# इंग्लंडांतील प्रवास

हा ग्रंथ

## करसनदास मुळजी

यांणीं




गुजरातींत केला

त्याचें

## भास्कर हरि भागवत

यांणीं

### दुसऱ्या आवृत्तीवरून भाषांतर केलें

तें पुष्कळ चित्रांसहित मूळग्रंथकर्त्यानें मुंबई सरकारच्या आश्रयानें छापून प्रसिद्ध केलें असे.

---

" सबी भूम गोपालकी, वामें अटक कहा ?
जाके मनमें खटक रही, सोही अटक रहा "

---

**मुंबई मध्ये;**

युनियन प्रेसांत नानाभाई रुस्तमजी राणीना यांणीं मालका करितां छापिला.

सन १८६७.

B

# TRAVELS IN ENGLAND

BY

# KARSANDÁS MÚLJI.

---

WITH NUMEROUS ILLUSTRATIONS.

TRANSLATED FROM THE

**SECOND GUJARATI EDITION**

BY

## BHÂSKAR HARI BHÂGWAT.

---

PUBLISHED UNDER THE PATRONAGE OF THE BOMBAY GOVERNMENT.

---

"THE EARTH IS GOD'S, WHERE CAN THE ATTAK LIE?
THE COWARD SHRINKS AND DARES NOT BURST THE TIE."




Bombay:

PRINTED BY N. R. RÁNINÁ AT THE UNION PRESS.

---

1867.

TO

# SIR H.B.E. FRERE, G.C.S.I., K.C.B.

LATE GOVERNOR OF BOMBAY,

WHO DURING A LONG INDIAN CAREER,
ESPECIALLY AS THE GOVERNOR OF THIS PRESIDENCY
PROVED A WARM FRIEND AND PATRON

OF

THE CAUSE OF EDUCATION
AND OF SOCIAL AND MORAL PROGRESS,

AND

WHO BY HIS KIND DISPOSITION AND GENUINE SYMPATHY
HAS ENDEARED HIMSELF TO ALL WHO KNOW HIM

This Volume

IS

WITH PERMISSION

MOST RESPECTFULLY AND GRATEFULLY

DEDICATED BY THE AUTHOR.




नामदार

# सर हेनूरी बार्टूल एड्वर्ड फ्रीयर साहेब,

जी. सी. एस्. ऐ, के. सी. बी.

मुंबईचे माजी गवर्नर

ज्यांणीं भरतखंडांत बहुतकाळ असतां त्यांत विशेष
करून या इलाख्याचे गवर्नर असतां

एतद्देशीय लोकांच्या
गृहस्थितीच्या सुधारणुकीस आणि विद्या व नीति यांच्या
वृद्धीस उदार आश्रय व उत्तेजन दिलें

आणि

जे सुस्वभावानें आणि दयार्द्र अंतःकरणानें
सर्वत्र प्रिय झाले आहेत,

त्यांस

ग्रंथकर्त्यानें त्यांची आज्ञा घेऊन
कृतज्ञतापूर्वक अति आदरानें

**हा ग्रंथ**

नजर केला असे.

This work owes its origin to the suggestion made by several friends and well-wishers of the country (among whom may be named Sir B. Frere) that a version of the author's *TRAVELS IN ENGLAND* in Marathi would prove useful and interesting to that section of his countrymen who spoke that tongue. The suggestion was made on the appearance of the first Gujarati Edition, a thousand copies of which were sold within a short time of its issue. Arrangements were therefore set on foot to carry it out in practice soon after it was enlarged and improved into the Second Edition. Of the merits or otherwise of the present work, the Marathi Public to whom it is offered, must be left to be the best judge. But the author may be allowed to state that he has tried his best to render it worthy of their approval and support. He begs to tender his best thanks to the Bombay Government, the Director of Public Instruction and those gentlemen who have given a very liberal support to this as well as the original work.

*24th October*, 1867.

——o——

ग्रंथकर्त्यानें "इंग्लंडांतील प्रवास" हा आपला ग्रंथ गुजराती भाषेंत छापून प्रसिद्ध केल्यानंतर, नामदार सर बार्टल फ्रीयर आदिकरून या देशाच्या कित्येक शुभचिंतकांनीं व इष्टांनीं असें सुचविलें कीं हा ग्रंथ मराठींत केला असतां महाराष्ट्र लोकांस मोठा उपयोगी व मनोरंजक होईल. मूलग्रंथाच्या थोड्याच दिवसांत हजार प्रती खपल्या, त्यावरून ग्रंथकारानें आपला ग्रंथ वाढवून आणि सुधारून त्याची दुसरी आवृत्ति तयार केल्यानंतर वरील सूचनेप्रमाणें करण्यास आरंभ केला. आतां हा ग्रंथ कसा उतरला आहे याविषयीं, ज्या मराठी लोकांस हा सादर केला आहे तेच यथायोग्य निर्णय करतील. परंतु हा त्यांस मान्य व आश्रयार्ह व्हावा एतद्विषयीं ग्रंथकर्त्यानें आपणाकडून तिळमात्र कसर केली नाहीं. ह्या ग्रंथास मुंबई सरकारानें, विद्याखात्याच्या डरेक्टरांनीं व संस्थानिक लोकांनीं व इतर गृहस्थांनीं उदारपणें आश्रय दिला ह्मणून ग्रंथकर्ता त्यांचे बहुत आभार मानीत आहे.



## भाषांतर कर्त्याकडून.

भाषांतराविषयीं एथें एक गोष्ट सांगितली पाहिजे. ती ही कीं मराठी आणि गुजराती या भाषांचा निकट संबंध व त्यांची भाषणपद्धति एकसारखी आहे यामुळें गुजरातीचें हें शब्दशः भाषांतर आहे असें कदाचित् कोणास वाटेल, परंतु तसें नाहीं. गुजरातीं भाषेंत जी शब्दयोजना आणि भाषणपद्धति चालते ती सर्वच मराठींत चालेल असें नाहीं. याजकरितां हें भाषांतर करितांना मूलग्रंथांतील अर्थ घेऊन त्याच्या भाषणपद्धतीकडेस लक्ष न देतां मराठी भाषेची रीति साधण्याविषयीं विशेष धोरण ठेविलें आहे. आणि साधारणतः भाषा प्रौढ आणि सुबोध करण्याविषयीं भाषांतरकर्त्यानें आपणाकडून होईल तितकी तजवीज केली आहे. तर हा ग्रंथ जसा गुजरातेंतील लोकांस मान्य होऊन त्यांणीं यास उदारपणें आश्रय दिला तसाच महाराष्ट्रांतील लोकांसही मान्य होईल अशी आशा आहे.



# PREFACE

On my return from England, it occurred to me that I could not do a better service to my countrymen than by laying before them, in this Volume, the various thoughts which suggested themselves to my mind during my visit to that country.

The Volume is divided into twelve chapters and each chapter treats of twelve subjects.

The first chapter is introductory to the work, delineating my first impressions of England, and the advantages of visiting that country; giving an account of the custom of visiting foreign lands prevalent among the ancient Hindus, and the causes which led to its discontinuance; and finally advocating the adoption of the same custom by the present generation.

The second chapter gives a brief description of the voyage between Bombay and London, (passing through France,) and of its various incidents.

In the third chapter I have attempted to give an idea of the external appearance of London,—its roads, bridges, parks, fountains, statutes; shops, gas-light, etc; and the thoughts suggested by these sights.

The fourth chapter describes the architecture of the private and public buildings of London; marking the difference between it and that of our Indian houses, especially in their forms of structure, with information about house rent in London, the probable cost of building a house and so forth. The importance of erecting houses of a better and more uniform structure in Bombay is also pointed out.

The most remarkable institutions of London, such as the British Museum, the Zoological Gardens, the Times Office, the Crystal Palace &c. have been enumerated in the fifth chapter; it is not easy to describe the advantages gained and the gratification experienced by a visit to these institutions.

In the sixth chapter I have endeavoured to give an account of some of the places of recreation and amusement in London. The knowledge, and entertainment which the sight of them afford have been particularly noticed.

The social or domestic state of England, so far as I have been able to understand it, I have laid before the reader in the seventh chapter. But to give a full and correct picture of the social life of Englishmen is, I must confess, beyond my powers. It is only with a view to give some faint idea of it to my countrymen, with the object of urging them

to reform their *own* social condition, that I have ventured to say something on the subject.

In the eight chapter I have spoken about the etiquette and various other usages of society of the people of England, which subject is doubtless as difficult to do justice to as that of the last chapter. My object, however, in saying any thing about it is to make my countrymen acquainted with some of the chief customs of Englishmen, that they may be the more able to maintain the interchange of socia and friendly cordialities with the latter.

The national characteristics of the people of England have been described in the ninth chapter. The most distinguishing traits in their character by which they have risen to pre-eminence in politics, arts, science, literature and commerce have been fully brought to view, and the importance of the same in the native character is particularly pointed out.

The causes of England's greatness are noticed in the tenth chapter. The events which have tended to the glory and enrichment of England have been treated in connection with the subject.

In the eleventh chapter I have attempted to give an idea of the POWER and CONSTITUTION of the British Government in a manner as to throw some light on those of my countrymen who are behind in knowledge of the subject.

The twelfth chapter closes the volume with a brief account of the visits I paid to some of the principal towns and places of England and Scotland, and the thoughts suggested by them.

I have introduced in this volume so much matter only as I have been able to bring within its compass from my own personal observation, study and experience during the visit. No part of the book is a simple translation from English authors. I have, of course, consulted numerous works and also quoted from some public writers and the speeches of His Excellency Sir Bartle Frere, as authorities in support of my statements.

It is my earnest request that my countrymen should give a patient and careful perusal to the volume, which will, I hope, create not only a desire to visit the great and glorious land of commerce, learning, liberty and benevolence, but the more important desire of raising themselves and their country to the same level.

# प्रस्तावना.

---

मी सन १८६३त इंग्लंडाचें पर्यटन करून परत आल्यावर मला असें वाटलें कीं या पर्यटनें करून माझ्या मनांत ज्या अनेक कल्पना आल्या आहेत त्या स्वदेशीय लोकांच्या सेवेंत सादर कराव्या, ह्मणून हा ग्रंथ तयार केला.

या ग्रंथाचीं बारा प्रकरणें केलीं आहेत आणि प्रत्येक प्रकरणांत बारा विषय आहेत.

पहिल्या प्रकरणांत उपोद्घात आहे. त्यांत विलायत देश पाहून मनावर प्रथम होणाऱ्या ग्रहाविषयीं, इंग्लंडास जाण्यापासून होणाऱ्या लाभाविषयीं, पुरातन काळीं हिंदु लोकांत प्रवास करण्याची चाल होती आणि ती मागाहून कां बंद झाली याविषयीं, आणि विलायतेस जाण्याविषयींचा प्रतिबंध मोडून टाकणें आवश्यक आहे याविषयीं लिहिलें आहे.

दुसऱ्या प्रकरणांत मुंबईहून फ्रान्सच्या मार्गानें लंडनास जातांना समुद्राविषयीं, आगबोटीविषयीं आणि वाटेस शहरें लागलीं त्यांविषयीं जें पाहण्यांत आलें तें संक्षिप्त रीतीनें वर्णिलें आहे, आणि त्यांवरून सुचलेले विचार प्रगट केले आहेत.

तिसऱ्या प्रकरणांत लंडन शहर कसें दिसतें—तेथील रस्ते, पूल, चौक, कारंजीं, पुतळे, दुकानें, धुराचे दिवे, लोकांची दाटी वगैरे कशीं दिसतात—हें लिहिलें आहे आणि तत्संबंधी कांहीं अभिप्राय दर्शित केले आहेत.

चौथ्या प्रकरणांत घरें आणि सार्वजनिक इमारती यांच्या रचनेविषयीं लिहिलें आहे. त्यांत आपल्या एथील घरांची रचना आणि विलायतेंतील घरांची रचना यांमध्यें किती अंतर आहे, व त्यांचा डौल कसा आहे; आणि लंडनांत घराचें भाडें किती पडतें व घर बांधावयास खर्च किती लागतो वगैरे सांगितलें आहे; आणि मुंबईमध्यें घरांतील जागा वाढवावी आणि प्रति आळींतील घरें एकाच डौलाचीं आणि दिसण्यांत एकसारखीं असावीं याविषयीं लिहिलें आहे.

पांचव्या प्रकरणांत लंडनांतील कितीएक प्रसिद्ध दर्शनीय स्थळीं कायकाय पाहण्यासारखें आहे, आणि तीं पाहून किती ज्ञान होतें व विचारशक्ति वाढते आणि किती नवे नवे विचार सुचतात हें सविस्तर वर्णिलें आहे.

सहाव्या प्रकरणांत लंडन शहरीं जीं मुख्यमुख्य प्रदर्शनें होतात त्यांचें वर्णन केलें आहे. त्यांतील कितीएक प्रदर्शनें पाहून मनुष्याचें मन किती संतुष्ट होतें तें थोडक्यांत सांगितलें आहे. हें सर्व पाहून जें ज्ञान व मनोरंजन होतें तें वाचणाराच्या ध्यानांत आणून देणें फार कठीण आहे, तथापि कित्येक प्रदर्शनगृहांमध्यें जें कांहीं पाहण्यासारखें आहे त्यांतील खुब्या मात्र थोडक्यांत सांगण्याविषयीं प्रयत्न केला आहे.

सातव्या प्रकरणांत, इंग्लंडच्या लोकांची गृहस्थिति कशी आहे याविषयीं ज्या कांहीं मुख्य त्रिना माझ्या अवलोकनांत आल्या त्या सविस्तर लिहिल्या आहेत. इंग्लिश लोकांच्या गृहसंबंधी स्थितीचें स्वरूप यथायोग वर्णण्याचें सामर्थ्य मजमध्यें नाहीं हें मला कबूल केलें पाहिजे. परंतु ह्या प्रकरणांत मीं जें कांहीं लिहिलें आहे तें एवढ्याच हेतूनें कीं स्वदेशीय लोकांस त्यांच्या उंच स्थितीचें कांहीं तरी ज्ञान होऊन त्यांस आपली गृहस्थिति सुधारण्याची इच्छा उत्पन्न व्हावी.

आठव्या प्रकरणांत इंग्लंडांतील लोकांचे शिष्टाचार व रीतिभाती

यांविषयीं लिहिलें आहे. हेंही काम कठीण आहे; परंतु मी एवढ्याच हेतूनें हें लिहिलें आहे कीं इंग्रज लोकांचे मुख्य मुख्य शिष्टोपचार आणि रीतिभाती स्वदेशीय लोकांस समजून यांस त्यांच्या मंडळींत मिसळून स्नेह जोडतां आणि वाढवितां यावा.

नवव्या प्रकरणांत इंग्रज लोकांचे सामान्य गुण वर्णिले आहेत. कितीएक मोठ्या गुणांनीं त्या देशाचे लोकांची राज्यप्रकरणांत, विद्याकळांत, आणि व्यापारांत वढती झाली आहे ते वर्णिले आहेत, आणि स्वदेशीय लोकांत त्यांची केवढी आवश्यकता आहे तें दर्शविलें आहे.

दहाव्या प्रकरणांत इंग्लंडाच्या महत्वाचीं मुख्य मुख्य कारणें निवेदिलीं आहेत. कितीएक कारणांचा संयोग होऊन इंग्लंडाचें महत्व आणि संपत्ति हीं वाढलीं आहेत. तीं कोणतीं तें वर्णण्याविषयीं प्रयत्न केला आहे.

अकराव्या प्रकरणांत त्या देशाचें सामर्थ्य आणि तेथील राज्यरीतीचा प्रकार हीं वर्णिलीं आहेत. आमचे बहुतेक लोक याविषयीं अनभिज्ञ आहेत, त्यांची समजूत पडावी अशा रीतीनें हें प्रकरण लिहिलें आहे.

मी इंग्लंड आणि स्कॉटलंड देशांतील किसेक शहरीं आणि गांवीं पर्यटन केलें त्याचें बाराव्या प्रकरणांत संक्षिप्त रीतीनें वर्णन केलें आहे, आणि त्यापासून सुचलेले विचार प्रगट केले आहेत. ह्या बाराव्या ह्मणजे शेवटल्या प्रकरणांत मी आपला प्रवास समाप्तीस आणिला आहे.

प्रवास, अवलोकन आणि अनुभव यांवरून इंग्लंडाविषयीं जें कांहीं माझ्या जाणण्यांत आलें त्यापैकीं या ग्रंथांत मावलें तितकेंच प्रविष्ट केलें आहे. यांत कोणत्याही इंग्रजी ग्रंथावरून भाषांतर केलेलें नाहीं. मी आपल्या ह्मणण्याचें आणि अभिप्रायाचें पुष्टीकरण करण्यासाठीं कितीएक ग्रंथकारांचें साहाय्य घेतलें आहे, आणि कितीएक प्रसि-

द्ध पुरुषांच्या आणि आपले माजी गवर्नर सर बार्ट्ल फ्रीयर साहेब यांच्या भाषणांतून उतारे घेतले आहेत.

माझी आपल्या देशबांधवांस अशी विज्ञप्ति आहे कीं त्यांणीं साव-काश मन लावून हा ग्रंथ वाचावा आणि याचा विचार करावा. या ग्रंथाचें विचारपूर्वक अवलोकन केलें असतां, इंग्लंडासारख्या समर्थ व पराक्रमी देशाचें पर्यटन करण्याची हौस आमच्या लोकांस येईल, आणि व्यापार, स्वतंत्रपणा, विद्या, कलाकौशल्य यांत स्वदेश इंग्लंडासारख्या उंच स्थितीप्रत पोंचविण्याविषयीं स्तुत्य उत्कंठा त्यांच्या ठायीं उत्पन्न होईल अशी मी मनापासून आशा बाळगीत आहें.



## CONTENTS.

### CHAPTER 1.

INTRODUCTION.



### CHAPTER II.

FROM BOMBAY TO LONDON.

## CHAPTER III.

### London—Its External View.



## CHAPTER IV.

### Private and Public Building

## CHAPTER V.

### Principal Institutions and Sights.



## CHAPTER VI.

### Places of Recreation and Exhibition.

## CHAPTER VII.

### Social State and Habits of the People.



## CHAPTER VIII.

### Etiquette and usages of Society.

## CHAPTER IX.

### General Character of the Nation.



## CHAPTER X.

### Causes of England's Greatness.

## CHAPTER XI.

### British Power and Constitution.



## CHAPTER XII.

### A Short Tour In Great Britain.

# अनुक्रमणिका.

## प्रकरण १.—उपोद्घात.



## प्रकरण २.—मुंबईहून लंडनापर्यंत.



D

## प्रकरण ३.—लंडन आणि त्याचा बाहेरील देखावा.



## प्रकरण ४.—खासगी घरें आणि सार्वजनिक इमारती.

## प्रकरण ५.—मुख्य मुख्य ज्ञानालयें व पाहण्याचीं स्थळें.



## प्रकरण ६.—विश्रांतिस्थळें व प्रदर्शनें.

## प्रकरण ७.—लोकांची गृहस्थिति आणि रीतिभाती.



## प्रकरण ८.—लोकांचे शिष्टाचार व रीति.

## प्रकरण ९.—इंग्रज लोकांचे सामान्य गुण.

पृष्ठ.



## प्रकरण १०.—इंग्लंडाच्या महत्वाचीं कारणें.

**प्रकरण ११.**—ब्रिटिश राज्याचें बळ आणि व्यवस्थेचा प्रकार.



**प्रकरण १२.**—विलायतेच्या प्रांतांतील पर्यटन.





# चित्रांची अनुक्रमणिका.

*List of Illustrations.*

लोखंडी पट्यावरचीं व शिला छापावरचीं.

## इलेक्त्रो—प्लेटीवरचीं.

लांकडावरचीं आणि लहान इलेक्ट्रो प्लेटीवरचीं.

पृष्ठ.

# इंग्लंडांतील प्रवास.

# TRAVELS IN ENGLAND.

---

## प्रकरण १.

## उपोद्घात.

### INTRODUCTION.

" सबी भूम गोपालकी, वामें अटक कहा;
जाके मनमें खटक रही, सोही अटक रहा."

सुधारणा, स्वतंत्रता आणि कलाकौशल्य यांविषयीं जो देश पहिली पदवी भोगीत आहे; व्यापार, उद्योग, संपत्ति आणि सामर्थ्य यांविषयीं जो देश बहुत प्रख्यात झाला आहे; आणि हिंदुस्थाना सारख्या आबाद, सुपीक व विस्तीर्ण भूमीवर जो देश सत्ता चालवीत आहे; त्या देशांत प्रवास करावा आणि तो देश डोळ्यांनीं पाहावा असें आज कित्येक वर्षें माझ्या मनांत होतें. हा मनोरथ ईश्वरकृपेनें पूर्ण झाला, आणि सन १८६३ त हा अति सुंदर देश माझ्या पाहण्यांत आला. हा पाहून माझ्या मनावर जो ग्रह झाला आणि जे विचार मनांत आले ते स्वदेशीय लोकांस कळविण्याजोगे आहेत असें समजून, हा ग्रंथ त्यांच्या सेवेंत प्रविष्ट करण्याची मी आज्ञा घेतों.

## १. मनावर प्रथमच होणारा ग्रह.

FIRST IMPRESSIONS.

हा देश पाहून मनावर प्रथमच जो ग्रह होतो त्याचें माझ्यानें वर्णन करवत नाहीं. आपल्या इकडचे देखावे आणि तिकडचे देखावे यांमध्यें इतकें अंतर आहे कीं कोणत्याच प्रकारें माझ्यानें त्यांची तुळणा करवत नाहीं. फ्रान्स देशांत जातांना वाटेनें प्रथम मार्सेल्स शहरांत पाऊल टाकलें ह्मणजे एका नव्याच सृष्टींत आलों असें मनास वाटतें. हारीनें बांधलेल्या मोठमोठ्या सुंदर हवेल्या; मोठे रुंद फरसबंदी रस्ते; गाड्या व गाडीं यांचा मोठा गडगडाट; जनरथ व घोडे जोडलेलीं मालाचीं गाडीं; सुंदर सोनेरी चकाकीदार हॉटेलें; बिलोरी दरवाजांचे चकचकीत काफीखाने व दुकानें; जागोजाग व रस्तोरस्तीं मोठीं घड्याळें व पाणी पिण्याचीं सुंदर उडतीं कारंजीं; फुलांचीं व रोपाचीं सुंदर दुकानें व मकाणें; लोकांस फिरायाला रस्ते व बगिचे; डोळे दिपवून टाकीत असे महाल व बाग; मन केवळ चक होऊन जाई असे त्यांमधील मोलवान् शृंगार व सामान; नाटकाचे व "ऑपिरा" चे खेळ व दुसरे तमासे; शोभायमान पूल व चौक; सुंदर देवळें व देवालयें; लोकांचा उद्योग, येणें जाणें व जमाव; आगगाडीचे रस्ते आणि विद्युत्तारा यांचा चहूंकडे पसारा. रात्रीस ग्यासलैट ह्मणजे धुराचे दिवे यांणीं केलेली लंका व नित्याची मोठी दिवाळी; रात्रीस ह्या मोठ्या प्रकाशानें डोळे दिपून जात असे लकलकीत व चकचकीत काफीखाने व दुकानें. हा सर्व प्रकार पाहून आपल्या इकडला प्रवासी प्रथमतः आश्चर्यानें अगदीं चक होऊन जातो. कांहीं वेळ त्यास भ्रांति पडते कीं मी स्वप्नावस्थेंत आहें कीं जागृदवस्थेंत आहें. मी खरेंच सांगतों कीं अशीच अवस्था माझी व माझ्या सोबत्यांची पहिल्यानें झाली. जेव्हां आह्मी मार्सेल्स

एथें एका उंच डोंगरावर फिरण्याची व बसण्याची जागा आहे तेथें संध्याकाळीं चढून पाहिलें तेव्हां आह्मास फार आश्चर्य वाटलें, आणि आह्मी एकमेकांस विचारूं लागलों कीं आपण पाहतों हें, सर्व खरें आहे कीं हें सगळें स्वप्नच?

## २. इंग्लंडांत पाहाण्यासारख्या वस्तु.

THINGS TO BE SEEN IN ENGLAND.

इंग्लंडांत पाहण्यासारख्या वस्तु किती व कशा आहेत हें माझ्यानें बरोबर सांगवत नाहीं. तेथें नव्या पाहण्याजोग्या व जाणण्याजोग्या असंख्य वस्तु आहेत. ह्या ग्रंथाच्या आरंभीं मी इतकेंच सांगतों कीं तेथील शहरांचें व गांवांचें बाहेरचें स्वरूप पाहण्यासारखें आहे. तेथील प्रसिद्ध घरें व ठिकाणें पाहण्याजोगीं आहेत. तेथील ज्ञान व गमतीचे कारखाने पाहण्यासारखे आहेत. तेथल्या लोकांची करमणूक व गमत पाहण्याजोगी आहे; तेथील लोकांची गृहसंबंधी स्थिति पाहण्यासारखी आहे; तेथील लोकांचा शिष्टाचार व चाल पाहण्यासारखी आहे. तेथील लोकांचा उद्योग, व्यापार, धंदा व कारभार पाहण्यासारखा आहे; तेथच्या लोकांचा निग्रह, साहस, व अभिमान पाहण्यासारखा आहे; तेथील लोकांचा देशाभिमान व स्वतंत्रता पाहण्यासारखी आहे; तेथल्या लोकांचें धैर्य, औदार्य आणि शौर्य पाहण्यासारखें आहे; तेथील लोकांची हिंमत, हुशारी व कौशल्य पाहण्यासारखें आहे; तेथल्या लोकांची विद्या, कला व राज्यरीति पाहण्यासारखी आहे. सारांश, त्या देशच्या प्रजेच्या आंगचे उत्तम गुण व तिच्या रीतिभाती पाहण्यासारख्या आहेत.

आणखी, इंग्लंडांत शेंकडो वस्तूंचे कारखाने पाहण्याजोगे आहेत. कापड, सूत, धोतर, जामदानी, चीट, लोंकर, रेशीम, गालिचे, कागद, बिलोरकाम, लोखंडकाम, लांकूडकाम व चिनई मा-

तीचीं भांडीं या अवध्याचीं यंत्रें व कारखाने पाहण्याजोगे आहेत. रंगण्याचे, धुण्याचे, धातु साफ करण्याचे, तेल काढण्याचे, यंत्रकाम तयार करण्याचे व ग्यासाचे कारखाने पाहण्यासारखे आहेत.

हें सर्व व दुसरें पुष्कळ पाहण्याजोगें आहे ह्मणून मी सांगितलें; परंतु त्यावरून सगळ्याच्या खुब्या वाचणारांच्या ध्यानांत येणार नाहींत. अंधारांतून एकाएकीं आपण सूर्याच्या उन्हांत जाऊन उभें राहावें आणि डोळ्यांवर उन्हाचा प्रकाश पडतो, त्याप्रमाणेंच ज्ञानरूपी प्रकाश प्रथम पाहणाराच्या मनावर पडतो. लंडनांतील ज्ञानाच्या व कर्मणुकीच्या स्थळांविषयीं वाचणारांच्या ध्यानांत कांहीं यावें ह्मणून हल्लीं मी एक दोन उदाहरणें देतों.

चला, आपण लंडन शहरांतील कोलोसिअम ह्या हवेलींत जाऊं. ह्या ठिकाणीं (कृत्तीनें केलेला) एक उंच डोंगर आपण पाहूं; ह्या डोंगरांतून पाण्याचा मोठा झोत उंचावरून पडतो तो पाहूं; ह्या च हवेलींत दुसऱ्या एका ठिकाणीं एक गुहा पाहूं; आणि तिसऱ्या एकाठिकाणीं उंच जागेवरून दिवसास लंडन शहराचा आणि रात्रीस पारीस शहराचा देखावा पाहूं. ह्या शहरांचीं पडद्यावर अशा रीतींनें चित्रें काढून चारही तरफ पडद्याची रचना अशी केली आहे कीं आपल्या नजरेस भूल पडावी, आणि या शहरांतील घरें, रस्ते, पूल, येतीं जातीं माणसें, गाड्याघोडे हीं हुबेहूब आपल्या दृष्टीस पडावीं. याच हवेलींत एका चवथ्या ठिकाणीं जाऊन पाहावें ह्मणजे लिस्बोन शहरांत मोठा धरणीकंप झाला आणि पुष्कळ सुंदर सुंदर हवेल्या कोसळून पडल्या व पुष्कळ माणसें चेंगरून मेलीं, त्या सगळ्याचें चित्र नजरेस पडेल. प्रथम लिस्बोन शहर दृष्टीस पडतें; तेथील सुंदर इमारतींची सुंदर रचना पाहण्यांत येते; समुद्रांत गलबतें चालतांना दिसतात; इतक्यांत धरणीकंपाचा मोठा गडगडाट होत आहे, ता

रवें वर येताहेत आणि खालीं जाताहेत अशीं दिसतात, आणि कित्येक जहाजें शेवटीं नाहींशीं होत आहेतशीं दिसतात. नंतर सुंदर हवेल्या एकाएकीं घडघडून खालीं पडताहेत; त्यांमध्यें कित्येक साफ जमीनदोस्त होऊन गेल्या आहेत, व कित्येक अर्ध्या मोडून वांकड्या होऊन राहिल्या आहेत असें पाहण्यांत येतें; हें सर्व पाहून आपली नजर अगदीं चकित होऊन जाते. या शिवाय दुसरी पुष्कळ गमत व मौज ह्या हवेलींतून नित्य रात्रदिवस पाहण्यांत येते. हें एका कोलोसिअम ह्या इमारती विषयीं मात्र सांगितलें.

लंडनांतील पोलिटेक्निक इन्स्टिट्यूट ह्यांत नित्य वीज, व रसायन शास्त्र आणि दुसऱ्या विद्यांचे मोठमोठे प्रयोग आणि चमत्कार पाहण्यांत येतात. मोठाल्या बुडी मारण्याच्या घांटेंत दोन तीन माणसें नमून वस्त्रांसहित पाण्यांत उतरत आहेत आणि पांच दाहा मिनिटें पाण्यांत राहून सुक्या वस्त्रांनीं बाहेर निघत आहेत. शत्रूचीं जहाजें पाण्याच्या खालून आग लावून कशीं जाळून टाकतात तें एथें पाहण्यांत येतें. पृथ्वी आणि तारे ह्यांची गति ही एथें दिसण्यांत येते. ह्याच हवेलींत दुसऱ्या एका ठिकाणीं भूतचेष्टेचा चमत्कार दृष्टीस पडतो. एक किमया करणारा आपल्या खोलीमध्यें विचारांत गडप होऊन पुतळ्याप्रमाणें खुरशीवर बसला आहे; इतक्यांत त्याचें मेलेलें नातलग पुनः जिवंत होऊन माणसाच्या आकारानें त्यापुढें उभें राहत आहे, आणि तो उठून जाऊन त्याच्या आंगावर हात ठेवणार, इतक्यांत तें एकाएकीं नाहींसें होतें. नंतर पुष्कळ वेळ तें दृष्टीस पडतें आणि तो त्यास धरावयास जातो तों त्याच्या हातीं वाऱ्याशिवाय कांहीं लागत नाहीं. आणि तो बिचारा पुनः निराश होऊन बसतो. त्यानंतर घोर अंधाऱ्या रात्रीप्रमाणें वाटतें, आणि मोठें वादळ व तुफान होत आहे असें दिसतें. तुफानाची गर्जना आणि वि-

जेचें चमकणें दृष्टीस पडतें, आणि एक भयंकर पिशाच टाळा पसरून येतें. याशिवाय दुसरी बहुत मौज व गमत या पोलिटेक्निक इन्स्टिट्यूटामध्यें करून दाखवितात.

तेथला क्रीमोर्न बाग घ्या. ह्या मोठ्या व सुंदर बागांत नित्य रात्रीस मोठी मौज होते. चारही तरफ दिव्यांची शोभा दिसते. वाद्यांचा मधुर ध्वनि निघत आहे; घोड्यांचा खेळ व मनुष्यांची कसरत चालली आहे; "ऑपेरा" याचे तमासे होताहेत आणि आकाशांतून यक्षिणी निराधार खालीं उतरून आल्या आहेत असें दिसतें. यक्षिणींचा मोठा मेळा मिळून व सुंदर वस्त्रें ल्याऊन, त्या मोठ्या कुशळ रीतीनें नाचताहेत. दुसरी कडून पुष्कळ दारू सुटत आहे. तें झालें कीं इग्लंडाच्या मागील राजांची स्वारी लश्करी डामडौलानें निघते. त्यावेळीं तमासे करणाऱ्या लोकांचा मोठा समुदाय, भरधांव घोड्यांवर बसून भाला घालून बारीक बारीक कड्या काढून घेण्याची कसरत, आणि शेवटीं तरवारींची झटापट होते ती पाहण्याजोगी आहे. याखेरीज दुसरी गमत ह्या बागांत रोज दृष्टीस पडते.

झुआलॉजिकल गार्डन्स (म्हणजे प्राणिसंग्रहालय) यांमध्यें जावें म्हणजे तेथें सर्व जातींच्या जिवंत पशुपक्ष्यांचा मोठा संग्रह केला आहे तो दृष्टीस पडेल. लहान बकरीपासून तों मोठा सिंह, वाघ, व हत्ती यांपर्यंत अनेक जातींचीं चतुष्पदें पाहण्यांत येतील. अनेक जातींचे वानर, अनेक जातींचे सर्प, अनेक जातींचे पोपट व अनेक जातींचे मासे नजरेस पडतील. हीं व दुसरीं अनेक जातींचीं जनावरें जीं मोठ्या अरण्यांत गेल्यावांचून अथवा पृथ्वीच्या चारही खंडांत गेल्यावांचून दृष्टीस पडावयाचीं नाहीत तीं सर्व याठिकाणीं पाहण्यांत येतात. एकेक जनावर एकेक मिनिट पाहत राहिलें तरी ही सगळ्या दिवसांत सर्व जनावरें पाहून होणार नाहींत. याप्रमाणेंच आ-

णखो ब्रिटिश म्यूझिअम ( म्हणजे पदार्थसंग्रहालय ) अथवा बिलोरी महाल यामध्यें जाऊन पाहिलें तर, लाखो जातींच्या तऱ्हतऱ्हेच्या पदार्थांचा संग्रह केला आहे तो दृष्टीस पडेल, आणि ते सर्व नीट पाहण्यात एक आठवडाहीं पुरणार नाही.

## ३. इंग्लंडच्या लोकांची परदेशस्थांवर ममता.

BRITISH KINDNESS TOWARDS FOREIGNERS.

इंग्लंडचे लोक कसे आहेत व ते परदेशीयांवर कशी ममता करतात असें पुसाल तर, याचें उत्तर मी असें देतों कीं ते फार भले व ममताळू आहेत, आणि परदेशस्थांवर प्रीति व ममता करण्याविषयीं त्यांची प्रशंसा आहे. हें ह्मणणें कांहीं सर्व इंग्रजांस सारखें लागू पडत नाहीं. कारण कित्येक इंग्रज लोक असे वाईट व ठक आहेत कीं ते आपल्या देशांतल्या हलक्या व ठक लोकांला एकीकडेस बसवतील. परंतु त्यांतले वरच्या प्रतीचे लोक बहुतकरून मायाळू व भल्या स्वभावाचे असतात. आपण रस्त्यांत वाट चुकलों आणि कोणा भल्या इंग्रजास वाट विचारली तर, तो आपलें स्वताचें काम टाकून नीट वाटेस लावण्यास आपणाबरोबर येईल. त्यांबरोबर गाडींत बसलें तर कित्येक बोलक्या स्वभावाचे आहेत ते आपला देश, जातपात, विचारून आणि दुसरें भाषण करून आपलें मनोरंजन करतील. पण बोलके नव्हत व गंभीर स्वभावाचे असे लोक अधिक पाहण्यांत येतात. ते ओळखीवांचून आपणाबरोबरर बोलत नाहींत यावरून त्यांविषयीं आपण वाईट तर्क केला तर ती मोठी चूक होईल.

एकदां कोणा भल्या व वजनदार इंग्रजाबरोबर आपली ओळख झाली, आणि ती ओळख कोणा तशाच आबरूदार गृहस्थाच्या मार्फत झाली असली, तर मग भल्या इंग्रजांचा भलेपणा व ममताळु-

पणा यांची खुबी एकदम आपणास समजेल. ते आपलें स्वताचें कुटुंब व स्नेही ह्यांची व आपली ओळख करून देतील, आणि मग तीं आपणास किती चाहतात, आपणावर केवढी प्रीति करतात, आणि आपलें व आपल्या देशाचें किती कल्याण चिंतितात तें आपल्या पाहण्यांत येईल. ह्या देशांतील इंग्रजांवरून तेथील (इंग्लंडांतील) इंग्रजांविषयीं तर्क बांधला तर मोठी चूक होईल. ह्या देशांत मिशनरी ह्मणजे पाद्री आणि प्रतिष्ठित व कुलीन जे इंग्रज येतात ते या देशांतील लोकांस चाहतात आणि त्यांच्या कल्याणार्थ श्रम करितात. परंतु इतर आहेत ते स्वार्थावर लक्ष देऊन एत्तद्देशीय लोकांकडे करडी नजर ठेवितात. त्यांच्या मनास या देशची गरम हवा बाधते आणि त्यामुळेंच त्यांची तब्यत ही गरम होऊन जाते. यास्तव या देशच्या इंग्रजांवरून तेथील इंग्रजांचा तर्क बांधला तर मोठी चूक होईल. जो इंग्रज एथें भला तो तेथें तर त्याहून ही भला होतो. ते आपणास परदेशी जाणून आपणावर विशेष ममता करतात, आणि योग्य रीतीनें आपणास मदत व सल्ला देतात.

### ४. इंग्लंडची हवा दुःसह अशी नाहीं.

CLIMATE NOT UNFAVOURABLE TO NATIVES OF INDIA.

इंग्लंडची हवा कशी आहे व ती आपल्या लोकांस सहन होईल किंवा नाहीं असें विचारलें तर, त्याचा जबाब हा कीं तेथील हवा थंड खरी, परंतु ती आपल्या लोकांस सहन न होई अशी नाहीं. तेथील थंड हवेंत नित्य फिरण्यासंवरण्याचा अभ्यास ठेवला पाहिजे, ह्मणजे ह्या देशांतल्या पेक्षांही अन्नास रुचि अधिक येते, आंगांत सामर्थ्य येतें, आणि शरीराचा रंग ही कांहींसा फिरून चांगला दिसूं लागतो. मला तेथल्या हिंवाळ्याचा अनुभव नाहीं, कारण ज्यांला छातींत रोग

अथवा क्षय आहे त्यांला हिंवाळ्यांत त्या देशामध्यें राहण्याची सल्ला ते-थील वैद्य लोक देत नाहींत. याजकरितां मला छातींत रोग असल्या-मुळें हिंवाळ्याच्या अगोदर परत यावें लागलें. तरीही सुमार ६ महि-ने मी इंग्लंडांत होतों, तितक्या काळांत माझी प्रकृति पुष्कळ सुधर-ली. रावसाहेब महीपतराम रूपराम हे सन १८६० त तेथला कड-क हिंवाळा खाऊन आले, परंतु ते शरीरानें पहिल्यापेक्षां पुष्ट व श-क्तिमान् झाले होते. मी आल्यानंतर इंग्लंडांत हिंवाळ्याची थंडी ज-बरदस्त पडली, तथापि माझ्या बरोबरच्या एका सोबत्यानें मला लि-हिलें कीं ह्या थंडीपासून मला कांहीं इजा झाली नाहीं. ह्याशिवाय दुसरे हिंदु, पारशी, व मुसलमान आज कित्येक वर्षें इंग्लंडांत राहता-हेत आणि त्यांच्या शरीरीं आराम आहे, ह्यावरून सिद्ध होतें कीं ते-थील हवा एतद्देशीय लोकांस सोसे अशी आहे.

तेथील घरांमध्यें अशी व्यवस्था असते कीं एका घरांत एकच स्व-यंपाकघर असतें, म्हणून सर्व घर भाड्यानें घ्यावें लागतें. आणि अ-शीं घरें आंतील सामानासुद्धां अथवा सामानाशिवाय पुष्कळ रिकामीं असतात, आणि आपणास तोलतील तशीं लहान मोठीं सहज भा-ड्यानें मिळतात. दर घरांत नळ घालून नदीचें पाणी आणलेलें असतें, त्यामुळें पाणी आणण्या करण्याची तर मुळींच अडचण पडत नाहीं. बहुत करून सर्व जातीचें धान्य मिळतें. तुरींची डाळ व कां-हीं जातीचें कडदण इतकें मात्र मिळत नाहीं. एका जातीचा वा-टाणा येतो तो तुरींच्या डाळीसारखा खायाला लागतो. कित्येक जातींची शाकभाजी मिळते, आणि ती शहरांतल्या दर एका तुक-डींतल्या दुकानांवर विकते. जे शाकभाजी विकतात ते मांस वगैरे विकीत नाहींत इतकेंच नाहीं, तर त्यांचीं दुकानें ही बहुतकरून नि-राळीं असतात. "कोवंट गार्डन" नांवाचा एक मोठा बाजार दररो-

ज सकाळीं भरत असतो, त्यांत शाकभाजी, फुलें, फळें व अनेक जातींच्या वनस्पति यांखेरीज दुसरें कांहींच विकीत नाहींत. आपल्या देशांतल्या लोकांस पाहिजे तसा सर्व मसाला मिळत नाहीं, आणि औषधाच्या दुकानांत मिळतो तो फार महाग. तो एथूनच घेऊन गेलें पाहिजे, अथवा दर खेपेस आणवला पाहिजे.

कित्येक अशी धास्ती बाळगतात कीं ह्या थंड देशांत नुसत्या धान्यावर आणि शाकभाजीवर निभाव लागणार नाहीं, ह्मणून मांस खाल्लेंच पाहिजे. किती एक इंग्रज लोकही असेंच मानतात, आणि म्हणतात कीं ह्या शीत देशांत मांस भक्षणावांचून चालणार नाहीं. मलाही कित्येकांनीं अशीच धास्ती घातली होती. परंतु याविषयीं ग्रान्ट कालेजाचे डाक्तर पीट यांणीं, आणि इंग्लंडास जाऊन आलेले माझे मित्र डाक्तर मन्चरजी बैरामजी कोला यांणीं प्रथमपासूनच माझी खातरी केली कीं ही धास्ती बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. इंग्लंडामध्यें कित्येक "वेजिटेरियन" म्हणविणारे आहेत ते कोणत्याही प्रकारें मांस भक्षण करीत नाहींत. असे इंग्रज त्या देशांत फारच थोडे आहेत हें खरें, परंतु ते धान्य, शाकभाजी आणि दूध यांवरच आपली गुजरण करितात हें कांहीं खोटें नव्हे. या देशांतील वॉल्श नामक एका प्रसिद्ध डाक्तरानें छातींतल्या दुखण्यामुळें मला हिंवाळ्याच्या पूर्वींच एथून निघून जावें असें मत दिलें, त्याबरोबर याविषयीं त्याणें आपला अभिप्राय कळविला आहे तो अगत्याचा समजून, त्याच्या चिटीची नकल मी एथें दाखल करितों. तिजवरून याबाबद कोणालाही संशय राहणार नाहीं. सन १८६३ च्या एप्रिल महिन्याच्या आरंभीं मी इंग्लंडास जाऊन पोंचलों, त्यावेळेस ह्या डाक्तरानें माझी छाती तपासून पाहिली होती. नंतर जुलई महिन्याच्या अखेरीस ती पुनः तपासून पाहून खालीं लिहिल्याप्रमाणें मत दिलें.

MY DEAR SIR,

I have very fully considered all the circumstances of your case and am of opinion it would not be safe for you to winter in this country, or in any country even nearly similar in dampness and variability of climate. Although the affection of the upper part of your left lung has not grown in the least worse since your arrival in London (indeed it has rather improved), I feel certain that it would be excited into morbid and dangerous activity by the wet and cold of our winter season. I advise you then to return to Bombay.

But I can not help remarking, *en passant,* how completely you have in your own person demonstrated that natives of India are capable of living in England on the vegetable diet to which they are accustomed in their own country. You have actually thriven upon it here,—you are stouter than when I first saw you. In this respect you differ in nowise from the native vegetarian of Great Britain, who, as is well known, is generally speaking plump and well nourished.

37, Queen Anne Street;
Cavendish Square.
*July* 26, 1863.

Believe me
&c. &c.
W. H. WALSHE.

(याचा अर्थ.)

"महाराज,

"तुमच्या दुखण्याच्या सर्व गोष्टींचा मी पुरा विचार केला आणि "मला असें वाटतें कीं ह्या देशांत किंवा ह्याचप्रमाणें सर्द व घडीघडी "ज्याची हवा बदलून जाणारी अशा कोणत्याही देशांत तुह्मास "हिंवाळ्यांत राहणें निर्भय नव्हे. तुह्मी इंग्लंडांत आल्यापासून तुम- "च्या डाव्या फफुसांतलें वरच्या बाजूचें दर्द वाढलें तर नाहींच, उ-

"लटें तें अंमळसें बरें झालें, तरी मला खचित असें वाटतें कीं आ-
"मच्या एथल्या सर्द व थंड हवेनें तें वाढून भयंकर होईल. यास्तव
"तुह्मी मुंबईस परत जावें अशी मी तुह्मास सल्ला देतों.

"परंतु ह्या ठिकाणीं माझ्यानें हें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं कीं
"हिंदुस्थानच्या ज्या लोकांस आपल्या देशांत धान्य व शाक भाजी
"हींच खाऊन राहण्याची सवई झाली आहे, त्यांला त्याच पदार्थांवर
"इंग्लंडांत आपला निर्वाह करतां येईल ही गोष्ट तुमच्याच उदाहर-
"णावरून पुरी सिद्ध होते ह्या देशांत तुह्मी त्यांवरच निर्वाह करीत
"आहां, आणि मी तुह्मास प्रथम पाहिलें त्यापेक्षां आतां मजबूत
"झालां आहां. या बाबतींत ग्रेट ब्रिटनांतले "वेजिटेरियन" (ह्मणजे
"धान्य व शाक भाजीच खाऊन राहणारे) ज्यांच्या शरीराचें पोषण
"चांगल्या रीतीनें होतें आणि जे बहुतकरून शरीरानें पुष्ट असतात,
"त्यांमध्यें आणि तुह्मामध्यें कांहीं भेद नाहीं."

ह्या शीतळ देशाच्या शीतळ हवेंत न्हाण्याधुण्यास अडचण पडत असेल असें कदाचित् वाटेल, परंतु तसें कांहीं नाहीं. नदीवर अथवा विहिरीवर उघडया जागीं न्हातां येत नाहीं, परंतु न्हाण्या धुण्याच्या बांधलेल्या ठिकाणीं किंवा घरामध्यें न्हाण्याधुण्याच्या बांधलेल्या खो-लींत न्हाण्यास कांहीं हरकत नाहीं. तेथील लोक बहुतकरून दर-रोज न्हात नाहींत, एका दिवसाआड, चारचार दिवसांनीं अथवा आ-ठाठ दिवसांनीं जशी ज्यांस सोय पडेल तसे ते न्हातात. ज्यांचा नित्य स्नान करण्याचा नियम असतो त्यांस तसें करण्यास कांहीं अडचण पडत नाहीं. पंजाबचा माजी राजा रणजीतसिंग याची विधवा राणी चंदाकुंवर चार वर्षें इंग्लंडांत होती. ह्या राणीविषयीं असें समजण्यांत आलें आहे कीं ती नित्य दोनवेळ स्नान केल्यावांचून अन्न खात नसे. हिचा पुत्र दिलीपसिंग हा ख्रिस्ती धर्म पाळतो, परंतु तिचा स्वतः

हिंदुधर्मावर (तिच्या विचाराप्रमाणें) इतका दृढभाव होता कीं स्नान केल्यावर आपल्या पुत्राचें तोंड दृष्टीस पडलें, तर ती पुनः स्नान करीत असे, किंवा अन्न घेतल्या वांचून राहत असे. असें सांगतात कीं ज्या दिवशीं ही राणी इंग्लंडमध्यें मरण पावली त्याच दिवशीं कायतें तिनें स्नान केल्यानंतर आपल्या पुत्राचें तोंड पाहिलें, आणि त्यामुळें ती तशीच उपाशी राहिली होती.

इंग्लंडामध्यें आपल्या पोशाकांत कित्येक फेरफार अवश्य करावे लागतात. फ्लानलचीं व बनातीचीं ऊबदार वस्त्रें घेतलीं पाहिजेत, व इजार व गरम मोजे यांवांचून तर चालतच नाहीं. ह्याशिवाय दुसरे फेरफार करण्याची गरज नाहीं. आपलें पागोटें व आपल्या देशच्या तऱ्हेचा डगला किंवा अंगरखा घालण्यांत त्या देशांत विशेष भूषण व मान आहे. अर्थात् अज्ञान लोकांस आपला पोशाक विचित्र दिसतो, आणि आपल्या पोशाकावरून ज्याचीत्याची आपणाकडेस नजर लागते, परंतु त्यामुळें कांहीं अडचण होत नाहीं. तेथील पुष्कळ गृहस्थांस आपण आपल्या देशचा पोशाक केलेला पाहण्यास आवडतें.

जातां येतां वाटेनें आगबोटीमध्यें कांहीं अडचण पडते, हें कोणाच्यानें नाहीं ह्मणवणार नाहीं. परंतु मुंबईहून कलकत्त्यास आणि आदनास जातांना आगबोटींत अथवा गलबतांत हिंदुलोकांस जी अडचण सोसावी लागते तिजहून इंग्लंडास जातांना कांहीं अधिक अडचण पडत नाहीं. मार्सेल्स एथें पोंचण्यास बहुतकरून पाऊण महिना लागतो, परंतु आरब लोकांच्या जहाजांतून मोझांबिक व आफ्रिकेच्या किनाऱ्यावरल्या दुसऱ्या ठिकाणीं हिंदुलोक जातात त्यांस याहूनही अधिक दिवस लागतात आणि अधिक अडचण भोगावी पडते. ज्या आगबोटींतून मी विलायतेहून मुंबईस आलों, त्याच आगबोटींत आदन एथून आलेले सुमारें सात वाणी उतारू होते. वे

"डेक" ह्मणजे अगदीं खालच्या प्रतीचे उतारू होते, ह्मणून त्यांला अडचण पडत असे ती आमच्या पेक्षां फारच अधिक. ज्या ठिकाणीं त्यांस जागा दिली होती त्या ठिकाणीं इंग्रजी खलाशी लोक त्यांच्या फराळास व पाण्यास घडी घडी शिंवत असत, आणि ते जस जसे अधिक सोंवळें करायास जात तसतसे ते त्यांस अधिक चिडवीत. ते खायाला बसत तेव्हां डोकीवरून कांहींतरी वस्त्र घेत, तें पाहून इंग्रजी खलाशांस तर गमतच वाटे, आणि ती गमत अधिक करण्यासाठीं ते तें वस्त्र हळूच काढीत, त्यामुळें त्यांच्या फराळास व पाण्यास वारंवार शिवाशीव होत असे. पहिल्या वर्गांतून जाणाऱ्यांस याचा दशमांश देखील अडचण अथवा त्रास काढावा लागत नाहीं.

## ६. इंग्लंडांत प्रवास करण्यापासून लाभ.

### ADVANTAGES OF VISITING ENGLAND.

इसवी सन १८५२ त बुद्धिवर्धक सभेंत मी देशाटणावर निबंध वाचला होता, आणि तो त्या सभेनें छापून प्रसिद्ध केला होता. त्या निबंधांत देशाटणापासून होणारे लाभ दाखवण्याचा मी यत्न केला होता. आतां याविषयीं माझी खातरजमा झाली आहे कीं कोणीही माणसानें हरएक वस्तूचा स्वतः अनुभव घेतल्यावांचून तींतली खरी खुबी त्यास समजत नाहीं; आणि खरी खुबी समजल्यावांचून तो त्या खुबीचें वर्णन करूं अथवा त्या वस्तूपासून होणारे लाभ दाखवूं लागला तर तें काम योग्य रीतीनें त्याकडून होत नाहीं.

मी प्रथम सांगितलेंच आहे कीं कोणताहि देश प्रत्यक्ष पाहिल्यानें जो संतोष होतो त्याचें वर्णन करतां येत नाहीं. इंग्लंड पाहणाऱ्याच्या मनांत पहिल्यानें असें आल्यावांचून राहतच नाहीं कीं ज्या कोणी मनुष्यानें ह्या पृथ्वीवर जन्म घेऊन असा देश कधीं पाहि

ला नाहीं त्याणें कांहींच पाहिलें नाहीं असें समजावें. "विहिरींतला बेडूक विहीर हेंच जग असें समजतो, त्या बिचाऱ्यास बाहेर काय आहे तें कळत नाहीं." आपले देशबंधु विहिरींतल्या बेडकाप्रमाणें आपला देश हेंच जग मानून बसून राहतील तोंपर्यंत आपला देश विद्या, कलाकौशल्य आणि सर्व जातींची सुधारणा यांत किती मागें पडला आहे हें त्यांला कळणारच नाहीं. ज्यांला ईश्वरानें द्रव्याची अनुकूलता दिली आहे त्यांणीं जन्मास येऊन सुधारलेल्या देशांत एकादां तरी पर्यटण अवश्य करून ज्ञान आणि संतोष हीं प्राप्त करून घ्यावीं हें योग्य आहे.

अहो, सुंदर, आणि मन चक्क होऊन जाई आणि कधीं दृष्टीस न पडणारी, अशी मौज आपल्या डोळ्यांसमोरून जात असली तर असा कोण मंदभागी आहे कीं त्या वेळीं आपले डोळे झांकील? अशा वेळीं कोणी आपल्या डोळ्यांवर हात धरूं लागला तर आपण तें सहन करूं काय? तर अशाच चकित करून टाकणाऱ्या शेंकडो व हजारो मौजा ज्या स्वप्नांत देखील दिसावयाच्या नाहींत आणि ज्यांचें वर्णन करतां येत नाहीं, त्या पाहण्याची हौस थोडी असावी काय? मी कांहीं तुह्मास भुलथाप देण्याकरितां लिहीत नाहीं, तर तेथें जाऊन आलेले आपले इतर देशबंधुही याविषयीं आपली अशीच खातरी करतील.

विद्यासंबंधी लाभ.—सुधारलेल्या देशांत प्रवास करणें हें चांगल्या विद्याभ्यासास आवश्यक आहे, व असें केल्यावांचून विद्याभ्यास पुरा झाला असें समजत नाहींत. ज्या शेंकडो व हजारो वस्तूंविषयीं आपल्या वाचण्यांत व ऐकण्यांत येतें, त्या प्रत्यक्ष पाहिल्यावांचून त्यांचें वास्तविक ज्ञान होत नाहीं. त्या सर्व अथवा बहुतेक वस्तु या ( विलायत ) देशांत दृष्टीस पडतात, आणि त्यांचें वास्तविक ज्ञान होतें.

कित्येक वस्तु माझ्या वाचण्यांत व ऐकण्यांत आल्या होत्या त्यांच्या स्वरूपाविषयीं मी अल्पबुद्धीनें आपल्या मनांत तर्क बांधला होता, तो किती खोटा हें त्या वस्तु डोळ्यांनीं पाहिल्यावरून समजलें. सुधारलेल्या देशांत प्रवास केल्यानें तेथील लोक विद्येंत व कलाकौशल्यांत किती पुढें गेले आहेत हें प्रत्यक्ष कळतें. आपला देश आणि आपण किती पाठीं पडलों आहों हें हा (इंग्लंड) देश डोळ्यांनीं पाहिल्याखेरीज कोणाही पुरुषाच्या ध्यानांत वास्तविक येणार नाहीं.

मला तर असें वाटतें कीं कापसाच्या योगानें आपली आबादानी झाली आहे व सुधारणुकीच्या मोठमोठ्या गोष्टी आपणामध्यें होत आहेत, व मुंबईंत कित्येक जातींचे कारखाने व कंपन्या झाल्या आहेत, व मुंबईच्या शोभेंत फेरफार होत आहे, तरीही सुधारलेला काळ व सुधारणुकीची गति यांत आपण प्रतीवर्षीं अधिकाधिक मागें पडत जात आहों. हीं अगोदरच आपणास पाठीं टाकून बहुत पुढें गेलीं आहेत, आणखी आगगाडीच्या वेगानें दरवर्ष पुढें चाललीं आहेत आणि आपण व आपला देश बैलांच्या खटाऱ्यांत बसून धक्के खात खात "तीन दिवसांनीं एककोश" याप्रमाणें जात आहों. जोंपर्यंत विद्या व कलाकौशल्य यांच्या वाटेवर लोखंडी सडक बांधून आपण आगगाडीच्या वेगानें पुढें जाणार नाहीं, तोंपर्यंत दरवर्ष आपण अधिकाधिक मागें पडत जाऊं.

आपल्या देशांत कलाकौशल्य कोणत्या स्थितींत येऊन पडलें आहे हें सर्व जाणतात. एका बारिक सुईपासून किंवा टांचणीपासून तों अंगावर घेण्याच्या वस्त्रांपर्यंत आपणाला लागणाऱ्या बहुतकरून सर्व वस्तूंविषयीं आपण इंग्लंड व दुसरे सुधारलेले देश यांचें अवलंबन करीत बसलों आहों, आणि आपल्या देशांतून कसबाचा दिवसानुदिवस लोप होत चालला आहे. इतकें बरें आहे कीं ईश्वरानें उदार ह

स्तें करून ह्या देशावर कृपा केली आहे आणि हा फलद्रूप केला आ-हे, आणि दयाळू इंग्रज सरकारच्या सत्तेंत दिला आहे, तेणेंकरून धंदा रोजगार व द्रव्य यांच्या बाबतींत आपली स्थिति सुधरली आहे; परंतु ईश्वराच्या सहाय्याबरोबर आपल्याकडूनही उद्योग झाला व वा-ढला पाहिजे.

इंग्लंडचा कारागीर नित्य विचार करीत असतो कीं कांहींतरी न-वी युक्ति किंवा नवी रीति शोधून काढावी, नाहींतर माझा शेजारी मला मागें टाकून आपण पुढें जाईल. अशी ईर्ष्या व हिंमत तेथील दरएक कारागीर बाळगतो; आणि दरसाल शेंकडो कारागीर नव्या युक्ति काढून पेटंट ( ह्मणजे ही चीज दुसऱ्या कोणी करूं नये ह्म-णून सरकारी पट्टे) मिळवतात, आणि लाखो रूपये कमावतात. अहो, अशी स्पर्धा आणि चढाचढी आपल्या देशांतले कारागीर कधीं कर-तील ! युरोपचे लोक कलाकौशल्यांत कसे व किती पुढें गेले आहेत आणि त्यांणीं किती नव्या युक्ति व कला काढल्या आहेत हें प्रथम आपल्या कारागिरांस समजलें पाहिजे. हें सर्व डोळ्यांनीं पाहिल्यावां-चून त्यांस कोठून कळणार? काय, आपल्या देशांतील कारागिरांमध्यें बुद्धि कमी आहे ? नाहीं, बुद्धि तर पुष्कळ आहे, परंतु तिला शिक्षण पाहिजे. जसा एकादा अमूल्य हिरा मातींत पडून झांकून राहतो, तसे आपल्या देशचे अशिक्षित कारागीर स्वदेशच्या कोनाकोनप्यांत पडून राहिले आहेत, आणि त्यांच्या बुद्धीवर घट्ट चिखलाचा पापदरा बसून गेला आहे.

तर आपल्या देशांतल्या क्षीण झालेल्या कलाकौशल्याचा जी-र्णोद्धार करण्यास कांहींच उपाय नाहीं काय? आपल्या देशांतला कोणी प्रामाणिक व उद्योगी कारागीर अथवा विद्यार्थी कोणत्याही जातीची कला अथवा कोणतीही विद्या शिकण्याकरितां सुधारलेल्या

देशांत जाऊं इच्छीत असला, तर त्यास कमी व्याजानें जरूरीचा तितका पैसा देण्यासाठीं म्हणून एक कंपनी मुंबईंत काढण्याची तजवीज चालली होती. परंतु तें काम हल्लीं पडून राहिलें आहे असें वाटतें. तें पुनः उंचललें पाहिजे. या कामास हिंदु, पारशी, मुसलमान सर्व जुडले पाहिजेत. ज्यांच्या पुढारीपणानें व मेहनतीनें हें मोठें काम पार पडेल त्यांचे स्वदेशावर व स्वदेशीय लोकांवर मोठे उपकार होतील.

गृहस्थितिसंबंधी लाभ—सुधारलेल्या देशांत गेल्याआल्यानें आणि तेथील लोकांबरोबर संघटण पाडल्यानें आपल्या गृहसंबंधी स्थितींत जशी सहज रीतीनें सुधारणा होईल तशी दुसऱ्या कोणत्याही मार्गानें होणार नाहीं. लोकांच्या चालू रीतिभातींत नुसत्या उपदेशानेंच फेरफार होणें फार कठीण आहे. एकमेकाच्या देखोदेखीनें जितकी सुधारणा होईल तितकी दुसऱ्या रीतीनें होणार नाहीं. “जशी संगत तशी बुद्धि” ही म्हण कांहीं खोटी नाहीं. आणि सत्संगतीनें चांगले गुण लागतात व कुसंगतीनें वाईट गुण लागतात, ही गोष्ट कोणाच्यानें खोटी करवणार नाहीं.

पाहा, देखोदेखीनें आपणास न समजतां, आपल्या आणि आपल्या बायकांच्या पोशाकांत केवढा फेरफार होत चालला आहे. जे मोजांचा व बुटां (इंग्रजी जोड्यां) चा धिःकार करीत असत तेच आपण ते घालूं लागले आहेत; जड आणि बेडौल दागिने जाऊन बारीक आणि हलके दागिने चालू होऊं लागले आहेत. हें सर्व कशानें? अमक्या एकानें पांयांत मोजे घातले म्हणून लोक कांहीं दिवस त्याची टींका करून उगे राहिले, तर आतां दुसऱ्यानें तसें कां करूं नये? याप्रमाणें एकमेकाचें पाहून कोणतेंही चांगलें अथवा वाईट काम जसें सहज रीतीनें होतें तसें दुसऱ्या कोणत्या प्रकारें होत नाहीं.

आपल्या कित्येक खराब चाली ह्या सुधारलेल्या देशांतील सुधारलेल्या लोकांत बिलकूल पाहण्यांत येत नाहींत. यावरून त्यांची गृहसंबंधी स्थिति आपल्या स्थितीपेक्षां किती चांगली आहे हें ध्यानांत येईल. ह्या स्वतंत्र भूमीचा स्वातंत्र्यरूप वारा एकदां खाल्ला म्हणजे देवभोळेपणाच्या चालींच्या बंधनांतून मुक्त होण्याची स्वाभाविकच उत्कंठा होते. सर्व पृथ्वीवर इंग्लंड देश स्वतंत्रतेविषयीं विख्यात आहे आणि तेथील स्वातंत्र्याचा वारा एकदां खाल्ला म्हणजे जातीच्या बंधनांतून मुक्त होण्याची कल्पना लागलीच मनांत येते. माझ्या एका मित्राचा मुलगा जो मुंबईंत असतां आपल्या बापाजवळ सहज बोलण्यास भीत असे, तोच (विलायतेहून) सुधारणुकीसंबंधी आपले विचार पित्यास कसा मर्यादापूर्वक परंतु स्पष्ट रीतीनें कळवतो आहे पाहाः—

"रिकाम्या मसलती करीतच आमचे लोक किती दिवस राहणार? चांगल्या गोष्टींविषयीं तोंडानें उपदेश करावा आणि हातानें तर कांहीं करूं नये असें कोठपर्यंत करणार? बाबा, हे विचार मी प्रगट करतों म्हणून मी फार धीट झालों असें समजू नका. खरें धैर्य म्हणजे काय आणि तें कसें दाखवावें हें इंग्लंडानें मला शिकवलें. मी हें कबूल करितों कीं माझ्या अंगीं जें कांहीं धैर्य आहे त्याविषयीं मी इग्लंडाचा ऋणी आहें तसाच तुमचाही आहें. किती थोड्या मुलांचे बाप माझ्या बापासारखे (चांगले) असतील बरें? पण, बाबा, पाहा, माझे वडोल म्हणून आपण माझें कल्याण केलें, तसें माझ्या बहिणींचे वडील म्हणून आपण त्यांचें काय कल्याण करणार?"

सोळा वर्षांच्या वयाचा तरुण मुलगा मुंबईंत आपल्या बापाजवळ एक साधारण गोष्ट बोलण्यास भीत असे त्या तरुणाच्या मनावर इंग्लंडाच्या स्वातंत्र्यरूप हवेनें थोड्या महिन्यांत केवढा फेरफार करून

टाकिला हें सदरील मजकुरावरून लक्षांत येईल. असे स्वतंत्र विचार उत्पन्न झाले म्हणून कांहीं नवळ नाहीं. आपल्या गृहसंबंधी स्थितींतल्या ज्या व्यंगांमुळें आपण हळहळत आहों आणि आपला जीव जळत आहे, तीं बहुतेक सुधारलेल्या लोकांचा अधिकाधिक निकट संबंध झाल्यानें दूर होतील यांविषयीं मला तर थोडाच संशय आहे. हें खरें आहे कीं "गांव आहे तिथे म्हारवाड आहेच," म्हणून सुधारलेल्या देशांतही कित्येक खराब व ठक लोक आहेत, परंतु त्यांपासून दूर राहण्याविषयीं पहिल्यापासूनच सावधगिरी ठेविली पाहिजे.

राज्यप्रकरणी लाभ—आपणावर सत्ता करणाऱ्या देशांत प्रवास केल्यानें, आणि त्या देशच्या लोकांबरोबर आपला संबंध झाल्यानें, आपणास राज्यप्रकरणीं बहुत लाभ झाल्यावांचून राहणार नाहींत. आपणास व आपल्या देशास कोणकोणत्या गोष्टींची गरज आहे, व कोणकोणत्या बाबतींत आपला गैरइनसाफ होतो, आणि आपल्या हक्कांस नुकसानी पोंचते याविषयीं त्या (इंग्लंड) देशांतील लोकांस बरोबर माहिती नाहीं. तर तेथील लोकांचा व आपला संबंध अधिक झाल्यानें त्यांला आपल्या स्थितीची अधिक माहिती होत जाईल, आणि मग ते तिकडे लक्ष दिल्यावांचून राहणार नाहींत.

इंग्लंडच्या लोकांपैकीं पुष्कळ लोक आपल्या देशाविषयीं आणि लोकांविषयीं गैरमाहीत व बेपर्वा आहेत, याचें मुख्य कारण एवढेंच कीं आपल्या लोकांचा व त्यांचा, चांगल्या रीतीनें, संबंध झालेला नाहीं. त्यांचा संबंध अधिक झाल्यावांचून ते आणि आपले लोक यांमध्यें परस्पर स्नेहभाव होणार नाहीं, आणि आपण एकमेकांस चांगल्या रीतीनें ओळखूं लागणार नाहीं. आणि असें होई तोंपर्यंत त्या देशांतले बहुतेक लोक आपणांविषयीं बेपर्वा राहिले ह्मणून त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

इंग्लंडांत Association for promoting the moral and Social Improvement of India या नांवाची एक मंडळी उपस्थित झाली आहे. तिचा मुख्य हेतु हा आहे कीं आपल्या (हिंदुस्थान) देशाची नीतिसंबंधी व गृहसंबंधी स्थिति सुधारावी. त्या मंडळीचे एक मुख्य अधिकारी नामदार मिस्तर आर्थर किनार्ड यांणीं एके रात्रीस मला आणि माझे कैलासवासी मित्र राव बहादूर रामचंद्र बाळकृष्ण यांस सभेस बोलावलें होतें, आणि त्या वेळीं त्या मंडळीचे बहुतेक सभासद ही आले होते. ते आमच्या देशाच्या स्थिती विषयीं आमच्या तोंडून कांहीं गोष्टी ऐकण्यास फार उत्सुक होते, ते ह्मणाले तुह्माला कोणकोणत्या गोष्टींत हरकत होते, कोणकोणत्या गोष्टींत तुह्मीच नाराजी आहां आणि कोणत्या गोष्टींची तुह्मास जरूरी आहे, ही सर्व हकीकत तुमच्याच तोंडानें ऐकावी अशी आमची फार इच्छा आहे, यास्तव तुमच्या लोकांची या देशांत येण्याजाण्याची वहिवाट वाढत जाईल तसतसे लाभ अधिक होत जातील.

ह्या व दुसऱ्या हरएक जागीं व हरएक मंडळींत सद्गृहस्थांबरोबर आपल्या देशासंबंधीं संभाषण करण्यास आपणास संधि सांपडते आणि त्यावरून मोठा लाभ होतो. बहुतेक इंग्रज लोकांचा स्वभाव असा आहे कीं अमुक कारणानें अमुक दुःख अमक्याला होतें असें एकदां त्यांस समजलें, ह्मणजे त्याचें निवारण करण्याविषयीं ते आपणाकडून हरप्रयत्न करतील. इंग्रजी राज्यरीतीचा पाया प्रजेच्या विचारांवर बांधलेला आहे; आणि बहुतेक प्रजेच्या विचाराचा कल असतो त्याप्रमाणें सर्व काम चालतें. कोणाही चांगल्या आणि वजनदार इंग्रजाची एकदां खातरी झाली, कीं हे गाऱ्हाणें करतात हें वाजवी आहे, तर मग तो त्याविषयीं जी जरूरीची तजवीज व मेहनत ती केल्यावांचून राहणार नाहीं.

ह्याविषयीं एक उदाहरण देण्याची मी आज्ञा घेतों. कर्नाटकचा नवाब अजीम जाह आणि महिसूरच्या राजाचा हल्लींचा वारस यांविषयीं तेथील कित्येक लोकांची जेव्हां खातरी झाली कीं यांचा दावा खरा आणि वाजवी आहे, तेव्हां त्यांणीं स्वतः श्रम घेऊन सभा भरली, आणि पार्लमेन्ट सभेस अर्जी केली. आपल्या एतद्देशीय राजेरजवाड्यांच्या हक्कांसाठीं अर्जी करण्यास इंग्रज लोकांनीं कमर बांधावी ह्मणजे कांहीं लहानसहान गोष्ट नव्हे. पुरूषोत्तम मुदलियर हे मद्रासेहून मुंबईस येऊन कर्नाटकच्या नवाबाच्या दाव्याविषयीं अर्जी करण्यासाठीं इग्लंडांस गेले होते त्यांच्या एकट्याच्याच चेतवणीवरून एक अर्जी तयार झाली. ह्यावरून वाचणाऱ्यांच्या ध्यानांत येईल कीं त्या लोकांचा आणि आपला संबंध जसा अधिक वाढेल तसा अधिक फायदा होईल.

व्यापारसंबंधी लाभ—ह्या देशांत गेल्यानें व्यापारसंबंधी केवढा फायदा आहे याचाही विचार केला पाहिजे. ज्या एतद्देशीय लोकांनीं हल्लीं विलायतेंत आपल्या पेढ्या घातल्या आहेत त्यांस स्वदेशीय व्यापाऱ्यांकडून मदत होईल, तर आपल्याच जातीच्यांस आणि शेवटीं आपल्याच देशास केवढा लाभ होईल हेंही लक्षांत आणलें पाहिजे. इंग्लंडाबरोबर आपल्या देशाचा व्यापार बहुत वाढला आहे, आणि तो कमी न होतां दिवसानुदिवस वाढत जाईल असें सर्वांच्या अटकळींत येतें. हा व्यापार चालवणारे मुख्यत्वें करून आपल्याच देशचे लोक आहेत, आणि ते आपल्या अडत्यांस शेंकडा २॥ टके हकशाई देतात, त्या हकशाईचा आकार वर्षास केवढा होतो याचा विचार केला पाहिजे. तेवढ्या मोठ्या रकमेपैकीं बहुतेक ऐवज आपल्या लोकांकडून आपल्या देशच्याच लोकांस मिळाला, तर तेवढा आपल्या देशासच मोठा लाभ होईल.

अमेरिकेंत लढाई चालू झाली, त्यापूर्वी आपल्या देशांतून विलायतेस दरसाल सुमारें ६ लाख कापसाचे गठ्ठे जात असत. लढाई चालू झाल्यावर वाढतां वाढतां सन् १८६४ त सुमारें १८ लाख गठ्ठे रवाना झाले. आतां लढाई बंद झाली तरीही या देशांतून सालिना ८।१० लाख कापसाचे गठ्ठे जातील. इतक्या सगळ्या कापसाच्या हकशाईचाच हिशेब केला तर १५।१८ लाख रुपये होतील. आतां, या व्यापारापैकीं ॥— व्यापार आपल्या देशचे लोक करतात.

याचप्रमाणें दुसऱ्या मुख्य मुख्य जिन्नसांचा विचार करूं. इकडून दर साल ३० लाख रुपयांची अळशी, शिरस वगैरे बीं जातें; ३० लाख रुपयांच्या शाली जातात; ९० लाख रुपयांच्या किंमतीची लोंकर जाते; ८ लाख रुपयांच्या किंमतीचा हस्तिदंत जातो; ४ लाख रुपयांच्या किंमतीची काफी जाते; ३ लाख रुपयांच्या किंमतीचा सुराखार जातो; आणि ३ लाखांचा मसाला जातो. आणि दुसऱ्या किरकोळ जिन्नसा मिळून, कापसाखेरीज दुसरा माल एकंदर १॥ कोटीचा इंग्लंडास जातो. यापैकीं नुसता एक कोटीचा एतद्देशीय लोकांचा धरला, तरी त्याचीच हकशाई २। लाख रुपये होते.

विलायतेहून आपल्या देशांत येणाऱ्या जिन्नसांत कापड मुख्य. हें कापड खरेदी करणारे बहुत करून भाट्ये व्यापारी होत. आपला कापडबाजार भाट्ये आणि वाणी यांणीं भरला आहे. आतां, दर साल इंग्लंडाहून आपल्या इकडे ३ कोटि रुपयांच्या किंमतीचें कापड येतें, त्याची हकशाई आणि हपीसशिरस्त्याची दलाली यांचा हिशेब केला तर, तेंच वर्षास २२ लाख रुपये व्हायाला जातात. याशिवाय सूत दर वर्षास ३० लाख रुपयांच्या किंमतीचें, तांबें ९०

लाख रुपयांच्या किंमतीचें, पितळकाम २९ लाख रुपयांच्या किंमतीचें, लोखंड ३० लाख रुपयांच्या किंमतीचें, आणि दुसरे धांतु ११ लाख रुपयांच्या किंमतीचे, लोंकरीचें कापड १० लाख रुपयांच्या किंमतीचें, आणि दुसरा किरकोळ माल मिळून, सुती कापडा खेरीज, सुमारें ४ कोटि रुपयांचा इंग्लंडाहून मुंबईस येतो.

ह्याप्रमाणें येणाऱ्या आणि जाणाऱ्या मालाच्या नुसत्या हक्कशाईचा हिशेब केला तर, तीच सालिना ५० पासून ५९ लाख रुपयांपर्यंत मोठी रकम न्हायाला जाते. यामध्यें युरोपियन व्यापाऱ्यांचे ३ आणे धरले तरी ही ४०।४५ लाख रुपये दरसाल आपल्या देशाच्या लोकांस हक्कशाईच मिळते. एतद्देशीय लोकांच्या साहा सात पेढ्या हल्लीं इंग्लंडांत आहेत त्यांच्या बद्दल ५० झाल्या, आणि आपल्या लोकांनीं आपल्याच पेढ्यांच्या मार्फत आपलें कामकाज चालवलें, तर दर पेढीस दरसाल नुसत्या हक्कशाईचीच एक एक लाख रुपये कमाई होईल. हा काय आपल्या देशबंधूंस आणि अंतीं आपल्या देशास लहान लाभ आहे? अमेरिकेंतल्या लढाईसारखी सुगी तर कधींकाळींच येते; परंतु ही नेहमींची कमाई आणि मालावरली मलई स्वदेशीय लोकांच्या पोटांत जाईल तर ते किती पुष्ट होतील! आणि अंतीं तितकीच आपल्या देशाच्या संपत्तीची वृद्धि होईल कीं नाहीं? याविषयीं आपल्या देशबांधवांनीं चांगला विचार करावा. कांहीं नाहीं तरी एवढें तरी अवश्य केलें पाहिजे कीं ज्या एतद्देशीय लोकांच्या पेढ्या हल्लीं (विलायतेंत) घातलेल्या आहेत त्यांला हा हक्कशाईचा बहुतेक फायदा मिळेल असें करावें. यांत तरी अंतर करूं नये.

आपल्या लोकांत जात्यभिमान अथवा स्वदेशप्रीति हीं बळकट असतीं तर ते अशा मोठ्या अगत्याच्या गोष्टींविषयीं बेपर्वा राहिले नसते.

हल्लीं जात्यभिमान केवळ जातिभेद राखण्यांतच राहिला आहे, तो तथून काढून स्वजातीचें कल्याण करण्याकडेस लावला पाहिजे. उद्योगी, हुशार आणि सचोटीचे एतद्देशीय व्यापारी यांला हकशाईच्या कामांत केवढा नफा होण्याजोगा आहे याचा दृष्टांत वर दिलाच आहे. स्वदेशांत सुधारणुकीचें व स्त्रीशिक्षणाचें बीजारोपण करणारांपैकीं एक मुख्य गृहस्थ जे आज सुमारें बारा वर्षें हकशाईचें काम इंग्लंडांत करीत आहेत, आणि तेथें स्वदेशीय लोकांला व्यापारधंद्यामध्यें व हरएक कामामध्यें चांगला बुद्धिवाद सांगणें, सर्व आवश्यक अशी मदत करणें, आणि सर्व प्रकारें प्रीति दाखवणें यांविषयीं प्रसिद्ध झाले आहेत, ते गृहस्थ उद्योग, हुशारी आणि सचोटी यांच्या योगानें केवढे वाढले ही गोष्ट सर्वांस ठाऊक आहेच. प्रोफेसर दादाभाई नवरोजी यांविषयीं मी लिहीत आहें. इंग्लंडामध्यें व्यापाराच्या कामांत फत्ते मिळवल्याचें हें उदाहरण सर्वांची खातरी करून देई असें आहे, ह्मणून ह्याविषयीं मी अधिक लिहीत नाहीं, इतकेंच पुरे.

यावरून कळून येईल कीं व्यापाराच्या कामांत किंवा राज्यप्रकरणांत, गृहस्थितीच्या बाबतींत किंवा विद्याकलाकौशल्याच्या बाबतींत, इंग्लंडांत प्रवास केल्यानें या देशास आणि या देशच्या लोकांस जसा आणि जेवढा फायदा होईल, तसा आणि तेवढा फायदा दुसऱ्या प्रकारें अथवा दुसऱ्या रीतीनें होणें कठीण आहे. याविषयीं मी जसा अधिक विचार करून पाहतों तशी माझी अधिक खातरी होते कीं ह्या देशास चढत्या दशेस आणण्यास आपण कितीही उपाय योजले आणि कितीही इलाज केले, तरी सर्वांत उत्तम, सर्वांत मोठा, आणि सर्वांत योग्य असा उपाय मला दिसतो तो हाच कीं निरनिराळ्या वळणाच्या व निरनिराळ्या बुद्धीच्या एतद्देशी-

य गृहस्थांनीं त्या सुधारलेल्या देशांत जाऊन प्रवास करावा, आणि कित्येकांनीं विद्याविषयक शोध करण्यांत गुंतावें आणि कित्येकांनीं कलाकौशल्याच्या शोधांस लागावें; कित्येकांनीं राज्यप्रकरणांत पडावें आणि कित्येकांनीं व्यापाराच्या कामांत यत्न चालवावा; कित्येकांनीं तेथील लोकांची गृहसंबंधी स्थिति वारकाईनें तपासून पाहावी, आणि कित्येकांनीं त्या देशच्या लोकांचे उत्तम गुण चांगले शिकून घ्यावे.

सारांश, सुधारलेल्या देशांत प्रवास केल्यानें सुधारलेल्या लोकांची प्रकृति व रीतरिवाज, कलाकौशल्य व राज्यरीति हीं सर्व माहीत होतात, आणि त्यांच्या आणि आपल्या देशांतील लोकांच्या स्थितीची तुळणा करतां येते. आपल्या देशचे लोक सुधारलेल्या देशांत जेव्हां प्रवास करूं लागतील, आणि त्या देशांत आपल्या लोकांची रहदारी वाढेल, तेव्हांच आपल्या देशास चेतना किंवा जीव येईल, तेव्हांच आपणास खरी जागृदवस्था भासूं लागेल, तेव्हांच आपलीं निद्रिस्थ इंद्रियें झटकन जागीं होतील, तेव्हांच देवभोळेपणाच्या वेड्या आपणास बाळगण्याची लाज वाटूं लागेल, आणि तेव्हांच सुधारलेल्या काळांत व सुधारिल्या काळाच्या गतींत आपला देश किती मागें पडला आहे, याचें यथार्थ ज्ञान व कल्पना आपणास होईल.

### ६. प्राचीन हिंदुलोकांत प्रवासाची चाल.

FOREIGN TRAVEL AMONG THE ANCIENT HINDUS.

आतां, हे सर्व लाभ प्राप्त करून घेण्याविषयीं आमच्या देशांतले लोक आणि विशेषें करून हिंदु कोठपर्यंत पाठीं राहणार? अटक नदीपलीकडे अथवा हिंदुस्थान सोडून बाहेर जाण्यास हरकत आहे असें जे समजतात त्यांणीं प्रथम शोध करून पाहिलें पाहिजे कीं परक्या आणि दूर देशांत प्रवास करण्याची चाल प्राचीन काळच्या हिं-

दु लोकांत होती किंवा नाहीं. प्राचीन काळचे हिंदु लोक फार सुधारलेले अशी कीर्ति आहे, त्यांमध्यें देशपर्यटण करण्याची चाल नव्हती असें कोणाच्यानें खातरीनें ह्मणवणार नाहीं. पुरातन काळीं पर्यटण करण्यास पाहिजेत तशीं साधनें नव्हतीं. तरीही ही चाल साधारण होती असावी असें मानण्यास पुष्कळ कारणें आहेत. याविषयीं कित्येक दृष्टांत इतिहासावरून मिळण्यासारखे आहेत ते मी एथें देतों.*

१ इसवी सनाच्या अगोदर ७६ वर्षें ह्मणजे आज १९४३ वर्षांपूर्वी हिंदु लोक जावा बेटांत गेले, आणि तेथें त्यांणीं आपला शक स्थापिला असा लेख आहे. ह्याला आणखी एक प्रमाण हें आहे कीं संस्कृत भाषेंत लिहिलेले जुने ग्रंथ व काव्यें त्या देशांत अढळण्यांत येतात, आणि तेथें मोडून पडेलेलीं जुनीं हिंदु देवालयें आहेत.

२ त्याचप्रमाणें आणखी जावा बेटाच्या पूर्वेस "बाली" ह्मणून एक बेट आहे तेथें पहिल्यापासूनच हिंदूंची वस्ती आहे, आणि हल्लींही तेथें हिंदु देवांची पूजाअर्चा होते, आणि सती जाण्याचा संप्रदाय अगोदरपासून चालत आहे.

३ आणखी रामचंद्राचा प्रपिता रघुराजा पारशी ह्मणजे इराण देशावर युद्ध करण्यास गेला होता, ही कथा रघुवंश या प्रख्यात संस्कृत काव्यांत आहे. हें काव्य भोज राजाच्या दरबारांतील प्रसिद्ध कालीदास कवि ज्याचें शकुंतला नाटक प्रख्यातीस पावलें आहे त्याणें रचलेलें.

४ इराणच्या क्षेर्क्षेस नामक राजानें युनान देशावर २३४७ वर्षांपूर्वीं स्वारी केली त्या वेळीं त्याच्या सैन्यांत हिंदुस्थानचे कित्येक नामांकित सरदार होते.

* Asiatic Researches.

५ कार्थेजचे सेनापति आस्द्रुबाल आणि हानिबाल यांच्या लश्करांत हिंदुस्थानांतून गेलेले हत्ती व हिंदु शिपाई होते.

६ शिकंदर बादशाह जेव्हां पोरस ( अथवा पौरव ) राजाचा पराजय करून इराणच्या वाटेनें आपला देश युनान एथें परत जायास निघाला तेव्हां त्याबरोबर "कलेनश" नांवाचा एक हिंदु योगी गेला आणि कित्येक हिंदु सरदार ही बायकामुलांसहित गेले. केतु नांवाचा एक हिंदु सरदार त्याच्या फौजेंत होता, तो मरण पावला तेव्हां त्याच्या दोघी स्त्रिया सती जाण्यास तयार झाल्या. त्यांपैकीं एकीस बादशाहनें सती जाऊं दिलें, दुसरीस दिलें नाहीं; कारण ती स्त्री गरोदर होती.

७ पोरस व दक्षिणेंतील पांड्य राजा यांणीं आपापले वकील रूम एथील सार्वभौम आगस्तस याकडेस पाठविले होते ते हिंदु होते, आणि ते थेट स्पेन देशापर्यंत गेले होते असा लेख आहे. त्यांबरोबर "बृगुगोशाक" ज्याला आपण आतां भडोच ह्मणतों तेथील एक विद्वान् ब्राह्मणही गेला होता.

८ सेवरस नांवाचा एक रूमी शिकंदर्या एथें आपले वृद्धापकाळचे दिवस काढण्यास गेला होता, तो मोठा विद्वान् समजून हिंदुस्थानचे कित्येक विद्वान् ब्राम्हण त्यास भेटायास गेले होते, आणि त्याणें त्यांचा चांगला आदरसत्कार केला असाही लेख आहे.

९ सुशेणाचार्यांनें रूम देशांत जाऊन तेथें सिद्धान्त जाणणाऱ्या म्लेन्च्छांजवळ म्लेन्च्छ सिद्धान्त शिकून रूमी सिद्धान्त रचला आहे. ही गोष्ट ज्योतिषी लोकांत प्रसिद्ध आहे.

१० रूम, ग्रीस, कार्थेज आदिकरून बाहेरच्या देशांच्या लोकांबरोबर हिंदु लोकांचा व्यवहार सुमारें बाराशें वर्षें एकसारखा चालला होता, ही गोष्ट पुष्कळ दृष्टांतांवरून सिद्ध करतां येईल.

## ७ ही चाल मागून बंद झाली याचीं कारणें.

CAUSES OF PROHIBITION IN LATTER AGES.

आतां कोणी असें विचारलें कीं ही चाल मागून कां बंद पडली, तर त्याचीं कारणें सांगतां येतील. तातार आणि अफघाण देशांकडून मुसलमान लोकांच्या झुंडीचा झुंडी आपल्या देशावर येऊन पडल्या आणि हल्ला करूं लागल्या, तेव्हां जो तो आपापल्या कुटुंबाचें आणि घरदाराचें रक्षण करण्यांत गुंतला, आणि परदेशांत जावयाचा तो अडकून राहिला. दुसरें, मुसलमानांनीं जुलमानें हिंदूंस बाटवण्याचा यत्न केला त्यामुळें अधिकच त्रास झाला, आणि त्यांस असें वाटूं लागलें कीं बाहेर देशीं असले लोक आपणास बाटवल्यावांचून राहणार नाहींत. अशी अवस्था व असा समय पाहून त्यांणीं नेम बांधून टाकला असेल कीं अटक नदीच्या पलीकडे जाऊं नये, तिच्या आंतच राहावें. असा तर्क केला तर तो केवळ निराधार दिसेल असें नाहीं. त्यावेळेस हा नियम धर्माची ढाल झाली असेल, परंतु सांप्रत काळीं तर तो नियम आपणाला केवळ बेडीच झाली आहे.

## ८. हा प्रतिबंध मोडला आहे.

THE PROHIBITION HAS BEEN DISREGARDED.

सांप्रतकाळीं आपले लोक कोठपर्यंत जाऊन आले आहेत आणि जाताहेत ह्याचा आपण आतां थोडासा विचार करूं. मुसलमानांचे हल्ले येऊन पडल्यानंतर आणि मुसलमानांची सत्ता झाल्यानंतर हिंदु लोकांची साहसशक्ति केवळ निद्रिस्थ होऊन गेली, आणि देशाटण करण्याची उमेद त्यांमधून निघून गेली ती पुनः आलीच नाहीं, आणि यात्रेस जाण्यास धर्माचें मिष नसतें तर, स्वदेशांतही एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं गेले नसते. परंतु देशाटण करण्याच्याच उद्देशानें कित्येक हिंदु हल्लींच्या काळांतही

दूरदूरच्या देशीं जाऊन आले आहेत अशीं कित्येक उदाहरणें सांपडतात. श्रावक लोकांचा एक जती थेट कॉन्स्तान्तिनोपल अथवा इस्तंबूल एथपर्यंत जाऊन आला आहे, आणि त्याणें आपल्या पर्यटणाचें वृत्त लिहिलें आहे. सुमारें १०० वर्षांहून अधिक वर्षांवर एक जोगी युरोपांत देशाटण करावयास गेला होता त्याचें नांव पुराणपुरी. त्याची थोडीशी हकीकत तारीख १७वी एप्रिल सन १८५९ च्या सत्यप्रकाशांत एका इंग्रजी ग्रंथावरून मी लिहिली होती ती अगत्याची समजून मी एथें उतरून घेतों.

"पुराणपुरी नांवाचा हिंदूंतील रजपूत जातीचा एक मोठा वैरागी होता. तो (सुमारें १०० वर्षांपूर्वीं, ह्या देशांत प्रवास केल्यावर) पहिल्यानेंच अफघाणस्थानांत गिजनी शहरीं महंमदशाह अबदली याच्या फौजेजवळ जाऊन पोंचला. तेथून तो हिरातच्या वाटेनें खुरासानांत गेला, आणि तेथें थोडे दिवस राहून कास्पियन समुद्राच्या कांठानें आस्त्राबादेकडे गेला. त्याणें आपल्या पर्यटणाचा वृत्तांत डंकन साहेबाजवळ निवेदन करतांना असें सांगितलें कीं कास्पियन समुद्राच्या पश्चिम दिशेस ज्वाळामुखी पर्वत आहे त्याला तेथील लोक दागीस्थान म्हणतात. आस्त्राबाद एथें ११ महिने राहून नंतर तो आस्त्राखान एथें गेला. तो असें म्हणतो कीं आस्त्राखान शहर एशिया खंडांतील रूस मुलखांत आहे तेथें पुष्कळ हिंदु आहेत.

"आस्त्राखानाहून १८ दिवस मजल केल्यावर तो युरोपांतील रूस देशांत जाऊन पोंचला. रूस देशांतलें पूर्वीचें मोठें आणि मुख्य शहर "मॉस्को" एथें तो पांच दिवस राहिला. ह्याठिकाणीं त्याच्या ऐकण्यांत आलें कीं "सेन्टपीटर्सबर्ग" च्या वाटेनें ग्रेट ब्रिटन एथून एका महिन्याची मजल आहे. पण तेथून तो पुढें गेला नाहीं, आस्त्राखानाकडेस परत आला. तेथून तो इराणाकडेस गेला. इरा-

णांतलीं मोठीं शहरें इस्पाहान आणि शिराज यांत तो कांहीं दिवस राहिला. तेथून तो अब्रू शहराकडेस गेला, आणि तेथून खारकांच्या बेटांत (?) गेला. तेथून जातांजातां तो बाहरीन नामक बेटाजवळ जाऊन पोंचला. तो असें म्हणतो कीं बाहरीनच्या किनाऱ्यावर मोतीं फार पिकतें.

"तेथून तो बसरा शहराकडेस गेला. तो असें ह्मणतो कीं बसऱ्यामध्यें हिंदु लोकांचीं कित्येक घरें आहेत, आणि तेथें गोविंदराय आणि कल्याणराय यांच्या मूर्ति आहेत. बसऱ्याहून तो मस्कत एथें गेला. मस्कतामध्यें ही तो ह्मणतो, पुष्कळ हिंदु राहतात. मस्कताहून तो परत हिंदुस्थानांत कच्छ एथें आला. हिंदुस्थानांतून तो फिरूनतातार देशीं गेला. तातार देशांतलीं मुख्य शहरें समरकंद, बुखारा आणि बाल्क यांत, तो ह्मणतो कीं हिंदु आहेत. तातार देशाहून काश्मीरच्या मार्गानें तो नेपाळच्या राज्यांत गेला, आणि नेपाळची राजधानी काटमांडू एथें बहुत दिवस राहिला. तिबेटच्या सरकारानें हिंदुस्थानचा गवरनरजनरल हेस्तिंग्स याला देण्याकरितां एक राज्यप्रकरणी पत्र त्या वैराग्याजवळ दिलें होतें. तें पत्र या जोग्यानें गवरनरजनरल यास मिस्तर इलियिट व दुसरे गृहस्थ यांच्या समक्ष दिलें. हा पुराणपुरी बाबा मुंबईंत ही आला होता."

शुद्ध देशाटणाच्याच हेतूनें देशाटण केल्याचीं अशीं कित्येक उदाहरणें सांपडतात. याशिवाय या देशांत लढाया बंद झाल्यानंतर उद्योग, धंदारोजगार अथवा व्यापार यांकारणें बहुत दूरदूरच्या देशीं या देशचे हिंदु जाऊन राहिले आहेत, आणि त्यांणीं येण्याजाण्याची रहदारी ठेवली आहे. एशिया खंडाच्या मध्य भागांत जितका व्यापार चालतो तितक्यापैकीं चवथा हिस्सा तर एकटे हिंदुच चालवतात. व्यापारधंद्यासाठीं मुलतान आणि लाहोर एथून शें-

कडो हिंदु लोक आस्त्राखानांत जाऊन राहिले आहेत, आणि तेथें एक हिंदूचें देऊळ ही आहे. सुमारें तीनशें वर्षें झालीं भाट्ये आणि वाणी मस्कत एथें जाताहेत आणि तेथें दोन हिंदु देवालयें ही झालीं आहेत. असें सांगतात कीं एका देवळांत श्री नाथजीची आणि दुसऱ्यांत श्री गोविंदरायजीची मूर्ति आहे. गोविंदरायजीची मूर्ति प्रथम बसऱ्यांत होती ती तेथें कांहीं गडबड झाल्यामुळें मस्कत एथें नेण्यांत आली.

जे वाणी आरबस्थानापर्यंत जाऊन आले आहेत आणि जातात त्यांस बखाई असें ह्मणतात. ते मोठी उंमर होई तोंपर्यंत "बखाच्या खेपा" मारून आणि बहुत काळ त्या देशीं राहून येतात. मस्कत एथें वाणी, ब्राह्मण, भाट्ये मिळून सुमारें हजार बाराशें हिंदु आहेत, त्यांत सारस्वत ब्राम्हण गृहस्थाश्रम करीत असतात. आदनांत सुमारें २०० वाणी आहेत, आणि एक देऊळ ही आहे. मुबासा, जंगबार, लामू आणि मोझांम्बिक ह्या ठिकांणीं भाट्ये, वाणी, हे एक हजारांवर होतील. जावा बेटाकडेस ही कित्येक वाणी, भाट्ये आज बहुत काळ जात येत आहेत, आणि थोड्या वर्षांवर तेथें व्यापार करण्यास भय होतें त्यावरून ही म्हण (गुजराथींत) पडली आहे.

जे जाय जावे ते फरी न आवे,
आवे तेना परीयांनां परीयां चावे.

(ह्मणजे जावा बेटास जातो तो परत येत नाहीं, परंतु जो परत येतो तो आपल्या नातुंडांपणतुंडांस खावयास बेगमी करून ठेवतो)

जमेकापर्यंतही हिंदु गेले आहेत. सिंगापूर एथें व मलायाच्या कांठावर शेट जीवराज बाळू व शेट गोविंदजी वीरजी यांचीं गलबतें जातात येतात त्यांवर भाट्ये ही असतात. चीनास शेट मोतीसाचा सासरा शाह ताराचंद चिनाई हा सुमारें ३२ वर्षांवर गेला होता. तो

परत आला तेव्हां प्रथम शेट मोतीसा यांणींच त्याजबरोबर अन्न-व्यवहार केला. सवचंद जेराम नांवाचा एक दुसरा वाणी सुमारें २८ वर्षांवर चीन देशास गेला होता. जेश्रीराम शिवलाल यांच्या पेढी-च्या तर्फें ही कित्येक मारवाडी तेथें गेले आहेत. शेट पुरुषोत्तम-दास हिराचंद यांच्या मुलांच्या कंपनीच्या तर्फें ब्रम्हक्षत्री प्राण-जीवन पूर्णानंद हा १८५९ त पोक्त वयीं सिंगापूर एथें मुनीम गे-ला होता. त्यानंतर शेट कासमभाई नाथाभाईच्या तर्फें दामोदर ईश्वर नांवाचा ह्याच जातीचा एक तरुण पुरुष १८६० त चीनम-ध्यें गेला होता. शेवटीं सन् १८६२ त डाक्तर धीरजराम दलप-तराम हे चीन देशास जाऊन आले.

हिंदुस्थान सोडून हिंदु लोक ज्याज्या जागीं जाऊन आले आहेत आणि जात असतात त्यात्या जागांच्या नांवांची यादी मी कित्येक जा-ऊन आलेल्या गृहस्थांच्या तोंडून तीं ऐकिलीं तशीच उतरून घे-तली आहे ती एथें प्रविष्ट करण्याची आज्ञा घेतों.

| | | | |
|---|---|---|---|
| गुवादर | मकला | तारण | केरमान |
| चोवार | मुख्खा | बुशेर | आंगोल |
| मकराण | लोइया | सेना | केपवर्ड |
| बंदर आबास | बारबरा | लामू | मादागास्कर |
| बसरा | आदन | मुबासा | मोरीस |
| बुद्दवी | मसवा | मलींदा | बारबोर |
| मुसनो | हुदीदा | जंगबार | श्याम |
| होरमज | सुमात्रा | पेबा | जावा |
| मस्कत | जपान | किलवा | सिंगापूर |
| मछीरा | काबूल | बिमू | बुखारा |
| रासल खेमा | कंदाहार | कोमर | तेहरान |

| किसम | वाल्क | मोझाम्बिक | आस्त्राखान |
|---|---|---|---|
| सोरा | गावरून | सुफाला | शिराज. |

ह्या सर्व ठिकाणीं हिंदु लोक जातात. एक हिंदु छत्तीस वर्षांवर युरोपांत रूस देशाची राजधानी सेन्टपीटर्सबर्ग एथें गेला होता त्याविषयींची हकीकत सरकारी दस्तैवजावरून कळण्यांत आली आहे. त्याचा मरणाचा काळ समीप आला तेव्हां त्याणें आपला मित्र रामदास यास सेन्टपीटर्सबर्ग एथें बोलावलें; त्याचा वृत्तांत मी तारीख ७ वी जुलई सन १८६१ चा रास्तगोफतार आणि सत्यप्रकाश यांत लिहिला होता तो अगत्याचा समजून खालीं उतरून घेतोंः—

"एका शीक व्यापाऱ्याच्या हिंमतीचें उदाहरण अलीकडेस प्रसिद्धीस आलें आहे. हा व्यापारी सुमारें वीस वर्षांवर रूस देशाचि राजधानी सेन्टपीटर्सबर्ग एथें जाऊन राहिला होता असें दिसतें. या गोष्टीच्या खरेपणाविषयीं सरकारी दस्तैवजावरून पुरावा होतो. ह्या दस्तैवजाचा सारांश "फ्रेन्ड आव् इन्डिया" यांत प्रगट झाला होता त्यावरून असें समजतें कीं या शिकाचें नांव राय ब्राह्मण होतें. हा पहिल्यानें पंजाबामध्यें जंग परगण्यांत राहात असे. तो तीस वर्षांपूर्वीं आस्त्राखानचें देऊळ पाहाण्यास गेला आणि आस्त्राखानच्या वाटेनें सेन्टपीटर्सबर्ग एथें जाऊन राहिला, आणि तेथें त्याणें एक पेढी काढिली. तो हळुहळू व्यापारांत वाढत गेला तो इतका वाढला कीं त्याणें इतक्या काळांत वीस लाख रुपयांची दौलत केली.

"या मोठ्या संपत्तीचा वारसा देण्याकरितां अथवा दुसऱ्या कोणत्या तरी हेतूस्तव त्याणें आपला मित्र रामदास यास जंग परगण्यांत पत्र पाठविलें. त्यांत त्याणें त्यास असें लिहिलें कीं तुह्मी मजजवळ येऊन राहावें. याच समयीं मुलाऊच नांवाच्या एका मुसलमान व्यापाऱ्यानें त्याच शहरीं दोन लाख रुपयांची दौलत केली

होती त्याणेंही अयोध्येहून आपल्या एका मित्रास बोलावलें. हे दोघे जण आपापल्या मित्रास भेटावयास जाण्यास बरोबर निघाले. ते मॉस्को शहराकडे जात असतां वाटेंत लुटले गल, आणि कांहीं आपदा भोगून सेन्टपीटर्सबर्ग एथें जाऊन पोंचले. परंतु त्यांचे मित्र राय ब्राह्मण व मलाऊच हे एक दोन महिने पूर्वींच मरण पावले असून कोणी वारस नसल्यामुळें त्यांची मालमत्ता सरकारच्या स्वाधी- झाली होती.

"रामदासानें रूस सरकारांत अर्जी केली आणि आपल्या मित्राचें पत्र दाखविलें; परंतु त्याचा अर्ज नामंजूर झाला. तो विचारा नाउमेद तर झाला खरा, परंतु त्याणें रूसदेशच्या चक्रवर्तीपाशीं दाद मागण्याचा निश्चय केला, एक दिवस तो राजमंदिराजवळ उभा होता इतक्यांत त्याजवर चक्रवर्तींची दृष्टि गेली. ह्या परदेशीयाचा विलक्षण पोशाक आणि चेहरा पाहून, चक्रवर्तीन त्याला जवळ बोलाविलें. त्याणें आपली सर्व हकीकत महाराजांस निवेदन केली आणि आपल्या मित्राच्या हातचें लिहिलेले पत्र दाखविलें. याच समयीं त्याच्या मुसलमान मित्राचीही दाद लागली.

"इसवी सन १८९६ च्या आरंभीं रूस सरकारानें इंग्लंडच्या सरकारास या दोघां जणांविषयीं असें लिहून कळवलं कीं मयतांची माल मिळकत आमच्या हातीं आली आहे, तर त्या मिळकतीचे वारस कोण याची चौकशी करावी. हें पत्र इंग्लिश सरकारानें हिंदुस्थान सरकाराकडे पाठवून दिलें; परंतु इतक्यांत रामदास मरण पावला.

"हिंदुस्थान सरकारांतून त्याविषयीं तजवीज झाली. मलाऊच याच्या नांवाचा कांहीं पत्ता लागला नाहीं. राय ब्राह्मणाविषयीं पंजाबामध्यें असा शोध लागला कीं तो तीस वर्षांपूर्वी जंग परगण्यांतून गेला. रामदासानें मरणाच्या पूर्वी असें सांगितलें होतें कीं माझे दोन भाऊ

आहेत, त्यांपैकीं एक जंग परगण्यांत आहे आणि दुसरा अमृतसर ये थें आहे. या भावांचा पत्ता लागला. पण राय ब्राह्मणाचा हक्कदार वारस कोण या गोष्टीचा सदरील पत्राखेरीज आणखी कांही शोध लागला नाहीं. सर चार्ल्स वुड यांणीं हा मजकूर रूस सरकारास लिहून कळविला."

त्यानंतर रूस सरकारानें याबाबद पुढें काय केलें तें माझ्या वा चण्यांत अथवा ऐकण्यांत आलें नाहीं. परंतु वर सांगितलेल्या सर कारी दस्तैवजावरून निःसंशय सिद्ध होतें कीं इसवी सन १८३० च्या सुमारास रायब्राह्मण व रामदास हे युरोपांतील रूस देशांत गे ले होते. ह्यावरून असें दिसतें कीं समंजस आणि हिंमतदार व्या पारी व्यापारधंद्याकारणें बाहेर गेले, आणि असमंजस व बेहिंमत ते कोनप्यांत बसून राहिले.

### ९ इंग्लंडास गेलेले पहिले एतद्देशीय.

FIRST NATIVES WHO VISITED ENGLAND.

आतां अशी उत्प्रेक्षा होते कीं ज्यापेक्षां हिंदु लोक याप्रमाणें दूर दूरच्या देशांमध्यें निरनिराळ्या समयीं गेले आहेत त्यापेक्षां कोणी हिंदु इंग्लंडास गेले आहेत किंवा नाहींत, आणि गेले असले तर प हिलेच कोण गेले व ते कोणत्या सालीं. याविषयीं जी गोष्ट माझ्या समजण्यांत आली आहे तिजवरून असें दिसतें कीं पहिल्यानेंच जा णारा एक दक्षिणी हिंदु होता; तो मुंबई इलाक्यांतून गेला होता, आणि त्या समागमें एक पारशीही होता. ही गोष्ट पारशी आणि हिं दु या दोनही जातींस मोठी अगत्याची व उपयोगाची आहे. इसवी सन १७८१ च्या आरंभीं रघुनाथराव पेशव्यानें आपल्या राज्यास म दत मिळवण्यासाठीं हणमंतराव नामक आपला एक कारभारी इंग्लंडास पाठविला होता, आणि मणियार नांवाचा कोणी पारशी

त्याबरोबर गेला होता. रघुनाथ रावाच्या कारकीर्दींत ही एक मोठी अगत्याची गोष्ट घडून आली. नामदार एडमन्ड बर्क याचा वृत्तांत या नांवाच्या इंग्रजी ग्रंथाच्या तिसऱ्या पुस्तकांत ४६ व्या पृष्टीं एडमन्ड बर्क याणें रघुनाथराव यास पत्र लिहिलें त्याचा उतारा केला आहे तो येणेंप्रमाणें:—

"You set too much value on the few and slight services, that I have been able to perform for your agent Hanumant Ráo, and his assistant Maniár Pársi. It was nothing more than a duty one man owed to another. Hanumant Ráo has done me the honour of being my guest for a very short time, and I endeavoured to make my place, as convenient as any of us are able to do, for a person so strictly observant as he was, of all the rules and ceremonies of the religion, to which he was born, and to which he strictly conformed, often at the manifest hazard of his life. To this I have been witness. We have however, Sir, derived one benefit from the instruction he has given us, relative to your ways of living; that whenever it shall be thought necessary to send Gentoos of a high *caste* to transact any business in this kingdom, on giving proper notice, and on obtaining proper licence from authority for their coming, we shall be enabled to provide for them in such a manner as greatly to lessen the difficulties in our intercourse and to render as tolerable as possible to them a country, where there are scarcely six good months in the year. The suffering these gentlemen underwent at first was owing to the ignorance, not unkindness of this nation.

"I am sorry, Sir, to inform you that I can give you no sort of hope of your ever obtaining the assistance of the troops you require. It is best at once to speak plainly when it is not in our power to act.

"Hanumant Ráo is a faithful and an able servant of yours and Maniár Parsi used every exertion to second him.

If your affairs have not succeeded to your wishes, it is no fault of theirs."

☞ *To the preceding letter the following is a foot note.*—

"The object of this letter is incomplete, and one that of Ragunáth Ráo to which it is in reply, has not been found amongst Mr. Burke's papers. The origin of the correspondence appears to be this: early in 1781 Hanumant Ráo, a Bráhman of high caste, and Maniár Parsi arrived in England as agents of Ragunáth Ráo, who had some business to transact with East India Directors and British Government, They were found by Mr. Burke under very unpleasant circumstances, occasioned by their peculiar modes of life, and the obligations of their religion. With the attention to strangers for which Mr. Burke was so remarkable, he took them down to Beaconsfield and it being summer, gave them up a large green-house for their separate use where they prepared their food according to the rules of their *Caste*, performed their ablutions, and discharged such other duties as rites of their religion and their customs required, and as circumstances permitted. They found great pleasure in Mr. and Mrs. Burke's society and where they were visited by many distinguished people whilst they sojourned at Beaconsfield. In autumn they set out on their return to India, and on their arrival there, Rgunáth Ráo wrote to thank Mr. Burke for his kindness to his agents. The fragment of Burke's reply which is here given was written probably at the end of the year 1782."—*Burke's life; vol. 3rd. p.* 46.

(याचा अर्थ.)

"आपला कारभारी हणमंतराव आणि त्याच्या हाताखालचा म-णियार पारशी यांच्या मी थोडासा उपयोगी पडलों ती मोठीच गोष्ट असें आपण समजतां. परंतु एकानें दुसऱ्याच्या उपयोगी पडावें हा मनुष्याचा धर्मच आहे, आणि मी कांहीं याहून अधिक केलें नाहीं. हणमंतराव याणें थोडे दिवस आमच्या एथें राहून आह्मास मोठा मान दिला. तो आपला आचारविचार आणि धर्मकर्म यांविषयीं फार जपत असे, आणि वेळीं जिवाला त्यापासून कांहीं झालें तरी पर्वा क-रीत नसे. अशा पुरुषास आमच्या घरीं जागेची जितकी सोय आम-च्यानें करवली तितकी आह्मी केली. हणमंतरावाच्या ह्या जातिध-

मीविषयीं निष्ठेचा प्रकार मी आपल्या डोळ्यांनीं पाहिला. परंतु, महाराज, यापासून आह्मास एक मोठा लाभ झाला तो हा कीं त्यापासून आह्मास आपल्या राहण्याच्या रीतीची माहिती झाली, आणि यापुढें कोणा उंच वर्णाच्या हिंदूस या देशीं पाठविण्याचें अगत्य पडल्यास, त्याची आह्मास पूर्वीं सूचना झाली आणि सरकारांतून त्याला येण्यास परवाना मिळाला असला ह्मणजे आह्मास एथें त्याची योग्य तर्दूद ठेवतां येईल; आणि जेथें वर्षांतून साहा महिने देखील चांगली हवा नसते असा जो हा आमचा देश ह्यांत तुमच्या लोकांस जितकें होईल तितकें सुखानें राहतां यावें आणि तुमच्या आमच्या व्यवहारांत एऱ्हीं ज्या अडचणी येतात त्या होतील तितक्या दूर व्हाव्या अशी तजवीज आह्मी करूं. ह्या गृहस्थांस जी आपदा पहिल्यानें भोगावी लागली ती ह्या देशांतील लोकांस तुमच्या रीतिभाती माहीत नाहींत यामुळेंच, त्यांणीं त्यांचा बराबर समाचार घेतला नाहीं ह्मणून, असें नव्हे. महाराज, मला लिहिण्यास फार वाईट वाटतें कीं शिपायांची कुमक तुह्मास पाहिजे ती आपणास कधीं तरी मिळेल अशी कांहीं आशा दिसत नाहीं. आपल्या हातीं कोणतें काम करणें नसलें तर तसें स्पष्ट सांगावें हें उत्तम. हणमंतराव हा आपला विश्वासू व हुशार सेवक आहे आणि मणियार पारशी याणें कोणत्या प्रकारें त्यास मदत करण्यांत कसर केली नाहीं. आपल्या इच्छेप्रमाणें आपलें काम झालें नाहीं तर ह्यांत त्यांचा कांहीं वांक नाहीं."

☞ ग्रंथकर्त्यानें ह्या पत्रास खालीं लिहिल्याप्रमाणें टीप लिहिली आहे:—

"ह्या पत्राचा उद्देश बरोबर समजत नाहीं आणि रघुनाथ रावाच्या ज्या पत्राचें हें उत्तर आहे तें पत्र मिस्तर बर्क याच्या कागदपत्रांत सांपडत नाहीं. हा पत्रव्यवहार चालू झाला तो मुळीं अशा

कारणावरून कीं सन १७८१ च्या आरंभींच हणमंतराव ह्मणून एक उंच वर्णाचा ब्राह्मण आणि मणियार पारशी असे रघुनाथ रावाकडून ईस्त इन्डिया डरेक्टर आणि इंग्रज सरकार यांकडेस कांहीं काम होतें त्यासाठीं इंग्लंडांत आले. त्यांची राहण्याची विलक्षण रीति आणि आचारविचार यांमुळें ते फारच दुःख भोगीत आहेत असें मिस्तर बर्क यास अढळलें. परदेशीयांचा समाचार घेण्याविषयीं मिस्तर बर्क प्रसिद्धच होता तो त्यांस एकदम बीकन्सफील्ड एथें घेऊन गेला, आणि ते उन्हाळ्याचे दिवस होते ह्मणून त्याणें बागांत एक मोठा बंगला त्यांच्या स्वाधीन केला, तेथें ते आपल्या जातीच्या चालीप्रमाणें स्वयंपाक व नित्याचें स्नानादिक कर्म करीत, आणि आपल्या धर्मांप्रमाणें व चालींप्रमाणें दुसरीं सर्व कर्मै त्या ठिकाणीं होत त्याप्रमाणें करीत असत. मिस्तर बर्क आणि त्याची पत्नी यांच्या समागमानें त्यांला फार संतोष होत असे, आणि ते बीकन्सफील्ड एथें होते तोंपर्यंत पुष्कळ नामांकित पुरूष त्यांस भेटावयास येत असत. पावसाळ्यांत ते परत हिंदुस्थानांत जावयास निघाले. आणि ते तेथें जाऊन पोंचल्यावर, रघुनाथ रावानें मिस्तर बर्क यास पत्र लिहिलें, आणि त्याणें आपल्या कारभाऱ्यांची बरदास्त ठेवली ह्मणून त्याचे आभार मानले. मिस्तर बर्क याणें बहुतकरून हें उत्तर सन १७८२ च्या अखेरीस लिहिलें असावें."

ह्यावरून निःसंशय सिद्ध होतें कीं या देशचा पहिला पुरूष हणमंतराव हा इंग्लंडास गेला त्याला आज ८६ वर्षें झालीं, आणि त्यास रघुनाथराव याणें पाठविलें होतें. त्यानंतर विलायतेस जाणारा दुसरा एतद्देशीय कलकत्त्याचा राममोहन राय. ह्या गृहस्थाच्या नांवास एतद्देशीय सुधारणारांमध्यें पहिली जागा दिली पाहिजे. हा सन १८३० सांत गलबतांत बसून कलकत्त्याहून लिवरपूल एथें गेला. लिवरपुलाहून तो लंडन एथें गेला आणि नंतर फ्रान्स देशीं गेला, आणि सन १८३३ सांत इंग्लंडांतच मरण पावला. तो जेव्हां इंग्लं-

डास जावयास निघाला तेव्हां बंगालच्या हिंदु लोकांत किती गवगवा झाला तो, खालीं थोडासा मजकूर राममोहन रायाचें चरित्र गुजराथींत लिहिलेलें आहे त्यांतून उतरून घेतला आहे त्यावरून ध्यानांत येईल.

"राममोहनराय युरोप ह्मणजे म्लेन्च्छ देशीं जाणार हें वर्तमान समजतांच, हिंदु लोकांत फार गवगवा झाला. लोक त्याची परोपकारबुद्धि आणि जिज्ञासा समजण्यास केवळ असमर्थ होत्साते, कांहीं अयोग्य हेतूस्तव तो हें पर्यटण करण्यास जात आहे अशी कल्पना करून, त्याविषयीं भलभलतेंच बोलूं लागले. परंतु ज्या पुरुषानें त्यांच्या जुलमाबरोबर लढण्यास कमर बांधली, ज्याणें आपण केलेले श्रम निष्फळ होतील अशी एकवेळ धास्ती घालणाऱ्या हजारों अडचणींचें निवारण केलें, ज्याणें धर्मसभेबरोबर युद्ध करून जय मिळविला, आणि ज्याणें ब्राह्मणांच्या शापांची आणि निंदेची पर्वा न करितां धिःकार केला, त्या पुरुषास आपले पक्के विचार सिद्धीस नेण्यास त्याच्या देशच्या लोकांची पोकळ ओरडाओरड प्रतिबंध करणार काय? सन १८३० त नवेम्बर महिन्याच्या पंधराव्या तारिखेस राजा राममोहन राय, आपला दत्तपुत्र राजाराम राय आणि दोन चाकर रामरत्न मुकरजी व रामहरि मुकरजी यांसह स्वदेश सोडून, आल्बियन तारूं लिवरपुलास जावयाचें होतें त्यांत बसून चालता झाला."

राममोहन रायाच्या मागून आणखी कित्येक बंगाली इंग्लंडास जाऊन आले आहेत, आणि कित्येक गेले आहेत. त्यांमध्यें डाक्तर चक्रवर्ती याचें नांव प्रसिद्ध आहे. एतद्देशीय लोकांपैकीं या गृहस्थानें पहिल्यानें वैद्यकीची सनद इंग्लंडामध्यें जाऊन मिळविली. इकडेस मुंबई इलाक्यांत हणमंतरावानंतर इंग्लंडास जाणारा नडियाद गांवचा शामलदास देसाई. हा सुमारें ३५ वर्षांवर आपल्या वतनसं-

बंधी कांहीं कामासाठीं विलायतेस गेला होता*. गोविंद विठ्ठल नामक एक दक्षणी ब्राह्मण मुंबईच्या हायकोर्टाचे जड्ज मिस्तर टकर यांबरोबर इंग्लंडांत विद्याभ्यास करण्यासाठीं आणि सिविल सर्विसची परीक्षा देण्याची तयारी करण्यासाठीं गेला त्यास आज सुमारें ९ वर्षें झालीं. त्याचीमाझी तेथें गांठ पडली होती. त्यानंतर इ० सन १८६० च्या आरंभीं रावसाहेब महीपतराम रूपराम जातीचे नागर ब्राह्मण हे बरोबर एक स्वयंपाकी ब्राह्मण घेऊन गेलेहोते. ह्या गृहस्थांस विद्याखात्याचे डरेक्टर यांणीं ग्रेट ब्रिटन देशांतील विद्या शिकवण्याची पद्धत पाहून व शिकून येण्यासाठीं पाठविलें होतें. ते एकवर्ष तेथें राहून आणि तेथील कडक हिंवाळ्याचा अनुभव घेऊन परत आले.

इसवी सन १८६३ मध्यें मार्च महिन्यांत मी इंग्लंडास गेलों. तेव्हां मजबरोबर तीन हिंदु सोबती होते. एक राव बहादुर रामचंद्र बाळकृष्णजी, दुसरे डाक्तर आत्माराम पांडुरंग यांचे सोळा वर्षांचे चिरंजीव मोरेश्वर राव, आणि तिसरे रा० वासुदेव बाबाजी नवरंगे. यांशिवाय दुसरे चार हिंदु आह्माबरोबर होते. एक मनोरदास रूपजी नांवाचा पोरवार वाणी, भास्कर आणि जनार्दन नांवांचे दोन दक्षणी ब्राह्मण, आणि उमाजी नांवाचा एक घाटी गडी. मी इंग्लंडांत होतों तेव्हां सगळे मिळून अठरा हिंदु तेथें होते. त्यांपैकीं बारा गृहस्थ अथवा यजमान आणि ६ चाकर; मुंबईकडील ८; पं-

---

* सातारचे माजी छत्रपति प्रतापसिंह महाराज यांस इंग्रज सरकारानें सन १८४० त पदच्युत करून काशीस पाठविलें तेव्हां त्यांणीं रंगो बापू यांस आपणाकडून विलायत सरकाराकडे वकील पाठविलें होतें. हे गृहस्थ सुमारें १५ वर्षें इंग्लंडांत होते. ते सुमारें १८५४ त परत आले. यांबरोबर शिरके आणि खांडवलकर या सरदार घराण्यांतील कोणी पुरुषही गेले होते.

जावचे २; कलकत्त्याचे ४; मद्रासचे ३; आणि सिलोन (सिंहलद्वीप) चा १. यांशिवाय पंजाबच्या रणजीतसींग राजाची विधवा राणी चंदाकुंवर ही इंग्लंडांत चार वर्षें होती, ती मी तेथें असतांच मरण पावली. तिजबरोबर दोन हिंदु कारभारी होते.

नंतर इसवी सन १८६९ च्या आरंभीं ह्मणजे मी जाऊन परत आल्यावर सुमारें सवा वर्षानें कांठेवाडांतला एक धीयेल रजपूत स्वतांच्या कांहीं कामाकरितां इंग्लंडास गेला. लिमडा आणि लाठी या दोन गांवांच्या भाईयातां* मध्यें त्यांच्या ग्रासां (हक्कां) संबंधी तंटा पडला होता त्याचा निवाडा मि० लांग याच्या कारकीर्दींत लिमडेकरांच्या तर्फे झाला होता, परंतु मागाहून मेजर कीटिंज याणें तो ठराव कांहीं कारणावरून रद्द केला. त्या ठरावास राजी न होऊन लिमडेकर भाईयात बरोबर दुसरें दोन मनुष्य घेऊन विलायतेस गेला तो थेट ग्लास्गो शहरापर्यंत मिस्तर लांग यास भेटण्यास गेला होता. त्याच्या सहाय्यानें इंग्लंडांत आपल्या तर्फे निवाडा करून घेऊन तो हिंमतदार रजपूत परत आला.

पुढें इसवी सन १८६६ त राजकोटांतील दशाश्रीमाली जातीचा एक वाणी गृहस्थ प्रागजी भिमजी हा एका कच्छी व्यापाऱ्याकडून विलायतेस गेला होता. त्याजबरोबर दोन माणसें गेलीं होतीं. यावरून असें सिद्ध होतें कीं हिंमतदार पुरुषांस विलायतेचा रस्ता मोकळा होऊन चुकला आहे. जे जातीपातीचें भय वाळगून जातिरूप संकोचित बंदीखान्यांत पडून बसून राहिले आहेत, आणि त्या बंदीखान्यांतून सुटून स्वतंत्र होण्याचा यत्किंचित्‌ही यत्न करीत नाहींत, त्या बंदीखान्यांतच जन्मभर पडून राहण्यांत संतोष मानतात, त्यांला इंग्लंडचा रस्ता कधींतरी मोकळा होईल अशी मला

---

* भाईयात ह्मणजे गादीवर जो संस्थानी असतो त्याचे धाकटे बंधु.

आशा दिसत नाहीं. जसें लाव्हूड नामक बंदीवानास पुष्कळ वर्षें ज्या बंदीखान्याची सवई झाली होती तो सोडणें आवडलें नाहीं, तसें ज्यांस जातिरूप संकोचित बंदीखान्याची सवई झाली आहे त्याला तो सोडणें आवडत नाहीं असें दिसतें.

पारशी लोकांत मणियाराच्या नंतर इ० सन १८०७ तांत फ्रामजी दादाभाई सेशनवाला हा डाक्तर ब्रेमनर नांवाच्या इंग्रजाबरोबर विलायतेस गेला होता. इ० सन १८२४ सांत चार्लसाचा मेहरवान म्हणून कोणी एक इंग्लंडास गेला होता. त्यानंतर शेट केखसरू फ्रामजी पाटक सुमारें १८३२ सांत, व शेट दिनशा फर्दुनजी १८३३ सांत गेले होते. त्यामागून पारशी सुधारणारांमध्यें प्रख्यात आणि ज्यांच्या नांवास पारशी सुधारणारांच्या माळिकेंत पहिली जागा दिली असतां शोभेल असे गृहस्थ म्हणजे शेट माणकजी खरशेटजी, जड्ज, हे इ० स० १८३८ सांत पहिल्यानेंच इंग्लंडास गेले. आणि त्याच वर्षी त्यांच्या मागून शेट जहांगीर नवरोजी आणि शेट हिरजी मेरवानजी हे गेले होते. त्यानंतर १८३९ सांत शेट आर्देसर खरशेटजी वाडया हे गेले होते.

परंतु जोंपर्यंत पारशी लोकांची पेढी विलायतेंत झाली नव्हती तोंपर्यंत इंग्लंडामध्यें पारशी लोकांचें नेहमी राहणें झालें नाहीं. पारशी लोकांत आणि वास्तविक म्हटलें तर एतद्देशीय लोकांत इंग्लंडामध्यें पहिलीच पेढी काढिल्याचा मान कामा घराण्यांतील पुरुषांस देणें योग्य आहे. कारण त्यांणीं इ० स० १८५५ नांत इंग्लंडांत पहिलीच पेढी स्थापली. ही पेढी घालण्याच्या कामांत मुख्यत्वें करून शेट खुरशेदजी नसरवानजी कामा आणि प्रोफेसर दादाभाई नवरोजी हे पुढारी होते. ही पेढी काढल्यापासून पारशांची रहदारी वाढली आणि दुसऱ्या पेढ्या निघाल्या, त्यांची यादी एथें करूं लागलो

तर फार लांब होईल. परंतु पारशी मंडळींत आणि आपल्या सर्व लोकांत मान्य असे हल्लींचे सर जमशेटजी जीजीभाई हे सुमारें ६ वर्षांवर इंग्लंडास गेले होते हें बहुतेकांस ठाऊक असेल तरी एथें लिहिणें योग्य आहे. हल्लीं इंग्लंडांत चाकरांसुद्धां सुमारें ६९ । ७० पारशी आहेत. एक खोजे व्यापाऱ्यांची व एक कच्छी वाणी व्यापाऱ्यांची अशाही दोन पेढ्या निघाल्या होत्या, परंतु इ० सन १८६९ सांत पुष्कळ मोठमोठ्या असामी मुंबईत आणि विलायतेंत बसल्या तेव्हां ह्या व दुसऱ्या कित्येक पारशांच्या पेढ्या बंद झाल्या. ही गोष्ट लिहितांना मला फार खंती वाटते, परंतु मी अशी आशा बाळगतों कीं ही खूट लौकर भरून येईल इतकेंच नाहीं, तर एतद्देशीय लोकांच्या पेढ्या यापुढें इग्लंडांत प्रतिवर्षी वाढत जातील.

## १०. प्रवास करण्याविषयीं शास्त्रप्रमाणें.

RELIGIOUS AUTHORITIES ON FOREIGN TRAVELS.

धर्मशास्त्र, व्याकरण, न्याय इत्यादि विद्यांत प्रवीण आणि ज्याला मोठमोठे पंडित मान देतात असा जो भर्तृहरि तो म्हणतोः—

अयं निजःपरो वेति गणना लघुचेतसां
उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम् ॥

याचा अर्थ—"हा माझा देश आणि हा परका देश असें समजणें हें हलक्या मनाच्या मनुष्यांचें काम आहे; उदार मनाचे पुरुष आहेत ते संपूर्ण पृथ्वी आपलें घर असें समजतात*."

वेद, स्मृति, शास्त्रें, पुराणें, उपपुराण इत्यादिक हीं हिंदूंचीं धर्मपुस्तकें होत. या सर्वांत वेद श्रेष्ठ मानले आहेत, कारण ते सर्वांहून प्राचीन आहेत. देशाटण करण्याविषयीं अथवा तारवांत बसून समुद्रमार्गें पर्यटण करण्याविषयीं वेदांत कोठेंही निषेध नाहीं. प-

* Prasthán Chandriká

रंतु उलटें असें दिसून येतें कीं वैदिक काळीं हिंदु लोक व्यापाराकारणें आणि युद्धाकारणें परदेशीं जात असत. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळांत ५६ व्या सूक्तामध्यें दुसऱ्या ऋचेंत, व्यापारी लोक प्राप्तीसाठीं समुद्रामध्यें गलबतांतून एकत्र जमतात, याचा एक दृष्टांत दिला आहे. आणखी ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळामध्यें ११६ व्या सूक्तांत दुसऱ्या व पांचव्या ऋचांत ह्मटलें आहेः—

तुग्रोह भुज्युमश्विनादमेघेरयिनकश्चिन्ममृवाँअवाहाः ॥
तमुहथुर्नौभिरात्मन्वतीभिरंतरिक्षप्रुद्भिरपोदकाभिः ॥ ३ ॥
अनारंभणेतदवीरयेथामनास्थानेअग्रभणेसमुद्रे ॥
यदश्विनाऊहथुर्भुज्युमस्तंशतारित्रांनावमातस्थिवांसं ॥ ४ ॥

(याचा अर्थ)

"कोणी मरावयास टेंकलेला पुरूष जसा आपल्या संपत्तीला सोड-
"तो तसें तुग्र याणें आपला पुत्र भुज्यु यास समुद्रांत पाठविलें. परंतु,
"हे अश्विनहो! तुह्मी आपलीं तारवें समुद्रांत चालवून आणि पाण्यापा-
"सून रक्षून तो परत आणून दिला. महासागरामध्यें आश्रय करण्या-
स किंवा बसण्यास किंवा धरण्यास कांहींच नाहीं, तशांत, हे अश्विन-
"हो! तुह्मी असा पराक्रम केला कीं शंभर वल्ह्यांच्या तारवांत बसवून
"भुज्यु आपल्या पित्याच्या घरीं परत आणून दिला*."

यावरून सिद्ध होतें कीं वैदिक काळीं हिंदु लोकांस जलमार्गें ह्मणजे समुद्रांतून देशाटण करण्यास कांहीं अटकाव नव्हता. पुढें लढाईच्या व शत्रूच्या भीतीस्तव द्विज ह्मणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांणीं जलपर्यटन करूं नये असा कित्येक शास्त्रकर्त्यांनीं व पुराणकर्त्यांनीं निर्बंध केला असेल. परंतु आतां कांहीं लढाई किंवा जुलूम करून बाटवण्याचा काळ नाहीं. याजकरितां प्राचीन काळीं जो

* Wilson's Rigaveda Sanhitá; Vol. I, P. 152,306,307.

निर्बंध ब्राह्मणांनीं केला असेल तो हल्लींच्या काळास अगदीं लागू नाहीं. कारण मिताक्षरांत प्रायश्चित्तअध्यायनीं देवल ऋषीचें वचन आहे कीं:—

सिंधुसौवीरसौराष्ट्रां स्तथा प्रत्यंतवासिनः
अंगवंगकलिंगांध्रान् गत्वा संस्कारमर्हति ॥

याचा अर्थ—"सिंधु, सौवीर, सौराष्ट्र, म्लेन्च्छ देश, अंग, वंग, कलिंग व आन्ध्र देश यांत कोणी गेला असतां पुनः संस्कारास पात्र होतो."† आतां सिंध व सौराष्ट्र एथें जाण्यास इतका प्रतिबंध सांगितला आहे तरीही ब्राह्मण, क्षत्रिय आणि इतर वर्णांचे हिंदु यांचें तेथें जाणेंयेणें आहे. वल्लभकुळांतले महाराज पूर्वी सिंधदेशाला जात नसत, आणि लोकांजवळच्या भेटी आणण्यास आपल्याबद्दल सारस्वत ब्राह्मणांस पाठवून देत असत, परंतु तेही आतां जाऊं लागले आहेत. समुद्रांतून जाणाऱ्या ब्राह्मणाचा समागम न करावा असें आदित्यपुराणांत सांगितलें आहे:—

द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्या प्यसंग्रहः

याचा अर्थ—"समुद्रांतून तारवांत वसून जाणारा ब्राह्मण शुद्ध झाला तरीही त्याचा संग्रह करूं नये."†

परंतु हल्लीं आपण याच्या उलटाच प्रकार पाहतों. ब्राह्मण समुद्रांतून पुष्कळ ठिकाणीं जातात येतात, आणि त्यांस त्याविषयीं कोणी विचारीत नाहीं. असेंच झालें पाहिजे; कारण ज्या काळीं पुराणांत असें लिहिलें त्या काळीं हा निर्बंध कदाचित् चांगल्या कारणावरून झाला असेल, परंतु आतांचे ब्राह्मण तो पाळण्यास बांधले गेले आहेत असें नाहीं. सांप्रतच्या काळाप्रमाणें हा निर्बंध काढून टाकणें अवश्य आहे. आणि ज्यापेक्षां सिंध व काठेवाड ह्या देशांत

† Prasthân Chandrikâ.

समुद्रांतून जाण्यायेण्याविषयीं प्रतिबंध नाहींसा झाला, त्यापेक्षां इंग्लंड अथवा विलायत एथें जाण्यासही आतां कांहीं प्रतिबंध राहिला नाहीं असें स्पष्ट सिद्ध होतें.

शास्त्राप्रमाणें "ब्राह्मणानें म्लेंच्छ भाषेचा एक शब्दही उच्चारूं नये. हिंदूंशिवाय इतर सर्व लोक म्लेंच्छ धरले आहेत. कोणी ब्राह्मण होत्साता म्लेंच्छास स्पर्श करील तर मोठें पाप आहे, आणि त्यास स्नान केलें पाहिजे. दिवसामध्यें अशा कित्येक वेळा सांगितल्या आहेत कीं त्या वेळीं ब्राह्मणानें म्लेंच्छाचें तोंड देखील पाहूं नये. कोणी ब्राह्मण होत्साता पतिताची चाकरी करील तर त्यास पतित म्हणावें. ब्राह्मणानें तर पतिताबरोबर कांहींएक संबंध किंवा व्यवहार ठेवूं नये."

सांप्रत काळीं म्लेंच्छांची चाकरी करणारे ब्राह्मण किती सांपडतील बरें? वर सांगितल्याप्रमाणें पारशी, मुसलमान आणि इंग्रज हे सर्व म्लेंच्छ ठरतात, आणि त्यांची चाकरी करणारे व त्यांजबरोबर संबंध ठेवणारे उंच जातीचे हिंदु आज पुष्कळ सांपडतील. यास्तव अशा बाबतींत प्राचीन काळचा ठराव बिलकूल लागू पडत नाहीं, आणि लागू पाडला तर सर्व गोष्टींस लागू पाडला पाहिजे. इंग्लंडास जाण्याच्या बाबतींत हा ठराव लागू पाडला, तर कांठेवाड व कराची एथें जाणें व म्लेंच्छांची चाकरी करणें यांसही लागू केला पाहिजे.

आज कोणाच्यानें खातरीनें ह्मणवेल कीं मी म्लेंच्छाबरोबर कांहींएक संबंध ठेवीत नाहीं.? परंतु ह्या गोष्टीस हलीं कोणाच्यानें हरकत घेवत नाहीं. तर इंग्लंडास जाण्याच्या गोष्टीस दुसऱ्या कोणत्या आधारावरून हरकत घेतां येईल? पूर्वीं जयपूरचा राजा मानसिंग हा देश जिंकण्यास निघाला तो देश जिंकीत जिंकीत अटकनदीपर्यंत जाऊन पोंचला; त्या समयीं ह्या ग्रंथाच्या आरंभीं साकी लिहिली आहे ती म्हणून तो नदीच्या पैलतीरास जाता झाला. या सा-

कीचा अर्थ हाच कीं सर्व भूमि ईश्वरानें उत्पन्न केली तिजमध्यें अटक कोठून आली? ज्याच्या मनांत खटक ह्मणजे संशय तोच अटकून राहतो. तर अटकेजवळ कशासाठीं अटकून राहावें.?

धर्माविषयीं हरकत घेणारे धर्म म्हणजे कशांत आहे याचा थोडाच विचार करितात. मनुष्याचा धर्म मनुष्याबरोबरच राहतो. कोणीही माणूस स्वसंतोषानें आपला धर्म सोडी तोंपर्यंत तो धर्म त्याला सोडीत नाहीं. सांप्रत काळीं जातिभेद आणि चाली यांचें संरक्षण करण्यास बाहेरून होईल तितकें सोंवळें आणि डामडौल करणें यांतच धर्म आहे असें विचारहीन लोक समजतात. जे सहज बोलतांना लबाडी सांगतात आणि खोट्या शपथा घेतात ते कांहीं धर्मविरुद्ध चालतात असें नाहीं. जे चोरी करितात, व्यभिचार करितात, आपल्या भाऊबंदांचें द्रव्य हरण करितात, अनाथ विधवांस रडायास लावतात आणि सरकारच्या मोठ्या अपराधांत सांपडून काळ्या पाण्यावर जातात ते कांहीं धर्मविरुद्ध चालतात असें नाहीं; परंतु कोणी वर लिहिल्याप्रमाणें जातिभेदाचें रक्षण करण्यास बाहेरचें सोंवळें केलें नाहीं अथवा कोणाकडून त्यांत किंचित् अंतर पडलें तर त्यांत त्यांणीं मोठें पाप केलें आणि ते धर्मविरुद्ध चालले. हाय हाय! काय समजुती ह्या आणि अशा कोठपर्यंत चालणार!

## ११. प्रवास करण्याविरुद्ध जात्यभिमान.

CASTE PREJUDICE IN REGARD TO FOREIGN TRAVEL.

बरें, जातीविषयीं खरा अभिमान लोकांस असून त्यांच्या समजुती अशा असत्या तर असो, परंतु तसें कांहीं नाहीं. ते नुसते बाहेरून सोंवळें करतात, आणि तोंडानें मोठमोठ्या गोष्टी सांगतात, परंतु आपल्या विचाराप्रमाणें वागून जातिभेद राखीत नाहींत. याचें थोडेसे दृष्टांत देऊन हें प्रकरण पुरें करितों.

(१) ओढ्या जगन्नाथाचे पुजारी बहुत करून मांसाहारी असतात, आणि त्यांच्या हातचें शिजवलेलें अन्न सर्व जातींच्या हिंदूंस, वल्लभ कुळांतल्या महाराजांस देखील चालतें, पण दुसऱ्या ठिकाणीं तसें चालत नाहीं. दुसरें, जगन्नाथ एथें सर्व वर्णांचे हिंदु एकमेकास शिवून जेवतात, परंतु तसें इतर ठिकाणीं झालें असतां जातिभेद माडला असें ह्मणतील.

(२) तैलंग ब्राह्मण व द्राविड ब्राह्मण अद्यापि सोमयज्ञ करितात, आणि त्यांत पशूचा वध करून भक्षण करितात तें चालतें, परंतु इतर ठिकाणीं तसें होऊं शकत नाहीं.

(३) संपूर्ण गुजराथ देशांत शाक ह्मणजे देवीउपासक ब्राह्मण आहेत. ते देवीची उपासना करितात, आणि देवीस मद्यमांसाचा नैवेद्य करून आपण भक्षण करितात. नागर आदिकरून उंच जातीचे हजारो देवीउपासक ब्राह्मण आज सर्व गुजराथेंत आहेत, ते बाहेरून मद्यमांसाचा निषेध करितात, आणि ते पदार्थ पाहून आपणास तिरस्कार येतो असें दाखवितात, परंतु आंणून ते भक्षण करितात तें चालतें.

(४( मुंबईत मेश्री (वैष्णव) वाणी आणि श्रावक (जैनधर्मानुसारी वाणी यांचा परस्पर अन्नव्यवहार चालतो, आणि ते एका पंगतींत बसून जेवितात; परंतु गुजराथेंत मेश्री वाणी श्रावकाच्या घरचें पाणी देखील पीत नाहींत, आणि प्याले असतां जात मोडली असें होतें.

(५) काठेवाडांत वाणी लोक धोतरें नेसून जेवायाला बसतात आणि जातिभोजनांत धोतरें नेसून वाढतात; परंतु मुंबईत तसें केलें तर जात मोडली असें ह्मणतील.

(६) मुंबईत ज्या विहिरीवर मुसलमान आणि दुसऱ्या जातींचे लोक पाणी भरतात त्या विहिरीवर ब्राह्मण, वाणी यांणीं पाणी भर

अथवा त्या पाण्यास रस्त्यांत कोणी शिवलें तर चालतें, परंतु बाहेर गांवीं कित्येक ठिकाणीं तसें चालत नाहीं, तसें केलें तर जात बुडाली असें ह्मणतात.

(७) अमदाबादेंत चामड्याच्या पखालींतलें पाणी वाणी लोक प्याले तर चालतें; तसेंच आदनामध्यें मुसलमानानें चामड्याच्या पखालींत भरून गाढवावर घालून पाणी आणलें तर चालतें, परंतु मुंबईंत असें केलें तर जात मोडली ह्मणतील.

(८) काठेवाड प्रांतीं पोरबंदर व मांगरोल एथें ज्या गादीवर मुसलमान बसला असतो त्याच गादीवर बसून वाणी काफी किंवा पाणी प्याला, अथवा त्याणें मुसलमानाच्या हातचा कुसुंबा घेतला तर चालतें, परंतु दुसऱ्या ठिकाणीं तसें केलें असतां जातिभेद मोडला असें होईल.

या थोड्याशाच दृष्टांतांवरून असें दिसून येतें कीं जातिभेदाविषयीं कांहीं निश्चित नियम नाहीं. जातिभेदाचा प्रकार बहुत करून देशकालमानावर आहे.

तसेंच एकाच गांवांत एकाच जातीचे लोक तरी एकसारिख्या रीतीनें जातिभेद पाळतात असें नाहीं. मुंबईंत एकाच जातीचा एक मनुष्य एका रीतीनें जातिभेद राखतो आणि दुसरा दुसऱ्या रीतीनें राखतो.

(१) कृष्णोबा जितकेदां जेवतो तितकेदां स्नान करतो, परंतु त्याच्याच जातीचा वामनराव तसें करीत नाहीं, तर तें चालतें.

(२) गोविंदराव लाडवाच्या दुकानावरून लाडू, करंजा आणून खातो तें चालतें, परंतु त्याच्याच जातीचा नाना ह्मणतो यांत भ्रष्टाकार होतो व धर्म राहत नाहीं.

(३) चिमणाजीपंत किरिस्तांवांच्या हातचें आणि त्याच्या पाण्याचें

औषध पितो तें चालतें, परंतु धोंडोपंत ह्मणतो यांत कांहीं धर्म राहत नाहीं.

(४) रामचंद्रशेट आपल्या घरांत इंग्रज लोकांस बोलावून वाईन वगैरे दारू देतो तें चालतें. परंतु सखारामशेट ह्मणतो यांत धर्म बुडतो.

(५) बापूजी टीचर आणि रॉजर्स यांच्या दुकानचें लेमोनेड व सोडावाटर आणून पितात तें चालतें, परंतु जगन्नाथजी ह्मणतात असें करून हे आपला धर्म बुडवतात.

माधवराव थालिपीट, पुऱ्या, भजीं, सांडगे, लोणचें घरांत तयार करून आगगाडींतून घेऊन जातो, आणि म्हार, मुसलमान, धेड यांस शिवतो तें चालतें, परंतु रघुनाथराव ह्मणतो असें केल्यानें धर्म बुडतो.

(७) लक्ष्मणराव मलबाराला जातांना मुसलमानाच्या गलबतावर स्वयंपाक करून जेवतो तें चालतें, परंतु त्याच जातीचे वामनराव ह्मणतात यांत धर्म बुडतो.

(८) सखारामपंत सुतक्याला शिवून जेवतो तें चालतें, पण त्याच्याच जातीचा हरिपंत ह्मणतो सुतक्याला शिवून स्नान केल्यावांचून जेवलें तर धर्म बुडतो.

याशिवाय आंतून भ्रष्टाकार चालतो तो खेरीज. कित्येक वेश्यांच्या, रांडांच्या घरीं जाऊन आपणास भ्रष्ट करून घेतात. कित्येक मुसलमानांच्या दुकानांत गांजा, चंडूल ओढून भ्रष्टाकार करून घेतात. कित्येक चोरट्या रीतीनें दारू पितात आणि भ्रष्ट होतात. हलक्या जातीचे कित्येक लोक पैशानें ताजे झाले आहेत त्यांजबरोबर कित्येक वरच्या जातींचे लोक बागांत अथवा वाडींत जेवणाखाणाला जातात. कित्येक काळ्या पाण्यावर जाऊन बाटून आले आहेत. अशा रीतीनें आंतून भ्रष्टाकार चालतो, त्याला कोणी विचारीत नाहीं. याविषयीं इतकेंच ह्मणतात कीं "त्यांचें कर्म ते जाणत."

अशा स्थितीस जातिभेद जाऊन पोंचला आहे, तथापि लोक त्याला धर्माचें मूळ करून बसले आहे. सर्वांत मोठी आश्चर्याची गोष्ट ही कीं जे हिंदु चोरि वगैरे मोठे अपराध केल्यामुळें देशपार होतात आणि काळ्या पाण्यावर जाऊन येतात ते तर खरोखर बाटून येतात असें असतां, त्याला कोणी विचारीत नाहीं. यावरून असें दिसतें कीं प्रत्येक जातीचे लोक जेथें मऊ सांपडेल तेथेंच खणूं लागतात. दुसरें कांहीं नाहीं.

## १२. स्वतंत्रपणें वागण्याची आवश्यकता.

PREE ACTION MOST NEEDED.

जेव्हां मनुष्यास आपल्या इच्छेप्रमाणें वागतां येत नाहीं तेव्हां तो कैदखान्यांत पडलेला आहे असें म्हटलें तरी चालेल. स्वतंत्र मनुष्यास आपल्या इच्छेप्रमाणें पाहिजे तेथें जातां येतें. जातीच्या भयामुळें स्वदेशरूप कोनप्यांतून बाहेर पडवत नाहीं, आणि सुधारलेल्या देशीं प्रवास करण्यास जावत नाहीं, या स्थितीला बंदीखान्याशिवाय दुसरें कोणतें नांव शोभे? कोणी जुलमी राजा आपणास आपल्या घरांत कोंडून ठेवतो, बाहेर जाऊं देत नाहीं, आणि बाहेर गेल तर शिक्षा करतो, असें झालें तर तो जुलूम आपल्याच्यानें कसा सहन करवेल? आपण असें म्हणणार नाहीं कीं अशा स्थितींत राहणें यापेक्षां मरणें बरें? आतां, याचप्रमाणें कोणी जुलमी राजा जर असें ह्मणाला कीं मी तुह्मास आपल्या देशाच्या बाहेर जाऊं देणार नाहीं, माझ्या देशांतच हातांत बांगड्या भरून राहा, तर या जुलमी राजाच्या जुलमांतून सुटण्याचा विचार आपण करणार नाहीं काय? हा जुलमी राजा कोण तो तुह्मांस ठाऊक आहे काय? हा जुलमी राजा जातीचा अतिशय अधिकार हाच होय. ह्या जातीच्या अतिशय अधिकाराचें आपण अधिक भय वाळगावें तसा तो आप-

पास अधिक दुःख देईल. यास्तव हें भय सोडून आपण धैर्यानें बा-हेर पडलों तर, हा जुलमी राजा झटदिशीं आपल्या हातीं लागेल.

अहो! कोणी आपणास सांगितलें कीं पैसा मिळवण्यास बाहेर जाऊं नका, घरांत बसूनच दळीत राहा, तर तें आपण सोसूं काय? अहो! कोणीं सांगितलें कीं चांगली वस्तु किंवा चमत्कार पाहण्यास बाहेर जाऊं नका, घरांत हात जोडून भिंतीकडे पाहात राहा, किंवा माझा हांकीत बसा, किंवा हातांत घांट घेऊन वाजवीत राहा, तर तें आपल्याच्यानें सोसवेल काय? आपणामध्यें मनुष्यपण असलें तर आपण म्हणूं कीं होणार तें होऊ, पण हा जुलूम आमच्यानें कांहीं सोसवत नाहीं. असा गैरवाजवी जुलूम सहन करणें हें कांहीं मनुष्य-पणाचें लक्षण नव्हे.

हल्लीं आपण सुधारलेल्या राज्यांत व सुधारलेल्या काळांत राहत आहों. मूर्खपणाचा व जुलमाचा काळ जात चालला आहे. हल्लीं-चें हें सुधारणुकीचें व स्वतंत्रतेचें युग होय. पाहा, स्वतंत्रतेसाठीं अ-मेरिकेंत केवढें युद्ध झालें! युरोपखंडांत स्वतंत्रतेकरितां किती व केवढ्या लढाया झाल्या! स्वतंत्रतेसाठीं लोक आपले प्राण देतात. जे स्वतंत्र होण्याची दरकार बाळगीत नाहींत त्यांची आणि गुला-मांची स्थिति एकच असें समजावें. कोणालाहीं गुलामांच्या स्थि-तींत पडून राहायाला आवडेल, किंवा सुधारलेल्या आणि स्वतंत्र रा-ज्यांत राहायाला आवडेल? काय, स्वतंत्र होण्याचा समय अजून ना-हीं आला! हल्लीं जी गडबड व भवतिनभवति चालली आहे ति-जवरून मला असें वाटतें कीं तो समय जवळ आला आहे. व्यथेनें पीडित झालेल्या कुडींतून निघून जाते वेळीं थोडा वेळ जिवाला जसें दुःख होतें तसेंच अज्ञानरूप व्यथेनें पीडित जी दशा तींतून मोक-ळें होण्यास आपणास थोडेंसें कठीण पडल्यावांचून राहणारच नाहीं.

मी पुनः एकदां हें सांगण्याची आज्ञा घेतों कीं समुद्रांतून जाऊं नये अथवा अटकेच्या पलीकडेस जाऊं नये ही चाल पूर्वीच्या काळीं धर्माची मोठी ढाल झाली असेल, परंतु हल्लीं ती आपणाला बेडी झाली आहे. ही बेडी आपण आपल्या हातपायांत कोठपर्यंत राहूं देणार? ही बेडी घालून सुधारलेल्या व समंजस लोकांमध्यें वागण्यास व फिरण्यास आपणांस लाज वाटत नाहीं काय? अहो, सुधारलेल्या काळांत, स्वतंत्र राज्यांत, आणि ज्ञानदीपाच्या योगानें आपलीं मनें प्रकाशित झाल्यावर, ही बेडी आपल्याच्यानें कशी सोसवते बरें? ही बळकट बसलेली बेडी ज्ञानशक्तीनें तोडून टाकावी हा प्रत्येक सुशिक्षित व समंजस एतद्देशीय मनुष्याचा धर्म नव्हे काय? हे माझे बंधुजन हो! हें दास्य आपण कोठपर्यंत काढावयाचें?

अभंग.

विद्याहीन बुद्धी झालीसे बावरी ॥ दास्य कोठवरी करावें बा ॥ १ ॥
खाउनियां लाता बुक्या परोपरी ॥ दास्य कोठवरी करावें बा ॥२॥
वाहुनियां सदा बोझे शीरावरी ॥ दास्य कोठवरी करावें बा ॥३॥
बरें तें मरण भांडोनी समोरी ॥ दास्य कोठवरी करावें बा ॥४॥
सुविचारें शुद्ध स्वमतीशीं करीं ॥ दास्य कोठवरी करावें बा ॥५॥
करणें बेडावलीं विषयमंदिरीं ॥ दास्य कोठवरी करावें बा ॥ ६ ॥
आणीं विद्यामात्रें तयां शुद्धीवरी ॥ दास्य कोठवरी करावें बा ॥७॥

सुधारणुकीचें पाणी चढूं लागलें आहे, आणि स्वतंत्रपणाचा वारा सुटला आहे. तर बांधवहो, उठा आणि आपलें तारूं हकारा. जे खलाशी भरतीचा आणि वाऱ्याचा समा पाहून तारूं हकारतात ते जलदी आणि सुखरूप बंदरांत जाऊन पोंचतात; आणि जे मागून ओहटीच्या वेळेस हकारतात ते मागें पडून राहून समुद्रांतलें तुफान खात जातात. सुधारणुकीचें पाणी चढलें आहे तों बहुत काळ-

पर्यंत सोडून ठेवलेला नागर उंचला, आणि सर्व तुटून पडून आपलें गलबत हकारा. एकदां आपली पराकाष्ठा करा ह्मणजे माझी खातरी आहे कीं फत्ते झाल्यावांचून राहणार नाहीं. हें काम असें आहे कीं यांत अधिक धिमेपणा केला असतां अधिक नुकसान आहे. आपण जसे अधिकाधिक धिमे होऊं, तसे आपण सुधारणुकीच्या काळांत व सुधारणुकीच्या गर्तांत अधिकाधिक पाठीं पडत जाऊं. —"अजून वेळ आली नाहीं" हें निमित्त सुधारणुकीच्या दुसऱ्या बाबतींत कदाचित् चालेल; परंतु या बाबतींत तें चालणार नाहीं. या बाबतींत भोळ्या समजुतीपेक्षां भय अधिक नडतें. यास्तव हें भय सोडा आणि त्वरा करून पाऊल टाका.

## पद.

चला चला रण मारा, सकळही ॥ धृ० ॥
गर्जत वंडु रणसिंग तुतारी, वाजत भेरि नगारा ॥ १ ॥
चला उठा हल्लाच करा अजि, विजय तुह्मा सामोरा ॥ २ ॥
आतां आळस किमपि नका करूं, शंका भय दुर सारा ॥ ३ ॥
पुन्हा न येइल समय आजचा, जरि गेलीं युगें बारा ॥ ४ ॥
फोल बोल कधि कामि न येती, सिद्धि करिती तलवारा ॥ ५ ॥

## अभंग.

जगीं परशुराम आणिक अर्जून ॥ झाले सर्वमान साहसानें ॥ १ ॥
मारुनि सौमित्रें दुष्ट तो शक्रारी ॥ मानवला सुरीं साहसानें ॥ २ ॥
उज्जनीचा राजा विक्रम प्रसिद्ध ॥ साहसेंचि शुद्ध कीर्तीमान् ॥ ३ ॥
पाहा कोलंबसें नवी अमेरिका ॥ शोधिली भूमीका साहसानें ॥ ४ ॥
नेपोल्यन बोनापार्टीचें साहस ॥ सर्व युरोपास विदीत कीं ॥ ५ ॥
पोपाचे संगतीं भांडला लुथर ॥ साहसानें झाला जयवंत ॥ ६ ॥
शिकंदर पादशाह जगीं मान ॥ पावल निधान साहसानें ॥ ७ ॥

### श्लोक.

ज्ञातीचा बंध तोडा, अणि परभुमि जा, साहसें वित्त जोडा ॥
व्यापारीं चित्त कोंडा, मग बहु मिळवा कीर्ति, दैन्यासि झोडा ॥
पाखंडाला विखंडा, जगिं अनुपम या ब्रह्मभक्ती सुगोडा॥
तीतें तोंडांत पाडा, इहपर सुखि व्हा, दुःखनिर्मुक्त गाढा ॥ १ ॥

कोणी ह्मणतील कीं तुमचा समज कमी ह्मणून तुह्मीं उतावळ केली. तर याचें उत्तर मी थोडक्यांत इतकेंच देतों कीं होय, बाबा, आमचा समज कमी. ज्ञानसागर फार मोठा आणि अपार आहे. परंतु याचसाठीं आह्मी या सागराचें दर्शन करण्यास गेलों होतों. आह्मास या ज्ञानसागराचें दर्शन झालें, आणि त्यांतील ज्ञानरत्नें आमच्या दृष्टीस पडलीं. त्यांच्या स्वरूपाचें वर्णन करतां येईल असें नाहीं, तथापि मी माझ्या अल्प शक्त्यनुसार जें थोडेंसें वर्णन आपल्या सेवेंत प्रविष्ट करीत आहें तें आपण वाचलें किंवा ऐकिलें तर तेवढ्यांतच मी मोठा संतोष मानीन. ही गोष्ट खरी आहे कीं थोडेंबहुत दुःख सोसल्यावांचून आपलें आणि आपल्या देशाचें कल्याण होणें नाहीं. तथापि ईश्वराचा हा मोठा आभार मानला पाहिजे कीं आपण कोणा जुलमी सरकाराच्या सत्तेखालीं नाहीं, अथवा ग्यालिलियो होता तशा काळांत नाहीं; कारण "पृथ्वी फिरते" असें मत त्याणें दिलें तेवढ्यामुळेंच त्या विचाऱ्यास बंदीशाळा भोगावी लागली.

असा जुलमाचा काळ आतां निघून गेला, ह्मणून आपण ईश्वराचे अनंत उपकार मानले पाहिजेत. ही भयंकर काळाची अंधारी रात्र आतां पार झाली. सुधारणारूप सूर्य उगवूं लागला आहे. तर, बांधव हो, वर उठा; उठा आणि जागे व्हा. प्रभात झालें व दिवस उगवला. अज्ञान व देवभोळेपण यांची मोठी रात्र आतां पुरी झाली, आणि आपणही फार दिवस झोंप घेऊन कंटाळलों आहों. आतां स्व-

तंत्रपणाची लहर आली आहे, आणि तेणेंकरून आपल्या हातपायांचे बंद तुटले आहेत. आपण झोंपेंतून पुरते जागे झालों नाहीं, ह्मणून आपणास वाटत असेल कीं आपले हातपाय अद्यापि बेड्यांतून सुटले नाहींत. परंतु, बंधुजन हो! आळस झाडून झटकन उठा, आणि पाहा ह्मणजे खरोखर प्रभात होऊन दिवस उगवला आहे, आणि आपल्या हातपायांचीं बंधनें बहुत वर्षे होऊन कीट आल्यामुळें आणि सुधारणुकीच्या लहरीनें तुटून गेलीं आहेत असें समजेल. सुधारणारूप सूर्य उगवत आहे तो आपणासाठीं आतां थांबणार नाहीं.

याजकरितां, बांधव हो! मी पुनः विनंती करून सांगतों कीं उठा आणि धैर्य धरून बाहेर पडा. हिंमत करून देशाटण करा, विलायतेस जा, आणि आपला देश किती पाठीं पडला आहे तो पाहा. ह्या माझ्या विनंतीकडे आपण लक्ष दिलें तर, माझी खातरी आहे कीं, या पाठीं पडलेल्या देशास पुढें नेण्याची आणि उंच स्थितीप्रत पोंचवण्याची प्रेरणा आपणास झाल्यावांचून राहणार नाहीं.



# प्रकरण २.

## मुंबईहून लंडनापर्यंत.

II. FROM BOMBAY TO LONDON.

मुंबईहून लंडन सुमारें पांच हजार मैल आहे. तेथें जाण्याचा अगदीं जवळचा मार्ग म्हटला म्हणजे "ओवरलांड" म्हणजे स्वेज संयोगी भूमीवरून आहे. स्वेज संयोगी भूमीवरून पुढें जाण्याचे तीन मार्ग आहेत. एक, सौधाम्तनाच्या वाटेनें उजू जातां येतें. दुसरा, मार्सेल्सावरून फ्रान्समधून. आणि तिसरा त्रियस्तावरून आस्त्रिया, जर्मनी, बेल्ज्यम इत्यादि युरोपखंडांतल्या देशांमधून. या सर्वांत जवळचा मार्ग मार्सेल्सावरून जाण्याचा हा होय. सुंदर पारिस शहर पाहणें असलें तर ह्याच वाटेनें जावें. आह्मी या मार्गानें जाण्याची चिटी घेतली होती.

### १. आरबी समुद्र.

THE ARABIAN SEA.

आह्मी तारीख १३ वी मार्च सन १८६३ रोजीं सकाळचे अकरा वाजतां मुंबई बंदरांतून निघालों. मजबरोबर तीन दक्षिणी हिंदु मित्र होते, आणि त्यांचे चार चाकर होते. यांशिवाय एक गुजराथी मनुष्य मजबरोबर होता तो जातीचा परवार वाणी होता. आह्मी सर्व मिळून आठ हिंदु—त्यांत दोन दक्षिणी ब्राह्मण होते—एकाच आगबोटींत बसून बरोबर विलायतेस निघालों. आह्माबरोबर चार पारशी गृहस्थ होते, आणि त्यांजबरोबर तीन पारशी चा-

कर होते. यांखेरीज पुष्कळ इंग्रज गृहस्थ, त्यांच्या स्त्रिया आणि मुलेंबाळें यांणीं आमची आगबोट अगदीं भरून गेली होती.

मुंबईच्या बंदरांतून निघतांच आह्मी आरबी समुद्रांत गेलों. नंतर वर आकाश आणि खालीं पाणी यांवांचून कांहींच दृष्टीस पडेनासें झालें. मला लौकरच गलबत लागूं लागलें आणि माझें डोकें फिरूं लागलें. चार पांच वेळां वांतिही झाली. याप्रमाणें पहिला दिवस तर त्रासांत गेला. दुसऱ्या दिवशीं जरा आराम वाटलें, परंतु उठावें, बसावें अथवा खावेंप्यावें असें कांहीं वाटेना. याप्रमाणें दोन दिवस गेले, नंतर हळूहळू गलबताची सवई होऊं लागली. मी मन कठीण करून जरा इकडे तिकडे फिरावें, "केबिनीं"तून उठून अंमळ "डेका" वर जाऊन बसावें, असें केलें ह्मणजे जिवाला किंचित् समाधान वाटूं लागलें.

तथापि वेळ जाईना, एकेक तास एकेका दिवसाप्रमाणें वाटे. आह्मी अंमळ वेळ वाचावें, अंमळ गोष्टी सांगाव्या, अंमळ फिरावें आणि अंमळ आकाश आणि समुद्र ह्यांकडे पाहावें. मिसिस नेस्बिट ही बाई केव्हां केव्हां गुजराथी शिकायाला मजजवळ येऊन बसत असे. ती आणि दुसरे कित्येक इंग्रज ममताळू व मनमिळाऊ होते ते आमचा समाचार घेत आणि आह्मांबरोबर गोष्टी सांगत बसत. इंग्रजांचीं लहान लहान मुलें आगबोटीवर इकडे तिकडे धांवत तें पाहून आह्मास मोठी मौज वाटे.

### २. आगबोटीवरील हकीकत.

ON BOARD THE STEAMER.

आमची आगबोट फार चांगली व मोठी होती. तिचें नांव "जेदो." ज्यांणीं विलायती मोठ्या आगबोटींतून अथवा गलबतांतून पर्यटन केलें नाहीं त्यांला उतारू लोकांच्या सोईसाठीं त्यांत काय का-

य तजवीज केलेली असते हें माहीत नसेल. निजायाला व पोशाक करायाला आणि जरूरीचें तितकें सामान ठेवायाला लहानच, परंतु सुंदर आणि सुखावह अशा खोल्या असतात. ह्या खोल्यांस "केबिनी" ह्मणतात. दर "केबिनी" मध्यें बहुतकरून तीन उतारूंचा समावेश होतो; आणि एकेका केबिनींत उंच फळया बसवून त्यांवर तीन बिच्छाने घातलेले असतात. ह्या निजण्याच्या दर एका जागेस "बर्थ" ह्मणतात.

एकेका बर्थावर सुंदर पडदे टांगलेले असतात ते ओढून वर घेंतां किंवा खालीं सोडतां येतात. येणेंकरून एका केबिनींतल्या तीनही उतारांस एकमेकाची मर्यादा राखतां येते. बहुत करून तीन स्नेही अथवा ओळखीचे मिळून एक केबीन घेतात. दर केबिनींत हात तोंड धुवायाला "वॉशिंग टेबल" असतें. त्यावर तोंड पाहायाला आरसा आणि पाण्याला कांचेचीं भांडीं ठेवलेलीं असतात. वांति झाली तर त्यासाठींही एक रिकामें भांडें असतें.

आगबोटीवरल्या ज्या माणसास दरएका केबिनीचें काम नेमून दिलेलें असतें तो रोज दोन चार वेळां येऊन हाततोंड धुवायाचें आणि ओकायाचें भांडें साफ करून जातो. तो नित्य केर काढून बिच्छाना घालून आणि धुतलेला रुमाल ठेवून जातो. तो सांज होतांच दिवा लावून जातो. तो आठाठ दिवसांनीं जुनी चादर आणि जुनें पांघरूण काढून घेऊन धुतलेली चादर आणि धुतलेलें पांघरूण घालून जातो. रात्रीस निजते वेळीं आपण आपले बूट केबिनीच्या बाहेर ठेवले तर केबिनीचा माणूस सकाळीं मोठ्या पाहांटेस ब्रशानें ते साफ करून ठेवितो.

केबीन ही मुख्यत्वेंकरून निजायाला आणि पोशाक करायाला असते. जेवायाला बसण्याची जागा निराळी असते तेथें एक मोठें

टेबल असतें. त्यावर वारा घालण्यासाठीं एक मोठा पंखा टांगलेला असतो. तेथें मोठे आरसे आणि दिवेही टांगलेले असतात. त्या खोलींत जेवायाला बसतात तेव्हां तिची शोभा पाहण्यासारखी असते. इंग्रज लोक आपाल्या घरीं तर वैभव भोगतातच; परंतु समुद्रांत देखील ते तसेंच वैभव भोगीत असतील असें आपणास वाटणार नाहीं. रात्रीस या सलून ह्मणजे खोलीमध्यें रोशनाई करितात. केव्हां केव्हां चित्तास करमणूक करण्यासाठीं उतारू लोक वाद्यें वाजवितात, आणि स्त्रिया व पुरुष एकत्र जमून गाणेंबजावणें करितात. जेवणाच्या वेळीं वाडपी लोक उन्हून आणि तऱ्हतऱ्हांचीं पक्वान्नें ने आण करीत असतात.

पहिल्या वर्गाच्या उतारूंस हिंडण्याफिरण्यास आणि उघड्या हवेंत बसण्यासवरण्यास आगबोटीवरला सुकाणाकडचा भाग मोकळा ठेवलेला असतो. त्या भागास "क्वॉर्टर डेक" म्हणतात. ह्या ठिकाणीं कित्येक बरोबर घेतलेल्या प्रवासाच्या खुर्चा घेऊन त्यांवर बसतात, आणि सुख भोगतात. कोणी वाचीत बसतात. कोणी गोष्टी सांगतात. कोणी बुधबाळें अथवा गंजिफा खेळतात. कोणी फिरत राहतात. सारांश, हरएक प्रकारें ज्यांला जसें भावेल तसे ते आपापला काळ घालवतात.

स्नान करण्याच्या निराळ्याच खोल्या असतात. त्यांत न्हाण्याधुण्याची सर्व सोय असते. अंग धुण्यास पाणी ऊन्ह किंवा थंड पाहिजे तसें मिळतें. डोकें वर राखून पाण्यांत सपसल पासलें पडून अंग चोळतां येई असेंही एक मोठें लांब भांडें दरएका न्हाण्याच्या खोलींत असतें. त्याची कळ फिरविली कीं त्यांत समुद्राचें ताजें पाणी येऊन भरतें, आणि खालून गुडदी काढली ह्मणजे तें पाणी फिरून समुद्रांत जातें. "शॉवरबाथ" म्हणजे पावसाच्या सरींत अंघोळ क-

रावी तशी करावयाची असल्यास त्याचीही तजवीज केलेली असते.

शौचास वगैरे जाण्याची न्हाण्याच्या खोलीजवळच एक निराळी खोली असते. तिला "वॉटरक्लॉसेट" ह्मणतात. ती ओळखतां यावी ह्मणून तिजवर w. c. हीं अक्षरें काढलेलीं असतात. सर्व रात्रभर तींत दिवा जळत असतो. घाण येऊं नये म्हणून ही जागा स्वच्छ ठेवण्यास फार जपत असतात.

सकाळीं उजेडतांच आगबोटीवरचा माणूस एकेका केबिनींत एकेका उतारूसाठीं चाहाचा एक प्याला ठेवून जातो. पुष्कळ इंग्रज लोकांला अशी सवय असते कीं अंथुरणांतून उठतांच दांत घासल्यावांचून व तोंड धुतल्यावांचून पारोशा तोंडींच चाहा प्यावा. ही सवय कांहीं चांगली आहे असें नाहीं. साडेआठ नऊ वाजतां न्यहारीची वेळ होते. दोनप्रहरीं टिफिणीची वेळ होते. दोनप्रहरां उपरांत चार वाजतां मोठें जेवण तयार होतें. त्या वेळीं पुष्कळ तऱ्हांचीं ताजीं उन्हून पक्वान्नें केलीं असतात. जेवणाच्या अंतीं चांगली चांगली फळफळावळ खायाला मिळते. पुनः संध्याकाळीं साडेसाहा वाजतां काफी किंवा चाहा घेण्याची वेळ होते.

जातीच्या बंधनांत सांपडलेले हिंदु आणि कित्येक पारशी खेरीज करून, पहिल्या प्रतीचे सर्व उतारू हें जेवण होतें तेथें जेवायाला जातात. ते घरीं जेवतात त्याहून एथें त्यांस चांगलें जेवण मिळतें. दुसऱ्या प्रतीचीं उतारें आगबोटीच्या पाठच्या भागीं मागून जेवतात. त्यांबरोबर पहिल्या प्रतीच्या उतारांचे चाकरही जेवतात. न्यहारी, टिफीण, जेवण किंवा चाहा हा प्रथम चार वेळां तयार व्हावयाचा, आणि मग टेबलावर जेवायाला जावयाची घांट वाजते. याप्रमाणें नित्य आठ वेळ घांट वाजते ती ऐकतां येते.

भर समुद्रांत गेल्यावर आगबोट लहान व लांबट बेटासारखी दि-

सते. वास्तविक पाहिलें असतां भर समुद्रांत आगबोट हा एक चालता गांवच होय. हा गांव विस्तारानें आणि वस्तीनें कित्येक लहान गांव असतात त्यांहून कांहीं कमी नाहीं. ह्या गांवांत अन्नपाण्याचा मोठा संग्रह करून ठेवलेला असतो. एथें बकरीं, कोमडीं आणि दुभत्या गाई असतात. यांत मनुष्यांची मोठी वस्ती असते. आगबोटीचा कप्तान हा ह्या गांवचा नायक होय. कप्तानाच्या हाताखालीं मालीम व इंजनेर व कोठारी व डाक्तर असतो. ह्या दरएकाच्या हाताखालीं आणखी पुष्कळ माणसें असतात.

कामें निरनिराळीं वांटून दिल्यानें आणि दरएक जणास निराळें काम नेमून देऊन त्याचें जोखीम त्याजवर टाकल्यानें काम कसें चांगल्या रितीनें व बरोबर होतें याचा दाखला आगबोटीवर येतो. प्रत्येक जण आपापलें काम बरोबर समजून करतो. कोणी कोणाच्या कामांत आड येत नाहीं.

मालीम आगबोट चालवण्याच्या कामांत कप्तानास मदत करतो. कोणत्या ठिकाणीं तारूं आलें आहे; कोणत्या ठिकाणीं खरावा अथवा खडक आहे याची चौकशी राखण्यांत तो सावध असतो. त्याच्या हाताखालीं पुष्कळ खलाशी असतात. ते आपापलीं कामें बजावतात. सुकाण्याला मालीम हुकूम करतो त्याप्रमाणें तो पुनः पुनः सुकाणूं फिरवितो. एका तासांत आगबोट किती मैल चालते याची वारंवार मोजणी होत असते, आणि तें लिहून ठेवीत असतात. वाऱ्याच्या दिशेप्रमाणें आगबोटीचीं शिडें चढवावीं, फिरवावीं किंवा उतरावीं याविषयीं खलाशी लोक मालिमाच्या हुकूमाप्रमाणें अथवा मालिमाच्या सांगण्यावरून मुख्य खलाशी हुकूम करतो त्याप्रमाणें काम करितात.

इंजनेराचें काम वाफेच्या यंत्राची खबरदारी ठेवावी हें होय. त्याच्या

हाताखालीं सुतार, लोहार, कोळसेवाला आणि दुसरीं पुष्कळ माणसें असतात. तीं सर्व यंत्रें चालवण्याच्या कामांत गुंतलेलीं असतात. जरूर असेल त्याप्रमाणें यंत्र हळू किंवा जलदी चालण्याचा हुकूम हा इंजनेर करतो. यंत्रामध्यें कोठेंही जरा कांहीं बिघडलें असें समजलें तर हा इंजनेर तें नीट करण्याचा उपाय लागलाच करतो. यंत्राचा दरएक भाग साफ आणि तयार राखण्याच्या कामांत ह्या खात्याचीं माणसें नेहमी गुंतलेलीं आहेत असें आपण पाहतों.

कोठाऱ्याचें काम कोठार संभाळावें, आणि खाण्याजेवण्या विषयीं तर्तूद ठेवावी हें होय. कोठाऱ्यास "पर्सर" असें म्हणत असतात. त्याच्या हताखालीं स्वयंपाकी, वाडपी वगैरे पुष्कळ माणसें असतात. खाण्याचे काय काय आणि किती किती पदार्थ करावयाचे याविषयीं कोठारी हुकूम करतो. कोणा उतारूची प्रकृति बिघडल्यामुळें अमुक एका रितीचें पथ्य करणें असलें, तर त्याविषयीं कोठाऱ्यासच सूचना केली पाहिजे.

डाक्तराचें काम आगबोटीवरील माणसांपैकीं कोणाचीही प्रकृति बिघडली किंवा उतारांपैकीं कोणासही बरें वाटत नाहीं असें झालें, तर त्याला औषध द्यावें. त्याच्या हाताखालीं एक दवाखाना असतो. त्याला कांहीं पुष्कळ माणसांची गरज नाहीं. पहिल्या प्रतीच्या उतारांपैकीं कोणास बरें वाटत नाहींसें झालें तर हा डाक्तर त्याच्या केबिनींत जाऊन त्यास औषध देतो.

सारा दिवस आणि सारी रात्र आगबोट चालत असते, आणि वाफेचें यंत्र चालू असतें. "धव धव धव" असा त्याचा मोठा आवाज होत असतो. नित्य सकाळीं उजेडण्याबरोबर आपण निजून उठलों नाहीं तोंच दुसरा एक "धवड धवड" असा आवाज होतो. हा आवाज पाण्याच्या बंबाचा होतो. बंब यंत्रानें चालतो. आगबोटीच्या

डेकावरची फिरण्यासवरण्याची जागा बंबानें नित्य धुवून स्वच्छ करितात, आणि मग पुसून साफ करितात. पितळकाम नेहमीच्या घासण्यानें चकचकीत दिसतें. कोठें ही तिळभर घाण किंवा केर दृष्टीस पडत नाहीं.

आदित्यवारीं आगबोटीवर चाकरी करणाऱ्या सर्व माणसांची हजिरी घेतात. यासाठीं सर्व मनुष्यें धुतलेलीं वस्त्रें घालून "क्वार्टर डेक" यावर दोहों बाजूंस हारीनें उभीं राहतात. त्यांची हजिरी झाल्यावर रविवारच्या ईश्वरस्तवनाची वेळ होते तेव्हां घांट वाजते. मग सलूनमध्यें सर्व जमतात. त्यांमध्यें धर्मोपदेशकाचें काम चालवी असा कोणी असला तर ठिकच, नाहींतर कप्तान तें काम चालवतो.

आमच्या आगबोटीचा कप्तान आणि त्याचे मनुष्य मोठे मौज्ये होते. त्या माणसांनीं एक दिवस रात्रीस नाटक करून दाखविलें, आणि नाटक झाल्यावर "चिलिचटनी" नांवाची एक नकल करून सर्वांस खूब हांसवलें. आगबोट भर समुद्रांतून चालली होती, आणि वर आकाश आणि खालीं पाणी याशिवाय चोंहोंकडे दुसरें कांहीं दिसत नव्हतें. अशा ठिकाणीं नाटकाची व नकलेची मौज पाहून मी मनांत आश्चर्य पावून ह्मणालों "आहाहाः! काय ईश्वरी चमत्कार आहे!! मनुष्य जमिनीवर तर मौज आणि मजा भोगतोच, परंतु पाण्यावर तुफान आणि मोठमोठ्या लाटा यांच्या धास्तींत क्षणोक्षणीं असतांही तो अशी मौज मारतो!!"

## ३. आदन.

ADEN.

तारीख १९ वीस सकाळीं आठ वाजतां आमच्या कप्तानानें आदन दोन तीन तासांत दृष्टीस पडेल असें आह्मांस सांगितलें, तेव्हां आम्हास फार हर्ष झाला. आमच्या पायांत जोर आला. आह्मी उभे रा-

हून उत्कंठेनें पाहूं लागलों. या हर्षांत दोन कलाक निघून गेले, नंतर ओसाड डोंगर दिसूं लागले. आतां आगबोट बंदरांत दाखल झाली. एकीकडेस तोफ मारण्याची आणि दुसरीकडेस नांगर टाकण्याची तयारी चालली. वाफेचें यंत्र हळूहळू चालण्याचें बंद झालें. इतक्यांत तोफ सुटली, आणि नांगर टाकला. आतां आह्मी मुंबईहून १६५० मैल दूर आलों.

नांगर सुटतांच कित्येक मचवे आमच्या आगबोटीच्या आसपास येऊन राहिले. कित्येक आरबांचे मुलगे पोंहत पोंहत आमच्या आगबोटीजवळ येऊन बुडी मारण्याचें कसब दाखवूं लागले. आगबोटीवरून कोणी चवली किंवा पावली टाकली म्हणजे ह्या पोरांनीं लागलीच बुडी मारून अर्ध्या पाण्यांतून ती काढून आणावी. त्यांचें चपळपण इतकें कीं त्यांनीं एक चवली किंवा पावली जाऊं देऊं नये. ही त्यांची चपळाई व चलाकी पाहून आह्मास मौज वाटली, आणि संतोषही झाला.

नंतर आह्मी मचव्यांत बसून किनाऱ्यावर गेलों. किनाऱ्यावर लोकांला उतरण्यासाठीं पारशांनीं बंगले बांधले आहेत. हा गांव समुद्रकांठापासून तीन मैल आंत आहे. मुंबईतल्यासारख्या भाडोत्री गाडींत बसून आह्मी तसेच गांवांत गेलों. हा गांव सुमारें २८ वर्षें इंग्रज सरकारच्या ताब्यांत आहे. एथें इंग्रजी लश्कराची छावणी आहे. ही छावणी नसली तर हा गांव दिसतो यापेक्षांही ओसाड आणि कंगाल दिसेल. आह्मी गांवांत जातांच बिनपाखी बोडकीं धाब्याचीं घरें दृष्टीस पडलीं. पुढें चालतां चालतां पोष्टहपिसाजवळ गेलों तेव्हां गांवांचें स्वरूप कांहींसें चांगलें दिसूं लागलें. कित्येक पारशांनीं या ठिकाणीं विलायती सामानाचें दुकान घातलें आहे तेथें आम्ही पहिल्यानें गेलों.

या गांवांत आरब आणि सोमाली लोकांची वस्ती अधिक आहे. एथें हिंदु व पारशीही पुष्कळ आहेत. हिंदूंची संख्या सुमारें २०० होईल. त्यांत काठेवाडांतले वाणी फार आहेत. त्यांणीं एक देवालय बांधलें आहे, आणि त्यांत मूर्ति बसविली आहे. एथें एक धर्मशाळा ही आहे, ती दिसण्यांत फारच वाईट आहे. पारशांची वस्ती वाढत चालली आहे. कित्येक सकुटुंब एथें राहिले आहेत. त्यांची स्थिति, वाण्यांच्या स्थितीशीं तुळणा करून पाहिली असतां, फार चांगली आहे. वाणी फार दरिद्रावस्थेंत राहतात. ते आरब लोकांबरोबर व्यापार करितात, आणि पुष्कळ वर्षांनीं बहुत काटकसरेनें वागून चार पैसे जवळ करितात.

या गांवांत पाण्यासाठीं बहुत हाल काढावे लागतात. उभ्या वर्षांत सगळा ६।७ इंच पाऊस पडतो. एकाद्या वर्षीं पाऊस अधिक पडला तर त्याचें पाणी धरून ठेवण्यासाठीं टांकीं बांधलेलीं आहेत. हीं टांकीं फार जुनीं आहेत. अलीकडेस बहुत खर्च करून हीं टांकीं नीट केलीं आहेत. तीं पाहण्यासारखीं आहेत. आदनास गेलेल्या प्रवाशानें तीं अवश्य पाहावीं, पाहिल्याशिवाय परत येऊं नये. पाणी गांवापासून बहुत दूर आहे. त्यामुळें आदनांत राहणारे हिंदु, वाणी अथवा ब्राम्हण, या सर्वांस मुसलमानाच्या हातचें भरलेलें आणि चामड्याच्या पखालींतून गाढवावरून आणलेलें पाणी प्यावें लागतें. या बाबतींत त्यांस सोंवळें राखतां येत नाहीं. मुंबईत मुसलमान शिवलेलें पाणी कोणी ब्राम्हण अथवा वाणी प्याला तर मग झालेंच.

मी कितीएक वाण्यास विचारून पाहिलें कीं मुसलमानाच्या हातानें भरलेलें आणि चामड्याच्या पखालींत भरून गाढवावरून आणलेलें पाणी तुह्मी खायाला प्यायाला कसें वापरतां ? ते म्हणाले असें न केलें तर आह्मी पाण्याविना मरून जाऊं. यांत धर्म राहत नाहीं हें आ-

ह्मी जाणतों, परंतु पोटासाठीं काय नाहीं करावें लागत? मी त्यांला विचारलें, तर मग पोटासाठीं म्हणजे पैका मिळवण्यासाठीं विलायतेस जाण्यास काय हरकत आहे? तुह्मी एथपर्यंत येतां आणि मुसलमानाच्या हातचें पाणी पितां, तर विलायतेस कां जात नाहीं.? त्यांतून एकानें मला जबाब दिला "खर्च फार लागतो आणि तो देश फार दूर पडला. दुसरें, या जंगली लोकांमध्यें आह्मास चार पैसे मिळवतां येतात, परंतु इंग्रजांसारख्या धूर्त आणि सर्व कळांत निपूण अशा लोकांमध्यें आमचा काय पाड पिकणार आहे? आह्मासारखे अशिक्षित तेथें जाऊन काय करणार?" मी म्हटलें तुह्मी म्हणतां हें खरें आहे, आणि त्यांस "जय गोपाळ" करून चालता झालों.

नंतर आह्मी गाडींत बसून टांकीं पाहायाला गेलों. आह्मी तीं नीट खालीं उतरून पाहिलीं. त्यांत पाणीतर मुळींच नव्हतें. हीं बांधायाला पुष्कळ खर्च झाला असावा. त्यांचें बांधकाम पाहून आह्मास बहुत संतोष झाला. हीं टांकीं सुमारें बाराशें वर्षांपूर्वीं बांधलीं असावीं. तीं मातीनें होरून जाऊन निकामी झालीं होतीं, परंतु इंग्रज सरकारानें तीं उसपून नीट केलीं. तीं डोंगराच्या बाजूवर मोठमोठे दगड चढवून घेऊन बांधलेलीं आहेत असें वाटतें. एकेक टांकें मोठ्या तळावा सारखें दिसतें. त्यांच्या आसपास लहान लहान बगीचे आहेत ते खूब शोभतात. टांकीं पाहून आह्मी परत गांवांत आलों. तेथें धर्मशाळेंत आमच्या माणसांनीं जेवण तयार केलें होतें तें जेवून आह्मी आगबोटीवर जाण्यास तयार झालों. आह्मी परत आलों तेव्हां सांज झाली होती. त्यावेळीं कितीएक लोक गाढवांवर बसून फिरायास निघाले होते. त्यांणीं गाढवांवर फार चांगला साज घातला होता. आह्मी आगबोटीवर जाऊन पोंचल्यावर, आगबोट हकरण्यास एका तासाचा अवकाश होता.

## ४. तांबडा समुद्र.

THE RED SEA.

आदनाहून सांजचे साडेसात वांजतां आमची आगबोट निघाली. नंतर आम्ही आरबी समुद्र सोडून "रेड सी" ह्मणजे तांबड्या समुद्रांत शिरलों. या नांवावरून जर कोणी असें समजेल कीं या समुद्राचें पाणी तांबडें आहे तर ती मोठी चूक आहे. तांबड्या समुद्रांत जातांच दोहोंकडे जमीन दिसूं लागते. "पेरिमना" हें बेटही दिसतें. हा देखावा पाहून चित्तास फार आनंद होतो. हा समुद्र फारच अरुंद आहे. पेरिमना बेटाजवळ त्याची रुंदी नुसती १६ मैल असेल. जरा पुढें गेलें ह्मणजे जमीन पुनः दिसेनाशी होते; आणि वर आकाश आणि खालीं पाणी इतकेंच कायतें दिसतें. या समुद्राची लांबी १४००मैल आहे व यांत २३० वांवें पाणी खोल आहे असें सांगतात.



उडता मासा.

या समुद्रांत उडते मासे दृष्टीस पडतात. ते हवेंत उंच उडतात, आणि पुनः खालीं पाण्यांत पडतात. कित्येक मासे उडून आगबोटीवर देखील येतात. ते पाण्यांतून बाहेर पडतात तेसमयीं लाग साधून पक्षी त्यांस भक्षण करतात, तें केव्हां केव्हां दृष्टीस पडतें.

या समूद्रांतुन तारवें चालवण्याचें काम फार कठीण आहे. कारण यांत रेतीचे दांडे व पोंवळ्यांचे खडक असंख्य आहेत. हे खडक दिवसानुदिवस वृद्धि पावत आहेत. ज्या ठिकाणीं थोड्या वर्षांपूर्वीं

खडक मुळींच नव्हते त्या ठिकाणीं नवे निघत आहेत. इंग्रजी कप्तानास नौकागमनाचें चांगलें ज्ञान असतांही आदनाहून एक आरब नाखुदा या समुद्रांतला माहीतगार म्हणून बरोबर घ्यावा लागतो. या नाखुदाच्या सांगण्याप्रमाणें आगबोटीचें सुकाणूं आतां फिरत आहे. कित्येक दिवसांत या समुद्रामध्यें फारच गरमी पडते. तेव्हां जीव फार विकळ होऊन जातो. ह्या समुद्रांतून जाण्यास सात आठ दिवसांवर अधिक लागत नाहींत.

## ९. स्वेज—वाळूचें मैदान.

SUEZ—THE DESERT.

तारीख २६ वी मार्च रोजीं संध्याकाळीं आह्मास समजलें कीं आपण आज रात्रीस बारा वाजल्याउपरांत स्वेज बंदरीं जाऊन पोंचूं. यावरून आह्मास आनंद झाला. आमची आगबोट रात्रीस बारांवर दोन वाजतां त्या बंदरांत नांगरली. सकाळीं दुसरी एक लहान आगबोट आम्हास नेण्यास आली. कारण स्वेजच्या खाडींत पाणी फार खोल नाहीं, म्हणून बहुत दूर नांगर टाकला होता. ही लहान आगबोट आमची न्यहारी होई तोंपर्यंत थांबून राहिली. नंतर आह्मी तींत बसून गेलों, ते सकाळचे ८ वाजतां स्वेज एथें तडीस उतरलों. आतां आह्मी मिश्र देशांत आलों.

स्वेजच्या संयोगी भूमीवर आह्मी उतरलों तेव्हां त्या बंदराच्या नाक्यावर आगगाडी आह्मासाठीं तयार होती. गाडी निघण्यास अजून अंमळ वेळ होता, म्हणून आह्मी सर्व आगगाडीच्या चक्राजवळ विसाव्याच्या ठिकाणीं विश्रांति घ्यावयास गेलों. स्वेजमध्यें इमारती तर फार थोड्या आहेत, व गांव केवळ कंगाल आहे. यांत पाहण्यास कांहींच नाहीं. ह्या गावांत पाणी देखील पिण्याजोगें नाहीं. याजकरितां मिश्र देशच्या राजानें युरोपियन वगैरे प्रवाशांसाठीं एथें नील

नदीचें पाणी आणून पोंचवण्याची तजवीज करून ठेविली आ

आमची आगगाडी सुमारें अकरा वाजतां निघाली. या गा
चा "गार्ड" ह्मणजे रखवालदार मिश्रदेशांतच जन्मलेला हो
त्याला फ्रेंच व इंग्रजी येत असे. एथें आगगाडी आपल्या इकडी
आगगाडीसारखीच होती. गाडी चालू होतांच आह्मास वा
मोठें मैदान लागलें. आह्मी आगबोटीवर होतों तेव्हां चोंहोंकडे
पाणी आणि वर आकाश दृष्टीस पडत असे; तसें आतां एथें रेती
मैदान आणि आकाश दृष्टीस पडूं लागलें.

ठिकठिकाणीं वाळूच्या राशी व डोंगर पडले आहेत. उष्ण
ऱ्यानें रेती आमच्या तोंडावर उडते. असें सांगतात कीं या मैद
नांत मोठें तुफान सुटतें तेव्हां वाळूचे डोंगरचाडोंगर एका ठि



रेतीच्या मैदानांतला वाटसरू.

णाहून दुसऱ्या ठिक
णीं सरत जातात.
रेतीच्या मैदानांत
उंटावर वसून को
एकादा वाटसरू स
रून येतांना दृष्टीस
डतो. तो दाढींत
तीं भरूं नये म्हण
दाढीवरून नाकाप
त बारीक वस्त्र बांधून उंटावर बसलेला असतो. रस्त्यावर कित्ये
लाहान लाहान गांव लागतात त्यांत कित्येक ठिकाणीं गाडी उभी
हते. परंतु हा गांव आहे असें आपण कांहीं वेळ मानणार नाहीं.
म्हणजे नुसते चुन्याचे धाबे, त्यांवर कवलें किंवा वांसे मुळींच नाहीं

असल्या ओसाड मैदानांतून जातांना आम्हास फार कंटाळा अ

ला. संध्याकाळीं चार वाजण्याचा सुमार झाला इतक्यांत आह्माबरोबर इंग्रज उतारू होते ते म्हणाले, पाहा, पाहा! मिश्रदेशचे पिरमिड दिसताहेत! आह्मी लागलेच उत्कंठेनें गाडींत उभे राहून पाहूं लागलों. चालत्या गाडींतून ते फार दुरून आमच्या दृष्टीस पडले. जे कोणी प्राचीन इतिहासाचे अभ्यासी आहेत त्यांस हे प्रसिद्ध "पिरमिड" पाहून फार आनंद होतो. हे "पिरमिड" कोनाकृति आहेत. केरो नांवाच्या प्रख्यात शहराहून ते दहा मैल आहेत. ते बहुत उंच आहेत, परंतु जवळ जाऊन पाहिल्यावांचून त्यांची उंची बरोबर लक्षांत येत नाहीं. असें ह्मणतात कीं ते ९०० फुटी उंच आहेत, आणि हजारो वर्षांचे जुने आहेत. विद्वान् लोकही कबूल करितात कीं हे बांधण्यास पुष्कळ वर्षें लागलीं असावीं, आणि ते निदान तीन हजार वर्षांचे जुने असावे.

सर्व मिळून चार "पिरमिड" आहेत. असें सांगतात कीं ते एकमेकापासून चार चार तासांच्या मजलेवर आहेत. हे एवढे मोठे "पिरमिड" बांधण्यास किती माणसें किती वर्षें काम करीत होतीं असतील बरें! युनानी ग्रंथकर्त्यांनीं असें लिहिलें आहे कीं हे बांधण्यास एक लक्ष मनुष्यें वीस वर्षें काम करीत होतीं. असें सांगतात कीं ह्या "पिरमिडां"च्या शेजारीं अर्धा मनुष्य आणि अर्धा सिंह अशा आकृतीचें एक मोठें शिर आहे. हेंही फार प्राचीनकाळचें आहे. आह्माला असें वाटलें कीं हे "पिरमिड" जवळ जाऊन पाहावे. परंतु थांबण्यास अवकाश नव्हता.

थोड्याच मिनिटांत हे "पिरमिड" दिसतनासे झाले. थोड्या वेळानें जमिनीचें स्वरूप बदललें. ओसाड रेतीचें मैदान आतां संपलें. दाट झाडी आणि झाडें पाहून आमचे नेत्र थंड झाले. अहाहा! ही किती फलद्रूप जमीन! चोहोंकडे वनस्पति आणि हिरवेंगार



मिश्रदेशचे पिरमिड.

मैदान कसें शोभतें! यासमयीं आह्मास गुजराथच्या सुपीक जमिनीचें स्मरण झालें. झाडाची दाटी आणि पाण्याची समृद्धि पाहून आमच्या जिवास फार संतोष झाला.

ओसाड मैदानांत थकून व्याकूळ झाल्यावर झाडाच्या छायेखालीं बसलें असतां जें समाधान वाटतें त्याहून आह्मास आतां अधिक वाटलें. परंतु या संतोषाच्या प्याल्यांत दुःखाचा थेंब पडला. माझ्या छातींतून रक्ताचे गोळे पडूं लागले. हा दुष्ट उरःक्षत रोग मला होऊन दोन वर्षें झालीं. त्यामुळें वर्षांतून दोनतीनदां रक्तवाहिनी फुटून छातींतून रक्त पडतें. हा रोग या ठिकाणीं जाणवल्यामुळें मी बहुत चिंतेंत आहें इतक्यांत केरो नांवाचें प्रख्यात शहर दिसूं लागलें.

## ६. केरो.

KAIRO.

अह्मी केरो एथील आगगाडीच्या चक्रावर जाऊन पोंचलों इतक्यांत समजलें कीं शिकंदर्येच्या बंदरांत आपणासाठीं आगबोट तयार नाहीं, ह्मणून केरोमध्यें आपणास रात्रभर राहावें लागणार. मला थोडी वि-

श्रांति मिळाली ह्मणून मी खुशाल झालों. प्रवाशांस उतरण्यासाठीं बंगला बांधला आहे, त्यांत आह्मी गेलों. आह्मास दरएकास निजायाला निरनिराळी खोली मिळाली. सुंदर छप्पर पलंगावर बिच्छाना घातलेलाच होता त्यावर मी विश्राम घेऊन औषध लावलें आणि पोटांतही घेतलें.



मिश्र देशची स्त्री.

अजून संध्याकाळ झाला नव्हता ह्मणून माझे सोबती मला जरा आराम वाटलें असें पाहून केरो शहर फिरून आले. मी दुसरे दिवशीं सकाळीं बरा झालों, आणि आह्मी न्याहारी करून आगगाडीच्या चक्रावर गेलों. एथील लोक जातीनें मुसलमान आहेत. त्यांच्या बायका डोळ्यांखालून तोंडावरून लांब बुरखा घेतात. त्या डोळे आणि कपाळमात्र उघडें ठेवितात, आणि नाकापासून छातीपर्यंत आंग बुरख्यानें झांकतात. अशा रीतीनें बुरखा घेतल्यामुळें त्या आह्मास विद्रूपशा दिसल्या, परंतु त्या त्यांतच शोभा मानतात.

## ७. शिकंदर्या.

ALEXANDRIA.

आह्मी सकाळीं नऊ वाजतां केरो शहरांतून निघालों. ज्या नील नदीच्या पाण्यानें संपूर्ण मिश्र देशास पीक येतें ती आह्मी डोळ्यांनीं

पाहिली. केरोहून शिकंदर्येस जातांना आह्मास आदले दिवसासारखा कंटाळा आला नाहीं. वाटेनें जातांना आह्मास कित्येक गांव लागले. आह्मी शिकंदर्या शहरीं सुमारें तीन वाजतां जाऊन पोंचलों. या शहराचें हें नांव महापराक्रमी शिकंदर बादशाहावरून पडलें आहे. युरोपियन लोक या शहरास "आलेक्झान्ड्रिया" म्हणतात. ह्या शहरांतून जातांना असें वाटतें कीं हें फार मोठें आणि संपन्न शहर आहे. या नगराचें स्वरूप दिसण्यांत चांगलें आहे. एथील राजास सर्व मिश्र देशाचा "पादशाह" म्हणतात.



क्लिओपेत्राज नीड्ल.

शिकंदर्येमध्यें दोन मोठे आणि प्रख्यात असे स्तंभ आहेत. त्यांपैकीं "पॉम्पीज पिलर" म्हणून जो आहे तो रूम एथील सरदार "पॉम्पी" याच्या स्मरणार्थ बांधलेला आहे. दुसरा जो स्तंभ आहे त्याला "क्लिओपेत्राज नीड्ल" असें म्हणतात. हा स्तंभ "क्लिओपेत्रा" नामक राणीच्या स्मरणार्थ बांधलेला आहे. याचा आकार सुईसारखा आहे त्यावरून "क्लिओपेत्राज नीड्ल" म्हणजे क्लिओपेत्रेची सुई असें याचें नांव पडलें आहे. हा स्तंभ आमच्या गाडींतून आम्हास दिसला. आगीची गाडी थेट बंदरापर्यंत आह्मास घेऊन गेली. बंदराजवळ गेलों तों पवनचक्क्यांच्या हारीच्या हारी

दृष्टीस पडूं लागल्या. ह्या चक्या वाऱ्याच्या जोरानें फिरतात, आणि त्या फिरल्यानें धान्य दळतें. ह्या ठिकाणीं असल्या चक्या सुमारें २०० होतील. बंदरावरून "पादशाहा"चा महाल आणि शिकंदर्या शहराचा सुंदर देखावा दृष्टीस पडतो.

हें शिकंदर्या शहर मुळचें फार मोठें आणि विख्यात होतें. असें सांगतात कीं "पूर्वीं या नगरामध्यें चार हजार महाल व चार हजार स्नानगृहें होतीं; आणि बारा हजार दुकानें व चारशें नाटकगृहें होतीं. तेथील पुस्तकालयांत सात लक्ष पुस्तकांचा संग्रह होता*." रूमी लोकांबरोबर लढाई झाली तींत आग लागून या शहराची नासाडी झाली. अलीकडेस थोड्या वर्षांत हें शहर पुनः आबादानींत येऊं लागलें आहे.

## ८. भूमध्य समुद्र.

### THE MEDITERRANEAN SEA.

शिकंदर्या बंदरीं आल्यावर अर्ध्या पाऊण तासानें आह्मी "मसिलिया" नांवाच्या आगबोटीवर चढलों. ही आगबोट संध्याकाळीं पांच वाजतां निघाली. आतां आह्मी भूमध्य समुद्रांत आलों. या समुद्रांत भरतीओहटी लागत नाहीं, तथापि आह्मास यांत लाटांचा जोर इतर समुद्रांतल्या एवढाच किंबहुना आधिक वाटला. ह्या समुद्रांत लाटांच्या आणि वाऱ्याच्या जोरानें आमची आगबोट डोलूं लागली. आगबोटीवर चालतांना असे झोंके येत कीं जणूं आतां आपण खालीं पडूंच.

अंमळ पुढें गेलों तों पुनः "वर अकाश आणि खालीं पाणी" असें झालें. ह्या समुद्रांत तारवें आणि आगबोटी यांची मोठी रहदारी आहे. आमच्या आगबोटीवरून नेहमी एक नाहीं तर एक गलबत अथ-

* Dr. Buists' Overland Journey to India.

वा आगबोट दिसत असेच. शिकंदर्या बंदर सोडून तीन रात्री गेल्यावर चवथ्या रात्रीस आह्मास समजलें कीं आपण सकाळीं माल्टा एथें जाऊन पोंचूं. यावरून आह्मा सर्वांस आनंद झाला. सकाळीं उजेडतांच आमची आगबोट माल्टा बंदरीं जाऊन पोंचली.

## ९. माल्टा.

MALTA.

ह्या बंदराचा देखावा आणि तेथील स्फटिकाप्रमाणें स्वच्छ पाणी पाहून आह्मास फार संतोष झाला. बंदरांतून शहरही फार सुंदर दिसतें. बंदरही फार चांगलें आहे. सुंदर लहान लहान मचवे आह्मास उतरण्यासाठीं आमच्या आगबोटीजवळ आले. त्यांपैकीं एकात बसून आह्मी तडीस उतरलों. आह्मांस घेऊन जाऊन शहरांत हिंडवून आणण्यासाठीं किनाऱ्यावर भाडोत्री गाड्या (फैटनीं) तयार होत्या. तसेच वाटाडीही होते. आह्मी एका गाडींत बसून एक वाटाडी बरोबर घेऊन गांवांत फिरावयास गेलों.

माल्टा शहराची रचना आणि देखावा आश्चर्य करण्यासारखा आहे. एथील रस्ते, दुकानें व माणसें पाहून आह्मास बहुत आश्चर्य वाटलें. शिकंदर्येपर्यंत बहुतकरून आपल्या इकडल्यासारखीच रचना आणि देखावा होता, परंतु तो प्रकार या ठिकाणीं सर्व बदलला. युरोपखंडांतील शहरें कशीं आहेत हें माल्टा पाहून प्रथम कांहींसें ध्यानांत येतें. एथील रस्ते फरसबंदी आहेत. किस्येक शेऱ्या व बोळ उंचसखल आहेत. रस्ते चांगले स्वच्छ आहेत. घाण म्हणून मुळींच नाहीं. सकाळची वेळ होती म्हणून दुकानदार लोक आपापल्या दुकानांत सामान मांडून ठेवीत होते. आमचा पोशाक त्यांस विलक्षण वाटला, आणि किस्येक हातचें काम टाकून आह्मास पाहण्यास दुकानांतून बाहेर आले.

माल्टा शहर इंग्रजांकडेस आहे. एथें इंग्रजी लश्कर आणि लढाऊ जहाजें नेहमी असतात. हें शहर सन १८०० पासून इंग्रजांकडेस आहे. एथें गवर्नराचा वाडा आणि सेन्ट जॉन नामक देवालय पाहण्यासारखें आहे. आह्मी प्रथम गवर्नराचा वाडा पाहण्यास गेलों. एथें चिलखतें व लढाईचा सरंजाम जमा करून लावून ठेविला आहे. तो खरोखर पाहण्याजोगा आहे.

सेन्ट जॉन हें देऊळ टोपी किंवा पागोटें काढल्यावांचून पाहूं देत नाहींत. याविषयीं आमच्या पारशी सोबत्यांनीं हरकत घेतली यामुळें आह्मास देवालय पाहावयास मिळालें नाहीं. परंतु आह्माबरोबरचे दुसरे मित्र असें ह्मणाले कीं हें देऊळ तुह्मी पाहिलें नाहीं ही मोठी चूक केली. तें ऐकून मला मोठा खेद वाटला. परंतु मनांत अशी उमेद बाळगली कीं ईश्वर करील तर परत येतेवेळेस हें देऊळ पाहीन. ही माझी आशा पूर्ण झाली आणि मीं परत येतांना हें देवालय पाहिलें.

आह्मी किल्ल्यावर चढलों. तेथून बंदर अत्यंत रमणीय आणि सुंदर दिसलें. एक इंग्रजी शिपाई पहारा करीत होता त्याणें आह्मास मुंबईचा समाचार विचारला. तो ह्मणाला मी "हिंदुस्थानांत पुष्कळ वर्षें चाकरी केली आहे. माल्टा एथें राहायास मला आवडत नाहीं. तुमच्या देशीं पुनः जावेंसें वाटतें." ज्याणें ज्या देशांत बहुत वर्षें घालविलीं असतील त्या देशांत त्यास राहावयास अधिक आवडतें याचें हें एक उदाहरण आमच्या पाहण्यांत आलें.

माल्टा एथील हवा समशीतोष्ण आहे. एथें अतिशय उष्णता नाहीं आणि अतिशय थंडीही नाहीं. एथील भाषा "माल्टी" ही तुर्की, आरबी आणि इतालियन ह्या भाषा मिश्र होऊन झाली आहे. एथें इंग्रजी अंमल झाल्यापासून इंग्रजी समजणारे व बोलणारे लोक

जागोजाग थोडथोडे झाले आहेत. एथील स्त्रियांचा पोशाक यहूदी स्त्रियांच्या पोशाकासारखा आहे. त्यांत आणि यांत भेद इतकाच कीं एथील स्त्रिया बुरखा न घेतां तोंड उघडें ठेवतात. ह्या स्त्रिया कशिदाच्या कामांत फार निपुण आहेत अशी आख्या आहे.

आह्मी संध्याकाळीं सुमारें चार वाजतां माल्टा बंदराहून निघालों. दुसरे दिवशीं सकाळीं कॉर्सिका व सार्डिनिया हीं दोन मोठीं बेटें आगबोटीवरून आमच्या दृष्टीस पडलीं. इतालीं देशाचा किनाराही दिसूं लागला. प्रसिद्ध गारिबाल्डी याचें घर देखील दिसलें. हें पाहून आह्मास फार हर्ष झाला. तारीख ३ री एप्रिल रोजीं सकाळीं आमची आगबोट मार्सेल्स बंदरानजीक पोंचली. तेव्हां आह्मा सर्वांस हर्ष झाला, आणि आह्मी पाहण्यासाठीं "डेका"वर गेलों. परंतु थोडक्याच वेळांत चहूंकडेस धुकें पसरून सर्व अंधारमय होऊन गेलें. आमच्या अगदीं जवळून तारूं गेलें तरी देखील आह्माला दिसेना. समोरून गलबत येऊन आगबोटीवर आपटूं नये म्हणून आमच्या आगबोटीवरून वाफेचा सुसाट होऊं लागला. अशा अंधकारांत वाफेचें यंत्र बंद ठेवावें आणि आगबोट उभी करावी असा कप्तानानें हुकूम केला. याप्रमाणें काळोखी सुमारें दीडतासपर्यंत होती. नंतर धुकें निघून गेलें, आणि सूर्य पुनः दिसूं लागला.

## १०. मार्सेल्स.

MARSEILLES.

आमची आगबोट उजू बंदरांत गेली. दुसरीं शेंकडो जहाजें नांगर टाकून होतीं त्यांवरून चालत किनाऱ्यावर जातां येई अशा ठिकाणीं तिणें जाऊन नांगर सोडिला. हा देखावा पाहण्यासारखा होता. तरती गोदी ह्मणजे काय, आणि मोठमोठीं गलबतें एकमेकावर न आपटतां जवळ जवळ उभीं राहतात, आणि त्यांवरू-

न उड्या मारीत मारीत तडीस जातां येतें हें आह्मी प्रथमतः मार्सेल्स एथें पाहिलें आणि बहुत संतोष पावलों.

आतां आमचें सर्व सामान मांडवींत उघडून दाखवलें पाहिजे. एवढ्यासाठीं आह्मास मचव्यांत बसवून मांडवीजवळ उतरलें. एथें आह्मास खोळंबावें लागलें. आह्मास बसावयास एक मोठी खोली मिळाली. परंतु एथें फार वेळ लागल्यामुळें आह्मास कंटाळा आला. याप्रमाणें सुमारें दोन तास गेले; तितक्यांत आगबोटवाल्यांनीं आमचें सामान मांडवींत उतरून दुसऱ्या एका खोलींत ठेविलें.

नंतर आह्मास थोडथोड्यांस त्या खोलींत जाऊं दिलें. आह्मी तेथें जाऊन आपापल्या सामानाच्या पेट्या आणि पिशव्या शोधून काढल्या. फ्रेन्च कामदार प्रवासी लोकांचें सामान फारच बारकाईनें तपासतात; तें एवढ्यासाठीं कीं कोणी त्यांत लबाडी करूं नये. आपणाजवळ जकातीचा जिन्नस कांहीं असला तर लागलेंच सांगावें. असा जिन्नस बरोबर घेतलाच नाहीं तर बरें. आह्मी आपलें सर्व सामान सोडून दाखविलें. तपासणारानें सामान पाहिल्यावर पसार झाल्याची एकेका डागिन्यावर खूण करून दिली.

एका संभावित हॉटेलाचा कारभारी इंग्रजी बोलत असे तो आह्माजवळ येऊन आह्मास मदत करूं लागला. त्याणें आमचें सामान उचलून बाहेर एक मोठी गाडी उभी होती तींत नेऊन ठेविलें. त्याणें आह्माला गाडींत बसवून आपल्या हॉटेलाकडेस गाडी नेवविली. फ्रेन्च लोकांबरोबर बोलण्याची आणि ते बोलतात तें समजण्याची अडचण पडते तेव्हां अशा माहीतगार मनुष्यावांचून चालत नाहीं.

हॉटेलास जातांना वाटेनेंच आह्मी बहुत आश्चर्य पावलों. मोठमोठ्या हवेल्या, मोठमोठे रस्ते, मोठमोठीं सुंदर दुकानें, मोठमोठे जनरथ, मोठमोठे घोडे आणि मालाच्या गाड्या, हा सर्व नवीन व

विचित्र प्रकार पाहून आह्मास फार चमत्कार वाटला. आह्मी हॉटेला-जवळ जाऊन पोंचलों तेव्हां तेथें उतरलों. युरोपांतल्या हॉटेलांची सुंदर बांधणी आणि त्यांतील सोई यांविषयीं मी पुढें लिहिन. एथें एवढेंच सांगतों कीं हें हॉटेल मुंबईतील कोणत्याही श्रीमान् गृहस्थाच्या वाड्यापेक्षां कोणत्याही प्रकारें कमी नव्हतें. एथें आह्मी अंघोळ व न्यहारी करून प्रथम थोडीशी विश्रांति घेतली.

नंतर आह्मी आमच्या बरोबरच्या एका दक्षिणी ब्राम्हणास परत मुंबईस पाठवून देण्याच्या खटपटीस लागलों. हा चाकर मोठा द्वाड निघाला. तो शिरफिराऊ आणि अक्कलेनें जरा कमी होता. तो आगबोटीवर इंग्रजी खलाशांच्या मुलांस छडीनें मारण्यास तयार झाला होता. ह्याला परत पाठविण्यास तेथील इंग्रजी कॉन्सल याचें सहाय्य घ्यावें लागलें. नंतर आगबोटवाल्यांबरोबर बंदोबस्त करून त्यास परत मुंबईस रवाना केलें.

इतक्यांत संध्याकाळ होत आला. शहरांत फिरावयास जाण्यास हा समय चांगला होता. आह्मी फिरत फिरत एका उंच टेकडीजवळ गेलों. ही टेकडी कृतीनें फारच सुंदर केली आहे. तिच्या खालीं पाण्याचा धोत पडत होता. हें स्थळ "पाल—नेपोलियन" या नांवानें प्रसिद्ध आहे. आह्मीं उंच वर चढलों. वर जाऊन पाहतों तों ही टेकडी जसा कांहीं बागच बनावली आहे. एथें नेपोलियन बोनापार्ट याचा पुतळा उभा केला आहे. आह्मी अगदीं उंचावर जाऊन उभे राहिलों तेथून तें रमणीय नगर संपूर्ण आमच्या दृष्टीस पडलें.

ह्या वेळीं संध्याकाळ झाला होता. सूर्य अस्तास जात होता. आहाहा! किती सुंदर आणि रमणीय देखावा!! चारही दिशा सोनेरी रंगासारख्या तकतकत होत्या. आह्मी तेथें त्याच वेळीं म्हटलें, हा काय खरा देखावा आहे कीं आपण स्वप्नावस्थेंत आहों ? अशी

सुंदर नगरी आह्मी कधीं पाहिली नव्हती. या ठिकाणीं बसण्याची आणि फिरण्याची मोठी मौज आहे. कित्येक फ्रेंच गृहस्थ बायका मुलें घेऊन एथें फिरायाला आले होते. ते आह्माकडे साश्चर्य पाहूं लागले. एथें एक सुंदर हवेली बांधली आहे ती सर्व आह्मी जाऊन वरपर्यंत पाहून आलों.

नंतर आह्मी बहुत आनंदित आणि संतुष्ट होत्साते परत यानयान निघालों. कित्येक रस्त्यांत मध्येंच दाट झाडी होती आणि लोक तेथें फिरत होते. एका रस्त्यावर आह्मी फुलें विकण्याचीं दुकानें पाहिलीं. आहाहा! तीं किती सुंदर होतीं! आतां दिवे लावण्याची वेळ झाली होती. ग्यासलैट ह्मणजे धुराचे दिवे आम्ही प्रथम मार्सेल्स एथें पाहिले. ह्या दिव्यांच्या मोठ्या ज्योतीनें दुकानांत खूब उजेड पडला होता. आह्मी फिरत फिरत आणि पाहत पाहत बिऱ्हाडीं परत आलों. भिकाऱ्यांचे पोरगे वाद्यांच्या पेट्या गळ्यांत बांधून आणि हातानें फिरवून वाजवीत वाजवीत रस्त्यानें हिंडत होते. दोन तीन पोरगे आह्मापाशीं येऊन वाजवूं लागले, आणि त्यांणीं आह्मास बहुत खूश केलें. आह्मी त्यांस थोडेसे पैसे दिले ते त्यांणीं बहुत आभारपूर्वक घेतले.

कित्येक पोरगे ब्रशानें जोडे घांसून साफ करण्याचें सामान घेऊन रस्त्यानें फिरत होते. आपले बूट ब्लाकिंगानें साफ करविण्याची ज्यांची मर्जी असेल ते रस्त्यांत एके बाजूस बूट पायांत घालून उभे राहिले ह्मणजे बूट साफ करणारा पोरगा खालीं ओणवून बूट जोरानें ब्रशानें घांसून चकचकीत नव्यांसारखे करून देतो.

मार्सेल्स एथें व्यापारी लोकांस एकत्र जमण्यासाठीं "एक्सचेन्ज" बांधली आहे ती फारच उत्कृष्ट आणि पाहण्यासारखी आहे. असें ह्मणतात कीं संपूर्ण युरोपखंडांत अशी सुंदर "एक्सचेन्ज" दुसरी

एकही नाहीं. मार्सेल्स एथील कितीएक हॉटेलें व काफीखाने बा-हेरून कसे दिसतात तें पाहून आश्चर्य वाटतें. त्यांचा डौल व भव-का राजांच्या मंदिरांप्रमाणें दिसतो. मी आपल्या गायकवाड सर-कारचा वाडा पाहिला आहे तो हीं हाटेलें किंवा काफीखानें यांच्या पुढें कांहींच नाहीं. खांब, खिडक्या आणि दरवाजे यांचे कोनकोंपरे सोन्याचा मुलामा दिल्यासारखे दिसतात. घरें पोरबंदरी दगडासा-रख्या सफेत दगडाचीं आणि हारीनें एकसारखीं एका डौलाचीं बां-धलीं आहेत अशीं दिसतात.

आह्मी दोनच दिवस मार्सेल्स एथें राहिलों. तिसरे दिवशीं ह्म-णजे तारीख ९ वी एप्रिल रोजीं सकाळीं आह्मी घाईघाईनें न्यहारी उरकून आगगाडीच्या ष्टेशनावर गेलों. युरोपांत आगगाडीचीं चक्रें केवढीं मोठीं आणि भवकेदार असतात हें आह्मास पहिल्यानें हें चक्र पाहिल्यावरून कळलें. आह्मी त्वेरेनें जाणाऱ्या गाडींतून पारिसप-र्यंत जाण्याच्या टिकिटी घेतल्या. चाकर लोकांसाठीं देखील पहि-ल्या वर्गाच्याच टिकिटी घ्याव्या लागल्या. कारण जलदी जाणा ऱ्या गाडींतून जाण्यास पहिल्या वर्गाच्याच टिकिटी मिळतात, दु सऱ्या किंवा तिसऱ्या वर्गाच्या मिळत नाहींत. आह्मांतून एक असा-मी कमी झाल्यामुळें बाकी राहिलेल्या सात जणांस गाडीचा एक स-गला खण मिळाला.

मार्सेल्स एथून पारिस ७६० मैल दूर आहे. मार्सेल्स हें फ्रान्स-च्या दक्षिणेस आहे. आह्मास आतां उजू उत्तरेकडेस गेलें पाहिजे. आमची गाडी निघाली त्या वेळेस सुमारें दहा वाजले होते. ही गा-डी एका तासांत २६ पासून ४० मैलांपर्यंत जाऊं लागली. वाटे-नें जातांना फ्रान्स देशांतील सुंदर गांव आणि शेतें आमच्या दृष्टीस पडलीं. ओसाड अथवा पडीत अशी जमीन मुळींच नाहीं. ही ज-

मीन जरी आपल्या देशांतल्याप्रमाणें सुपीक नाहीं तरी एथें एक तसूभर देखील रिकामी किंवा पडजमीन सांपडत नाहीं. चहूंकडेस धान्यानें भरलेलीं शेतें आणि लहान्या गांवांतलीं लहानच परंतु सुंदर अशीं घरें पाहून आह्मास बहुत संतोष झाला. उद्योगाचीं आणि समृद्धीचीं चिन्हें चहूंकडे दिसून आलीं. वस्त्राशिवाय तर कोणी मनुष्य दृष्टीस पडतच नाहीं.

या भूमीवर ईश्वराची मोठी कृपा असावी असें आह्मास वाटलें. आमची गाडी लहान लहान ष्टेशनांवर मुळींच थांबत नाहीं. ती मोठ्या ष्टेशनावर मात्र उभी राहते. ती कित्येक ठिकाणीं नुसतीं दोनच मिनिटें थांबते, आणि कित्येक ठिकाणीं १५।२० मिनिटें थांबते. आह्मास फ्रेन्च भाषेचें ज्ञान नाहीं ह्मणून थोडीशी अडचण पडली. जेथें गाडी उभी राही तेथें "गार्ड" येऊन गाडी एथें इतकीं मिनिटें उभी राहील असें झटकन बोलून जाई. परंतु तो काय बोले तें आह्मास समजेना, यामुळें आह्मास लघुशंका करण्याची अडचण कित्येक तासांपर्यंत तशीच सोसावी लागली. नंतर प्रत्येक ष्टेशन लहानमोठें दिसे त्यावरून एथें गाडी अधिक थांबेल कीं नाहीं हें आह्मी तर्कानें समजूं लागलों. आह्मी आगगाडीचें टैमटेव्ल ह्मणजे वेळाचें पत्रक बरोबर घेतलें असतें तर किंचित्‌ही अडचण पडली नसती.

## ११. लायन्स.

LYONS.

लायन्स शहर ज्याला फ्रेंच लोक लियाँ ह्मणतात त्याजवळ आह्मी रात्रीस सुमारें साडेसात वाजतां जाऊन पोंचलों. त्या मोठ्या शहरांतील आगगाडीचें मोठें चक्र पाहून आह्मी चकित होऊन गेलों. सदरील रेलवेच्या ष्टेशनाचा असा भबका आणि डौल पाहून एतद्देशीय प्रवासी प्रथमतः आश्चर्यानें थक्क होऊन गेल्यावांचून राहत ना-

हीं. ग्यासलैटानें या चक्रावर दिवाळीच्या दिव्यांपेक्षां अधिक प्रकाश पडला होता. आह्मी जातेवेळेस लायन्स शहरीं उतरलों नाहीं, परंतु मी इंग्लंडाहून परत येतांना या शहरीं एक दिवस राहिलों.*

आमची गाडी लायन्स एथें सुमारें अर्धकलाक थांबली. त्यावेळीं रात्र होत आली होती आणि थंडी फार पडली होती. आम्हाला ऊब यावी म्हणून आगगाडीवाल्यांनीं आमच्या गाडींत लांब वाटोळे "रोल" कढत ऊन पाण्यानें भरून आणून टाकले. त्यांजवर गालिच्या

*हें शहर मोठें आणि पाहण्यासारखें आहे. हें मार्सेल्सापेक्षां फार मोठें आहे. तें रस्त्यांच्या सफाईनें आणि दुसऱ्या कित्येक गोष्टींनीं पारिसाची बरोबरी करील असें आहे. लायन्स एथें कित्येक चवाठ्यांवर कारंजांची मोठी बहार केलेली आहे. माझा वाटाडी मला एका उंच स्थानीं घेऊन गेला, तेथून शहर फारच रमणीय दिसतें, आणि ऱ्होन आणि सोन या उभय नद्यांचा संगमही दृष्टीस पडतो.

या शहरांत रेशमी कापड विणण्याचे मोठमोठे कारखाने आहेत. चिनई रेशमी "तानचोई"वर अथवा बनारसी किनखाबावर तऱ्हेवार कशिदा काढलेला येतो, त्याप्रमाणें रेशमी कापडावर तें विणतांनाच माणसाच्या हुबेहूब तसबिरी एका कारखान्यांत निघत असतात. मी येते वेळीं हा कारखाना पाहावयास गेलों होतों. तेथें रेशमी कापडाच्या विणकरींत फ्रान्सचा चक्रवर्ती लूई नेपोलियन याची तसबीर हुबेहूब तयार होत होती ती पाहून मला फारच आश्चर्य वाटलें. दुसऱ्या एका सांचांत फ्रान्स एथील राज्यकारणी पुरुषांच्या दहा बारा तसबिरी एकदम तयार होत होत्या. ज्याणें अशा रीतीनें विणून तसबिरी काढण्याची युक्ति शोधून काढली तो पुरुष धन्य होय. ही युक्ति काढणारा मोठा संपत्तिवान् आहे, परंतु दिसण्यांत अगदीं साधा व कृपण असा दिसतो. मी आठवणेकरितां म्हणून कांहीं तसबिरी विकत घेतल्या. आरशांत बसवितां येतील अशा मोठ्या तसबिरीही एथें विणून तयार करितात, परंतु त्या फार महर्घ पडतात.

सारख्या कापडाचें वेष्टन होतें. या रोलांवर पाय ठेवल्यानें आम्हास उ-
बारा आला, आणि थंडी कमी झाली. उतारू लोकांच्या सुखासाठीं
इकडील आगगाडींत काय काय तजवीज केलेली असते याचा हा
एक मासला होय.

आतां आमची गाडी पुनः चालू झाली. लायन्स शहर गाडीं-
तून पाहिलें तरी देखील बहुत सुंदर दिसलें. रात्र झाली होती,
परंतु शहरांत दिव्यांचा लकलकाट पडला होता. गाडी पुनः जल-
दीनें चालूं लागली. आतां रात्र पडली, गाडींत दिवे आहेत, परंतु
बाहेरचें कांहीं दिसत नाहीं. आम्हास गाडींत बसून बसून झोंपेच्या
डुलक्या येऊं लागल्या. जरा डोळा मिटावा आणि जरा उघडावा.
अशा रीतीनें आम्ही अवघी रात्र काढली. नंतर प्रातःकाळ होण्या-
चा समय आला, आणि दिशाप्रकाश झाला. जरा वेळानें चाल-
त्या गाडींतून अति सुंदर आणि मनोहर असा देखावा चोहोंकडेस
दिसूं लागला. हा देखावा पारिस शहराचाच असावा असें लाग-
लेंच आमच्या मनांत आलें.

## १२. पारिस.

PARIS.

आम्ही एप्रिल महिन्याच्या ६ व्या तारिखेस सकाळीं पारिस एथें
जाऊन पोंचलों. आहाहा! मी त्याचें वर्णन काय करूं! अशी सुंदर
आणि देखणी नगरी पृथ्वीवर दुसरि कोठें नसेल! माझ्या ऐकण्यांत असें
होतें कीं या पारिसासारखें शोभायमान नगर दुसरें नाहीं. मी मा-
र्सेल्स पाहून याविषयीं थोडेंसें अनुमान केलें होतें, परंतु ऐकण्यांत आ-
णि देखण्यांत किती अंतर आहे! ज्याप्रमाणें कोणत्याही खाण्यापि-
ण्याच्या वस्तूचा स्वाद ती प्रत्यक्ष चाखल्याशिवाय नुसती पाहूनच
कळत नाहीं, त्याप्रमाणेंच कोणतीही दर्शनीय वस्तु नजरेनेंच पाहि-

त्याशिवाय, नुसतें तिजविषयीं ऐकिल्यानेंच, तींतील खऱ्या खुब्या कधीं लक्षांत येणार नाहींत.

मी खरेंच सांगतों कीं सदरहू शहर पाहून माझी नजर चक होऊन गेली. काळोखाच्या खोलींतून बाहेर येऊन सूर्याकडे पाहिलें असतां डोळे जसे दिपून जातात तसे माझे डोळे ह्या शहराकडे पाहून दिपून गेले. आपल्या कवींनीं लंकेचें आणि द्वारकेचें वर्णन केलें आहे, परंतु माझी खातरी आहे कीं त्यांणीं पारिस पाहिलें असतें, तर त्याचें वर्णन त्याच्या शतगुणित अधिक केलें असतें. कांहीं वेळपर्यंत माझें देहभान गेलें. मला एकदां अशी भ्रांति पडावी कीं मी पाहतों हें स्वप्नावस्थेंत किंवा जागृदवस्थेंत; मी ह्या लोकींच आहें किंवा परलोकीं आहें; ही मनुष्यनगरी आहे किंवा देवनगरी? ह्याप्रमाणें कितीएक वेळां माझ्या मनांत संभ्रम उत्पन्न झाला. शेवटीं माझी खातरी झाली कीं मी शुद्धीवर असून खराखुराच अति सुंदर असा देखावा पाहत आहें, आणि अत्यंत रमणीय आणि शोभायमान अशा नगरीप्रत आलों आहें.

आह्मी आगगाडींतून उतरून भाड्याची गाडी करून एका प्रसिद्ध हॉटेलांत गेलों. त्या हॉटेलाचा डौल आणि शोभा काय वर्णावी? मी मुंबईंत थोड्याच श्रीमान् लोकाचीं घरें यासारखीं भबकेदार पाहिलीं आहेत. परंतु "लुवर" नांवाचें दुसरें एक हॉटेल आहे तें यापेक्षांही अधिक आहे. लुवर हॉटेलाची बरोबरी कोणत्याही हॉटेलाच्यानें करवणार नाहीं. त्याच्या इमारतीनें दोन एकर जमीन आटोपली आहे. त्यांत निजायाच्या खोल्या ८०० हून अधिक आहेत. त्यांत चाकर लोकांस बोलावण्यासंबंधाचें काम विद्युद्यंत्रानें चालतें. आमचें हॉटेल याहून कमी असें असतांही माझी नजर चक होऊन गेली. आह्मी ह्या अतिसुंदर मंदिरांत न्यहारी केल्यावर

किंचित् विश्रांति घ्यावी असें आमच्या मनांत आलें. परंतु स्वप्नांत देखील कधीं पाहिली नाहीं अशी सुंदर आणि झगझगीत नगरी पाहण्याचें टाकून विश्रांति घ्यावयास कोणाला आवडणार? आह्मी लागलेच एक माहीतगार मनुष्य बरोबर घेऊन हें अतिउत्कृष्ठ नगर पाहावयास निघालों.

" आहाहा! रस्ते किती मोठे आणि कसे स्वच्छ!! घरें व दुकानें किती नीटनेटकीं!! रस्तोरस्तीं किती सुंदर कारंजीं व पुतळे!! जागोजाग कशीं झाडें व बागबगीचे!! कसे झगझगीत काफीखाने व रेस्तोरीं!! एक पाहातांच दुसऱ्याचा विसर पडतो. हें पाहावें कीं तें पाहावें!! एक पाहावें, दुसरें पाहावें, तिसरें पाहावें तरी मनाची तृप्ति होत नाहीं. मोठे रस्ते किती प्रशस्त व सुंदर दिसतात!! घरांचा नीटनेटकेपणा, दुकानांची शोभा आणि रस्त्यांचा सुरेखपणा पाहून जिवास आल्हादच होऊन जातो. जसा कांहीं मोठा सणाचा दिवस असून सर्व लोक मौजेनें व चैनीनें फिरत आहेत व जागोजाग त्यांचे मेळे जमले आहेत असें आपणाला भासतें. परंतु हा प्रकार या शहरीं नित्याचा आहे. "

पारिसामध्यें रस्त्यांची रचना व शोभा यांशिवाय दुसरें अपरिमित पाहण्यासारखें आहे. मोजल्या दिसांत पाहावें काय आणि न पाहावें काय? आह्मी तीन दिवसपर्यंत सकाळचे नऊ वाजल्यापासून रात्रीचे बारा वाजत तोंपर्यंत तिळभरही विसावा न घेतां, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं आणि दुसऱ्या ठिकाणाहून तिसऱ्या ठिकाणीं याप्रमाणें फिरत होतों, परंतु मनाची तृप्ति झाली नाहीं. मध्यें थोडी टिफीन करावी तेवढी कायती विश्रांति. परंतु स्वस्थ बसणें मुळींच नाहीं. याप्रमाणें आह्मी तीन दिवस केलें, आणि तितक्यांत आह्माकडून झालें तितकें पाहून घेतलें. मी मुंबईस परत आलों तेव्हांही पारिसावरून

आलों, आणि पुनः दोन दिवस फिरून तें शहर पाहिलें, तथापि मी खरेंच सांगतों कीं माझ्या मनाची तृप्ति झाली नाहीं. पुनः जाऊन पारिस पाहावें असें मनांत वारंवार येतें.

रात्रीस ग्यासाचे दिवे लावतात तेणेंकरून संपूर्ण पारिस शहरांत मोठा प्रकाश आणि झगझगाट होऊन जातो. आपण दिवाळीच्या दिवसांत मौजेनें रात्रीस फिरावयास निघतों तसे एथिल लोक नित्य रात्रीस फिरावयास निघतात. आपली मुंबईतील दिवाळी तर ह्या नित्याच्या दिवाळीपुढें कांहींच नाहीं. एथील दुकानांचा भबका आणि काफीखान्याची शोभा पाहून डोळे दिपून जातात. कित्येक ठिकाणीं दिव्यांचा चकचकाट व झगझगाट, कित्येक ठिकाणीं रागरंग व मौज आणि कित्येक ठिकाणीं गाणेंबजावणें चाललेंच आहे. याप्रमाणें मौजेंत व ख्यालीखुशालींत पडलेले लोक पृथ्वीवर दुसऱ्या थोड्याच ठिकाणीं असतील. अशा आनंदांत निमग्न झालेल्या लोकांमध्यें राहून कोणाला आनंद होणार नाहीं?

पुतळे आणि कारंजीं—रस्तोरस्तीं आणि जागोजागीं पुतळे आणि कारंजीं यांची मौज पारिसामध्यें जशी आहे तशी दुसऱ्या कोणत्याही शहरीं नसेल. उंच स्तंभ कोरून त्यांवर ठेवलेले पुतळे व उडतीं कारंजीं यांच्या शोभेचें वर्णन माझ्यानें करवत नाहीं. "पारिसामध्यें मिनाऱ्यांचीं कारंजीं सुमारें ४० व साधीं १०० असतील. याशिवाय २००० नळांचीं तोंडें दररोज तीन तासपर्यंत उघडून ठेवितात."* या नळांतून पाण्याचा झोत जागोजाग सुटतो तो पाहून मनास आनंद होतो.

चेटलेट नांवाचें एक मोठें प्रसिद्ध व सुंदर कारंजें आहे तें एका उंच स्थंभांतून उडतें. हा स्तंभ सुमारें ६० फुटी उंच असून ता-

* Galignani's Paris' Guide.

डासारख्या आकृतीचा आहे. ह्या स्तंभाच्या उथाळ्यावर चार पुतळे एकमेकाच्या हातांत हात घालून स्तंभासभोंवार उभे आहेत. हे न्याय, बल, बुद्धि आणि चपलता या चार गुणांचे चार पुतळे आहेत. स्तंभाच्या शिरीं एका गोलावर एक सोनेरी रंगाचा पुतळा बसविला आहे तो विजयप्रदर्शक आहे. कंकॉर्ड नांवाच्या चौकावरही कारंजीं, स्तंभ आणि पुतळे यांची मोठी बहार आहे.

वेन्दोम नांवाच्या चौकावर एक स्तंभ १३५ फुटी उंच आहे, त्यावर नेपोलियनाचा पुतळा आहे. ह्या स्तंभावर चढून पाहिलें तर पारिस शहर फार चांगलें दिसतें. बास्तील नांवाच्या चौकावर जुलई नामक स्तंभ आहे तोही मोठा शोभिवंत आहे. या स्तंभाच्या मस्तकावर स्वातंत्र्यदेवते (Genius of Liberty) चा पुतळा आहे. त्याच्या उजव्या हातीं मशाल आहे आणि डाव्या हातीं तुटकी शृंखळा आहे. तो एका पायावर उभा असून जसा काय आतांच पंख उघडून उडून जाणार आहे असा दिसतो. हा स्तंभ सुमारें १५० फुटी उंच आहे. तो बांधण्यास साडेबारा लक्ष फ्रान्क ह्मणजे पांचलाख रुपये लागले असें ह्मणतात.

हिंडण्याफिरण्याच्या प्रख्यात जागा—पारिसामध्यें हिंडण्याफिरण्याच्या जागा अशा आहेत कीं तेथें फिरावयाला जाणाऱ्याच्या जिवास समाधान वाटल्यावांचून राहणारच नाहीं. वर सांगितलेले चौक आणि कारंजीं यांजवळ फिरावयास गेलें तर चित्ताला आनंद होतो. परंतु "चांप्स इलैसीस" नांवाचें ठिकाण आहे तें सर्वांत मोठें आणि रमणीय आहे. त्यांत झाडांच्या सुंदर हारीचा हारी लाविलेल्या आहेत. तेथून "इन्वालिड" नांवाचें हॉटेल व "इंडस्त्री" नांवाचा राजवाडा दृष्टीस पडतो, तीं दोनही खूब शोभायमान दिसतात. "मान्स्यू" नांवाचें मोठें पार्क ह्मणजे उपवन आहे तें मनाला फारच

रंजविणारें असें आहे. टुइलरी व लुक्षांबो नांवाचे बाग व पालेस रॉयल या राजमंदिराचा बाग वगैरे फिरण्याच्या जागा सर्व लोकांस जाण्यास मोकळ्या असतात, आणि त्यांत कोणास फिरावयास अटकाव नसतो.

बुल्वर्ड नांवाच्या ठिकाणीं फिरण्याची मोठी मजा आहे. पूर्वीं पारिसाच्या सभोंवार तट होता तो पाडून जे नवे रस्ते बांधले त्यांला बुल्वर्ड असें म्हणतात. एक बुल्वर्ड रस्ता १५००० व दुसरा १६००० वारांपेक्षां अधिक लांब आहे. यांमध्यें झाडांच्या चार हारी एकसारख्या समरासमोर आहेत. झाडांच्या मधल्या हारींमध्यें गाड्यांचा रस्ता आहे, आणि दोनही बाजूंच्या झाडांच्या हारींमध्यें हिंडण्याफिरण्याचा रस्ता आहे. उत्तरेकडील बुल्वर्ड हा पारिस शहराचा सर्वांत सुंदर आणि उत्तम भाग धरला आहे. त्यास पारिसाचें नाक व मुख्य शोभा असें मानतात.

पारिसाचीं सर्वांत सुंदर दुकानें, सर्वांत मोठीं आणि भबकेदार घरें आणि सर्वांत चकचकीत काफीखाने पाहायाचे असेल, तर या ठिकाणीं जावें. एथें लोक उंचे उंचे पोशाक करून येतात, याजकरितां पारिसाच्या प्रख्यात "फ्याशन" पाहणें असलें तर त्या एथें दृष्टीस पडतील. एथें वाद्यांचा मधुर ध्वनि कानीं पडतो. इतालियन नांवाचा बुल्वर्ड आहे तेथें सर्व मौज्ये आणि शौकी फ्रेंच लोक जमतात, आणि संध्याकाळीं ती जागा स्त्रीपुरुषांनीं भरून गेलेली असते. हे लोक भाड्याच्या खुर्च्या घेऊन एथें बसतात. पुतळ्यांचा नाच आणि दोऱ्यांवरला नाच पाहणें असल्यास टेम्पल नांवाचा बुल्वर्ड आहे तेथें जावें. या ठिकाणीं प्रत्येक रविवारीं जणूं काय मोठी जत्राच भरते.

घरें आणि दुकानें—पारिस एथील घरें आणि त्या घरांत खालीं दुकानें असतात त्यांच्या शोभेसारखी शोभा कोठेंही माझ्या पाहण्यांत आली नाहीं. पारिसामध्यें ९० हजार घरें आहेत आणि ३०

हजार दुकानें आहेत असें सांगतात. थोड्याच वर्षांत जुनीं घरें मोडून त्यांच्या ठिकाणीं नव्या डौलाचीं सुंदर नवीं घरें बांधलीं जातात, यामुळें संपूर्ण पारिस नगर खूब विराजतें. तेथें असा कायदा आहे कीं प्रत्येक घरवाल्यानें दहा दहा वर्षांनीं आपल्या घरास बाहेरून व पुढून रंग किंवा चुना लावून तें नीट करावें, नाहींतर त्यास शिक्षा होते. याप्रमाणेंच कोणी घरवाल्यानें आपल्या घराच्या बाजूचा अर्धा रस्ता दररोज सकाळीं झाडून साफ केला नाहीं, आणि उन्हाळ्याच्या दिवसांत त्यावर पाणी शिंपलें नाहीं तरही त्यास शिक्षा होते. याबंदोबस्तामुळें रस्ते फार स्वच्छ राहतात, आणि त्यांवर बहुत करून केरकचरा दृष्टीस पडत नाहीं. याप्रमाणेंच रस्त्यावरील दुकानांच्या रचनेंत आणि शोभेंत ही तिळमात्र व्यंग सांपडणार नाहीं. एकेक दुकान पाहून आपलें मन चक्क होऊन जातें.

काफीखाने—पारिस शहरांत मोठी शोभा ह्मटली ह्मणजे तेथील काफीखान्याची होय. दोनशें वर्षांपूर्वीं पारिस एथें एकसुद्धां काफीखाना नव्हता. आतां रस्तोरस्तीं आणि जागोजागीं काफीखाने झाले आहेत. एकेका काफीखान्याच्या मालकाचें उत्पन्न काफीखान्याच्या डामडौलाप्रमाणें आणि त्यांतील सामानसुमानाप्रमाणें असतें. काफीखाना जसा अधिक भवकेदार आणि सामानानें भरलेला असेल तशी धन्याची प्राप्ति अधिक. यामुळें हे काफीखाने इतके झगझगीत आणि ढबदार असतात कीं ते पाहून आपणास अचंबा वाटल्यावांचून राहत नाहीं. बुल्वर्ड वगैरे ज्या ठिकाणीं मौजा मारणारे लोक गोळा होतात तेथील काफीखाने पाहून तर आपली नजर चकच होऊन जाते. तेथें रात्रीस दिवे लावितात त्या वेळीं इतका उजेड पडतो कीं बाहेरून किंवा आंतून पाहणाराचे डोळे अगदीं दिपून जातात.

नित्य संध्याकाळीं स्त्रिया व पुरुष या काफीच्या दुकानाबाहेर खुर्च्या व लहान टेबलें घालून मौजेनें बसतात. कोणी काफी पीत आहेत, कोणी चाहा पीत आहेत, कोणी आईसक्रीम (म्हणजे बर्फानें दाट झालेलें दूध) अथवा बर्फानें घट्ट झालेला फळांचा रस खात आहेत, कोणी मेवामिठाई खात आहेत, कोणी गोष्टी सांगत आहेत, कोणी लोक येतात जातात आणि भोंवतालें काय चाललें आहे तीं मौज पाहत बसले आहेत. ह्या दुकानाच्या आंत जाऊन पाहावें, तर असे मोठमोठे आरसे आणि इतके दिवे लावलेले असतात कीं हीं दुकानें आहेत असें आपणास वाटणार देखील नाहीं. सोन्याच्या मुलाम्याचा आणि दीपप्रदर्शनाचा इतका चकचकाट व झगझगाट होऊन जातो कीं जसे काय आपण कोणा महान् राजाच्याच मंदिरांत आहों असें आपणास भासतें.

टुईलरी नामक राजवाडा—पारिस एथील केवळ काफीखाने व हॉटेलें पाहून जर आपली नजर चक्क होऊन जाते, तर तेथील राजवाडे पाहून आपले डोळे अर्थातच दिपून जातील. हल्लींचा चक्रवर्ती लूई नेपोलियन नगरांत असतो तेव्हां बहुधा तो "टुईलरी" नांवाच्या मंदिरांत राहतो. ह्या वाड्याची शोभा आणि त्याच्या बागाची रचना यांत तिळमात्र न्यून नाहीं. एथें चक्रवर्ती राहत असला तथापि या मोठ्या बागांत हिंडण्याफिरण्यास किंवा वाड्यांत जाऊन आंतील कित्येक भाग पाहण्यास कोणी अटकाव करीत नाहीं, पुष्कळ लोक नित्य संध्याकाळीं नवनवे आणि तऱ्हतऱ्हांचे पोशाक करून ह्या राजवाड्याच्या विस्तीर्ण मोकळ्या बागांत फिरावयास जातात, आणि कित्येकतर भाड्याच्या खुरच्या घालून त्यांवर बसतात, जणूं काय ते आपल्या स्वताच्याच बागांत बसून मजा मारीत आहेत.

या महालांत जाण्यापूर्वी प्रथम एका मोठ्या दरवाज्याजवळ दोन

घोडेस्वार दरवाज्याच्या दोहोंकडे पहारा करण्यास उभे आहेत असे दिसतात. फक्त एवढा हा दरवाजा करण्यास सहा लक्ष रुपये खर्च झाले असें सांगतात. या दरवाज्याच्या शिरावर "जयाचा पुतळा" रथामध्यें बसविला आहे. दरवाज्याच्या एकेका खांबावर नेपोलियन बोनापार्ट याच्या लश्करांतील एकेका शिपायाचा पुतळा आहे. याशिवाय नकशीकामानेंही हा दरवाजा बहुत सुशोभित केलेला आहे. आपण दरवाज्यांतून आंत गेलों ह्मणजे बागांत जातों, आणि तेथें उभे राहून बागाकडे व वाड्याकडें पाहतांच आपले डोळे दिपून जातात. एथें सर्वांत प्रख्यात अशा कारागिरांनीं केलेले पुतळे पाहावयास सांपडतात. याप्रमाणेंच बागांतील वनस्पति आणि कारंजीं यांची रचना आणि शोभा ह्याही परिपूर्ण आहेत.

वाड्यांत जातांच आपल्या आश्चर्यास पार नाहींसा होतो. वाड्यांतल्या मोठ्या दिवाणखान्याचें छत पाहावें किंवा त्यांतलें उंचें मोलवान् सामान व शृंगार पाहावा? आपण पहिल्यानें सभोंवार नजर टाकतांच चकित होऊन कांहीं वेळ जेथच्या तेथेंच स्तब्ध राहतों. या महालाचा कांहीं भाग नवीन बांधून तयार होत आला होता त्यालाच दोन कोटि रुपये खर्च झाले असावे. यावरून हा सर्व महाल किती मोठा आणि सुंदर असेल याचें कांहीं अनुमान करितां येईल. या वाड्याच्या लगत एक बाग आहे तो खुद्द चक्रवर्तीसाठींच आहे. त्यांत बहुतकरून कोणाला जाऊं देत नाहींत. हा बाग आणि थोरला बाग मिळून दोहोंची लांबी सुमारें दोन हजार फुटींपेक्षां अधिक होईल, आणि रुंदी सुमारें एक हजार फुटी होईल.

वर्सेलीस एथील प्रख्यात राजमंदिर—वर्सेलीस हा गांव पारिस एथून सुमारें चार मैल आहे, तेथें हें प्रख्यात राजमंदिर आहे. हें मंदिर फ्रान्स देशाच्या इतिहासांत जसें प्रख्यात आहे तसेंच तें सुंदर

आणि पाहण्याजोगें आहे. या वाड्यावर लाखो तर काय, परंतु कोत्यावधि रुपये खर्च झाले असतील. या महालालगत तबिले आहेत ते एवढे मोठे कीं त्यांत एक हजार घोडे राहतील. वाड्यांत दिवाणखाने आणि खण किती आहेत याचा तर कांहीं सुमारच नाहीं. त्यांतील सामानांत व शोभेंत काडीमात्र व्यंग सांपडणार नाहीं. दरएका खणांत मोठमोठे किंमतदार तसबिरींचे आरसे टांगलेले दृष्टीस पडतात. बहुतेक चित्रांवरून फ्रान्स देशाच्या इतिहासाची माहिती होते; कारण मोठमोठ्या लढाया आणि दुसऱ्या घडून आलेल्या गोष्टी त्यांत फार बारकाईनें काढलेल्या आहेत. मी या चित्रांचें आणि वाड्यांतील सामानसुमानाचें वर्णन करूं लागलों, तर या पुस्तकाचीं पुष्कळ पृष्ठें त्याणेंच भरून जातील.

अहाहा! या महालासभोंवतालच्या बागाची आणि फिरण्याच्या जागेची शोभा मी काय सांगूं!! जागोजाग पुतळे आहेत, ते इतके आणि असे सुंदर आहेत कीं त्यांचें वर्णन माझ्यानें करवत नाहीं. तशींच ठिकठिकाणीं कारंजीं आहेत, त्यांचे निरनिराळे डौल आणि नकशी पाहून आपणास आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. एक कारंजें वसंत ऋतूचें आहे. त्यांत एका पुतळ्याच्या हातीं फुलांची परडी दिली आहे, आणि त्याच्या भोंवतालीं मुलें फुलांचे हार घेऊन उभीं आहेत. उन्हाळ्याचें कारंजें आहे त्याचा आकार निराळाच आहे. दुसरें एक अत्यंत सुंदर कारंजें आहे त्याला १९ लक्ष फ्रांक ह्मणजे ६ लक्ष रुपये लागले असें सांगतात. एक बहुत मजेची व सुंदर टेकडी केलेली आहे. तिच्या बाजूवर छानदार छानदार पुतळे आहेत. ह्या खडकांतून पाण्याचा धोत वस्त्राप्रमाणें पसरून पडतो, आणि तेणेंकरून जसे काय पाण्याचे अपरिमित झरेच फुटतात. तें पाहण्यास मोठें रमणीय व मजेचें दिसतें.

एका तळ्यांत लहान मुलें खेळत व पोंहत आहेत असे पुतळे केले आहेत, आणि त्यांच्या मध्यें ५० फुटी उंच पाण्याचा झोत उडत आहे. बागांत याशिवाय दुसऱ्या ठिकाणीं पाण्याचीं कारंजीं आहेत तीं जेव्हां उडतात तेव्हां त्यांतून इतकें पाणी निघतें कीं त्याचा खर्च दर वेळेस १० हजार फ्रांक ह्मणजे ४ हजार रुपये होतो. ह्या रमणीय बागांत फिरतानां किंवा व्यायाम करतानां मनाला जो आनंद आणि संतोष होतो त्याचें माझ्यानें वर्णन करवत नाहीं.

दुसरे राजवाडे—याशिवाय पालेस रॉयल, व लुक्षांबो व बुर्बोन वगैरे राजवाडे प्रसिद्ध आहेत. पालेस रॉयल याच्या डौलांत आणि शोभेंतही तिळमात्र न्यून आढळत नाहीं. तो वाडा कित्येक प्रकारें टुइलरी वाड्यापेक्षांही बाहेरून अधिक शोभतो. यांत लोकांस हिंडण्याफिरण्यास जाण्याची मोकळीक आहे. या वाड्यांत चक्रवर्तीचा पुतण्या राहत असतो. बागांतील कारंजांची मौज आणि झाडांची हारबंद रचना पाहून नजर चक होऊन जाते. हा बाग सुमारें ७०० फुटी लांब आहे आणि ३०० फुटी रुंद आहे. यांतही हिंडण्याफिरण्यास आणि विहार करण्यास पुष्कळ लोक जात असतात. त्यांत फक्त खुरशांवर बसण्याच्या भाड्याचेच सरकारास दरसाल १५००० रुपये उत्पन्न होतात. एथेंही लोक आपल्या स्वताच्याच बागांत बसावें त्याप्रमाणें चैनीनें बसून सुख भोगतात. लुक्षांबो आणि बुर्बोन हीं मंदिरेंही इतिहसांत प्रसिद्ध आहेत. यांत हल्लीं राज्यप्रकरणी सभा भरत असते.

देवालयें—पारिस एथें कितीएक देवालयेंही पाहण्याजोगीं आहेत. त्यांला आपल्या एथील कित्येक हिंदु देवालयांची नकशीमध्यें सर येणार नाहीं हें खरें आहे, परंतु सफाईनें व कांहीं अंशी डौलानेंही हीं त्यांपेक्षां चांगलीं आहेत. फ्रान्स देशांतील बहुतेक

लोक रोमन क्याथोलिक धर्माचे आहेत, म्हणून बहुतेक देवळांत मूर्ति असतात. खिडक्यांच्या कांची असतात त्या बहुधा रंगीत असतात, आणि त्यांजवर चित्रें काढलेलीं असतात. आपल्या देवालयांत आणि (गुजराथी) महाराजांच्या "मंदिरांत" "चरणामृत" अथवा तीर्थ देतात त्याप्रमाणें एथेंही एक पाद्री बाहेर बसून येणाऱ्याजाणाऱ्या मनुष्यांस पाणी देत असतो. तें कोणी पितात आणि कोणी नेत्रांस व हृदयास लावतात. पारिस एथील नॉटरडाम आणि पान्थियन ह्या देवळांची मोठी प्रख्याति आहे. कोणीही प्रवाशानें तीं अवश्य पाहावीं.

नेपोलियनाची कबर—ज्या नेपोलियन बोनापार्टाच्या पराक्रमें करून फ्रान्स देशाची कीर्ति वर्धमान झाली, आणि ज्याला एक वेळ संपूर्ण युरोपखंड थरथरां कांपत होतें त्याची कबर पाहण्याजोगी आहे. ती प्रवासी लोकांस अवश्य दाखविण्यांत येते. फ्रेंच लोक नेपोलियनाच्या कबरेस मोठा मान देतात, तो इतकाकीं कोणा गैरमाहीत मनुष्यास हे तिची पूजाच करितात असें वाटेल. ह्या कबरेस संगमरवर पुष्कळ लावला आहे, आणि तिचें कांहीं काम फार नकशीदार आहे. नुसत्या संगमरवरासच २० लक्ष फ्रांक ह्मणजे ८ लक्ष रूपये खर्च झाला, आणि ह्या चक्रवर्तीच्या कबरेस एकंदर ८० लक्ष फ्रांक म्हणजे ३६ लक्ष रूपये.यांहून कमी लागले नाहींत! ह्या कबरेंत जाण्याच्या वेळेस आपलीं पागोटीं काढा म्हणून प्रथम आह्मास सांगितलें, परंतु आमच्या वाटाड्यानें समजावून सांगितलें कीं पूर्वेकडील लोक डोकीस पागोटें घालणें यांत मान आहे असें समजतात.

प्राणिसंग्रहालय—प्रवासी लोकांनीं पारिस एथील प्राणिसंग्रहालय अवश्य पाहावें. आह्मी तें पाहावयास गेलों होतों. तेथें अनेक भिन्न भिन्न जातींच्या प्राण्यांचा संग्रह केला आहे. एथें युरोपांतील सर्व जातींचे मिळून १०००० हून अधिक पक्षी पाहण्यांत येतात.

सर्प आदिकरून जिवार्णवें सुमारें दोन हजारांवर होतील. चतुष्पदांचा-ही मोठा संग्रह असून त्यांत वाघ, लांडगे वगैरे घातुक पशु सुद्धां आ-हेत. जिराफ जातीचा प्राणीही पाहण्यांत येतो. असें सांगतात कीं एथें एक मोठा जिराफ होता तो मरून १७ वर्षें झालीं. एथें मासे देखील वहुत आहेत. मत्स्य सर्व मिळून सुमारें पांच हजार होतील. सर्व जातींचे प्राणी धरले तर त्यांची संख्या दोन लक्षांपेक्षां कमी होणार नाहीं.

नाटकगृहें—फ्रान्सदेशीय लोक स्वभावानें मौज्ये व शौकी आ-हेत यामुळें ते नाटकगृहांदिक ख्यालीखुशालीचीं साधनें यांकडे वि-शेष लक्ष देतात. पारिस एथील नाटकगृहें पाहण्याजोगीं आहेत. आह्मी एका मुख्य आणि प्रख्यात नाटकगृहांत ऑपराचा खेळ पा-हावयास गेलों होतों. ऑपरा हें नांव पूर्वीं माझ्या ऐकण्यांत होतें, प-रंतु मीं तो खेळ प्रथम पारिस एथेंच पाहिला. ऑपराचें विवेचन (ह्या ग्रंथाच्या) सहाव्या प्रकरणांत सांपडेल. मी एथें त्याविषयीं इ-तकेंच सांगतों कीं तो पाहून आमचीं मनें फारच खूश झालीं. हीं नाटकगृहें दिसण्यांतही खूब भबकेदार होतीं. दुसरें, एथें आह्मास पारिस एथील मोठमोठ्या कुलीन सुंदर स्त्रिया उत्तम पोशाक केले-ल्या पाहावयास संधि सांपडली. हें नाटकगृह फार मोठें आणि त्यां-त लोकांची मोठी दाटी असतांही, गडबड किंवा गोंगाट कांहीं न-व्हता. नाटकगृहाच्या दरवाजाजवळ गाड्या एकामागून एक ज-लद येतात, त्यांत त्वरित वसून चालतें झालें पाहिजे. गाडींत ब-सावयास एक मिनिट अधिक लागलें तर तितका वेळ देखील शि-पाई गाडी थांबूं देत नाहीं. खेळ पाहणारांची एवढी गर्दी असते.

आह्मी एका रात्रीस पारिसामध्यें "सर्कस" पाहावयास गेलों होतों. तेथें सुमारें दहा हजार लोक तो तमासा पाहावयास आले होते.

आह्मा सातजणांचा पोशाक आणि भिन्न भिन्न पागोटीं पाहून, बहुतेक लोक प्रथम आह्माकडेसच टेळूं लागले. नंतर खेळ चालू झाल्यावर खेळ करणारांनीं भरधांव घोड्यांवर नाचणें, उड्या मारणें वगैरे अलौकिक कसरती करून दाखविल्या. त्या आह्मी स्वदेशांतच पुष्कळदां पाहिल्या होत्या, ह्मणून आह्मांला त्यांत कांहीं विशेष आश्चर्य करण्यासारखें वाटलें नाहीं.

घोड्यांची कसरत झाल्यावर, तमासेवाल्यांच्या माणसांनीं एक जबरा मोठा पिंजरा मध्येंच आणून ठेविला. त्यांत दोन मोठे जबरदस्त सिंह आणि दोन वाघ होते. हे क्रूर पशु फार विक्राळ आणि भयंकर दिसत असत. तेथें एक खेळकरी रुपेरी लकलकीत तंग पोशाक करून आणि हातांत चाबूक व पिस्तूल घेऊन आला. तो जातीचा इंग्रज होता.

ह्या खेळकऱ्यानें पिंजऱ्याचें दार उघडलें, आणि झटकन आंत जाऊन तें लागलेंच लावून घेतलें. तो वाघास आणि सिंहास चाबकानें झोडूं लागला. त्या पशूंनीं क्रोधानें भयंकर गर्जना केली. आमचे पाय तर थरथरां कांपूं लागले. आह्मास असें वाटलें कीं हे असे क्रुद्ध झालेले घातकी पशु ह्या खेळकऱ्यास कदाचित् फाडून खातील. आह्मांला जशी चिंता पडली तशीच बहुतेक खेळ पाहणारांस पडली होती असें आम्हास दिसलें, कारण ते वारंवार मोठ्यानें ओरडून "ईश्वर त्याचें रक्षण करो" असें म्हणत.

आतां या शूर खेळकऱ्यानें काय केलें तें ऐका. एका सिंहाला व वाघाला चाबकानें खूब मारून तो त्यांच्या पाठीवर बसला, आणि नंतर त्यांच्या पाठीवर एक पाय ठेवून उभा राहिला, आणि पुनः त्यांस चाबकानें मारूं लागला. ह्या मारामुळें ते क्रूर पशु भयभीत होऊन पिंजऱ्याच्या दांड्यावर जाऊन ओरडत उभे राहिले.



सिंहाचा तमासा करणारा खेळकरी.

नंतर त्या खेळकऱ्यानें त्या जनावरांसमोर पिस्तुलाचा एक बार मारला. त्या वेळेस त्यांणीं भयंकर गर्जना केली. आमचें सर्वांग कांपूं लागलें. परंतु तो खेळकरी तत्क्षणीं एका सिंहाच्या तोंडाजवळ जाऊन त्याचें पसरलेलें तोंड दोन हातांनीं धरून उभा राहिला. नंतर त्याणें आपलें डोकें त्याच्या तोंडांत घातलें. हें पाहून आह्मी फार आश्चर्य पावलों आणि संतुष्ट होत्साते घरीं आलों.

लोंकरीच्या कशिद्यानें मनुष्याचीं हुबेहूब चित्रें काढण्याचा कारखाना अवश्य पाहावा असा आहे. ह्याला टेपस्त्री (Tapestry) ह्मणतात. हा पाहावयास आह्मी गेलों होतों. एथें उंचेउंचे गालिचेही करण्यांत येतात. हा कारखाना सरकार चालवतें, कारण याचा खर्च फार मोठा आहे. हरएका मनुष्याच्या चामडीच्या वर्णाप्रमाणें निरनिराळ्या रंगाच्या लोंकरीच्या दोऱ्यांनीं चित्रें काढावीं हें काम खरोखरच आश्चर्यकारक वाटतें. हीं कशिद्याचीं चित्रें पाहून आपण पहिल्यानें फसतों, आणि असें समजतों कीं कोणी मोठ्या कुशळ चितारीनें हें चित्र हातानें रंग भरून काढलें असेल.

हीं चित्रें कशीं काढतात तें पाहावयास सांपडतें. हातानें काढलेलें चित्र पुढें ठेवून त्याप्रमाणें लोंकरीचे दोरे घेऊन गुंतवतात. हें

काम फारच कठीण आहे आणि त्यांत वेळही बहुत जातो. सरकार खर्च देतें ह्मणून तयार झालेला माल सरकारच वापरतें किंवा परदेशीय सरकारांस भेटी पाठवितें. सुमारें एकशें वीस माणसें नेहमी या कारखान्यांत खपत असतात. एकेका कारागिरास सालिना १९०० पासून ३००० फ्रांकॉपर्यंत पगार मिळतो. या कारागिरांपैकीं कोणी काम करण्यास असमर्थ झाला तर त्याला ६०० पासून १००० फ्रांकॉपर्यंत पेन्शन मिळतें, आणि त्याच्या जागीं दुसरा कारागीर ठेवला जातो. एथें चक्रवर्तीसाठीं गालिचेही तयार होतात. कांहीं कांहीं गालिचे दहा वर्षांपर्यंत तयार होत असतात, त्यांला दीड लक्ष फ्रांकॉहून अधिक किंमत पडते.

फ्रान्सचा चक्रवर्ती लूई नेपोलियन बहुतकरून पारिस शहरीं राहतो. याची सत्ता संपूर्ण फ्रान्स देशावर चालते, आणि अवघ्या युरोपखंडांत हा मोठा प्रख्यात आणि उद्योगी राज्यकारणी पुरुष आहे. राज्यप्रकरणांत यासारखा खबरदार आणि दूरदृष्टि पुरुष आजकाळीं दुसरा मिळणें कठीण. हा इसवी सन १८०९ त जन्मला, आणि हा पुढें फ्रान्सच्या सिंहासनावर विराजेल असें वीस वर्षांपूर्वीं कोणाला वाटलें नव्हतें. फ्रान्सचें राज्य लूई फिलिप याच्या हातीं होतें तें त्याजवळून परत घेण्याचा विचार याच्या मनांत प्रथमपासूनच होता. तो दोनचारदां राज्यप्रकरणी अपराधांत सांपडला होता, आणि सरतेशेवटीं (१८४६ त) फ्रान्स देशांतील बंदीखान्यांतून स्त्रीचा वेष धारण करून इंग्लंडांत जाऊन आश्रयास राहिला. तो अडीच तीन वर्षें लंडनांत सुखवस्तू होता.

सन १८४८ त फ्रान्स देशांत बंड झालें तेव्हां ती संधि साधण्यासाठीं लूई नेपोलियन पारिस एथें गेला, आणि हा बोनापार्टाचा वंशज ह्मणून फिलिपास काढून यास गादीवर बसवावें असा बहुत

लोकांचा विचार झाला. याविषयीं ८० लक्ष मनुष्यांचीं मतें घेतलीं, त्यांत ७९ लक्ष मतें लूई नेपोलियन याच्या पक्षास पडलीं. यामुळें तो गादीवर बसला, आणि सन १८५२ त "तिसरा नेपोलियन चक्रवर्ती" हें पद लोकांकडून पावला. याच वर्षीं त्याणें स्पेन देशांतील एका सरदाराची यूजिना नामक अतिसुंदर आणि रूपवती कन्या वरिली. ही चक्रवर्तिनी संपूर्ण युरोपखंडांत मोठी देखणी आहे. फिलिपाच्या पक्षाचे लोक अजून फ्रान्समध्यें पुष्कळ आहेत, आणि त्यांचे हेर व जासूद लूई नेपोलियनाचा प्राणघात करण्याच्या तजविजींत आहेत, परंतु बहुतेक प्रजेचा विचार याला अधिकाधिक अनुकूल होत चालला आहे, आणि हल्लीं हा फ्रान्स देशांतील लोकांचा मोठा लाडका होऊन बसला आहे.

फ्रान्सची राज्यव्यवस्था—ज्याप्रमाणें इंग्लंडामध्यें पार्लमेन्ट म्हणजे "हौस आव् कॉमन्स" आणि "हौस आव् लॉर्ड्स" ह्या सभा राज्याधिकार चालवतात त्याप्रमाणेंच फ्रान्समध्यें "लेजिस्लेटिव बॉडी" आणि "सेनेट" ह्या दोन सभा राज्याधिकार चालवतात. "लेजिस्लेटिव बॉडी"चे २६२ सभासद आहेत. यांची निवडणूक प्रजा करते. ३५००० लोकांच्या वस्तीस आपल्या तर्फेनें एक सभासद नेमण्याचा अधिकार आहे. ह्या सभेचें काम वर्षांतून तीन महिने चालतें. "सेनेटा"मध्यें राजपुत्र, मानकरी अथवा सरदार, धर्माध्यक्ष आदिकरून बसतात. या सभेचे एकंदर १७० सभासद आहेत, आणि एकेका सभासदास दरमहा २५०० फ्रांक ह्मणजे एक हजार रूपये मिळतात. या सभेचें काम बारमास चालतें. "लेजिस्लेटिवबॉडी" च्या एकेका सभासदासही दरमहा इतकाच मिळतो, परंतु वर्षांतून तीन महिने सभेचें काम चालतें तोंपर्यंत मात्र मिळतो, बारमहा मिळत नाहीं. "लेजिस्लेटिव बॉडी" चे सभासद सहासहा महिन्यांनीं पा-

लटतात, परंतु "सेनेटा"चे सभासद पालटत नाहींत. काम त्वरित चालण्यासाठीं "सेनेटा"मध्यें पांच पांच सभासदांच्या आणि "लेजिस्लेटिव बॉडी" मध्यें नऊ नऊ सभासदांच्या कमिटी होतात. इंग्लंडांत "हौस आव् कॉमन्स" तशी फ्रान्सांत "लेजिस्लेटिव बॉडी" आणि "हौस आव् लॉर्ड्स" तसें "सेनेट" होय.

राज्यप्रकरणी दोन मुख्य सभा वर सांगितल्या, त्यांच्या खालोखाल "कौन्सिल आव् स्तेत" ह्मणून एक सभा आहे तिजमध्यें फ्रान्सचा चक्रवर्ती प्रमुखस्थानीं बसतो. प्रधानांनीं जें कांहीं "बिल" अथवा राज्यप्रकरणी काम "लेजिस्लेटिव बॉडी" आणि "सेनेट" यांत दाखल केलें असेल तें हें कौन्सिल तपासतें आणि योग्य वाटलें तर मंजूर करतें. कौन्सिलांत २४ सभासद आहेत, त्या एकेकास सालिना २५ हजार फ्रांक मिळतात. प्रधानमंडळींत एक मुख्य प्रधान आणि निरनिराळ्या खात्यांवरचे दुसरे आठ प्रधान असतात. एकेका प्रधानास वर्षास एक लक्ष रुपये मिळतात. चक्रवर्तीची सत्ता फार मोठी आहे, आणि हरएक काम बहुधा त्याच्या मर्जीप्रमाणें होतें. तो आपल्या खर्चास सालिना अडीज कोटि फ्रांक ह्मणजे एक कोटि रुपये घेतो, आणि त्याच्या घराण्यांतील एकेका राजपुत्रास सालिना पंधरा लाख फ्रांक म्हणजे सहा लाख रुपये खर्चास बांधून दिले आहेत.

फ्रेंच लोक इंग्रजांपेक्षां स्वभावानें मिळताऊ व शिष्टसंप्रदायी आहेत. तसेच बाहेरील सफाई आणि डामडौल यांत ही ते इंग्रजांहून अधिक आहेत. ते बहुतकरून खोटें तकलादी सामान वापरतात, परंतु तें मोठें भवकेदार असतें. ते लोक मोठे मौज्ये व शौकी आहेत. ते बहुतकरून जेवणाखाणाची खटपट फारशी घरीं ठेवीत नाहींत. बहुतेक मध्यम स्थितींतले आणि गरीब लोक आपापल्या

योग्यतेनुसार व शक्त्यनुसार एकादें हॉटेल किंवा रेस्तोरें पाहून तेथें जेवून येतात.

कोणाही एकाद्या साधारण मनुष्याची जेवण्याची ढब पाहिली तरी असें वाटेल कीं इतक्या मोठ्या इतमामानें जेवायाला बसणारा हा कोणी थोर राजवंशी पुरुष असावा. भोजन होतांच त्याला वाचण्यास वर्तमानपत्रें टेबलावर तयार आहेत. कसेंही उंचें भोजन करणें असलें तरी तें हॉटेलांत अथवा रेस्तोऱ्यांत होतें. आमचे देशबंधु असा डौल आणि सुख कधीं भोगतील? हें सर्व डोळ्यांनीं पाहिल्याविना भोगण्याचें मनांत कोठून येणार?

फ्रेंच लोक मिशा व आखूडशी दाढी ठेवतात. आह्मी पुष्कळ ठिकाणीं पाहावयास व हिंडाफिरावयास गेलों, परंतु आमचा पोशाक पाहून अथवा आह्मी परदेशी म्हणून आमचा कोणी अपमान केला असें नाहीं. एके रात्रीस आह्मी स्वतः गाडी करून तींत बसून जात होतों, आणि एक छाकटा फ्रेंच जनरथावर बसून जात होता, तो आह्मास पाहून थट्टेनें कांहीं मोठ्यानें बोलला, परंतु दुसऱ्या लोकांनीं लागलाच त्याचा धिःकार केला.

पारिसामध्यें सुमारें १९ लाख वस्ती आहे. तेथें इंग्लंडांतल्या एवढी थंडी नाहीं, तथापि आपल्या एथल्यापेक्षां अधिक आहे. गोड्या पाण्याच्या कारंजांत किंवा कृतीनें केलेल्या नाल्यांत अनेक जातींचे सुंदर सुंदर मासे पाळण्याची हौस फ्रेंच लोकांस फार आहे. या कारंजांत मत्स्यांची संतति वाढते. हें सुंदर युक्तीचें कारंजें पाहण्यासारखें आहे.

आह्मी तारीख ९ वी माहे एप्रिल रोजीं सकाळीं न्यहारी करून पारिस एथून लंडनास जावयास निघालों, आणि आगगाडींत बसून "क्यालेस" एथें गेलों. आह्मी सकाळीं ९ वाजतां निघालों ते दोन प्रहरांनंतर एक वाजतां क्यालेस एथें पोंचलों. एथें आल्यावर स-




मत्स्य पाळण्याचें कारंजें.

मजलें कीं आह्मी आतां फ्रान्स देशाच्या शेवटास अथवा हद्दीवर आ-लों. आतां "डोवर" खाडी आली. एक लहानशी आगबोट तयारच होती तींत आह्मी बसलों आणि ती चालती झाली. आतां आह्मी फ्रान्स देशाचा किनारा सोडला. ही खाडी इतकी अरूंद आहे कीं समोर इंग्लंडाचा किनारा दिसत होता. ही खाडी अशी वाईट आहे कीं आगबोट हिजमध्यें फारच हिंसके खाते.

आतां शीतळ वायु वाहूं लागला. या वेळीं माझ्या मनांत असें आ-लें कीं स्वतंत्र भूमीच्या शीतळ हवेची मी आतांच पहिल्यानें रुचि

घेत आहें. थोड्याच वेळानें समोर पांढऱ्या खडी (चाका) चे डोंगर दिसूं लागले. इतक्यांत किनारा आला, आणि आमच्या लहान्या आगबोटीनें नांगर टाकला. आह्मी सुमारें तीन वाजतां इंग्लंडाच्या भूमीवर पाऊल ठेविलें. आहाहा! या समयीं माझ्या अंतःकरणाला किती आल्हाद व हर्ष झाला !!

हा डोवर किल्ला होता. आह्मी एथें अर्ध कलाकापेक्षां अधिक थांबलों नाहीं. आगीची गाडी तयार होती. आमचें सामान गाडींत घालतांच, आह्मी आंत जाऊन बसलों आणि गाडी निघाली. संध्याकाळीं सरासरी पांच वाजतां इंग्लंडाची राजधानी लंडन एथील धुराडीं दिसूं लागलीं. नंतर जरा वेळानें आमची गाडी लंडन-ब्रिज-रेलवे-ष्टेशन यावर येऊन उभी राहिली.



# प्रकरण ३.

## लंडन आणि त्याचा बाहेरील देखावा.

### III. LONDON—ITS EXTERNAL VIEW.

आह्मी एप्रिल महिन्याच्या ९ व्या तारिखेस सायंकाळीं सुमारें पांच वाजतां इंग्लंडाची राजधानी लंडन यांत पहिल्यानें पाऊल ठेवलें. आहाहा! या वेळीं आह्मास किती आनंद व हर्ष झाला! तो आनंद व हर्ष वर्णावयास मला यथायोग्य शब्द सुचत नाहींत. आह्मी आपल्या एका पारसी मित्रास पारिस एथून पूर्वींच ताराद्वारें सूचना पाठविली होती. तो भला मित्र आह्मास भेटावयास व घरीं घेऊन जावयास आगगाडीच्या ष्टेशनावर येऊन राहिला होता. आह्मी मोठ्या हर्षानें व प्रेमानें त्याला भेटलों. आमचें सामान उतरून मांडवींतून पार होई तोंपर्यंत आह्मास थांबावें लागलें. आह्मी सकाळीं पारिस एथून निघालेले ते आतां अगदीं थकून जाऊन अर्धमेले झालों होतों, तथापि एथें खोळंबा झाला म्हणून आह्मास किंचित्ही कंटाळा आला नाहीं.

आह्मास पंधरा वीस मिनिटांपर्यंत थांबावें लागलें. तितक्यांत लंडन-ब्रिज-ष्टेशनावरची सर्व व्यवस्था आमच्या पाहण्यांत आली. ती पाहून आह्मास फार आश्चर्य वाटलें. एक पाटी मारून तिजवर सूचना लिहिलि होती तिकडे आमचें लक्ष गेलें. "BEWARE OF PICK-POCKETS ह्मणजे "खिसेकातरू संभाळा" असें मोठाल्या अक्षरांनीं लिहिलें होतें. ज्या देशांत सर्व प्रकारच्या कला पूर्ण दशेस आलेल्या आहेत त्यांत चोरी आणि ठकबाजीही पुर्ण दशेस आलेली असली ह्मणून कांहीं नवल नाहीं. कोणा चोराच्या

किंवा ठकाच्या सपाट्यांत कोणी प्रवाशानें सांपडूं नये एवढ्यासाठीं ही सूचना मोठी अगत्याची आहे. परंतु मी सुमारें ६ महिने विलायतेंत होतों तेवढ्या काळांत माझ्या खिशांतून कधीं कांहीं वस्तु चोरीस गेली नाहीं.

## १. एतद्देशीय प्रवाशांस कांहीं सूचना.

A FEW HINTS TO INDIAN TRAVELLERS.

आगगाडीच्या ष्टेशनाबाहेर "क्याब" ह्मणजे घोड्यांच्या भाडोत्री गाड्या तयार असतात. त्यांतून एका गाडींत बसून आपणाला अमुक ठिकाणीं जावयाचें असें गाडीवानाला सांगितलें म्हणजे तो आपणास नीट त्या ठिकाणीं नेऊन उतरतो. कोणा स्नेह्याच्या घरीं उतरावयाचें असलें, तर तो कोणत्या रस्त्यावर अथवा कोणत्या आळींत आणि कोणत्या नंबराच्या घरांत राहतो तें सांगितलें पाहिजे. कसेंही करून कोणा मित्राच्या घरीं उतरण्यास जाणें चुकेल तितकें चुकवावें. कारण या देशांत राहण्याची रीति आपल्या देशांतील रीतीहून फार भिन्न आहे. आपण स्वतः घर घेऊन बिऱ्हाड करूं तोंपर्यंत हॉटेलांत राहावें हें एतद्देशीय चालीस अनुसरून आहे इतकेंच नाहीं, तर आपण मित्राच्या घरीं उतरलों असतां त्यास मोठी अडचण पडावयाची ती असें केल्यानें टळते. इतकेंही असून, स्नेह्याच्या घरीं उतरणें असलेंच, तर त्याविषयीं पूर्वींच त्यास सूचना पाठवून तजवीज ठेविली पाहिजे.

ह्या मोठ्या शहरांत वस्ती फार आहे, तथापि एथें भाड्यानें घरें मिळण्यास अडचण पडत नाहीं. सांप्रत याविषयीं मुंबईंत जेवढा त्रास काढावा लागतो तेवढा कांहीं एथें लागत नाहीं. अर्थात् ज्या ठिकाणीं श्रीमान् आणि ऐश्वर्यवंत लोक राहतात त्या ठिकाणीं भाडें फार पडतें. परंतु जेथें उदमी किंवा मध्यम स्थितीचे लोक राहतात तेथें

भाडें मुंबईंत सध्या आहे यापेक्षांही कमी पडतें. भाड्यानें घरें देण्याचीं जागोजाग दुकानें असतात. तेथें जाऊन विचारावें ह्मणजे सामान-सुमानासुद्धां किंवा रिकामें पाहिजे तसें घर सहज मिळतें. नेहमी अथवा बहुत दिवस राहावयाचें नसलें, तर सामानसुमानासुद्धां घर घ्यावें हें ठीक पडेल. कारण पदरचा पैसा खर्च करून सामान-सुमान विकत घेईन ह्मटलें, तर तेथील रीतीप्रमाणें पांच हजारांपा-सून पंचवीस हजार रूपयांपर्यंत लागतील. परंतु हेंही ध्यानांत ठे-विलें पाहिजे कीं भाड्यानें घेतलेलें सामान वापरतांना आपल्या हा-तून त्यांत कांहीं नुकसान झालें अथवा कांहीं बिघडलें, तर त्याबद्दल तितका पैसा द्यावा लागतो, आणि अंतीं तेंही महागच पडतें.

आह्मी क्याम्डन–टौन एथें एक घर सामानसुमानासुद्धां भा-ड्यानें घेतलें होतें. त्यांत एक दिवाणखाना होता, एक जेवणाची खोली होती, एक स्वयंपाकघर होतें, दोन मोठ्या निजावयाच्या आ-णि चार लहान खोल्या होत्या, आणि एक आंग धुण्याची खोली हो-ती. याशिवाय घराच्या मागेंपुढें फूलझाडें वगैरे लावण्यास जागा होती. घरामध्यें कोंचो, खुर्च्या, टेबलें, झुंमर, आरसे, कबाटें, गा-लिचे, वाद्यें, छप्परपलंग, गाद्या, पलंगपोस, पांघुरणें, बुर्णूस, हात पु-सावयाचे रूमाल, वगैरे सामान होतें. या अवघ्याचें भाडें दरमहा १२५ रूपये पडत असे. हल्लीं मुंबईंत एवढें रिकामें घर सुद्धां इतक्या भा-ड्यास मिळणें कठीण.

ज्याला जातिभेदाची अडचण नसून होईल तितक्या कमी ख-र्चानें राहावयाचें असेल, त्याणें कोणत्या एकाद्या कुटुंबांत राहावयाची तजवीज केली असतां त्यांत सोय पडेल. दर आठवड्यास अमुक एक द्यावयाचें असें ठरविलें, तर बसण्याउठण्यास व निजण्यास एक खोली देऊन घरांत जेवावयास घालणारीं अशीं संभावित कुटुंबें लं-

डन शहरांत जागोजाग सांपडतील. मध्यम रीतीनें खाऊन पिऊन राहावयाचें असलें तर राहण्याचा व खाण्यापिण्याचा खर्च दरमहा ६० रुपयांपेक्षां अधिक होणार नाहीं. एवढ्या खर्चानें मध्यम स्थितींतल्या गृहस्थाप्रमाणें राहतां येईल. अशा कुटुंबांत राहिलें असतां आपणास सुधारलेल्या लोकांच्या रीतिभातींची व चालींची माहिती होते. परंतु कोणत्याही कुटुंबांत राहावयास जाण्याच्या पूर्वी त्याच्या संभावितपणाविषयीं आणि चालचर्येविषयीं चांगल्या ठिकाणाहून खातरी करून घेतली पाहिजे.

फारच गरिबीच्या रीतीनें राहावयाचें असलें तर तसेंही करतां येतें. आपल्या इकडील गरीब प्रवासी लोकांकरितां "एशियाटिक होम" या नांवाची धर्मशाळा बांधली आहे. ही आपल्या एथल्या धर्मशाळांपेक्षां चांगली आहे. हींत उतरणारांसाठीं चांगली सोय केलेली आहे. जातिभेद पाळणाऱ्या हिंदूनें स्वयंपाक करण्यास निराळी जागा मागितली तरी ती मिळते. ह्यांत गैरसोय ती एवढीच कीं ही धर्मशाळा खलाशीमोहल्ल्यांत आहे, आणि त्या लगत्यास गरीब व हलके असे लोक राहतात. पूर्वेकडील खलाशी यांस बहुतकरून या धर्मशाळेचा उपयोग पडतो. हिजमध्यें राहण्याचा व खाण्यापिण्याचा खर्च ज्याच्या त्याच्या इच्छेप्रमाणें होतो. खर्च फार म्हटला म्हणजे दरमहा पंचवीस रुपये होतो, अधिक होत नाहीं. धर्मशाळेंतील लोक परदेशी असें जाणून तिजवर ठेवलेला कामदार त्यांस अगत्याचा व चांगला बुद्धिवाद सांगतो. कोणीएक गरीब बंगाली सकुटुंब या धर्मशाळेंत राहून, लंडनांत रस्त्यांवर लहान लहान पुस्तकें विकून निर्वाह करीत असे.

## २. लंडनाचा देखावा.

VIEW OF LONDON.

लंडन शहर दिसण्यांत पारिस शहराइतकें सुंदर नाहीं, तथापि कित्येक गोष्टींनीं याच्या सारिखा देखावा पारिसांत किंवा दुसऱ्या कोठेंच नाहीं. एथील घरें आणि रस्ते पारिसांतल्यापेक्षां दिसण्यांत कमी खरे, परंतु लोकांचा उद्योग, रहदारी आणि दाटी हीं पाहून आमची नजर चक्क झाली. असें सांगतात कीं असा उद्योग व अशी दाटी पृथ्वीवर दुसऱ्या कोठेंही नाहीं.

घरांवर धुरांड्यांचे तांबडे नळ चहूंकडेस पाख्यांतून बाहेर आलेले दृष्टीस पडतात. त्यांतून धूर निघत असतो. ह्या धूरांड्यांतून धूर निघतो तो सर्व शहरभर पसरतो. धुरामुळें घरांचा रंग बाहेरून काळसर मारतो. चहूंकडेस इतका धूर होतो कीं सगळा दिवस बाहेर फिरून संध्याकाळीं घरीं आलें आणि तोंड धुतलें तर हात काळसर दिसतात. पहिल्यानें मला असें आश्चर्य वाटलें कीं ही इतकी मस किंवा शाई माझ्या तोंडास कोणी लाविली. ज्या शहरांत इतका धूर त्याचा देखावा बाहेरून काळसर मारिल्यावांचून राहणारच नाहीं.

असें आहे, तथापि घरांची बांधणी व डौल आणि हारबंद दुकानांची रचना व शोभा कांहीं साधारण आहे असें नाहीं. हीं पाहून रस्त्यानें जाणाराचें मन खुश होऊन जातें. जनरथावर बाहेर बसून मोठ्या रस्त्यानें फिरावयास निघालें ह्मणजे लंडनाचा बाहेरचा देखावा दृष्टीस पडतो. लंडन-ब्रिजापासून वेस—वॉटरपर्यंत एक; वेस—वॉटरपासून पार्लमेन्टसभागृहापावेतों एक; आणि पार्लमेन्टसभागृहापासून रीजन्ट-स्त्रीटच्या नाक्यापर्यंत एक; असे तीन फेरे केले ह्मणजे लंडन शहराचा बाहेरील देखावा आणि शोभा संपूर्ण पाहण्यांत येते. तसेंच, टेम्स नदींत फिरणाऱ्या पुष्कळ आगबोटी

आहेत त्यांतून एकींत वसून लंडनांतील गोदीपासून बाटर्सी-ब्रि-जपावेतों एक फेरी मारिली ह्मणजे त्या शहरांतल्या कितीएक खाशा अतिसुंदर इमारतींचें बाह्य स्वरूप दृष्टीस पडतें आणि चित्तास बहुत आनंद होतो.

## ३. शहराची वस्ती आणि विस्तार.

EXTENT AND POPULATION.

लंडन शहराची वस्ती आणि विस्तार मोठा आहे. जागोजागीं मनुष्यांची मोठी दाटी दृष्टीस पडते, जणूं काय मोठी जत्राच भरली आहे. लंडन-ब्रिज आणि "ब्यांक-आव-इंग्लंड" यांजवळ माणसांची दाटी केवढी असते याचा सुमारच नाहीं. लंडन-ब्रिज या पुलावरून "सुमारें एक लक्ष दहा हजार मनुष्यें आणि वीस हजार गाड्या प्रतिदिनीं जात येत आहेत." एवढ्यावरूनच या दाटीचें अनुमान होईल. कित्येक ठिकाणीं इतकी दाटी असते कीं आपणास वाट करावयास बराच वेळ लागतो. निरनिराळ्या ठिकाणीं दाटी अधिकउणी असते, परंतु जावें तिकडेस दाटी आहेच. एकाद्या मोठाल्या बागांत, बिलोरी महालांत, एकाद्या संग्रहालयांत किंवा नाटकगृहांत गेलें असतां, जेथें जावें तेथें मोठी दाटी दृष्टीस पडते. लंडनांत एकंदर तीस लक्ष मनुष्यें आहेत असा अजमास आहे. ही संख्या प्रतिवर्षीं वृद्धिंगत होत चालली आहे. एवढी मोठी वस्ती पृष्ठभागावर दुसऱ्या कोणत्याही एका ठिकाणीं नाहीं.

ह्या मोठ्या शहरांतील वस्तीचें अनुमान करण्यास एवढेंच जाणणें पुरे आहे कीं "लंडनांत २४०० सरकारी सनदी डाक्तर आहेत; ३००० राहून अधिक वकील आहेत; बारिस्तर सुमारें ४००० आहेत; २९०० पोशाक विकणारे आहेत; १९०० गवळी आहेत; १९०० गांवठी शाळा आहेत; ४००० दारूचीं दुकानें आहेत;

२५०० किराणा माल विकणारे (केमिष्ट) आहेत; आणि सुमारें २६०० चाहा विकणारांचीं दुकानें आहेत."*

ह्या शहरांतील मोठ्या वस्तीप्रमाणेंच त्याचा विस्तारही मोठा आहे. उजू लांबच्या लांब चालत गेलें तर असें वाटतें कीं लंडनाचा शेवट येतच नाहीं. "लंडनाचें क्षेत्रफळ सुमारें १२० मैल आहे. त्यांत १०० पेक्षां अधिक पेंठा किंवा तुकड्या आहेत."† दक्षिणोत्तर किंवा पूर्वपश्चिम ह्या शेवटापासून त्या शेवटापर्यंत उजू सात मैल जावें तोंपर्यंत लंडन शहर संपत नाहीं. याचा विस्तार आणि वस्ती यांवरून हें मोठें प्रचंड शहर आहे असें आपल्या मनांत आल्यावांचून राहतच नाहीं. कित्येक ग्रंथकारांनीं या मोठ्या शहरास "MIGHTY LONDON" ह्मणजे "महाप्रचंड लंडन" असें ह्मटलें आहे तें यथायोग्य आहे.

## ४. रस्ते आणि चौक.

### STREETS AND THOROUGH-FARES.

कित्येक रस्ते व चौक पाहण्याजोगे आहेत. रस्ते फारकरून मोठे व फरसबंदी आहेत. गाड्याघोडे जाण्याचे रस्ते आहेत ते जाड विटांसारखे दगड कुडती बसवून चिरेबंदी बांधले आहेत. रस्त्याच्या दोनही बाजूंस पायीं चालणारांसाठीं मोठमोठ्या ताशींव लाद्या बसवून पायवाटा केल्या आहेत. त्यांवरून चालण्याची मोठी मौज आहे. हिंवाळ्यांत जेव्हां स्नो ह्मणजे बर्फ पडतें तेव्हां ह्या पायवाटांवरून जातांना कित्येकांचे पाय निसरतात. चालणारा नवा असला तर वेळीं पडूनही जातो. बारीक बारीक पाऊस इंग्लंडांत बारमास पडत असतो. त्यामुळें रस्त्यांत चिखल होतो तो काढून रस्ता साफ करण्याचीं ब्रशासारखी केरसुणी असते.

मोठ्या रस्त्यांशिवाय आणखी गल्या आणि बोळ इतके आहेत

* Murray's Hand-Book of London. † Renold's Guide.

कीं शहरांतून जातांना आपण गोंधळल्यावांचून राहणारच नाहीं. आपण अमुक रस्त्यानें अमुक आळींत किंवा बोळांत गेलों होतों किंवा नाहीं हें मुळींच समजत नाहीं, अशी कांहीं वेळपर्यंत आपली अवस्था होऊन जाते. लंडनाचे पाहिजे तितके नकाशे मिळतात. त्यांतून एक नकाशा घेऊन मुख्यमुख्य रस्ते प्रथम समजून घ्यावे. परंतु पुष्कळ दिवस लंडनांत राहिल्याशिवाय आणि चहूंकडे फिरल्याशिवाय, त्या शहरांतल्या गल्ल्या तर काय, परंतु मोठे रस्ते देखील ध्यानांत येणार नाहींत. लंडनांत मोठे रस्ते, गल्ल्या आणि बोळ मिळून एकंदर सुमारें १२०००० होतील. त्या शहरीं बहुतकाळ राहिलेला पुरुष अगोदर कधीं ज्या रस्त्यानें गेलेला नाहीं अशा रस्त्यानें जाईन ह्मणेल तर तो सुद्धां गोंधळल्यावांचून राहणार नाहीं.

कितीएक रस्ते फार लांबरुंद आहेत. कित्येक इतके रुंद आहेत कीं त्यांतून पांच पांच सहा सहा मोठमोठ्या गाड्या एकमेकीस लागल्याशिवाय एकदम जातात. याशिवाय पायीं चालणारांसाठीं दोन्ही बाजूंस आणखी पायमार्ग आहेतच. गल्लीबोळांतले रस्ते फारसे रुंद नाहींत; आणि कित्येक तर फारच अरुंद आहेत. सर्वांत मोठी आळी "रीजन्ट-स्ट्रीट" ही होय. ती सुमारें मैलभर लांब आहे. ह्या आळींतील रस्त्यावरचा देखावा फारच रमणीय आहे. ऑक्सफर्ड-स्ट्रीट आणि न्यूरोड या नांवांचे आणखी दोन मोठे रस्ते आहेत तेही फार मोठे व शोभायमान आहेत. यांपैकीं एक दीड मैल लांब आहे आणि दुसरा तीन मैल आहे.

कित्येक चौक फारच शोभिवंत आणि पाहण्यासारखे आहेत. चेरिंग-क्रॉस याजवळ ट्रफाल्गर स्केर ह्मणून एक चौक आहे तो फार सुशोभित व रमणीय आहे. ह्या चौकापाशीं संध्याकाळच्या वेळीं अंमळ उभें राहिलें असतां जीव अत्यंत खूश होऊन जातो. ह्या चौकाजवळ पु-

ष्कळ सुंदर सुंदर कारंजीं आहेत; कितीएक विख्यात पुरुषांचे सुंदर पुतळे आहेत. लॉर्ड नेल्सन याचा पुतळा १४५ फुटी उंच स्तंभावर बसविला आहे. कारंजाकडेस तोंड करून ह्या स्तंभापाशीं उभें राहिलें असतां, समोर न्याशनल ग्यालरी आणि सोसायटी-आव-आर्ट्स ज्यांत पुष्कळ सुंदर सुंदर मोलवान् चित्रांचा मोठा संग्रह केलेला आहे त्यांची इमारत दृष्टीस पडते. एकीकडेस हॉटेल आणि देऊळ दिसतें आणि दुसरीकडेस "क्लब-हौस" दिसतें. ह्या चौकाची जसी बाहेरून शोभा मारते तशी लंडनांत दुसऱ्या कोणत्याच ठिकाणाची मारीत नाहीं.

विलायतेंत कित्येक रस्त्यांवर आणि पुलांवर "टोल" म्हणजे जकात पडते. तेथें जकातदार असतो तो गाडी अटकावून एक दोन पेनी जकात घेतो. जनरथांच्या कंपन्या जकात घेणाऱ्या कंपन्याबरोबर जकातीबाबद कांहीं बंदोबस्त करून ठेवितात. ह्मणून त्यांच्या रथांस कोणी अटकाव करीत नाहीं. कित्येक ठिकाणीं पायीं जाणाऱ्यांस देखील कर द्यावा लागतो. सुधारलेल्या देशांत फिरण्यासवरण्यास अशा अडचणी असाव्या ही मोठी वाईट व आश्चर्यकारक गोष्ट आहे खरी, परंतु याचें कारण असें आहे कीं कोणी कंपनी कोणता एकादा रस्ता किंवा पूल बांधते त्यावर अमुक मुदतीपर्यंत जकात वसूल करण्याचा हक्क ती आपण सरकारापासून करार करून घेते.

जेथें गाड्याघोड्यांचा मार कमी तेथें रस्ते फरसबंदी नसतात. तसल्या ठिकाणीं आपल्या देशांतल्यासारखे साधे रस्ते असतात. कित्येक गल्ल्या फार अरुंद आहेत त्यांतून दोन जनरथ एकमेकास आपटल्यावांचून जाणें फार कठीण पडतें. अशा अरुंद गल्ल्यांमध्यें फारकरून गरीब कंगाल लोक राहतात. तेथील दुकानेंही तशींच भिकारी दिसतात.

## ९ गाड्याघोडे.

HORSES AND CONVEYANCES.

लंडनांत तेथल्या वस्तीप्रमाणेंच गाड्याघोडे पुष्कळ आहेत. तेथें आपल्या इकडल्यासारखे बैलांचे खटारे मुळींच नाहींत. मालाच्या गाड्यांस सुद्धां घोडेच जुंपतात. मालाच्या गाड्यांस कधींकाळीं गाढवें अथवा खेंचरें जोडतात, परंतु बैल कधीं जोडीत नाहींत. मनुष्यांच्या खांद्यावर पालकींत अथवा डोलींत बसून जाण्याची चाल त्या देशांत मुळींच नाहीं. त्याप्रमाणेंच मुंबईतल्यासारखे घाणेरडे निकामी बैलांचे रेकले व खटारीं एथें मुद्दल ठाऊक नाहींत.

लंडनांत गाड्याघोड्यांची रहदारी मोठी जबरदस्त आहे. मोठ्या रस्त्यांवर सर्व दिवस गाड्याघोड्यांचा फरफराट चाललाच असतो. दिवसभर त्यांचा घडघडाट होत असतो त्यामुळें आपले कानटाळे बसून जातात आणि आपणास त्रास येतो. सेन्टपॉलाच्या देवळावरून गाड्याघोड्यांचा आवाज ऐकिला तर जसा काय मोठा रहाटच चालला आहे असें वाटतें. खासगी व भाडोत्री गाड्या पुष्कळ फिरत असतात. भाडोत्री गाड्या देखील घरगुतीप्रमाणेंच चांगल्या असतात. त्यांचे घोडेही फार मोठे व वळकट असतात. माल नेण्याच्या गाड्यांस जे घोडे बांधावयाचे ते फार मोठे व वळकट असले पाहिजेत. त्यांपुढें आपले मुंबईतील भाडोत्री घोडे केवळ तुच्छ आहेत.

तेथील माल भरून नेण्याचीं गाडीं आपल्या देशांतल्या गाड्यांप्रमाणें निकामी नाहींत. कित्येक गाड्यांस कमाण असते आणि कित्येकांस नसते. गाड्यांत माल चापून भरले-



पिंपें भरण्याचें गाडें.



छापऱ्याचें गाडें.



कमाणीचें गाडें.

ला असला म्हणजे गाडीवाला खालीं उतरून गाडी हाकितो. शाकभाजी वगैरे हलका माल भरून नेण्याच्या गाड्या लहान असतात. गाड्यांवर छापरें असतें तें झांवळ्यांचें असत नाहीं तर जाड्या कितानाचें वगैरे असतें.

बसण्याच्या भाडोत्री गाड्यांमध्यें तीन प्रकार आहेत. एक ऑम्निबस म्हणजे जनरथ ज्यांत पुष्कळ माणसें बसतात; दुसरा ब्रूहम म्हणजे चार मनुष्यें बसण्याची गाडी; आणि तिसरा हान्सम अथवा फलाई म्हणजे दोनच मनुष्यें बसण्याची गाडी. जनरथ फार मोठे असतात. त्यांच्या आंत लोक बसतात आणि त्याप्रमाणेंच वर बाहेरही बसतात. अशा रीतीनें एकेका मोठाल्या जनरथांत ३६ मनुष्यें बसतात आणि लहानांत २८ बसतात.

आंत समरासमोर तोंडाकडेस तोंड करून आणि वर पाठीकडेस पाठ करून हारीनें इतकीं मनुष्यें बसलेलीं असून घोडे सगळे दोन किंवा चार बांधिले असतात. पुष्कळ लोक "ऑम्निबस" या शब्दांतील पहिलीं अक्षरें सोडून देऊन त्यास नुसतें "बस" ह्मणतात. ह्या "बसां"तून जाण्यायेण्यास लोकांस मोठें स्वस्थ आणि सोईवार पडतें. यांतून हजारो मनुष्य नित्य जातें येतें. मोठ्या रस्त्यांवरून दहा दहा

मिनिटांनीं किंवा पाव पाव तासानें जनरथ जातात येतात. हा जनरथ कोणकोणत्या रस्त्यांवरून जाणारा हें प्रत्येकावर लिहिलें असतें. तसेंच त्याचें शेवटचें मुकाम कोणतें म्हणजे तो कोठपर्यंत जावयाचा हेंही मोठाल्या अक्षरांनीं वर लिहिलें असतें. हें वाहन इतकें स्वस्थ पडतें, कीं लंडन शहराच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत गेलें तरीही सहा पेनी म्हणजे चार आण्यांहून अधिक भाडें पडत नाहीं.



ऑम्निबस अथवा जनरथ.

लंडन शहरांत एकंदर १५०० जनरथ फिरत आहेत. मुंबईंत आज १५ असले तर मोठें भाग्य, मग १५०० कोठून असणार? हे रथ लंडनांत सकाळचे आठ वाजल्यापासून रात्रीचे बारा वाजत तोंपर्यंत फिरत असतात. यांचे घोडे वारंवार बदलतात. हें काम चालवण्यास अनेक निरनिराळ्या मंडळ्या उपस्थित झाल्या आहेत. त्यांला चार सहा आणे तरी व्याज सुटत असेल असें मला वाटत नाहीं. परंतु त्या लोककल्याणार्थ हें काम चालवितात. आपणास जेथें जावयाचें तेथील जनरथ ओळखतां नयेईल तर, रथ हाकणाऱ्यास किंवा रथांत माणसें बसविणारा रथाच्या मागें उभा असतो त्यास आपणास कोठें जावयाचें त्या ठिकाणाचें नांव मात्र कळवावें ह्मणजे झालें. रथ त्या ठिकाणीं जावयाचा असला तर तो लागलाच उभा करून आपणास आंत बसवितो. रथ चालला असला तर तो उभा करण्यास ओरडण्याची गरज नाहीं. आपण हातानें किंवा बोटानें खूण केली ह्मणजे हाकणारा लागलाच रथ उभा करितो.

लोक चालत्या जनरथांत आणि बाहेर रथाची छत्री अथवा छापरें यावर झटाझट जाऊन बसतात तें पाहण्यासारखें आहे. रथाच्या छापऱ्यावर चढून बसावयास प्रथम थोडी भीति वाटते, परंतु दोनचार वेळां बसलें म्हणजे धीर येतो. पाऊस अथवा थंडी नसली तर बाहेर बसण्याची मोठी मौज आहे. स्त्रियांच्यानें आणि अशक्त पुरुषांच्यानें वर चढून बसवत नाहीं, ह्मणून आंत बसणें हें त्यांलाच योग्य असें समजतात. तथापि कोणा तरुण पुरुषाची आंत बसण्याची मर्जी असली तर त्याला कोणाच्यानें नको म्हणवणार नाहीं. आंतली सर्व जागा भरून गेली असली आणि कोणी स्त्री बसावयास आली, तर कोणी तरी पुरुष झटदिशीं आपणच उठून बाहेर जाऊन बसतो. याप्रमाणें ते लोक अबलांचा मान राखण्याविषयीं सर्वदां सिद्ध असतात.

जनरथांत कागद चिकटवून अनेक प्रकारच्या जाहिराती लाविलेल्या असतात त्यांजकडेस आंत बसणाऱ्याचें लक्ष जातें. "अमुक जिन्नस अमुक ठिकाणीं विकत मिळेल" अथवा "थोड्या खर्चानें घर बांधावयाचें असलें तर अमुक कंपनीकडेस जावें" वगैरे जाहिराती प्रत्येक जनरथांत लाविलेल्या असतात. जाहिराती देणारे आणि जनरथांची कंपनी यांचा ठराव झाला असतो त्याप्रमाणें ते कंपनीस पैसा देतात, आणि अशा रीतीनेंही कंपनीस प्राप्ति होते. रथांत बसणाऱ्या लोकांजवळून रथवाले भाडें घेण्यांत हुशारी दाखवितात ती अलौकिक आहे. जनरथांत चोविसांपासून छत्तिसांपर्यंत मनुष्यें असतात, त्यांपैकीं कोणतें कोणत्या ठिकाणीं बसलें हें ते बरोबर ध्यानांत ठेवितात, आणि त्याप्रमाणें तीं उतरतात तेव्हां एकेकाजवळून पैसा चुकावून घेतात.

स्वतः भाड्याची गाडी करावयाची असली तर एक ब्रूहमासारखी किंवा फ्लाई किंवा हान्सम नांवाची पाठीं बसून हाकावयाची असते ती केली तर सोईवर पडते. हान्सम गाडी हलकी असल्यामुळें फार त्वरेनें जाते. ह्या दोनही जातींच्या गाड्यांस साधारणतः "क्याब" म्हणतात. ह्या जागोजागीं मिळतात, आणि दर मैलास यांचें भाडें चार आणे पडतें. मुंबईच्या घाणेरड्या वग्यांचें भाडें देखील ह्या ब्रूहमाच्या अथवा हान्समाच्या इतकेंच पडून, पुनः गाडीवाल्याची तब्यत संभाळावी लागते. लंडनांतल्याइतका पैसा देऊन मुंबईंत लंडनांतल्याप्रमाणें चांगली गाडी मिळू नये ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. लंडनांत एकंदर सुमारें ९००० "क्याब" असतील. ते हरएक टिकाणीं पाहिजे तेथें जातात येतात.



हान्सम अथवा फ्लाई.



ब्रूहम.

श्रीमान्लोकांच्या गाड्या मोठ्या भवकेदार असतात. श्रीमान्लोक हैड-पार्कांत फिरावयास जातात, अथवा त्यांच्या स्त्रिया रीजन्ट-स्त्रीट वगैरे रस्त्यांवर दुकानांत कांहीं खरेदी करावयास जातात, अथवा ते लोक रात्रीस ऑपेरा किंवा



फेटन.



डॉककार्ट.

नाटकें पाहावयास जातात, तेव्हां त्यां-च्या गाड्यांची मौ-ज खचित पाह-ण्यासारखी असते. मुंबईतल्यासारख्या बग्या आणि शिग्रामी मुळींच दृष्टीस पडत नाहींत. दोन किंवा चार घोड्यांचे मोठे ब्रूहम अथवा फेटन हे मुख्यत्वेंकरू-न तेथील श्रीमान्लोक वापरतात.

मोठ्या संपत्तिवानाशिवाय दुसरे कोणी बहुतकरून स्वताची गा-डी ठेवीत नाहींत. आपण ज्यांला लाख दोन लाख रूपयांच्या अ-सामी समजतों अथवा ज्यांचें दरमहा हजार बाराशें रूपयांचें उत्पन्न आहे, ते देखील फारकरून घरची गाडी ठेवीत नाहींत. कार-ण गाडी बाळगण्यास खर्च मनस्वी लागतो. एका गाडीघोड्याचा खर्च सालिना १८०० पासून २२०० रूपयांपर्यंत होतो. नुसता घोडा बाळगण्यासच वर्षास एक हजार रूपये लागतात. अशा मोठ्या खर्चामुळें मध्यम प्रतीचे मोठमोठे लोक देखील घरची गाडी बाळ-गीत नाहींत. परंतु भाडोत्री गाड्यांवर सर्व प्रकारें त्यांचा निर्वाह होतो.

मुंबईंत दोनशें अडीचशें रूपये दरमहा मिळविणाऱ्यांस आणि वी-स पंचवीस हजारांच्या असामींस घरची गाडी ठेवावी लागते. याचें कारण हें कीं भाडोत्री गाड्यांवर त्यांचा निर्वाह होत नाहीं. त्यांस आपल्या कुटुंबांतील माणसें तीन तीन चार चार दिवसांनीं कोठें बा-हेर पाठवावयाचीं असलीं आणि घरची गाडी नसली तर, त्यांणीं बैलांची गाडी करावी किंवा तीन चार रूपये खर्चून भाड्याचा शिग्राम क-रावा, यावांचून त्यांस आपल्या योग्यतेनुसार दुसरी गाडी मिळत नाहीं. दुसरें असें कीं ते आपल्या कामकाजाच्या ठिकाणाहून दीडदोन मै-

लांपेक्षां जरा दूर राहत असले तर घाणेरडी बगी सुद्धां पाहिजे तेव्हां मि-ळणें कठीण पडतें. विलायतेंत अशी अडचण मुळींच पडत नाहीं. तेथें आपण सात मैलांच्या अंतरावर राहत असलें तरीही भाडोत्री गाडी सहज मिळते, आणि ती घरच्या गाडीसारखी असते.

विलायतेंत एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाणेंयेणें बहुत सुलभ आणि सुखाचें आहे. ज्याला पाहिजे त्याणें "क्याब"मध्यें ब-सावें किंवा जनरथांत बसावें. याशिवाय शहरांत कित्येक ठिकांणीं आगगाडी जातयेत असते. ही आगगाडी कित्येक ठिकांणीं जमि-नीवरून जाते आणि कित्येक ठिकांणीं जमिनीखालून विवरांतून जाते. प्रत्येक ष्टेशनावरून पावपाव तासानें अग्निरथ जातो. एक गाडी चु-कली तर दहापंधरा मिनिटांनीं दुसरी तयार आहेच. विवरांतून अग्निरथ चालतो त्यास "अन्डरग्रौन्ड-रेलवे" असें ह्मणतात. वर र-स्ते, घरें, माणसें असतात, आणि खालीं "टनल" ह्मणजे बोगद्या-सारखें विवर खणून त्यांत लोखंडी सडक बांधलेली असते. त्यांत स-र्वदां अंधार असतो ह्मणून दिवसास देखील गाडींत ग्यासाचे दिवे लाविले असतात. मी पांचसात वेळां ह्या "अन्डरग्रौन्ड-रेलवेवरील" अग्निरथांत बसलों आहें.

याशिवाय नदींत लहान लहान आगबोटी दिवसभर फिरत अस-तात, त्या एक पेनी दिली म्हणजे आपणास एका ठिकाणाहून दु-सऱ्या ठिकाणीं घेऊन जातात. याजकरितां लंडन शहरांत एका जागेहून दुसऱ्या जागीं जाण्याचें सुख असून तें काम फार सुलभ आहे. आपणास पाहिजे तर आपण क्याबमधून जावें, नाहीं तर जनरथांतून जावें. आगगाडीचें चक्र जवळ असलें तर अग्निरथांत बसून जावें, आणि नदींतील आगबोट जवळ पडत असली तर आ-गबोटींत बसून जावें. एक जनरथ, अग्निरथ किंवा आगबोट चुक-

ली, तर दहाबारा मिनिटांत दुसरी तयार आहेच; आणि जरूर व त्वरितच जावयाचें असलें तर क्याब उभा आहेच.

## ६. दुकानें आणि बाजार.

SHOPS AND MARKETS.

लंडनाचा बाहेरचा देखावा सुंदर दुकानांनीं फार सुशोभित आहे. या दुकानांची शोभा आणि भबका नीट पाहावयाचा असला, तर गाडींत बसण्यापेक्षां पायीं चालत जावें हें चांगलें. मोठमोठ्या आळींत एका नाक्यापासून दुसऱ्या नाक्यापर्यंत सुंदर चकचकीत दुकानांच्या रांगा लागल्या असतात. दुकानांत जिन्नस अशा रीतीनें मांडले असतात कीं त्यांवर आपलें मन गेल्यावांचून राहूंच नये. कितीही पाहात पाहात फिरत गेलें तरी मनाची तृप्ति होतच नाहीं. दुकानांतील सामानसुमान व शृंगार पाहून, आपणास चालतां चालतां श्रम होण्याबद्दल, संतोष आणि आनंद होतो.

विलायतेंत दुकानदारांची गिऱ्हायकी बहुधा रात्रीस अधिक असते. म्हणून सर्व दुकानदारलोक आपापल्या दुकानांत नित्य ग्यासाच्या दिव्यांचा मोठा उजेड करून ठेवितात. तेणेंकरून त्यांचीं दुकानें खूब शोभतात, आणि जसा कांहीं दिवाळीचाच सण आहे असा नित्य रात्रीस दीपप्रदर्शनाचा मोठा लकलकाट होऊन जातो. यास्तव लंडन शहरांतील दुकानांची मौज पाहावयाची असली तर रात्रीस फिरावयास निघावें. पारिसांतील दुकानें आणि लंडनांतील दुकानें यांची तुलना करितां, लंडनांतील दुकानें निरस खरीं, तथापि तीं आपल्याइकडील मनुष्यांस बहुत सुंदर वाटल्यावांचून राहणार नाहींत.

दुकानदारांचीं नांवें सोनेरी अक्षरांनीं पाऱ्यांवर लिहून पाऱ्या दुकानांबाहेर मारल्या असतात. त्यांबरोबर आणखी दुकानावर कोणत्या जातीचा माल विकतो याचेंही चिन्ह दाखवलें असतें. कि-



केस कापणाऱ्याच्या व उगवणाऱ्याच्या दुकानाची निशाणी.

त्येक दुकानांवर चस्मे टांगले असतात त्यावरून समजावें कीं एथें चस्मे, दुर्बिणी, आरशा वगैरे पाहण्याचें काचकाम विकतात. कित्येक दुकानांच्या तोंडावर लहान कोंकरूं लोंबत असतें त्यावरून हें दुकान उबेचीं वस्त्रें विकण्याचें आहे असें समजावें. कित्येक दुकानापुढें छत्री टांगली असते त्यावरून हें छत्र्यांचें दुकान आहे असें कळतें. कित्येक दुकानांवर चिनई मनुष्य चहा तोलून विकीत आहे असें चित्र काढलें असतें, त्यावरून हें गांध्याचें किंवा चहा विकणाराचें दुकान आहे असें जाणावें. कित्येक दुकानांवर बूट




गांध्याच्या दुकानाची निशाणी.

(इंग्रजी जोडा) टांगला असतो, त्यावरून हें दुकान जोड्यांचें आहे असें कळतें. याप्रमाणें बाहेर करून ठेविलेल्या खुणेवरून दुकान ओळखतां येतें. अशा निशाण्या करून ठेवण्याचा मुख्य उद्देश हा कीं रस्त्यानें जाणाऱ्यायेणाऱ्याचें लक्ष दुकानाकडेस जावें.

जवाहिराचीं, घड्याळांचीं, धातुपारख्यांचीं, सोनेरीरूपेरी मुलाम्याच्या सामानाची, काफीचीं, दारूचीं, हीं सर्व दुकानें रात्रीस फारच शोभतात. कापडवाल्यांचीं आणि किराणा जिन्नस विकणाऱ्यांचीं दुकानें यांचा भवका तरी कांहीं उणा असतो असें नाहीं. शिंप्यांचीं आणि नहाऱ्यांची दुकानें यांचा डौल देखील कांहीं कमी नाहीं. हीं आणि इतर सर्व दुकानें रात्रीस फारच खुलतात आणि बहार करून देतात. आपल्याइकडील कापडाचीं आणि किराण्या जिन्नसाचीं दुकानें यांची तुलना या दुकानावरोबर मुळींच होणार नाहीं. गाढव आणि घोडा यांमध्यें जें अंतर त्याहूनही अधिक अंतर या दोहोंमध्यें आहे असें समजावें. एथील साधारण खाणावळींस "ईटिंग-हौस" ह्मणतात. फ्रान्स देशांत जशीं "रेस्तोरीं" तशीं इग्लंडांत हीं "ईटिंग-हौसें." ह्या साधारण खाणावळी देखील फार स्वछ आणि दिसण्यांत चांगल्या असतात. रस्त्यानें येणारे जाणारे लोक पाहिजे तेव्हां ह्या दुकानांत जाऊन जेवून येतात. शाकभाजी विकणाऱ्यांच्या अथवा खाटक्यांच्या दुकानांची सफाई पाहून आपणास अचंबा वाटेल. हीं दुकानें सुद्धां सुंदर सुशोभित दिसतात, त्यापेक्षां इतर कशीं दिसत असतील याची वाचकांनींच कल्पना करावी.



जेवायाला जाण्याचें साधारण दुकान.

सारांश, दुकानांची रचना आणि शोभा यांत विलायतेंतील लोक

तिळमात्र कसर किंवा उणें करीत नाहींत. प्रत्येक दुकानदार असेंच समजतो कीं माझ्या दुकानांची शोभा आणि डौल असेल त्याप्रमाणें माझ्या एथें गिऱ्हाइकें येतील. असें समजून प्रत्येकजण आपापल्या दुकानाची शोभा वाढविण्याविषयीं बहुत श्रम घेतो. दुकानांतील शृंगार आणि त्यांत मांडून ठेविलेलें सामान बाहेरून जाणाऱ्यायेणाऱ्याच्या दृष्टीस नीट पडावें म्हणून विलोरी काचेचीं मोठमोठीं तावदानें बसविलीं असतात. दुकान लहान असलें तरी त्यांत तोंड पाहावयाचा आरसा अशा रीतीनें टांगला असतो आणि सामानसुमान अशाप्रकारें मांडून ठेविलें असतें कीं रस्त्यानें जाणारास हें मोठें दुकान आहे असेंच वाटावें.

लंडन शहर मुख्यत्वेंकरून दुकानांची रचना व सौंदर्य यांच्या योगानें सुशोभित आहे. दुकानाची रचना आणि शोभा नसली, तर ह्या मोठ्या नगराचा बाहेरील मोठा डौल आणि भव्य देखावा ह्यांतून रुपयाचे दहा किंवा बारा आणे शोभा कमी झाली असें होईल. विकण्याच्या जिन्नसा नीट मांडण्यांत आणि काचीचीं तावदानें व दरवाजे घांसून साफ करण्यांत दुकानदारांचा पुष्कळ वेळ जातो.

दुकानदारलोक आपला माल खपावा ह्मणून अनेक युक्ति करितात. ते अस्क्यांत चांगला माल असेल त्याचा नमुना दुकानांत पुढें ठेवितात. दरवाज्याची काच इतकी स्वच्छ असते कीं आपणास आंत गेल्यावांचून बाहेरूनच आंतलें सर्व चांगल्या रीतीनें दिसतें. जवाहिरीलोक देखील आपलें जवाहीर रस्त्यानें जाणारास दिसावें अशा रीतीनें उघडें ठेवितात. दरवाज्यावर जाड काचीचीं तावदानें बसविलीं असतात त्यामुळें दुकानांतील पदार्थांवर केर पडण्याची अथवा ते कोणी घेऊन जाईल अशी तिळमात्र भीति नसते.

कित्येक दुकानदार आपल्या दुकानांवर पाटी अथवा (पितळेचा

लांब पत्रा) मारून त्यावर असें लिहितात कीं एथें माल सर्वांत स्वस्थ मिळतो. कित्येक असें लिहितात कीं माल जाईल त्या किंमतीनें विकावयाचा. कित्येक असें लिहितात कीं दुकान काढून टाकावयाचें आहे याजकरितां एथें माल मातीच्या मोलानें विकला जाईल. ह्या सर्व माल खपविण्याच्या युक्ति आहेत. याजकरितां त्यांस भुलून कोणीही एतद्देशीय प्रवाशानें फसूं नये. प्रतिष्ठित दुकानदाराच्या दुकानीं ठकवण्याचें भय मुळींच नाहीं; आणि अशा प्रतीचे दुकानदार पुष्कळ सांपडतील.

लंडनांत पुष्कळ मोठमोठे बाजार भरत असतात. फुलें, फळें आणि शाकभाज्या यांचा एक फारच मोठा बाजार भरत असतो. तो कोवेन्ट–गार्डन या नांवेंकरून प्रसिद्ध आहे. या बाजारांत दररोज सकाळीं दाटी किती असते याचा कांहीं सुमारच नाहीं. एथें फुलें, फळें, शाकभाज्या किती विकतात याचाही कांहीं पार नाहीं. या पदार्थांशिवाय दुसरें कांहींच या ठिकाणीं विकीत नाहींत. एथें फुलें, फळें आणि शाकभाज्या यांचीं इतकीं गाडीं नित्य भरून येतात कीं तीं पाहून कोणासही अचंबा वाटेल. ह्या बाजाराची पुरी मौज पहावयाची असली तर मंगळवार, बृहस्पतवार अथवा शनवार या दिवशीं पहाटेचे तीन वाजल्यापासून सात वाजतपर्यंत बघायाला जावें. एथें फुलें फळें, वगैरे जिनसांच्या गाड्यांवर गाड्या येऊन पडतात त्याच पाहून आपल्या जाण्याचें सार्थक झालेसें वाटेल. नुसती फुलांची मांडणी आणि सुगंध यांचीच मौज पाहावयाची असली तर दिवसास कोणत्याही वेळीं जावें.

यांशिवाय दुसरेही बाजार निरनिराळ्या ठिकाणीं भरतात. लेड्न-हॉल–मार्किट आणि फारिंग्टन–मार्किट नामक बाजार भरतात त्यांमध्यें शाकभाज्या आणि मांस दोनही विकतात. परंतु लोकांस

सोई पडावी ह्मणून फुलें, फळें, शाकभाज्या यांचीं आणि मांसाचीं दु-
कानें जागोजागीं आणि रस्तोरस्तीं निरनिराळीं आहेत, ह्मणून नि-
त्याच्या खर्चाचे जिन्नस घेण्यास बाजारांतच जावें लागतें असें नाहीं.
ज्या मनुष्याबरोबर आपण उक्काडा बांधला असेल तो बहुतकरून
ते जिन्नस नित्य आपल्या घरीं आणून पोंचते करतो.

ज्याप्रमाणें शाकभाज्या वगैरेचा एक बाजार निराळाच आहे
त्याप्रमाणेंच दाण्यादुण्याचाही एक मोठा सुंदर बाजार आहे. या
प्रमाणेंच आणखी मांस विकण्याचा एक व मासळी विकण्याचा ए-
क असेही निरनिराळे बाजार आहेत. मांस विकण्याचा थोरला बा-
जार पाटर—नॉस्तर नांवाच्या रस्त्यावर आहे आणि मासळीबाजार
लंडन—ब्रिज याजवळ आहे. मांसबाजारास न्यूगेट—मार्किट असें ह्म-
णतात. ह्या बाजारांत बकरीं मारण्याची रीत फारच वाईट आहे.
असें सांगतात कीं बकरीं वरून खालीं भुयारांत फेकून देतात, तेणें-
करून त्यांचे हातपाय मोडतात, आणि नंतर तीं कापतात. ही
गोष्ट खरी असली तर लंडन शहराच्या किर्तीस अशा क्रूरपणानें ख-
चित मोठा कलंक लागतो. मासळीबाजारास बिलिंग-गेट-मार्कि-
ट ह्मणतात. हा बाजार फार मोठा असून चांगला बांधलेला आ-
हे. यांत वाईट हवा जमली तर काढून टाकून नवी स्वच्छ हवा
आंत आणण्याचें यंत्र व एका तासांत ७७००० ग्यालन पाणी नदीं-
तून वर चढे अशी तजवीज केली आहे ती आपल्या पाहण्यांत येते.

जिवंत बकरीं आणि गुरेंढोरें विकण्याचा बाजार फार मोठा आ-
णि प्रसिद्ध आहे. ह्या बाजाराचें नांव मेत्रापॅालिटन—क्याट्‌ल—मा-
र्किट असें आहे. हा बाजार इतका मोठा आहे कीं त्याणें तीस ए-
कर जमीन आटोपली आहे. एथें दररोज लोकांची मोठी दाटी अ-
सते, आणि दर आठवड्यास ३००० बकरीं आणि तीन हजार गुरें

विकलीं जातात. ह्या बाजारामध्यें एक घड्याळाचा खांब तारह-पिसांतून उभा केलेला दिसतो. येणेंकरून बाजारास मोठी शोभा आली आहे. हा बाजार क्याम्‌डन--टौन नामक पेंठेंत आहे. हें ठिकाण आमच्या बिऱ्हाडाहून जवळच होतें.

वर बाजार सांगितले यांस तेथील लोक मार्किट ह्मणतात. परंतु ते लोक ज्यांला बाजार (Bazzar) ह्मणतात ते निराळ्याच तऱ्हेचे असतात. अशा बाजारांत नानाप्रकारच्या उंचा जिन्नसा विकत मिळतात. अशा प्रकारचीं दुकानें रस्त्यावर दृष्टीस पडत नाहींत. असले बाजार मोठमोठाल्या इमारतींत भरत असतात. कित्येक बाजारांस आर्केड असेंही नांव आहे. ऑक्सफर्ड-स्ट्रीटमध्यें "पान्थियन" नांवाचा एक मोठा प्रसिद्ध बाजार आहे. ह्या बाजाराच्या इमारतींत गेल्यावर शेंकडो लहान लहान दुकानें मांडलेली दृष्टीस पडतात. प्रत्येक दुकानावर एक तरणी बायको जिन्नस विकायास उभी किंवा बसलेली असते. आपलें मन कांहीं तरी वस्तु घेण्याविषयीं व्हावेंच अशा रीतीनें प्रत्येक दुकानदारीण कांहीं वस्तु आपल्या दृष्टिस पाडते. या बाजारांत सर्व प्रकारचा माल आणि सामानसुमान विकत मिळतें. जडावकाम, वस्त्रें, तऱ्हतऱ्हांचीं चित्रें, खेळ, नाना प्रकारच्या रागांवर वाजविण्याचीं वाद्यें, चाकू, कातऱ्या वगैरे सामान या ठिकाणीं मिळतें. खालीं एकीकडेस फूलझाडांच्या व रोपाच्या कुंड्या, आणि दुसरीकडेस सुंदर सुंदर जिवंत पक्षी, वानर, सोनेरी पंखांचे मासे, पांढरे उंदीर वगैरे विकतात.

सोहा नांवाचा आणखी एक बाजार दुसऱ्या एका ठिकाणीं आहे. तोही मोठा आणि प्रसिद्ध आहे. तेथें चारशें बायका दुकानें मांडून बसलेल्या अथवा उभ्या पाहण्यांत येतात. यांत चार चार फुटी लांब अशीं दुकानें आहेत. त्या एकेकाचें भाडें दर दिवसास दोन

रुपये पडतें (हें भाडें स्वस्थ समजतात). मडमठूसा, बर्लिंग्टन-आर्केड व लोथर-आर्केड वगैरे आणखी बाजार निरनिराळ्या ठिकाणीं आहेत. मडमठूसा बाजारांत प्रतिवर्षीं ख्रिस्तमस ह्मणजे नाताळाला पाळींव गुरेंढोरें आणि शेतकीचीं आवतें यांचें प्रदर्शन होतें, व तीं विकण्यांतही येतात. बर्लिंग्टन-आर्केड या बाजारांत बहुतकरून युरोप खंडांतील परदेशस्थ लोक नानाप्रकाचें सामान आणून विकतात.

### ७. वर्तमानपत्रें आणि जाहिराती.

NEWS-PAPERS AND PLACARDS.

लंडनांत रस्तोरस्तीं आणि गल्लोगलीं वर्त्तमानपत्रें आणि जाहिरातींच्या चिन्ह्या पाहण्यांत येतात. लहानलहान मुलगे वर्तमानपत्रांचे भारेचाभारे घेऊन रस्त्यांनीं फिरत असतात. ते मोठमोठ्या चवाऱ्यांवर अथवा प्रसिद्ध ठिकाणीं उभे राहून, गाडींतून जाणाऱ्यांस आणि पायीं चालणाऱ्यांस रोख पैसा घेऊन फुटकळ प्रती विकतात.

वर्तमानपत्रें विकण्याची एथील रीत मुंबईतील रीतीहून भिन्न आहे. एथें वर्तमानपत्रांचे मालक आपण पत्रें विकीत नाहींत, आणि विकण्यास आपलीं मनुष्येंही पाठवीत नाहींत. कितीएक उदमी लोक वर्तमानपत्रांच्या ठरविलेल्या किंमतींतून कांहीं टके वजा करून आपण घाऊक वर्तमानपत्रें एकदम खरेदी करितात, आणि नंतर आपापल्या लगत्याच्या नेहमीच्या गिऱ्हाइकांस अथवा फुटकळ घेणारांस विकतात. येणेंकरून ह्या उदमी लोकांस नफा होऊन वर्तमानपत्रांच्या मालकांस फार सोपें व सोईवार पडतें. त्यांला पत्र छापावें मात्र लागतें, तें विकण्याची आणि पैसा वसूल करण्याची मेहनत व खटाटोप मुळींच पडत नाहीं.

एथें पुष्कळ वर्तमानपत्रें निघतात, त्या सर्वांची नांवनिशी एथें लिहिण्याचें कांहीं कारण नाहीं. टैम्स या वर्तमानपत्राचा फारच प्रसार

व उत्कर्ष झाला आहे. हेंच सर्वांत वजनदार पत्र धरिलें आहे. याच्या ६०००० प्रती नित्य छापतात. हें दिवसांतून दोनदां निघतें. सकाळीं मजकूर छापला असतो तोच संध्याकाळीं पुनः छापतात, परंतु कांहीं नवीन ताजें वर्तमान समजलें असल्यास, कमी अगत्याचा मजकूर काढून टाकून तें घालतात. सकाळच्या प्रतींचीं गिऱ्हाइकें असतात तीं सकाळचें पत्र घेतात, आणि संध्याकाळच्या प्रतींचीं असतात तीं संध्याकाळचें घेतात. कितीएक लोक दुहेरी खर्च करून सकाळसंध्याकाळ दुवेळीं पत्र घेतात. हें आणि डेलि-न्यूज, टेलिग्राफ, मॉर्निंग-हेरल्ड, मॉर्निंग-स्तार, ईव्हनिंग-स्तार, ईव्हनिंग-स्तांदर्द इत्यादि पत्रें दररोज निघतात.

ह्या सर्व पत्रांचा नित्य पुष्कळ खप होतो. एकेकाची किंमत बहुतकरून एकापासून चार पेन्सपर्यंत असते. इलस्त्रेतेद-लंडन-न्यूज हें पत्र प्रति शनिवारीं निघतें, आणि याच्या दोन लक्ष प्रती खपतात. इलस्त्रेतेद-न्यूज-आव-धी-वर्ल्ड व इलस्त्रेतेद-टैम्स हीं पत्रें दर आठवड्यास निघतात. यांच्या पन्नास पन्नास हजार प्रती खपतात. हीं तीनही पत्रें दर खेपेस अनेक चित्रांसहित निघतात. पंच ह्मणजे थट्टा करण्याचें पत्र निघतें त्यांत राज्यकारणी पुरुषांचीं व कामदार लोकांचीं चित्रविचित्र चित्रें काढून त्यांच्या पक्षपातीपणाच्या वगैरे अयोग्य कामाविषयीं त्यांची थट्टा केली असते. त्यांत लोकांच्या कितीएक वाईट चालींचाही चित्रें काढून उपहास करण्यांत येतो.

वर्तमानपत्रांत अनेक प्रकारच्या जाहिराती छापतात. निरनिराळ्या उदमी आणि व्यापारी लोकांस आपापल्या कामासंबंधी जाहिराती छापविण्यांत मोठा फायदा आहे. कोणास कांहीं जिन्नस पाहिजे असला अथवा कांहीं चीज विकावयाची असली, कांहीं भाड्यानें द्यावयाचें असलें किंवा कोणाचें कांहीं सांडलें असलें, अथवा को-

णाला चाकरी किंवा चाकर पाहिजे असला, तर पैसा देऊन वर्तमानपत्रांत त्याबाबद जाहिरात देण्याची चाल एथें फार आहे. कितीएक उद्यमी लोक जाहिराती देण्यांत हजारो रुपये खर्च करितात. हालोवेची जाहिरात तर पृथ्वीच्या चारही खंडांत छापून प्रसिद्ध होते, आणि ती छापविण्यांत सहस्रावधि रुपयांचा खर्च होतो, हें सर्वांस विदित असेलच; परंतु विलायतेंत हालोवेसारखे पुष्कळ आहेत; आणि तेही त्याप्रमाणेंच जाहिरातींकडे बहुत खर्च करण्यास मागें सरत नाहींत.

याशिवाय कित्येक लोक जाहिराती मोठाल्या अक्षरांनीं छापून तो कागद पाटीवर चिकटवून जागोजागीं आणि रस्तोरस्तीं दिवसभर फिरवितात. अशा रीतीनें जाहिराती फिरविणारे मनुष्य पाट्या वर उचलून अथवा गळ्यांत घालून रस्त्यानें हिंडत असतात. याप्रमाणें जागोजाग जाहिरखबरांच्या पाट्या फिरविल्यानें व्यापारी लोकांस मोठा लाभ होतो.




जाहिरखबर फिरवणारा.

कितीएक जाहिराती मोठ्या भवकेदार रंगीत अक्षरांनीं चित्रांसहित छापल्या असतात. कसेंही करून लोकांचें लक्ष आपल्या जाहिरातीकडे जावें आणि लोकांनीं ती वाचावी अशा हेतूनें त्या भवकेदार करितात. अशा जाहिराती आगगाडीच्या ष्टेशनावर




जाहीरखबर फिरवणारा.

आणि जनरथांत लावल्या असतात इतकेंच नाहीं, तर बिलोरी महालासारख्या करमणुकीच्या व मौजेच्या ठिकाणींही त्या पाहण्यांत येतात. लहान लहान दुकानदार आणि उदमी लोकच याप्रमाणें जाहिराती प्रसिद्ध करितात असें नाहीं, तर मोठमोठे कारखानदार आणि कंपन्यांचे डरेक्टर ह्मणजे व्यवस्थापक सुद्धां अशा रीतीनें जाहिरातींची प्रसिद्धि करितात.

हे लोक कितीएक साधारण गोष्टींविषयीं देखील जाहिराती देतात. त्यांच्या कितीएक जाहिराती अशा असतात कीं त्या पाहून आपणास हंसें आल्यावांचून राहणार नाहीं. कोणा स्त्रीच्या अथवा पुरुषाच्या मनांत लग्न करावयाचें असलें, तर माझें वय अमुक असून स्वरूप अशा प्रकारचें आहे आणि माझी जिनगी इतकी आहे, तर कोणास मजबरोबर लग्न कर्तव्य असल्यास स्वकीय वृत्त पत्रद्वारें कळवावें, अशी जाहिरात देतात. तेथील पत्रांत अशा अनेक प्रकारच्या जाहिराती वाचून आपणास आश्चर्य वाटल्यावांचून राहत नाहीं.

## ८. उपवनें आणि सार्वजनिक बाग.

PARKS AND PUBLIC GARDENS.

अशा मोठ्या शहरांतील लोकांच्या सुखासाठीं सर्व प्रकारचीं साधनें केलीं आहेत, त्यांमध्यें हिंडून फिरून सुख घेण्याचीही तजवीज असलीच पाहिजे. शहराच्या निरनिराळ्या भागांत झाडेंझुडें लावून मोठमोठीं उपवनें केलीं आहेत. उपवन ह्मणजे लहानसें वन अथवा मोठा बाग. यांस तेथील लोक "पार्क" ह्मणतात. असे सर्व सात पार्क असून त्यांणीं एकंदर सुमारें सोळाशें पन्नास एकर जमीन आटोपली आहे. सर्वांत मोठें उपवन ४७२ एकर आहे, व सर्वांत लहान साठ एकर आहे. या उपवनांखेरीज आणखी सरकारी बाग आहेत, तेथेंही लोकांस विहार करण्याची मोकळीक आहे.

सर्वांत मोठें उपवन रीजंट्स-पार्क हें होय. याचें क्षेत्रफळ ४७२ एकर आहे. ह्यांत व इतर उपवनांत झाडांझुडांची रचना अशा रीतीनें केली आहे कीं त्यांत फिरल्यानें चित्तास आनंद होतो. यांत पायीं फिरण्यास आणि गाडींत बसून विहार करण्यास फार चांगले रस्ते केलेले आहेत. ह्या उपवनांतील कांहीं जागा दुसऱ्या कामास लाविली आहे. एका बाजूस "झुआलॉजिकल गार्डन्स" ह्मणजे प्राणिसंग्रहालय आहे. त्यांत सर्व जातींच्या जिवंत पशुपक्ष्यांचा संग्रह केला आहे. दुसऱ्या बाजूस "बोटानिकल गार्डन्स" ह्मणजे वनस्पतींचा बाग आहे. त्यांत सर्व जातींचीं झाडेंझुडें लावलेलीं आहेत. "बोटानिकल गार्डन्स" यांच्या सभोंवार वर्तुलाकृति रस्ता विहार करण्यास बांधला आहे. ह्या उपवनांत कितीएक जागीं झाडांच्या ओळी आहेत त्यांच्या जवळून फिरल्यानें जिवास समाधान होतें. ह्या उपवनासभोंवार रस्ता बांधला आहे तो दोन मैल आहे. दररोज सकाळसंध्याकाळ सहस्त्रावधि लोक या उपवनांत विहार करण्यास जातात.

"हैडपार्क" नामक उपवनांत श्रीमंत आदिकरून मोठे लोक हिंडावयास व व्यायाम करावयास जातात. यामुळें त्याचा डौल व शोभा विशेष आहे. याचा विस्तार ३८८एकर आहे. हें उपवन सुंदर लोखंडी जाळीमुळें व मोठ्या डौलदार दरवाज्यामुळें फारच शोभतें. मे महिन्यापासून आगस्त महिन्यापर्यंत वर्षांतून चार महिने हे ह्या उपवनांत फिरण्यासवरण्याचे दिवस धरले आहेत. इंग्लंड देशांतील श्रीमान लोक सकाळचे अकरा वाजल्यापासून दोन वाजत तोंपर्यंत आणि संध्याकाळीं साडेपांच वाजल्यापासून सात वाजत तोंपर्यंत सकुटुंब सपरिवार फिरावयास निघतात.

भाडोत्री गाड्यांस या उपवनांत जाण्याची परवानगी नाहीं. कोणी पायीं चालत जातात; कोणी स्वताच्या गाड्यांत बसून जातात, आणि कोणी घोड्यांवर बसून जातात. एथें वाद्यें वाजत असतात ते समयीं कधींकधीं लोकांचा एवढा समुदाय जमतो कीं फक्त घोड्यांवर बसून आलेलेच ७०० असामी होतात. ऐथें एक लहानशी कृत्रिमानें केलेली सर्पाकृति नदी वाहत असते. एका ठिकाणीं मध्येंच झाडें वर्तुळाकार लावलीं आहेत. एथें जूनजुलई महिन्यांत लश्कराची कवाईत होते ती पाहण्यासारखी असते. संगमरवरी दगडांचा दरवाजा पूर्वीं राणी साहेबांच्या महालांत होता, तो आणून ह्या उपवनांत "कंबर्लंड-स्ट्रीट" जवळ घातला आहे. ह्या दरवाज्याची किंमत आठ लक्ष रुपये असून, तो बसविण्यास एक लक्ष रुपयांहून अधिक खर्च झाला.

जेम्स-पार्क व ग्रीन-पार्क हीं दोन उपवनें आणि सदरील उपवनें हीं जवळ जवळ आहेत. जेम्स-पार्क ९२ एकर आहे आणि ग्रीन-पार्क ६० एकर आहे. यांतही पुष्कळ लोक फिरावयास जातात. विक्टोरिया-पार्क नामक नवें उपवन केलें आहे त्याचें क्षेत्रफळ २६९ एकर आहे. हें विक्टोरिया महाराणीच्या कारकीर्दींत झालें ह्मणून

याचें नांव विक्टोरिया-पार्क पडलें आहे. हें उपवन लंडनांत ईशान्य कोपऱ्यास आहे. "बाटर्सी" नांवाचें सहावें उपवन आहे तें १८९ एकर आहे. सातव्या उपवनास ग्रीनिच—पार्क असें ह्मणतात.

"रीजंट्स-पार्क" याजवळ "प्रिमरोज-हिल" नांवाची एक अतिसुंदर टेकडी आहे तिजवरही पुष्कळ लोक फिरावयास जातात. केन्सिंग्टन नांवाचा बाग हा हैड-पार्काजवळ आहे. यांत फिरण्याची मोठी मौज आहे. यांत वाद्य वाजत असतें तेव्हां तें ऐकण्यास पुष्कळ लोक जमतात. "रॉयल हॉर्टिकल्चरल सोसायटी"चा बागही बहुत सुंदर व पाहण्याजोगा आहे. हा बाग तयार करण्यास सात लक्ष रुपये खर्च झाले.

"क्यू" नांवाचा एक बाग हैड—पार्कापासून पांच मैल दूर आहे; तोही पाहण्यासारखा आहे. त्यांत एक वाजल्यानंतर सर्व लोकांस फिरूं देतात. ह्या बागांत "पामहौस" ह्मणजे उंच ताडाच्या झाडांसाठीं बांधलेलें घर आहे तें आणि बागांतील सुंदर वाफे विशेषेंकरून पाहण्यासारखे आहेत. उंच ताडांसाठीं जें घर बांधलें आहे तें संपूर्ण काचेचें अथवा बिलोरी आहे. त्याला तीन लक्ष रुपये खर्च झाले. ही गोष्ट ऐकून आमच्या देशांतील लोकांस कदाचित् आश्चर्य वाटेल, आणि ते ह्मणतील कीं ताडांसाठीं इतकें मोठें आणि उंचें घर बांधण्याची काय गरज! परंतु याचें कारण असें कीं विलायतेच्या थंड हवेंत ताडाचीं झाडें होत नाहींत, म्हणून तेथील लोकांस हें झाड चमत्कारिकसें वाटतें. आणि कोणत्याही नव्या चमत्कारिक वस्तूसाठीं फार खर्च करावा लागला, तरी ते लोक मागें सरत नाहींत. हें पामहौस ह्मणजे ताडघर ३६२ फुटी लांब, १३७ फुटी रुंद, आणि ७० फुटी उंच आहे. याशिवाय त्याच्या दोनही बाजूंस दोन काचेचीं मोठीं पाखीं काढलीं आहेत. तीं प्रत्येक ११२ फुटी लांब, ९०

फुटी रुंद आणि ३३ फुटी उंच अशीं आहेत. या घरास इतकी जाड काच लावली आहे कीं गारांचा वर्षाव झाला तरी देखील ती फुटत नाहीं. यांत मध्यभागीं ताडाचीं झाडें असून आजूबाजूस ज्या इतर अनेक वनस्पति उष्ण हवेवांचून होत नाहींत, त्या मोठी जतन करून वाढवल्या आहेत. ह्या सर्व झाडांझुडांची लागवड आणि रचना इतक्या सुयुक्तिक कौशल्यानें केली आहे, कीं तीं पाहून आपणास अचंबा वाटल्यावांचून राहणारच नाहीं.

या घराबाहेर कितीही थंडी असून उष्णमापक यंत्रांत पारा वीस अंशांपर्यंत उतरला असला, तथापि त्यांत इतकी उष्णता असते कीं उष्णमापक यंत्रांत पारा ऐशीं अंशांपर्यंत चढलेला पाहण्यांत येतो. ही एवढी उष्णता उत्पन्न करण्यास या घराखालीं सतत बारा भट्या पेटवलेल्या असतात, आणि त्यांवर कढणाऱ्या उष्ण पाण्याच्या उष्णतेची व्याप्ति सर्व घरभर व्हावी म्हणून सवाचार मैल लांब नळी घालून तींत अशी तजवीज केली आहे कीं ज्या झाडास जशी जितकी उष्णता पाहिजे तशी तितकी त्यास पोंचावी. या घरांत जातांच आपण आपल्या उष्ण देशांतच आहों असें आपणास वाटतें.

सर्व बागांत याशिवाय आणखी दहाबारा लहान लहान काचेचीं घरें आहेत. त्यांतील एका घरांत एक लहानशी पुष्करणी बांधली आहे. तींत पाण्यावर कमळांचीं पानें व फुललेलीं कमळें पाहण्यांत येतात. या बागांत एका ठिकाणीं वनस्पतींपासून उत्पन्न होणाऱ्या पदार्थांचा संग्रह केला आहे. एका ठिकाणीं चिनई लोकांच्या देवळासारख्या आकाराचा अथवा सात आठ ओळींच्या दिपमाळेसारखा मनोरा आहे. या "क्यू" बागाचे दोन भाग केले आहेत. त्या दोहोंनीं मिळून दोनशें एकर जमीन आटोपली आहे. त्यांतील मोठ्या भागास "प्लेझर-ग्रौंड" ह्मणजे विलासभूमि असें ह्मणतात.

या "क्यू" बागामध्यें सर्वांत मोठी शोभा ह्मटली ह्मणजे फुलांचे निरनिराळ्या आकृतींचे वाफे आहेत त्यांची होय. एका वाफ्यांत एका जातीचीं आणि एका रंगाचीं फुलें, दुसऱ्यांत दुसऱ्या जातीचीं आणि दुसऱ्या रंगाचीं, तिसऱ्यांत तिसऱ्या जातीचीं आणि तिसऱ्या रंगाचीं अशीं असतात. याप्रमाणें भिन्नभिन्न जातींच्या आणि भिन्न-भिन्न वर्णांच्या फुलांचे निरनिराळे वाफे असतात, तेणेंकरून या बागास फारच शोभा येते. आणि प्रत्येक वाफ्यांत निरनिराळ्या रंगांचीं फुलें असल्यामुळें जमिनीवर निरनिराळ्या रंगांचे गालिचेच पसरले आहेत असें भासतें. अशा सुंदर रचनेमध्यें अणखी या ठिकाणीं एक लहा-नशी तळी आहे. तींतून मधोमध पाण्याचा झोत उडत असतो तो पाहून डोळे थंड होतात.

## ९. पुतळे आणि कारंजीं.

PUBLIC STATUES AND FOUNTAINS.

पुतळे आणि कारंजीं यांचा अत्यंत रमणीय आणि पाहण्यासारखा देखावा लंडनांत "त्रफाल्गर" नांवाच्या मोठ्या चौकाजवळ आहे. या ठिकाणीं आपण पहिल्यानेंच गेलों तर देखाव्याच्या सौंदर्याच्या ते-जानें आपले डोळे दिपतात. लंडनामध्यें बाह्य सौंदर्यानें सर्वांत उ-त्तम अशी जागा पाहणें असल्यास तो या "त्रफाल्गर" चौकाजवळ आ-हे. असे चौक पारिसांत पुष्कळ ठिकाणीं आहेत आणि त्यांच्या यो-गानें तें शहर फार शोभतें. परंतु लंडनांत असा सुंदर व शोभाय-मान चौक दुसरा एकही नाहीं. एथें कारंज्यांची आणि पुतळ्यांची मोठी बहार आहे. नित्य संध्याकाळच्या वेळीं कारंज्यांचें पाणी अशा रीतीनें आणि अशा आकृतीनें उडतें कीं तें पाहून मनास आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं.

"त्रफाल्गर" चौकावर कितीएक पुतळे आहेत त्यांमध्यें एक पु-

तळा एकशें पन्नास फुटी उंच स्तंभावर उभा केलेला आहे. याची शोभा फारच आहे. हा पुतळा नेल्सन नामक आरमारावरील नामांकित सेनापति याचा आहे. याच्या पराक्रमावरून इंग्लंडच्या लोकांनीं यास हा मोठा मान दिला आहे. या स्तंभाजवळ इंग्लंडचा चौथा ज्यॉर्ज राजा याचा पुतळा घोड्यावर आहे. सर चार्ल्स नेपियर याचा आणि सर हेन्री हावेलॉक ज्याणें हिंदुस्थानामध्यें बंडाच्या समयीं मोठा पराक्रम केला, त्याचा असे दोघांचे पुतळे एथें आहेत. कारंज्याकडेस तोंड करून या पुतळ्यांजवळ उभें राहिलें तर समोर "न्याशनल ग्यालरी" नामक मोठें चित्रालय आहे आणि आजूबाजूस सुंदर हॉटेल व "क्लबहौस" आणि जवळ पुतळे व सुंदर कारंजीं यांची बहार, हा सर्व देखावा पाहून प्रवाशांच्या चित्तास फारच आनंद होतो.

कारंज्याची मजा रस्त्यावर अशी याच ठिकाणीं पाहण्यांत येते. दोहों बाजूंस दोन मोठीं कारंजीं उडत असतात, परंतु याशिवाय दुसऱ्या ठिकाणीं रस्त्यावर कारंज्यांची मौज पाहण्यांत येत नाहीं. या शोभेंत लंडन शहर पारिसापेक्षां फार मागें पडलें आहे. तथापि एथें लोकांस पाणी प्यावयास कारंजीं पुष्कळ जागीं आहेत. "रॉयल एक्सचेंज" जवळ पाणी पिण्याचें कारंजें आहे तें फार सुंदर आहे. एक स्त्रीचा पुतळा असा केला आहे कीं तो किंचित् ओणवून चंबूंतून पाण्याची धार सतत धरून मार्गानें जाणाऱ्या येणाऱ्या तान्हेल्यांस पाणी पाजीत आहे. कित्येक पाणी पिण्याचीं कारंजीं रस्त्यावरील घरांच्या भिंतींतून बसविलेलीं आहेत, आणि त्यांतील कित्येक फार कुशलतेनें केलेलीं दिसतात.

"त्रफाल्गर" चौकाच्या अमळ पुढें एका बाजूस गेलें तर आणखी एक स्तंभ पाहण्यांत येतो. त्यावर "ड्यूक आव यॉर्क" याचा पुतळा उभा केला आहे. हा स्तंभ एकशें पंचवीस फुटी उंच आहे. या चौका-



TRAFALGAR SQUARE.

नेल्सनाचा पुतळा त्रफाल्गार चौक.




पाणी पिण्याचें कारंजें. DRINKING FOUNTAIN.

च्या जरा पुढें दुसरीकडेस गेलें ह्मणजे चेरिंग-क्रॉस याजवळ पहिला-चार्ल्स राजा आणि तिसरा ज्यॉर्ज राजा या उभयतांचे पुतळे घोड्यांवर आहेत ते पाहण्यांत येतात. जरा आणखी पुढें गेलें असतां वेस्तमिन्स्तर-आबी याजवळ क्रिमिया एथील लढाईंत मरण पावलेल्या वीरांच्या आठवणीसाठीं एक पुतळा उभा केला आहे तो पाहण्यांत येईल. पार्लमेन्टसभागृहाजवळ "रिचर्ड धी लायन" या राजाचा पुतळा घोड्यावर बसविला आहे. आपले प्रख्यात लॉर्ड क्यानिंग यांचा पुतळा वाड्याच्या चौकांत आहे.

ज्या ड्यूक-आव-वेलिंग्टनानें, संपूर्ण युरोप खंडाला त्रास देणाऱ्या नेपोलियन बोनापार्टीचा पराजय करून त्यास कैद केलें, आणि ज्याच्या पराक्रमावरून त्याचें नाव इंग्लंडच्या लोकांस मोठें प्रिय आहे, त्याचे पुतळे पुष्कळ प्रसिद्ध ठिकाणीं ठेविले आहेत. रॉयल एक्सचेंज म्हणजे त्या ठिकाणीं हजारो लोक नित्यशः येतात जातात तेथें या पुरुषाचा एक पुतळा घोड्यावर उभा केला आहे. दुसरा हैड-पार्कीच्या एका कोपऱ्यावर मोठ्या रस्त्यांत "त्रायंफल-आर्च" च्या मोठ्या दरवाज्यावर आहे त्याचें सोनेरी चित्र या पुस्तकाच्या वरच्या पृष्ठावर काढलें आहे. हे पुतळे फारच शोभतात. ह्याच शूर ड्यूकाच्या स्मरणार्थ तिसरा पुतळा हैड-पार्कांत ठेविला आहे.

दुसऱ्या कित्येक नामांकित पुरुषांचे पुतळे कित्येक प्रसिद्ध ठिकाणीं उभे केले आहेत. इंग्लंडचा चौथा विल्यम राजा याचा पुतळा लंडन—ब्रिजाजवळ आहे. जो डाक्तर जेनर गोस्तनी देवी काढण्याची रीति शोधून काढल्यावरून जगप्रसिद्ध झाला आहे, त्याचा पुतळा केन्सिंग्टन बागांत आहे. विक्टोरिया राणीचा संगमरवरी पुतळा रॉयल एक्सचेंज हींत आहे. एलिझाबेथ राणीचा ही पुतळा या ठिकाणीं आहे. दुसऱ्या जेम्स राजाचा पुतळा "व्हैट-हॉल" नांवा-

च्या सरकारी वाड्याच्या चौकांत आहे. आन राणीचा पुतळा वेस्त-मिन्स्तराजवळ आहे. सोहो नांवाच्या चौकांत दुसऱ्या चार्लस् राजाचा पुतळा आहे. सेन्ट जेम्स वाड्याच्या चौकांत दुसऱ्या विल्यम राजाचा पुतळा आहे. या राजाचा पुतळा इंग्लंडच्या व्यांकींतही आहे. पोर्ट्लंड—प्लेस एथें ड्यूक-आव-केन्ट म्हणजे महाराणीचा पिता याचा पुतळा आहे. गिल्डहॉल, टेम्प्ल बार, वेस्तमिन्स्तर आवी आदिकरून प्रसिद्ध स्थळीं प्रख्यात पुरुषांचे आणखी पुष्कळ पुतळे आहेत. तसेच पार्लमेन्टसभागृहांत आणि सेन्टपॉलच्या देवळांतही पुष्कळ नामांकीत पुरुषांचे पुतळे आहेत. पार्लमेन्ट सभागृहांत पुतळे आहेत तेच चारशें पन्नासांवर होतील. लंडन शहरांत इसवी १६६६ त मोठी आग लागून बहुतेक शहर जळून गेलें होतें, त्याची आठवण राहण्याकरितां एक मोठा मनोरा बांधिला आहे. तो दोनशें फुटी उंच होईल. ज्या ठिकाणीं ही आग प्रथमतः लागली त्याच ठिकाणीं हा मनोरा बांधला आहे. त्याला मॉन्युमेन्ट म्हणतात. तो बांधण्यास १३०००० रुपये खर्च झाले. ज्या आगीमुळें हा मनोरा बांधण्यांत आला ती अत्यंत भयंकर असून चार पांच दिवस चालली होती. त्या काळीं संपूर्ण लंडन शहराचें क्षेत्रफळ ९०० एकर होतें त्यांतून ४२६ एकरांपर्यंत ही आग पसरली होती. तेरा हजार घरें व चारशें आळी या आगीनें जळून गेल्या. सेन्टपॉलचें मोठें देवालयही जळून गेलें होतें. या मोठ्या आगीनें एकंदर अकरा कोटि रुपयांचें नुकसान झालें.

या "मॉन्युमेन्टा"च्या वरल्या भागावर सोनेरी मुलाम्याचा कळस आहे तो आगीच्या गोळ्याप्रमाणें लाल भडक दिसतो. आजपर्यंत निरनिराळ्या समयीं या मनोऱ्यावरून सहा माणसें पडून मरण पावलीं आहेत असें सांगतात. याच्या आणि दुसऱ्या दोन मनोऱ्यांच्या योगानें लंडन शहरास मोठी शोभा आली आहे. यांत "ड्यूक-आव-यॉर्क"

आणि "नेल्सन" हे दोन मनोरे फार चांगल्या ठिकाणीं असल्यामुळें विशेष शोभतात. या मनोऱ्यांवर चढून पाहिलें असतां लंडन शहराचा देखावा फार चांगला दिसतो.

## १०. टेम्सनदी आणि तिजवरील पूल.

THAMES AND ITS BRIDGES.

"टेम्स नदी लंडनामधून वाहत जाते. ही नदी मोठी असून तींत मोठमोठीं गलबतें चालतात. लंडनांतील सर्व नरक आणि घाण या नदींत पडते. त्यामुळें नदीचें पाणी फार गढूळ व घाणेरडें झालें असतें. हें पाणी पिण्याच्या उपयोगी नसून कोणी पीतही नाहीं. या नदीचें पात्र सुमारें पाव मैल आहे. नदीवरील देखावा पाहण्यासारखा आहे. सर्व दिवस नदींतून लहान लहान आगबोटी जात असतात त्या पाहून मोठी मौज वाटते. त्यांतील एका आगबोटींत बसून चेल्सीपासून ब्लाकवॉलपर्यंत म्हणजे लंडनाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत फिरावयास निघालें तर दीडतासाहून अधिक वेळ न लागतां बहुत मौज व करमणूक होते.

याप्रमाणें फिरावयास निघालें असतां, नदीच्यातीरीं ज्या मोठमोठ्या इमारती आहेत त्यांचा सुंदर देखावा दृष्टीस पडतो. पार्लमेन्ट सभागृह, सेन्टपॉलचें देवालय वगैरे मोठमोठ्या इमल्यांची शोभा आणि डौल पाहण्यांत येतो. नदीवरील प्रत्येक पुलाखालून आपली आगबोट जाऊन ते दरोबस्त आपणास माहीत होतात. लहान लहान आगबोटी त्वरेनें जातात येतात तें पाहून अचंबा वाटतो. एक आगबोट समोरून येते ती दिसत आहे आणि आपणाजवळून गेली नाहीं तोंच दुसरी, तिसरी, चौथी, याप्रमाणें आगबोटी एकीवर एक येतात जातात त्या दृष्टीस पडतात. या आगबोटींतून जाणारे सर्वच लोक सहज फिरावयास निघालेले असतात असें नाहीं. बहुतेक तर कामकाजा-

साठीं लंडन शहरांत एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं गाडींत बसून न जातां आगबोटींतून जातात. नदीतीरच्या निरनिराळ्या ठिकाणीं ज्यांला जाणेंयेणें असेल त्यांला अशा रीतीनें फार सुलभ आणि स्वस्थ पडतें.

अशा रीतीनें नदींतून आगबोटींत बसून जाणारेयेणारे लोक नित्यशः सहस्रावधि असतात. आगबोट नऊ दहा ठिकाणीं थांबते. प्रत्येक ठिकाणीं उतारू झटाझट उतरतात आणि चढतात. प्रत्येक आगबोट दर खेपेस पाऊणशेंपासून शंभरांपर्यंत माणसें नेते आणते. प्रति माणसास बहुतकरून दर खेपेचें सगळें आठ पै भाडें पडतें. हा कारभार फार मोठा असूनही काम अशा त्वरेनें होतें कीं तें पाहून कोणासही आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. मी आगबोटींत बसून जात असतांना मला असें वाटलें कीं ज्याप्रमाणें या मोठ्या शहरांत एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाण्यास इतक्या आगबोटी फिरत आहेत आणि इतके लोक त्यांचा सुखानुभव घेत आहेत, त्याप्रमाणें आपल्या देशांत नदीतीरच्या व समुद्रकांठच्या शहरांत एथून तेथें जाण्यायेण्यास आगबोटी होऊन त्यांचा सुखानुभव स्वदेशीय लोक केव्हां घेतील?

लंडन शहरच्या रस्त्यांनीं नदीपलीकडे जाण्यास जागोजाग पूल बांधले आहेत. असे पूल एकंदर नऊ दहा असतील. सर्वांत मोठा पूल "लंडन-ब्रिज" हा होय. या पुलावरून मनुष्यें व गाड्याघोडे किती जातात येतात याचा कांहीं सुमार नाहीं. या पुलाजवळ दर रोज जितकी गर्दी पाहण्यांत येते तितकी दुसऱ्या कोठेंच नसेल. असें ह्मणतात कीं प्रतिदिनीं चोवीस तासांमध्यें वीस हजार गाड्याघोडे व एक लक्ष पायीं चालणारीं मनुष्यें एथून येतात जातात. हा पूल सुमारें हजार फुटी लांब आणि चौपन्न फुटी रुंद असून तो बांधण्या-

स दोन कोटि रुपये लागले. या पुलावरून गाड्याघोडे जाण्याविष
यीं असा बंदोबस्त केला आहे कीं गाडी जलदीनें न्यावयाची अस
ली तर मधून गेलें पाहिजे, आणि हळूहळू न्यावयाची असली त
बाजूनें नेली पाहिजे.

बाकीच्या पुलांपैकीं वेस्तमिन्स्तर-ब्रिज नामक पूल पार्लमेन्
सभागृहाजवळ आहे तो मोठा भवकेदार आहे. त्याची लांबी सु
मारें ११०० फुटी असून रुंदी ८९ फुटी आहे. तो बांधावयास सुमा
एकवीस लक्ष रुपये खर्च झाले. याशिवाय वॉटर्लू-ब्रिज, चेरिंग-
क्रॉस-ब्रिज, लांबेथ-ब्रिज वगैरे आणखी पूल आहेत. लांबेथ-ब्रिज ह
लोखंडाच्या सरांवर बांधलेला असून त्याला खालून कांहीं आधार न
हीं. हा बांधण्यास चार लक्ष रुपये खर्च झाला. सर्वांत मोठा पूल वॉ
टर्लू-ब्रिज हा १३२६ फुटी लांब असून ६४ फुटी रुंद आहे. स
र्वांत लहान पूल सौथवर्कचा हा ७०० फुटी लांब आणि ४२ फुटी
रुंद आहे. एक पूल किंचित् सखल आहे तो खेरीज करून, बाकी
चे बहुधा पन्नास फुटींहून अधिक उंच आहेत. हंगर-फोर्डचा पू
१३००० हजार फुटींहून अधिक लांब असून त्याला आधार खालु
फक्त तीन कमाणींचा आहे; आणि वेस्तमिन्स्तरचा पूल अकरा
फूटींपेक्षां कमी लांब असून पंधरा कमाणींवर बांधला आहे. कित
एक पुलांवर जाणाऱ्या येणाऱ्या लोकांस जकात द्यावी लागते.

### ११. रात्रीचा देखावा-धुराचे दिवे.

VIEW BY NIGHT—GASLIGHT.

लंडन शहराचा देखावा रात्रीस जसा अत्यंत सुंदर आणि आ
नंदकारक दिसतो, तसा दिवसास दिसत नाहीं. नित्य रात्रीस धु
राच्या दिव्यांचें असें तेज व प्रकाश पडतो कीं आपल्या एथील दि
वाळी त्यांच्या पासंगास देखील पुरणार नाहीं. आपण दिवाळीम

खिडक्यांवर दिवे उळकंबतों त्याप्रमाणें हा दीपोत्साह नसतो, तर प्रत्येक मोठ्या आळींत दुकानांच्या रांगाच्या रांगा असून प्रति दुकानांत धुराचे दिवे इतके लावले असतात कीं उजेडाचा भवकारा होऊन जातो, आणि नित्य लंकाच पेटली आहे काय असें वाटतें. रात्रीस जनरथावर बाहेर बसून फिरावयास निघालें असतां लंडनाच्या बाहेरच्या देखाव्याची मजा जशी पाहावयास मिळते तशी दुसऱ्या प्रकारें मिळणें कठीण आहे. कित्येक आळी व बोळ रात्रीच्या प्रहरीं फारच शोभिवंत दिसतात. त्यांत प्रति शनिवारीं धुराचे दिवे विशेष लाविले असतात.

धुराच्या दिव्यांच्या चमत्काराचें वर्णन करितां येईल असें नाहीं. मुंबईमध्यें धुराचे दिवे झाले आहेत, परंतु विलायतेमध्यें धुराच्या दिव्यांनीं बुद्धिकौशल्यानें नाना प्रकारच्या युक्ति करून शोभा आणतात, तशी मुंबईत आणण्यास आणखी पुष्कळ वर्षें पाहिजेत असें मला वाटतें. हे दिवे कितीएक मौजेच्या स्थळीं नाना प्रकारच्या आकृति करून लावितात. धुराच्या दिव्यांनीं नांवें देखील रेखतां येतात. ह्यांच्या योगानें पाहिजे ती आकृति रेखतां येते. या दिव्यांस तेलाची अथवा वातीची गरज नाहीं. नळीचें तोंड उघडलें ह्मणजे


ग्यासाचा साधारण झुम्बर.

त्यांतून कोळशांतला वायु निघतो. त्याला दिव्याची ज्योत लावतां
तो पेटतो. किल्ली सर्व फिरविली असतां दिवा भरजोरानें जळतो, अ
णि थोडीशीच फिरविली तर दिवा थोडासाच जळतो.

टांगण्याच्या झुम्बरांत, मूनल्यांपांत, भिंतीवरील वॉलशेडांत कि
टेबलावर ठेवण्याच्या दिव्यांत ग्यास घ्यावयाचा असला तर आप
हल्लीं जे झुम्बर, मूनल्यांप, वॉल शेडें व रीडिंगल्यांप वापरतों ते चाल
णार नाहींत. त्यास निराळ्याच प्रकारचे दिवे पाहिजेत. त्यांतून ग्या
साची बारीक नळी जाई असे ते असले पाहिजेत. अशा प्रकारचे ट
गण्याचे व भिंतीला लावण्याचे दिवे मोठे शोभायमान व पुष्कळ त
ऱ्हतऱ्हांचे होतात. टांगण्याच्या झुम्बरांत व मूनल्यांपांत ही नळी ब
हेर न दिसे अशा रीतीनें छतांतून आणिली असते.



ग्यासाचा उंचा झुम्बर.

ग्यासाचे दिवे मालवतांना फार संभाळ
पाहिजे. दिवा मालवून टाकल्यावर चुकू
किल्ली लावण्याची राहिली आणि नळींतू
वायु निघून खोलींत किंवा घरांत जमल
आणि त्याला जरा दिव्याची ज्योत लाग
असतां, सर्व खोली अथवा घर लागलेंच पे
घेईल. परंतु इतकें बरें आहे कीं नळी उघ
राहून तींतून ग्यास उगाच निघत अस
तर त्याची अशी खराब घाण येते कीं ग्यास निघून जात आहे अ
त्यावरून घरांतील माणसांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार ना
दुसरें असें कीं प्रत्येक जणाकडेस किती ग्यास खपला याचा बरो
हिशेब ठेवितां येतो.

एका घरांत अथवा कारखान्यांत ग्यासाचा नळ घेऊन त्यांत
हिजे तितक्या दुसऱ्या नळ्या घातल्या, आणि प्रत्येक नळीला दि

लावावयाचा असला, तरी तसें होतें. त्यांत आणखी मोठी खुबी ही आहे कीं प्रत्येक लहान नळीच्या किल्लीनें त्या नळीचा दिवा अधिक उणा करतां किंवा मालवतां येतो इतकेंच नाहीं, तर मोठ्या नळाची किल्ली अधिक उणी फिरविल्यानें पेटविलेले सर्व दिवे एकदम अधिक उणे होतात, किंवा मालवले जातात. ही युक्ति विलायतेंत नाटकगृहांमध्यें फार उपयोगी पडते.

कांहीं मोठा आनंदाचा दिवस किंवा सण असला म्हणजे धुराच्या दिव्यांची व त्यांच्या उजेडाची पुरी मौज पाहण्यांत येते. प्रत्येक मोठ्या घराचा व हवेलीचा पुढील भाग ग्यासाच्या दिव्यांनीं अत्यंत प्रकाशित करितात इतकेंच नाहीं, तर अर्धचंद्राकार कमाणी, चक्रें, झाडें, निशाणें वगैरे नाना प्रकारच्या आकृति करून त्यांत दिवे लावतात. त्यांचा भवकारा दुरून इतका मारतो कीं तो पाहून अशा दीपप्रदर्शनापुढें आपली दिवाळी कःपदार्थ आहे असें आपणच ह्मणूं.

## १२. हवा आणि ऋतु.

CLIMATE AND SEASONS.

लंडनाची आणि अवघ्या इंग्लंडाची हवा आनंदकारक अशी नाहीं. तेथील हवेची कांहीं शाश्वती नाहीं. ती क्षणोक्षणीं बदलते. आतां चांगलें निवर पडलें आहे तोंच क्षणांत अभ्रें येऊन थंड वारा वाहूं लागतो. सर्व दिवस उघाडी असून अकस्मात् पर्जन्याचे थेंब पडूं लागतात. कांहीं मोठा दिवस असला, अथवा कोणत्या एकाद्या ठिकाणीं लोक जमावयाचे असले, म्हणजे दिवस उघाडीचा आहे म्हणून आपण सहज फिरण्यास अथवा मौज मारण्यास निघावें, तों वाटेवरच अथवा मुक्कामास जाऊन पोंचल्यावर वारापाऊस येऊन मंडळीचे हाल होऊन रंगाचा भंग होण्यास वेळ लागत नाहीं. सारांश, जसे वर्षाचे चार ऋतु फिरतात तसे दिवसाचे चार ऋतु असून ते पा-

ऊटतात. अशा रीतीनें तेथील हवेंत बहुतकरून फेरफार होतात. कोणताही एकादा मोठा दिवस सुका उघाडीचा गेला तर ती मोठी भाग्याची गोष्ट असें समजतात. कोणे समयीं आंगांत जाड वस्त्रें घालण्याची अथवा छत्री घेऊन बाहेर जाण्याची कांहीं गरज दिसत नाहीं, परंतु उबेचीं वस्त्रें घातल्याशिवाय व छत्री घेतल्याशिवाय बाहेर गेलें आणि अकस्मात् वारापाऊस आला तर आपण फसून जातों. याजकरितां उन्हाळ्याच्या दिवसांत देखील बाहेर जातेवेळीं उबेचीं वस्त्रें घालून बरोबर छत्री घेतली पाहिजे.

आपल्या देशांतल्याप्रमाणें या देशीं घरांत किंवा हपिसांत दारें व खिडक्या उघड्या टाकून बसवत नाहीं. काचेचीं झडपें बंद केल्यावर आंत बसवतें. खिडक्या उघड्या टाकून समोरचा वारा घेतला तर मग आंथरूण धरल्यावांचून सुटका नाहीं. वाशी हवा घालवून ताजी हवा आंत घेण्यासाठीं आपण (बाहेर अथवा दुसऱ्या खोलींत जाऊन बसावें आणि) कांहीं वेळपर्यंत दारें व खिडक्या उघड्या ठेवाव्या म्हणजे आंत ताजी हवा येते; परंतु आपण आंत असतां, खिडक्या लावून घेतल्याच पाहिजेत.

बाहेर उघड्या हवेंत फिरण्यास कांहीं चिंता नाहीं, उलटा त्यांत फायदा आहे. त्यांत इतकें मात्र संभाळलें पाहिजे कीं उबेचीं वस्त्रें घालून तोंड आणि हात यांशिवाय बाकीचें सर्व शरीर चांगल्या रीतीनें झांकलें असावें. एथील हवा अशी आहे कीं बाहेर पायीं चालत हिंडलें फिरलेंच पाहिजे. बाहेर उघड्या हवेंत हिंडण्याफिरण्याचा अभ्यास न ठेविला, तर पोटांत वायु धरून प्रकृति बिघडते. घरांतून बाहेर पडण्याविषयीं पहिल्यानें मन होत नाहीं, परंतु एकदां निघाल्यावर आनंद होऊन प्रकृति चांगली राहते. बहुत फिरल्यानें शरीरांत अशी ऊब येते कीं जणूं थंडी मुळींच नाहीं.

थंडी फार पडते तेव्हां आंथरूणांत निजावयास पहिल्यानें आवड-त नाहीं, कारण आंथरूण फार थंड लागतें. परंतु बुरणूस पांघरूण घेऊन थोडा वेळ तसेंच पडून राहिलें म्हणजे आंगांत ऊब येऊन थं-डी निघून जाते. थंडी असते तेव्हां खोलींत शेगडी पेटवून ठेविली असतां थंडी कमी होते. कित्येक ठिकाणीं लोखंडाच्या नळ्या घा-लून त्यांत वाफ भरून देतात. म्हणजे मग आपल्या इच्छेप्र-माणें उष्मा होतो. कित्येक झाडांझुडांस ही इतकी उष्णता लागते, ह्मणून ज्या ठिकाणीं अशीं झाडेंझुडें ठेविलीं असतात त्या ठिकाणीं सदरहूप्रमाणें नळ्यांची तजवीज केली असते. अशा रीतीनें उष्ण केलेल्या स्थळास "हॉट—हौस" म्हणजे उष्णगृह ह्मणतात.

आह्मी वसंतऋतूच्या आरंभींच विलायतेस जाऊन पोंचलों. ते-व्हां थंडी होती. मी कोणकोणतीं वस्त्रें वापरीत असें तें सांगितलें ह्मणजे ती थंडी लक्षांत येईल. पहिला फ्लानलचा काचवा अथवा अर्धबंडी, त्यावर ऊबदार शर्ट ह्मणजे कमीज, त्यावर दुहेऱ्या बनातीसारख्या उ-ष्ण वस्त्राची बंडी, आणि त्यावर डगला म्हणजे लोंकरीचा आंगरखा; पायांत ऊबदार इजार आणि तिजवर "पान्टलून" आणि दुहेरी ऊब-दार मोजे. याशिवाय फारच थंडी असली तर बाहेर जाते समयीं क-धीं कधीं "ओवरकोट" घालीत असें. मी इतकीं वस्त्रें मुंबईत आंगांत घातलीं तर उकडून प्राण घाबरा होईल तो होईलच, परंतु त्यांचा भार साहणें देखील कठीण पडेल. परंतु विलायतेंत मला त्यांचा भार मुळींच वाटत नसे. हिंवाळ्यांत थंडी याहून अधिक असते खरी, परंतु मला असें वाटतें कीं मला छातींत रोग नसता तर माझ्यानें ती चांगल्या रीतीनें सहन करवली असती.

विलायतेंतील हवेविषयीं दुसरी एक गोष्ट जाणण्याजोगी आहे. ती ही कीं कधींकधीं आकाश अभ्रानें असें धुंद होऊन जातें कीं दि

वस असतां काळोख पडल्यासारखें होतें आणि केव्हां केव्हां दिवे ला-
वावे लागतात. कधीं कधीं धुकें इतकें पडतें कीं कोणी आपल्या स-
मोरून येत असलें किंवा जवळ उभें असलें तरी आपणांस ओळखतां
येत नाहीं. ह्या देशांत पाण्याची तहान फार लागत नाहीं. पा-
णी प्यालें तर तें बर्फाप्रमाणें गार लागतें.

उन्हाळ्यांत दिवस फारच मोठा आणि रात्र फारच लहान होते.
भर उन्हाळ्यांत पहाटेस तीन साडेतीन वाजतां सुर्योदय होतो, आणि
सायंकाळीं साडेनऊ दहा वाजत तोंपर्यंत दिवस असतो. मी प्रथम असें
समजलों कीं उजेडलें म्हणजे उठण्याची वेळ झाली. परंतु पाहतों
तों साडे तीन वाजले आहेत आणि सर्व निजलीं आहेत. हिंवाळ्यांत
याच्या विपरीत प्रकार होतो.

वसंतऋतु—मार्च, एप्रिल, आणि मे हे तीन महिने वसंत ऋतू-
चे धरले आहेत. ह्या ऋतूमध्यें मार्च महिन्यांत उष्णता बहुधा एके-
चाळिसांपासून एकावन्न अंशांपर्यंत असते. झाडांस पानेंफुलें येऊं
लागतात. शेतांची पेरणी सुरू होते. मे महिन्यांत वारा अधिक सुटतो.

उन्हाळा—जून, जुलई आणि आगस्त हे तीन महिने उष्णका-
ळाचे धरितात. ह्या ऋतूंत उष्णमापक यंत्रांत पारा ५७पासून ६१
अंशांपर्यंत असतो. जुलई व आगस्त महिन्यांत फुलांचा ऐन भर
असतो. या देशांत झाडांझुडांची जतन करितात ह्यामुळें त्यांची शो-
भा इतकी वाढते कीं तीं आपल्या एथील झाडांस शोभेंत खचित
मागें टाकतील. या ऋतूंत तेथील लोक पर्यटन करावयास बाहेर
जातात. आगस्त महिन्यांत शेतकापणी होते.

पावसाळा—सप्तेम्बर, आक्टोबर आणि नवेम्बर हे तीन महिने प-
र्जन्यकाळाचे धरले आहेत. या ऋतूंत उष्णमापक यंत्रांत पारा ५५
पासून ४३ अंशांपर्यंत उतरतो. आक्टोबरांत झाडांवरचीं पानें गळूं

लागून नवेम्बरांत झाडें अगदीं पारखडतात. पर्जन्य बारमास थोडथोडा पडतो, परंतु उभ्या वर्षांत एकंदर तीस इंचांपेक्षां अधिक होत नाहीं.

हिंवाळा---डिसेम्बर, जानुवारी आणि फेब्रुवारी हे तीन महिने हिंवाळ्याचे होत. उष्णमापकांत पारा ४० पासून ३७ अंशांपर्यंत उतरतो. जानुवारींत थंडी अतिशय पडते, पाणी थिजून बर्फ होतें. थंड देशांत हिंवाळा अत्यंत थंड असेलच, परंतु तो किती थंड असतो याचा अनुभव मला नाहीं. परंतु माझ्या कितीएक मित्रांस या देशांतील हिमर्तूचा अनुभव आला आहे. त्यांच्या तोंडून त्याविषयीं कितीएक गोष्टी ऐकून मला असें वाटलें कीं हिंवाळ्यांतील विलक्षण प्रकाराचा मी अनुभव घेतला असता तर मला फार आनंद झाला असता. हिंवाळ्याविषयीं ज्या गोष्टी माझ्या ऐकण्यांत आल्या आहेत, त्यांतील कितीएक जाणण्यासारख्या आहेत त्या सांगून मी हें तिसरें प्रकरण समाप्त करितों.

हिंवाळा जवळ आला ह्मणजे रात्रीस हिंव पडतें तें सकाळीं बारीक राख चहूंकडेस पसरली आहे यासारखें दिसतें. परंतु हिंवाळा चालू झाल्यानंतर स्नो पडतो. तो देखावा पाहण्यासारखा आहे. आपल्या देशांत स्नो पडतच नाहीं त्यापेक्षां त्याला नांव कोठून असणार? क्विनिन अथवा शुभ्र साकर हिजसारखी बारीक भुकी पावसाप्रमाणें पडते. ही भुकी रस्त्यांवर, रस्त्यानें जाणाऱ्या माणसांवर अथवा त्यांच्या छत्र्यांवर, घरांच्या छापऱ्यांवर पडते, आणि एकदां पडावयास लागली ह्मणजे कोणे समयीं थोड्याच वेळांत इतकी पडते कीं सर्व रस्ते आणि घरांचीं छापरीं तिणें अगदीं भरून जातात.

ही भुकी फार हलकी असते. परंतु दाबली असतां ती घट्ट बर्फासारखी कठीण होते. रस्त्यानें जातांना ती जोड्याच्या तळव्यास लागून तिचा बर्फाप्रमाणें कठीण थर होऊन जातो. तेणेंकरून

अशक्त माणसें, अथवा ज्यांस स्नोवरून चालण्याचा अभ्यास नाहीं तीं चालतांना पडतात. रस्त्याच्या दोहोंकडेस पायवाटा असतात त्यांवर स्नो पडला असतो तो काढून गाडीच्या रस्त्याच्या बाजूस गोळा करून ठेवतात तेव्हां ढोंपरांपर्यंत किंवा त्याहूनही उंच असे त्याचे ढीगच्या ढीग होतात. हा स्नो पडल्यावर त्याचें पाणी होऊं लागतें आणि तितक्यांत थंड वारा वाहूं लागला तर तो घट्ट होऊन बर्फ होतो. रस्त्यांत जेव्हां स्नोचें बर्फ होतें तेव्हां पुष्कळ वेळां गाड्याघोडे जाण्यास मोठी अडचण पडते.

हिंवाळ्यांत सर्व झाडें पारसडलीं ह्मणजे त्यांवरही स्नो पडून त्यांचा देखावा केवळ विचित्र करून सोडतो. स्नो वितळून पाणी होऊन घराच्या पांवळ्यांवरून खालीं पडत आहे इतक्यांत थंडी पडली तर पांवळ्यांस पाण्याच्या धारा लागल्या असतात त्या जेथच्या तेथेंच थिजून घट्ट होऊन लोखंडाच्या सळ्या लोंबत आहेत असें दिसतें. ज्या पुरुषाच्या लांब दाढीवर स्नो पडतो त्याचेंही स्वरूप विलक्षण बनतें. जिकडे वारा वाहत असेल तिकडे स्नो अधिक उडतो. कोणा गैरमाहीत मनुष्यास तर असें वाटेल कीं कापसासारखी शुभ्र साकर (लोफशुगर)च आकाशांतून पडत आहे.

हिंवाळ्यांत थिजलेल्या पाण्यावर किंवा बर्फावर स्केट नांवाची कसरत करण्याचा विलायतेंतील लोकांत फार प्रचार आहे. ही कसरत करण्याचे जोडे निराळ्याच प्रकारचे असतात. लांकडाचा तळवा करून त्याला खालीं कोयतीसारखें लोखंडाचें पान लाविलें असतें, आणि पक्ष्याच्या लांब चोंचीप्रमाणें त्या लोखंडाचें टोंक बाहेर आलें असतें. हें वाहाणाप्रमाणें पायांस बांधतात. आणि नंतर त्या कोयतीच्या पानाची बोथी बाजू बर्फांत खोंपसून त्यावर पाय ठेवून जरा जोरानें रेटतांच पाय इतक्या झपाट्यानें सरतो कीं जणूं काय त्यास

आगगाडीचाच वेग आला आहे. परंतु ज्याला याप्रमाणें चालण्याचा अभ्यास असेल तोच चालेल. इतर तसें करावयास जातील तर लागलेच पडून त्यांची फजिती होईल.

याप्रमाणें कोयतीसारखे लोखंडी जोडे घालून बर्फावर चालण्याची कसरत तेथील लोकांस फार प्रिय आहे. ते लोक ही कसरत बाळपणापासून शिकतात. आणि ज्याला स्केट करतां येत नसेल त्याची फार थट्टामस्करी होते. कित्येक तरुण पुरुष या कामांत इतके निपुण असतात कीं ते एकाच पायावर स्केट करतात. नवे शिकणारे वारंवार पडतात आणि त्यांची तोंडें पुष्कळ वेळां फुटून हाडें देखील मोडतात. हिंवाळ्यांत विलायतेंतल्या लोकांची स्केट करणें ही सर्वांत मोठी करमणूक होय. कारण जागोजागीं पुष्कळ लोक ही करमणूक करून आनंद पावतात.



# प्रकरण ४.

## खासगी घरें आणि सार्वजनिक इमारती.

## IV—PRIVATE AND PUBLIC BUILDINGS.

एक वेळ पारिस शहर पाहिल्यावर लंडनांतील घरें आणि सार्वजनिक इमारती यांविषयीं मनांत चांगलें येणें कठीण आहे. तथापि ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं मुंबईंतील घरें आणि सार्वजनिक इमले यांच्या शोभेपेक्षां लंडनांतील घरें आणि सार्वजनिक इमले यांची शोभा चांगली व अधिक आहे. मुंबईंतील कित्येक सार्वजनिक इमारती आणि कांहीं घरें लंडनांतल्यांची बरोबरी करतील किंवा त्यांहून चांगलींही निघतील, आणि लंडनांतील कित्येक घरें आणि त्यांचीं बेडौल धुरार्डी हीं दिसण्यांत वाईट दिसतात हें खरें आहे, तथापि लंडनांतील घरें आणि सार्वजनिक इमारती यांची शोभा मुंबईंतील घरें आणि सार्वजनिक इमारती यांच्या शोभेपेक्षां फारच अधिक आहे यांत कांहीं संशय नाहीं.

### शिल्पविद्या.

### ARCHITECTURE.

शिल्पविद्या ह्मणजे घर बांधण्याची कला जीस इंग्रजींत "आर्किटेक्चर" ह्मणतात तिची विलायतेंत जशी वृद्धि व सुधारणा झालेली पाहण्यांत येते तशी आपल्या एथें पाहण्यांत येत नाहीं. आपल्या देशांतील कित्येक इमारतींच्या, त्यांत विशेषें करून देवळें, मशिदी आणि कबरी यांच्या, बांधकामाची फार प्रशंसा आहे, तथापि या विद्येची जितकी वृद्धि झाली पाहिजे तितकी आपल्या एथें झालेली नाहीं.

सार्वजनिक इमले खेरीज करून, राहावयाच्या घरांची शोभा व रचना वाढविण्याकडे व सुधारण्याकडे आपल्या देशांत फारच थोडें लक्ष देण्यांत आलें आहे, परंतु विलायतेंत राहावयाच्या घरांची बाहेरील शोभा आणि आंतील सोय यांकडे फारच लक्ष देण्यांत येतें.

कोणत्याही शहरांत किंवा गांवांत सार्वजनिक इमारतींपेक्षां खासगी घरें नेहमी अधिक असतात, ह्मणून त्या शहराची अथवा गांवाची शोभा सार्वजनिक इमारतींपेक्षां खासगी घरांच्या शोभेवर अधिक असते. ह्या शोभेंविषयीं मुंबई आणि आपल्या एथील इतर शहरें व गांव फारच मागें पडले आहेत. मुंबईंत टौनहालाच्या दोहों बाजूंस ब्याकींसाठीं व हपिसांसाठीं नव्या इमारती बांधल्या आहेत तशा सुंदर इमारती लंडनांत बहुत पाहण्यांत येणार नाहींत, तथापि तेथें मोठमोठ्या आणि मुख्य मुख्य रस्त्यांवर हारबंद सुंदर डौलाच्या घरांची जशी शोभा आणि भबका आहे तशी शोभा आणि भबका मुंबईंतील घरांचा नाहीं.

घरांचा डौल आणि स्वरूप शोभायमान करण्याचा विलायतेंतील लोकांस मोठा "तेस्त" ह्मणजे शौक आहे. ते एकाच आळींत उंचसखल आणि निरनिराळ्या डौलांचीं घरें न बांधतां, एकाच उंचीचीं आणि एकाच डौलाचीं बांधतात. तसेंच आपल्या एथल्याप्रमाणें ते लोक घरांच्या मध्यें गल्ल्या किंवा खांची राखीत नाहींत. आपल्या देशांत कित्येक धोंडफोडे किंवा घरें बांधणारे गंवडी किंवा सुतार मोठे कुशल व हुशार असतात, तरी युरोप खंडांत घरें बांधण्याच्या विद्येंत केवढी वृद्धि व सुधारणा झाली आहे याचें वास्तविक ज्ञान त्यांस नाहीं. ते हें ज्ञान प्राप्त करून घेऊन आपली विद्या वाढवीत नाहींत.

विलायतेंतील धोंडफोडे अथवा शिल्पकाम शिकणारे हे शिल्पविद्येंत जी कांहीं वृद्धि व सुधारणा झाली आहे तिजविषयीं पहिल्यापासूनच माहिती ठेवितात इतकेंच नाहीं, तर निरनिराळ्या देशीं-

च्या आणि निरनिराळ्या काळींच्या प्रसिद्ध इमारतींचे नकाशे मिळ-वून त्यांची सुद्धां माहिती करून घेतात. अमदाबाद, विजापूर, धारवाड आणि महिसूर एथील प्रख्यात इमारतींच्या तसबिरींनीं युक्त जीं मोठ्या किंमतीचीं तीन सुंदर पुस्तकें ह्या लोकांच्या उद्योगानें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांपासून विलायतेंतील शिल्पकार लोक फायदा करून घेतल्यावांचून राहणार नाहींत. आपल्या एथील शिल्पकारांस स्वदेशांतील प्रख्यात इमारतींची देखील माहिती नाहीं, तर विलायतेंतील इमारतींची कोठून असणार?

तेथील लोक घर बांधतांना मुख्य अशी तजविज ठेवितात कीं घरांचा दुसरा आणि पहिला मजला होईल तितका उंच करावा, खिडक्या होतील तितक्या अधिक ठेवाव्या, आणि पाखें जितकें होईल तितकें वाईट न दिसेल असें करावें. चांगलीं घरें बहुतकरून पांढऱ्या धोंड्याचीं बांधतात, नाहींतर त्यांस पांढऱ्या धोंड्यासारखा रंग देतात. मोठ्या रस्त्यांवरील बहुतेक घरांखालीं दुकानें असतात, परंतु तीं अशीं असतात कीं त्यांणीं घरांस उणेपणा न येतां उलटी शोभा येते. आपल्या घरांस ओटी असते तशी या घरांस असत नाहीं. आपल्या घराला खिडक्यांचीं झडपें असतात तसलीं एथील घरांस नसतात; ह्मणजे तीं बाहेर रस्त्याकडच्या आंगास उघडत नाहींत; तर प्रत्येक खिडकीच्या आंत दोन कांचीच्या चौकटी बसविलेल्या असतात; ह्या चौकटी खालीं उतरल्या अथवा वर



घराखालील दुकानांचें स्वरूप.

चढविल्या ह्मणजे खिडकीचा वरील अथवा खालील भाग उघडतो.



उंच खांब.

उंच आणि नकशीदार खांबांनीं घरास मोठी शोभा येते. खांब बहुतकरून पांच प्रकारचे असतात. कित्येक मोठ्या घरांचे खांब उंच असतात आणि तेणेंकरून तीं घरें अधिक शोभतात. निरनिराळ्या पांच प्रकारचे खांब प्रचारांत आहेत, त्यांत कीत्येक साधे असतात आणि कित्येक नकशीदार असतात. कितीएक स्तंभांवर माणसांचीं अथवा जनावरांचीं तोंडें कोरून काढलीं असतात. अशीं नकशीदार तोंडें निराळीं मिळतात, आणि तीं खांबांवर लावल्यानें खांबांची शोभा वाढते.



गोल कमाणदार खिडक्या.

विलायतेंत पुष्कळ घरांच्या खिडक्या गोल कमाणीच्या असतात. कित्येक चवाठ्यांवर, आपल्या मुंबईंतील टौनहालाजवळ नव्या इमारती बांधल्या आहेत त्यांप्रमाणें, वर्तुल साधून घरें बांधलीं असतात. कित्येक आळींमध्यें अर्ध चंद्राकार साधून घरें बांधलीं असतात. अशा घरांची शोभा फार पडते अर्धचंद्राकार आळीस इंग्रजींत “क्रेसेंन्ट” असें ह्मणतात.

कित्येक ठिकाणीं मध्यें चौक ठेवून घरें बांधिलीं आहेत त्यावरून त्या आळींस स्क्वेर ह्मणजे चौक ह्मणतात. कित्येक घरांस वरून साहणीं ठेविलेलीं असतात. घरांस बहुतकरून दोन तीन मजले असतात, आणि मजले उंच असल्यामुळें घरें उंच दिसतात. वरच्या मजल्यापेक्षां खालचा मजला उंच असतो.

कित्येक मध्यम स्थितींतले लोक शहरापासून फार दूर राहतात. ते लहानशीं साधीं घरें बांधितात. अशा घरांस व्हिला अथवा कॉटेज



व्हिला किंवा कॉटेज.

ह्मणतात. हीं घरें साधीं असतात परंतु त्यांची बांधणी सुंदर दिसते. ही बांधणी अथवा डौल विलायतेंतला अस्सल आहे असें ह्मणतात. सांप्रत काळीं अशीं घरें या देशीं खेड्यापाड्यांत अथवा वतन वाड्यांत अधिक दृष्टीस पडतात. कित्येक लोक आपला साधेपणा अथवा जुन्या वस्तूंची आपणास आवड आहे असें दाखविण्यासाठीं अशा जुन्या तऱ्हेच्या घरांमध्यें राहण्यास फार चाहतात. अशा घरांस ते लोक कॉटेज ह्मणजे झोंपडी ह्मणतात, परंतु यांत आणि खेड्यापाड्यांतील मजूरांच्या झोपड्यांत बहुत अंतर असतें.



देवळासारखें राहण्याचें घर.

कित्येक घरें देवळाच्या आकाराचीं बांधलेलीं पाहण्यांत येतात. परंतु देवळास उंच मनोरा असतो तसा त्यांस नसतो. अशीं घरें बहुत शोभतात. असलीं घरें लंडन शहराबाहेरच्या मोकळ्या जागीं बहुतकरून फार दृष्टिस पडतात

शहराच्या आंतील घरांच्या आणि या घरांच्या डौलांत बहुतकरून फार अंतर असतें.

विलायतेंत घरें फार जलदी बांधतां येतात. जीं मोठमोठीं घरें मुंबईंत दोन दोन तीन तीन वर्षांनींही पुरीं होत नाहींत, तसलीं विलायतेंत दोन तीन महिन्यांत तयार होतात. लहान लहान घरें तर थोड्या आठवड्यांतच तयार होतात. मी तेथें होतों तितक्या काळांत पुष्कळ घरें थोडथोड्या दिवसांत तयार झालेलीं पाहिलीं. एथें घरें याप्रमाणें उभारतात असें मी सांगतों यांत कांहीं अतिशयोक्ति नाहीं. आपण लंडनांतून जाऊन दोन महिन्यांनीं परत आलों ह्मणजे ज्या कित्येक ठिकांणीं आपण पहिल्यानें मोकळी जागा अथवा जुनीं घरें पाहिलीं असतील, त्या ठिकाणीं नवीं घरें बांधलेलीं आपल्या दृष्टीस पडतात. लंडनांत एकंदर एक लक्ष तीस हजार घरें आहेत. त्यांत प्रति वर्षीं सुमारें चार हजार किंवा याहून अधिक घरें नवीं बांधीत असतील.

घरें अशा रीतीनें त्वरित बांधून तयार होतात, याचें मुख्य कारण हें आहे कीं घर बांधण्यास लांकूडकाम वगैरे सामान तयार मिळतें. आपणास केवढें मोठें आणि किती खर्चांत घर पाहिजे त्या मानानें त्याच्या खिडक्या, दरवाजे, खांब, तुळ्या वगैरे सर्व तयार मिळतें. याप्रमाणेंच विटा, खर्ची चुना अथवा प्लास्तर ही तयार मिळतो. घर बांधणें तर सर्व सामान आणून तें जोडण्यास आणि उभें करण्यास मात्र काय तो वेळ.

## २ खासगी घरें.

PRIVATE HOUSES.

विलायतेंत खासगी राहण्याच्या घरांत जितकी होईल तितकी सुखावह व्यवस्था करण्याविषयीं तेथील लोक फार जपतात. निर-

निराळ्या खणांची आणि खोल्यांची योजना फार चांगल्या रीतीनें केलेली असते. घर कितीही लहान आणि थोड्या योग्यतेचें असलें तरी त्यांत एक ड्रॉइंगरूम ह्मणजे बसण्याउठण्याचा दिवाणखाना, एक जेवणाची जागा, दोन तीन निजण्याच्या खोल्या, एक स्वयंपाक घर, एक कोठार, एक सर्पण ह्मणजे कोळसे भरून ठेवण्याची जागा आणि एक शौचकूप इतकें तर निदान असलेंच पाहिजे. हें अगदीं लहान व साधारण प्रतीच्या घराचें झालें.

परंतु घर मोठें असेल त्याप्रमाणें त्यांत अधिक जागा आणि खोल्या असतात. वर सांगितलें यापेक्षां अंमळ मोठें घर ह्मटलें ह्मणजे त्यांत लिहिण्यावाचण्याची एक, पोशाक करण्याची व काढण्याची एक, लहान मुलांस बसण्याची व निजण्याची एक, स्नान करण्याची एक, चाकर लोकांस निजण्याच्या दोन तीन, स्वयंपाकाचीं भांडीं घांसण्या करण्याची एक, शिजलेलें अन्न झांकून ठेवण्याची एक, कांचीचीं आणि चिनई मातीचीं भांडीं ठेवण्याची एक, सुऱ्या, कांटे, चमचे ठेवण्याची एक, मद्य ठेवण्याची एक, याप्रमाणें निरनिराळ्या खोल्या असतात. हें, पहिल्या ह्मणजे लहान व साधारण घरापेक्षां मोठ्या घराविषयीं झालें.

यापेक्षां मोठें घर ह्मटलें ह्मणजे त्यांत पिक्चर-ग्यालरी ह्मणजे चित्रें ठेवण्याची व टांगण्याची एक, टेबलावर चेंडू खेळण्याची एक, सकाळीं बसण्याची एक, टिफिन करण्याची एक, झाडांच्या कुंड्या ठेवण्याची एक, पोशाकाचीं वस्त्रें ठेवण्याची एक, दुभत्याची एक, वस्त्रें ब्रश मारून साफ करण्याची एक, बूट ह्मणजे जोडे ठेवण्याची व त्यांस ब्लाकिंग लावण्याची एक, अशा निरनिराळ्या खोल्या असतात. हें घर वर सांगितलेल्या दोन घरांपेक्षां मोठें होय.

बसण्याउठण्याची, आणि जेवणाखाणाची, ह्या खोल्या लांबीरुं-

दीनें बहुतकरून सारख्या असतात. बारा हजार रुपये लावून बांधलेल्या घरांत पुढील बसण्याची जागा बहुधा अठरा फुटी लांब व पंधरा फुटी रुंद असते. खोल्यांच्या खिडक्या बहुतकरून कांचीच्या असतात. शिग्रामाला असतात तशीं चढवण्याउतरण्याची कांचीचीं झडपें असतात. आंतल्या बाजूनें सुटीं विनिशनें (विनिजनें किंवा झुळमळया) खिडकीवर असतात किंवा जामदानीचे अथवा बारीक कापडाचे पडदे असतात. हीं विनिशनें किंवा पडदे पाहिजे तेव्हां उघडतां लावतां येतात. यामुळें लांकडाच्या खिडक्यांची गरज नाहीं, खिडक्यांच्या चौकटीची काच खिडकीएवढी मोठी असते. यामुळें त्या विशेष शोभतात. त्यांवर पडदे मोठ्या कुशल बुद्धीनें लाविले असतात.

प्रत्येक खोलींत, घांटेची तार ओढण्यासाठीं भिंतींत (कशाची तरी) सुंदर मूठ बसविलेली असते ती ओढली म्हणजे तार ओढली जाते आणि चाकर लोकांच्या खोलींत घांट वाजते. प्रति खोलीची निराळी घांट असते, म्हणून प्रत्येक घांटेच्या नादावरून मला अमुक खोलींत बोलावीत आहेत असें चाकरास समजतें. त्यावरून त्याच खोलींत तो हजर होतो.

प्रत्येक खोलींत शेकावयाची शेगडी भिंतींत बसविलेली असते. थंडी पडते तेव्हां ती पेटवितात. बसावयाच्या, जेवावयाच्या आणि निजावयाच्या जागीं ही शेगडी नेहमी पेटविली असते, म्हणून कोणाला कदाचित् असें वाटेल कीं धुरामुळें घर आणि घरांतील सामान सर्व काळें होऊन जात असेल अथवा बसण्याउठण्यास कंटाळा येत असेल, तर तसें कांहीं नाहीं. घरांत धूर अगदीं दृष्टीस पडत नाहीं. प्रत्येक घरांत धुराडें असल्यामुळें धूर जसाचा तसा बाहेर निघून जातो आणि स्वयंपाक घरांत देखील त्याची कांहीं खुणामुद्रा दृष्टीस पडत नाहीं. तेथें एकही घर धुराड्यावांचून नसेल.

आपल्या ऐथें धुराडीं करण्याचा प्रचार नाहीं, यामुळें स्वयंपाकघरांत आणि घरांत सर्व ठिकाणीं धूर पसरून त्रास आणतो. असें आहे तथापि आपल्या लोकांस धुराडीं करावीं असें अद्याप वाटूं लागलें नाहीं. ही केवढी दुःखाची व अश्चर्याची गोष्ट आहे!

प्रत्येक घरांत पाण्याचें, दिव्याचें व शौचकुपाचें मोठें सुख असतें. पाणी आणावें लागत नाहीं. कारण प्रत्येक घरांत पाण्याचा नळ घेतलेला असतो. हें पाणी लंडनाच्या वरच्या बाजूस कांहीं अंतरावरून टेम्स नदींतून व एक नवी नदी मोठ्या हिकमतीनें बांधली आहे तींतून नळ घालून व्याहाडाच्या पाण्याप्रमाणें आणिलें आहे. म्हणून पाणी आणण्यास अथवा भरण्यास कोणास बाहेर जावें लागत नाहीं. याप्रमाणेंच बहुतेक घरांत ग्यासाच्या म्हणजे धुराच्या नळ्या घेतल्या आहेत. म्हणून दिव्यांचें मोठें सुख आहे. शौचकुपाचें सुख कांहीं कमी नाहीं. कोणत्याही घरांत हलालखोरास जावें लागत नाहीं. मोठ्या नळांतून पाण्याबरोबर नरक आपोआप धुवून जातो. कोणीही माणूस शौचास जाऊन आल्यावर त्याची किंचित्ही खूण किंवा घाण राहत नाहीं.

घरांत निरनिराळ्या खोल्यांच्या मध्यें भिंती असतात त्या बहुत करून फारच अरुंद असतात. यादेशीं निजावयाच्या खोलींत मोरी मुळींच नसते, मोरीचें काम एका चिनई मातीच्या मोठ्या भांड्यानें होतें. हें भांडें हात व तोंड धुवावयाच्या टेबलाखालीं अथवा त्या साठींच केलेली पेटी असते तींत असतें. घरांतील कामकरीण तें नित्य दोन तीन वेळां धुवून साफ करिते. मजबरोबरचा एक चाकर हें भांडें कशाचें आहे हें प्रथम न जाणतां त्यांत कांहीं वस्तु ठेवावयास गेला, इतक्यांत आपली चूक त्याचे लक्षांत आली. मुंबई मध्यें आपले कितीएक लोक अशा चिनई मातीच्या वापरलेल्या अ-

थवा कोन्या भांड्यांत खाण्यापिण्याचे पदार्थ ठेवितात, परंतु इंग्रज लोक तीं कोणत्या कामीं लावतात हें त्यांस मुळींच ठाऊक नसतें.

कित्येक घरांच्या मागेंपुढें थोडीशी जागा असते. तेथें झाडेंझुडें लावून सुंदर बाग केलेला दृष्टीस पडतो. लंडनांत ज्याला मागें पुढें जागा आहे अशीं घरें थोडींच सांपडतील आणि जी जागा असते ती फारच थोडी असते. घरांत जाण्याचा दरवाजा उघडला म्हणजे लागलेंच बसण्या उठण्याच्या ठिकाणीं जातां येत नाहीं, तर तेथील घरांस लहानशी ढेलज कींवा पडवी असते तींतून बसण्याउठण्याच्या ठिकाणीं जावें लागतें. तेथील घरांचीं दारें नेहमी लावलेलीं असतात. ज्याला घरांत जावयाचें असेल तो बाहेरून घांटेच्या तारेची कडी ओढतो, म्हणजे घांट वाजून चाकर येऊन दरवाजा उघडतो. चाकर लोकांस जाण्यायेण्यास बहुत करून दुसरें दार असतें. त्याची घांट देखील निराळी असते. प्रत्येक घरावर सोनेरी अथवा रंगीत आंकडे घालून, रस्त्यानें जाणारास वाचतां यावा अशा रीतीनें नंबर लिहिला असतो. कारण नंबरावांचून कोणाचेंही घर शोधून काढणें मोठें कठीण काम आहे.

स्वयंपाकघराची जमीन बहुतकरून रस्त्यापेक्षां सखल असते. या देशाची हवा थंड असल्यामुळें भुयारांत कित्येक कामें करण्याची सोय पडते. आम्ही ज्या घरांत राहत होतों, त्यांत स्वयंपाकघर, बसण्याऊठण्याची जागा, कोठार, स्नानाची खोली, हीं सर्व भुईपेक्षां खोल जागेंत होतीं. सर्पण अथवा कोळसे ठेवण्याची जागा देखील जमिनीखालीं भुयारांत असते. त्या भुयाराचें तोंड रस्त्यांत पायीं चालण्याच्या वाटेंत आलें असतें. तें बंद असतें तेव्हां रस्त्याची जमीन नारखी दिसते. तें कोळसे भरण्यास मात्र केव्हां केव्हां उघडतात. पुढें अशा भुयारांचीं तोंडें पाहून रस्त्यानें चाललें पाहिजे. एकादे दि-

कार्णीं भुयाराचें तोंड उघडें असून आंत पाय जाईल ह्मणून संभाळलें पाहिजे. एका पारशी मित्राच्या लहान मुलाचें याकडे दुर्लक्ष झाल्यामुळें तो पडला आणि त्याच्या शरीरास इतकी दुखापत झाली कीं त्यास बरें होण्यास पुष्कळ दिवस लागले.

घर बांधण्याचा खर्च—हल्लीं मुंबईंत बांधकामाचा खर्च फार वाढला आहे यावरून विलायतेंत घरें बांधण्यास किती खर्च लागतो हें जाणण्याविषयीं वाचणारे उत्सुक असतील. लंडनांत घर बांधण्यास मुंबईंतल्यापेक्षां अधिक खर्च लागत नाहीं हें ऐकून कदाचित् कोणास आश्चर्य वाटेल. "इंग्लिश जेंट्लमन हौस" नांवाचें पुस्तक एकदां माझ्या पाहण्यांत आलें होतें त्यांतून मी विलायतेंत घर बांधण्याच्या खर्चाचा तपशील उतरून घेतला आहे. लंडन एथें मोठ्या बांध कामांत एका चौरस फुटीस ४ पासून १० रुपये आणि हलक्या बांधकामांत ३ पासून ९ रुपये खर्च होतो. बारा हजार रुपये खर्च करून बांधलेल्या घरांत खालीं लिहिल्याप्रमाणें जागा असते. मुंबई मध्यें इतक्या रुपयांत कोणाही मेस्त्रीस घर बांधावयास सांगितलें असतां इतकी जागा आंत करून देण्याचें तो कधींही कबूल करणार नाहीं.

| | मुख्य बांधकाम. | फुटी लांबरूंद. | चौरसफुटी. |
|---|---|---|---|
| १ | ड्राइंगरूम ह्मणजे दिवाणखाना........ | १८ × १५ | = २७० |
| १ | डायनिंगरूम ह्मणजे जेवणाची जागा. | १८ × १५ | = २७० |
| १ | पोर्च—ह्मणजे ढेलज किंवा पडवी.... | ८ × ५ | = ४० |
| २ | जिन्याची जागा........................ | १२ × ७ | = १६८ |
| २ | निजण्याच्या खोल्या ................ | १६ × १३ | = ४१६ |
| २ | निजावयाच्या लहान खोल्या ........ | १२ × १२ | = २८८ |
| १ | पोशाक करावयाची खोली............ | ८ × ८ | = ६४ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | मुलांची निजण्यावसण्याची खोली.... | १४ × १४ | = | १९६ |
| १ | एक लहान खोली व शौचकूप........ | १० × १० | = | १०० |
| १ | निजण्याच्या खोलींत जाण्याची वाट. | १२ × ४ | = | ४८ |
| | भिंती वगैरे किरकोळ जागा ........ | | = | ३७० |
| १३ | खोल्या ........................ | एकंदर चौरस फुटी | | २२३० |

एका चौरस फुटीस ४ रुपयेप्रमाणें २२३० चौरस फुटींचे ८९२० रुपये होतात.

हलकें बांधकाम.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | स्वयंपाकघर........................ | १६ × १४ | = | २२४ |
| १ | स्वयंपाकाचीं भांडीं घांसण्याची जागा. | १४ × १४ | = | १९६ |
| १ | कोठार ............................ | ८ × ६ | = | ४८ |
| १ | शौचकूप ........................... | ८ × ६ | = | ४८ |
| १ | सर्पण अथवा कोळसे ठेवण्याचें भुयार. | १० × ७ | = | ७० |
| १ | चाकरांची निजण्याची खोली........ | १२ × १० | = | १२० |
| १ | वाट.................................. | | = | ५७ |
| | भिंती वगैरे किरकोळ जागा........ | | = | २३७ |
| ९ | खोल्या ............................ | एकंदर चौरस फुटी | | १००० |

एका चौरस फुटीस तीन रुपयेप्रमाणें १००० चौरस फुटींचे ३००० रुपये होतात, यांत वरील रकम मिळविली ह्मणजे सुमारें १२००० रुपये होतात.

घरभाडें—लंडनांत ३०००००० मनुष्यांची वस्ती असून मुंबईपेक्षां भाड्याचीं घरें सुलभ व स्वस्थ मिळतात असें मी पूर्वींच सांगितलें आहे (पृष्ठ ९०।९१ पाहा.) ही गोष्ट पहिल्याने आश्चर्यकारकशी वाटेल, परंतु हिचें कारण उघड आहे. मुंबईंत वस्ती फार झाली तर लंडनांतील वस्तीच्या तृतीयांश असेल, परंतु एथें घरें अ-

ह्या अडाणी रीतीनें व जागेचा सुमार न ठेवितां बांधलीं आहेत कीं या शहरांत पुष्कळ जागा असून दहा लक्ष मनुष्यांचाही समावेश नीट होत नाहीं.

प्रथमतः आपण कापाचें मैदान सोडून मुंबईचा कापड बाजार पाहूं. ह्या बाजाराच्या खराब आणि घाणेरड्या स्थितीमुळें मुंबईचें नाक कापलें गेलें आहे. आबड धोबड खोंपटांसारख्या दुकानांच्या जागीं सुंदर उंच इमारती बांधून त्यांत खालीं दुकानें केलीं असतां एवढ्या जागेंतच किती सोय होईल? ह्याप्रमाणेंच धोबीतळ्याजवळ आणि काळकादेवीच्या रस्त्यावर कापाकडच्या बाजूस किती खोंपटासारखीं लहान लहान घरें आहेत आणि तीं सर्व नवीन उंच बांधिलीं असतां किती जागा होईल? या प्रमाणेंच भायखळें आणि महालक्ष्मी यांच्यामध्यें किती जागा रिकामी पडली आहे? तिला भरणी घालण्याचें सोपें काम सोडून, समुद्र भरून काढून जागा वाढविण्याचें अति दुर्घट काम मुंबईच्या लोकांस शेरांच्या वेडामध्यें सुचलें. परंतु अंमळ पुढें गेलें तर गिरगांव, शेतवाडी, चौपाटी, वाळकेश्वर, ग्रांटरोड, इत्यादि लगत्यांस एकएका घराच्या व बंगल्याच्या सभोंवार किती जागा रिकामी पडली आहे ती दृष्टीस पडेल. लंडन शहरांत कोठेंही याप्रमाणें जागा रिकामी पडलेली नाहीं. यावरून कोणी असें विचारतील कीं तर मग विलायतेंत वाड्या बंगले मुळींच नाहींत कीं काय? तर लंडन शहरांत निरनिराळ्या ठिकाणीं पार्क ह्मणजे उपवनें आहेत, परंतु आपल्या एथील वाड्या बंगले यांसारखें फारसें दृष्टीस पडत नाहीं. श्रीमान् लोक उन्हाळ्यांत लंडनांत येऊन राहतात, आणि उष्णकाळ संपल्यावर, इंग्लंड देशांत निरनिराळ्या लहान लहान गांवीं त्यांचे वाडे किंवा किल्ल्यासारखीं मोठीं घरें असतात त्यांत राहून बागबगीच्याचें सुख भोगितात.

याशिवाय मुंबईत माहिमाच्या बाजूस समुद्रकांठास किती जागा पडून राहिली आहे! त्या ठिकाणीं घरें बांधिलीं तर किती जागा होईल! मुंबईची मर्यादा माहिमापर्यंत धरितां येईल आणि त्याप्रमाणें धरिली तर जागेची कांहीं कमताई नाहीं. मुंबईत नऊ लक्ष लोकांची वस्ती असून घरें लहान मोटीं मिळून २०००० आहेत. लंडनांत तीस लक्ष वस्ती असून घरें सुमारें एक लक्ष तीस हजार आहेत. ह्या मानानें मुंबईत हल्लींच्या वस्तीस वीस हजारांच्या जागीं चाळीस हजार घरें असलीं पाहिजेत.

## ३. देवळें.

CHURCHES.

इमारतींच्या रचनेंत देवळांनीं बहुत शोभा येते. लंडनासारख्या मोठ्या शहरांत देवळांची कांहीं कमताई नाहीं. लंडनांत निदान शंभर देवालयें असतील. सर्वांत मोठें सेन्टपॉल हें देवालय होय. वेस्तमिन्स्तर आबी हें देवालयही बहुत मोठें, प्रख्यात व जुनाट आहे. ह्या उभय देवालयांचें वर्णन चित्रांसुद्धां पांचव्या प्रकरणांत केलें आहे. सेन्टपॉलचें जुनें देऊळ, मोठी आग लागली होती तींत जळून गेलें. त्याच्या ठिकाणीं पुनः नवीन देऊळ बांधलें त्याला एकशें पंचाहत्तर वर्षें होत आलीं. तें बांधण्यास फार ख-



वेस्तमिन्स्तर आबी.

र्च झाला. ह्या देवळाची बांधणी एकीकडून उंच आणि गोलाकार असून कांहीं अंशीं हिंदु देवालयांच्या सारखी आहे.

असें आहे तरी हिंदु देवालयांत आणि यांत बहुत अंतर आहे. कित्येक हिंदु देवालयांची बांधणी आणि डौल वाखाणण्याजोगा आहे इतकेंच नाहीं, तर कित्येकांची सर विलायतेंतील मोठमोठ्या देवळांस सुद्धां कित्येक प्रकारें येणार नाहीं. बहुतेक ख्रिस्ती देवळांच्या सभामंडपांची उंची, विस्तार, व सफाई पाहून मनास संतोष झाल्यावांचून राहत नाहीं. त्यांत कित्येक देवळांत रंगीत काचीचीं तावदानें, सभामंडपाचें छत वगैरे पाहून आपणास खचित आश्चर्य वाटतें. त्यांत क्याथोलिक पंथाचीं देवळें तर विशेषें करून चांगलीं आणि भव्य असतात. त्यांतील थाट हिंदु देवळांतील थाटाशीं कित्येक प्रकारें मिळतो.

विलायतचे लोक ख्रिस्ती धर्म पाळितात. परंतु धर्मप्रकरणांत सर्व लोकांचें एक मत नाहीं, यामुळें आपल्या एथें धर्मांत निरनिराळे पंथ झाले आहेत त्याप्रमाणें विलायतेमध्यें ख्रिस्ती धर्मांतही झाले आहेत. ह्या निरनिराळ्या पंथांचीं निरनिराळीं देवळें आहेत. ज्या पंथांत कर्ममार्ग अधिक त्या पंथाच्या देवळांत थाटमांट अधिक असतो, आणि ज्यांत कर्ममार्ग कमी त्याचीं देवळें दिसण्यांत साधीं असतात. इंग्रज लोकांशिवाय इतर लोकांचीं देखील देवालयें लंडनांत आहेत, कारण इंग्रजी राज्यांत सर्वांस आपापल्या धर्माप्रमाणें व विचाराप्रमाणें चालण्याची मोकळीक आहे. जर्मन, फ्रेंच, स्वीडिश, डानिश व यहुदी यांणीं आपापल्या लोकांसाठीं लंडनांत निरनिराळीं देवळें बांधिलीं आहेत. मला असें वाटतें कीं या देशचे पारसी, मुसलमान व हिंदु हे आपापल्या धर्माचीं देवळें विलायतेंत बांधण्यास सिद्ध होतील असाही समय आतां येईल.

वर दोन प्रसिद्ध देवळें सांगितलीं त्यांशिवाय सेन्ट सेवियर नामक देवालय लंडनांत प्रख्यात आहे. तें आठवा हेन्री राजा याच्या वेळीं बांधलें. ह्या देवळांतही कित्येक नामांकित पुरुष पुरले आहेत. टेम्पल-चर्च नामक देवालयही प्रसिद्ध आहे. तें सन ११८५ त बांधिलें असें सांगतात. ह्या देवळांत अजमासें पंचवीस वर्षांपूर्वीं कांहीं फेरफार करण्यांत आला त्यालाच सुमारें सात लक्ष रुपये खर्च झाले. सेन्ट हिलन्स हें देवालयही प्रसिद्ध आहे. परंतु यांत पाहण्यासारखें विशेष कांहीं नाहीं. "सेन्ट-पानक्रॉस इन्-धि फील्ड" नामक एक जुनाट देऊळ लंडनाच्या उत्तरेस आहे त्याच्या सभोंवारची जागा, आज सुमारें वीस पिढ्या झाल्या, माणसें पुरण्याच्या कामाला लाविली आहे, आणि तींत पुष्कळ लोकांचीं प्रेतें गाडलीं असतील. यांशिवाय आणखीही प्रसिद्ध देवळें लंडनांत आहेत. देवळांत प्रार्थना करण्यास आणि धर्मपर बोध ऐकण्यास बसायाचा बहुत मोठा, उंच आणि शोभायमान मंडप असतो. त्याचें छत, खिडक्या आणि खांब फारकरून गोल कमाणीच्या आकाराचे असतात. खिडक्यांत काचीचीं तावदानें बसवून त्यांवर मोठ मोठीं रंगीत चित्रें काढलेलीं असतात तेणेंकरून त्यांस फार शोभा येते. जमिनीस दगडाच्या लाद्या बसविल्या असतात त्याही फार उंच्या असतात. लोकांस बसण्याची वधर्माच्या पोथ्या ठेवण्याची व व्याख्यान करण्याची सोय फार चांगली केलेली असते. ज्या समयीं सर्व समाज गंभीर एकसुरानें ईश्वराची प्रार्थना करितो किंवा स्तुति गातो आणि



देवळाचा सभामंडप.

वाद्यांचा मधूर ध्वनि निघतो, त्या समयींचा तो प्रकार मोठा पाहण्या-सारखा असतो. हा प्रकार पाहून मनुष्याच्या मनांत बळकट ठसा व भक्तिभाव उत्पन्न झाल्यावांचून राहणारच नाहीं.

इंग्रज लोकांचीं कित्येक देवळें क्याथोलिक पंथाचीं आहेत. त्यांत येशू ख्रिस्त, त्याची कुमारी माता मेरी, व देवदूत यांच्या मूर्ति बस-विलेल्या असतात. या मूर्तींच्या पूजेंत आणि हिंदु लोक मुर्तिपूजा करतात तींत कांहीं अंतर आहे, तथापि त्या बहुतप्रकारें एकसा-रख्या आहेत. हिंदु देवालयांत चरणामृत किंवा तीर्थ देतात त्या-प्रमाणें या देवालयांतही एक पाद्री दरवाज्याजवळ बसून पाणी दे-तो तें लोक डोळ्यांस लावितात. ह्या देवाळयांत कित्येक भोळ्या भावाच्या स्त्रिया व पुरुष आपलीं पातकें धर्मगुरूपाशीं कबूल कर-ण्यासाठीं जाऊन तीं त्याच्या कानांत सांगतात आणि असें समज-तात कीं आपण आतां ह्या पापांपासून मुक्त झालों!! प्रॉतेस्तन्त मताच्या देवळांत मूर्तिपूजा अथवा असा देवभोळेपणाचा प्रकार कांहीं नाहीं, परंतु ह्या पंथांत ही अनेक मतें उपस्थित झालीं आहेत, आणि त्यांचीं धर्मसंबंधी कृत्यें आणि व्याख्यान करण्याच्या रीति अ-नेक प्रकारें एकमेकांपासून भिन्न आहेत.

### ४. राजवाडे.

PALACES.

कोणत्याही देशांतील मोठ्या इमारतींमध्यें राजमंदिरें हीं मुख्य होत. याजकरितां तीं कशीं दिसतात तीं पाहण्याची मोठी उत्कंठा असतेच. महाराणी विक्टोरिया लंडनांत असतात तेव्हां फारकरून बकिंघाम नामक वाड्यांत राहतात. हा महाल फार मोठा व सुंदर आहे. हा बांधण्यास चौथ्या ज्यॉर्ज राजाच्या कारकिर्दींत आरंभ झा-ला, परंतु तो चौथ्या विल्यम राजाच्या कारकिर्दीच्या पूर्वी पुरा झा-

ला नाहीं. ह्या राजास हें नवें मंदिर आवडलें नाहीं, परंतु व्हिक्टोरिया महाराणीस तें पसंत पडल्यामुळें, त्यांत कांहीं वृद्धि व सुधारणा करण्यांत आली आहे.

हा वाडा पाहण्याविषयीं माझी फार इच्छा होती, आणि तो पाहण्याची परवानगी मिळविण्यासाठीं माझे स्नेही कप्तान ईस्विक, इंदिया कौन्सिलाचे सभासद यांणीं फार मेहनत घेतली; परंतु महाराणी साहेब भ्रताराच्या दुःखांत व शोकांत असल्यामुळें, आह्मास तो वाडा दाखविण्याची परवानगी या सद्‌गृहस्थास, लॉर्ड चेम्बर्लेन याजकडून मिळाली नाहीं. या महालाचा मोठा जिना संगमरवरी दगडाचा आहे. यांतील दिवाणखाने फार मोठे व सुंदर आहेत. नाच करावयाचा दिवाणखाना आहे तो इतका मोठा कीं त्यांत २००० स्त्रीपुरुषांस नाचतां येतें. ज्या दिवाणखान्यांत महाराणीचें सिंहासन आहे तो ६४ फुटी लांब आहे आणि त्यांत साटीनचे पडदे टांगले आहेत. या वाड्यांतील आरसेमहालांत फार मोठीं व मोलवान चित्रें आहेत. यालगत तबेला आहे तो इतका मोठा कीं त्यांत चाळीस गाड्या मावतात आणि त्यांशिवाय मोठमोठे घोडे राहतात. एक गाडी इतकी मोलवान आहे कीं तिला ७६००० रुपये लागले.

सेन्ट जेम्स नांवाचें दुसरें एक राजमंदिर सदरहू मंदिराच्या शेजारीं आहे; त्यांत राणी साहेब राहत नाहींत, परंतु तें दरबार भरण्याच्या वगैरे उपयोगीं पडतें. दरबार दोन प्रकारचें होत असतें. एक "लेवी" आणि दुसरें "ड्रॉइंग रूम." लेवी ह्मणजे गृहस्थ मात्र महाराणीस भेटावयास जातात, आणि ड्रॉइंग रूम ह्मणजे पुरुष आणि स्त्रिया दोनही जातात. लेवी बहुतकरून बुधवारीं होते आणि ड्रॉइंग रूम बृहस्पतवारीं होते.

ज्या दिवाणखान्यांत महाराणी साहेब त्यांस भेट देतात, तो चां-

गच्या रीतीनें सुशोभित केलेला आहे; तरी ग्रेट ब्रिटनाच्या मोठ्या साम्राज्यास आणि नांवास शोभे असा त्याचा भव्यपणा नाहीं. केन्सिंग्टन नांवाचें तिसरें राजमंदिर आहे त्यांत सन १८१९ सालीं व्हिक्टोरिया महाराणींचें जन्म झालें. हल्लीं त्यांत राजकुटुंब राहत नाहीं. व्हाइटहॉल नामक चौथा राजवाडा आहे त्यांत आठव्या हेन्री राजापासून तिसऱ्या विल्यम राजापर्यंत राजे राहात असत. हा वाडा राजकीय कुटुंबानें राहण्याजोगा नाहीं आणि त्यांत आतां कोणी राहत नाहीं. मार्ल्बरो-हौस नांवाच्या वाड्यांत व्हिक्टोरिया राणीचा ज्येष्ठ पुत्र प्रिन्स-आव्-वेल्स हा राहतो.

लंडनाहून एकवीस मैलांवर विंड्सर कासल नामक, किल्ल्याच्या आकाराचा वाडा आहे त्यांत महाराणी वारंवार राहावयास जातात. ह्या महालाच्या रचनेंत कांहीं न्यून नाहीं. "आइल-आव-वाइट" या बेटांत "आस्बोर्न-हौस" नांवाचा वाडा आहे त्यांतही राणी साहेब वारंवार राहावयास जातात. "हाम्तन-कोर्ट" नांवाचा एक जुनाट महाल लंडनापासून तेरा मैल आहे त्यांत राजकुटुंब कधींच राहत नाहीं. परंतु त्यांत बादशाही महालांतील पुरातन काळचें पुष्कळ सामान पाहण्यासारखें आहे. ह्या महालाजवळ अशी एक जागा बांधली आहे कीं तींत जातांच आपणांस भ्रांतिच पडते.

याशिवाय पार्लमेन्टसभागृह आणि बीलोरी महाल हे दोन मोठे महाल आहेत. हे सर्व महालांपेक्षां अधिक शोभायमान व भव्य आहेत, परंतु ते राजकुटुंबास राहण्यासाठीं बांधलेलेच नव्हत. पार्लमेन्टसभागृहांत राज्यप्रकरणी सर्व व्यवस्था करण्यासाठीं राज्यसभा भरते, आणि बिलोरी महालांत लोकांस करमणूक होते. पार्लमेन्टसभागृहाप्रमाणें सुंदर आणि शोभायमान इमारत अवघ्या इंग्लंड देशांत दुसरी एकही नाहीं. त्याप्रमाणेंच बिलोरी महालाची

बरोबरी करणारी अशी दुसरी इमारत नाहीं. बिलोरी महालाची मा-
लकी एका कंपनीकडेस आहे, ह्मणून यास बादशाही महाल ह्मण-
वत नाहीं, तथापि त्यास महाल हें नांव सर्व प्रकारें शोभे असें आहे.

## ९. सरकारी इमारती.

### PUBLIC OFFICES.

वर राजवाडे सांगितले, यांशिवाय लंडनांत अणखी कित्येक सर-
कारी इमारती आहेत त्यांचीही शोभा कांहीं कमी नाहीं. लॉर्ड मेअर,
ज्याची पदवी एका अर्थी राजाच्या खालोखाल मानितात, त्यासाठीं
मान्शन हौस नांवाचा मोठा वाडा तेथील मोठ्या ब्यांकीजवळ आहे,
त्यांत सदरहू लॉर्ड मेअर राहतो आणि त्यांतच एका ठिकाणीं फौ-
जदारी खटल्यांचा न्याय करावयास बसतो. याप्रमाणें हा लॉर्ड मे-
अर तेथील मुख्य माजिस्त्रेटाचें काम करतो, परंतु त्याच्या गाडीचा
आणि पोशाकाचा डौल कांहीं साधारण नसतो. त्याच्या बरोबरचे आ-
ल्डरमेन यांचा देखील पोशाक मोठा भव्य असतो. त्याला ऐशीं
हजार रुपये वर्षासन मिळतें, आणि प्रति वर्षी नोवेम्बर महिन्यांत
नव्या लॉर्ड मेअराची निवडणूक होते, तेव्हां रस्त्यानें मिरवावयास
मोठी स्वारी निघते. लॉर्ड मेअर याचा राहावयाचा इजिप्श्यन-हॉल
नांवाचा दिवाणखाना ह्याचीं मोठाल्या इमारतींत बहुत प्रशंसा आहे.

गिल्डहॉल नावांची दुसरी एक इमारत आहे तीही मोठी
भव्य आहे. तिचें बांधकाम पाहण्यासारखें आहे. ती वर सांगितले-
ल्या इमारतींपासून फार दूर नाहीं. ही इमारत लंडनाच्या टौन-हा-
लाच्या जागीं आहे. या वाड्यांत लार्ड मेअर प्रति वर्षी मेजवानी करि-
तो. याच वाड्यांत "कोर्ट-आव्-एक्सचेकर" आणि "कॉमन् कौन्सि-
ल चेम्बर" भरत असतात. या सभांचे दिवाणखाने पाहण्यासारखे
आहेत. या इमारतीची पुढली सदर मोठी भव्य आहे.

ट्रेझरी—व्हाइट—हॉल नांवाची एक तिसरी मोठी सरकारी इमारत आहे, तींत सरकारी खजिन्यासंबंधी सर्व कामकाज चालतें. आपल्या देशांतील हाय कोर्टांच्या निवाड्यांवर "प्रिवी कौन्सिलास" जीं अपिलें होतात त्यांची, प्रिवी कौन्सिलाची "ज्युडिशल कमिटी" या ठिकाणीं बसून चौकशी करिते. याशिवाय लॉर्ड-हाय-ट्रेझरर याचें हपीस, होम-ऑफीस, पे-मास्तर-जनरल-ऑफीस, फारेन-ऑफिस हीं सर्व हपिसें याच इमारतींत आहेत.

या "ट्रेझरी-व्हाइट-हॉल"च्या सुंदर इमारतीसमोर "हॉर्स-गार्ड" नांवाची एक मोठी सरकारी इमारत आहे. तींत कमाण्डर-इन्-चीफ, आडजुटन्ट-जनरल आणि क्वॉटर-मास्तर-जनरल यांची हपिसें आहेत. या भव्य इमारतीच्या दरवाज्याच्या दोहों बाजूंस नित्य सकाळचे दहा वाजल्यापासून संध्याकाळचे चार वाजत तोंपर्यंत दोन घोडेस्वारांचा पहारा असतो. हे घोडेस्वार पुतळ्यांप्रमाणें उभे असतात. घोडा देखील बहुधा हालत नाहीं. कमाण्डर-इन्-चीफ म्हणजे मुख्य सेनापति यास सुमारें तीन हजार (रुपये) दरमहा मिळतात. ह्या दोन इमारती समोरासमोर असून पार्लमेन्टसभागृहापासून फार दूर नाहींत.

इंदिया-ऑफिस पहिल्यानें, लंडन-हॉल-स्ट्रीट नांवाच्या आळींत ब्यांक-आव्-इंग्लंड हीजवळ होतें, तें तेथून काढून पार्लमेन्टसभागृहाच्या शेजारीं वेस्तमिन्स्तर-हॉटेल याच्या हवेलींत आणिलें. नंतर न्यू-पब्लिक-ऑफीस तयार झाल्यावर तें त्यांत जावयाचें होतें. इंदिया-कौन्सिलाच्या मेम्बरां (सभासदां)चीं हपिसें वेस्तमिन्स्तर-हॉटेलाच्या हवेलींत होतीं. तेथें सर एर्स्किन पेरी आणि कप्तान ईस्विक, इंदिया-कौन्सिलाचे मेम्बर यांस मी भेटावयास गेलों होतों तेव्हां तीं हापिसें माझ्या पाहण्यांत आलीं.

सरकारी हपिसांपैकीं दोन हपिसें फारच मोठीं आहेत असें ह्मणतात; एक कस्टम-हौस ह्मणजे मांडवी, आणि दुसरें पोष्ट-ऑफीस. कस्टम-हौस याची इमारत फार मोठी आणि भव्य आहे. यांत गेल्या नऊ वर्षांमध्यें जकातीचें उत्पन्न वीस कोटि रुपये झालें असें सांगतात. यांत २२३० मनुष्यें काम करीत असतात, आणि त्यांच्या पगाराचा खर्च सरकारास प्रतिवर्षीं साडे सत्तावीस लक्ष रुपये होतो. या हपिसांत एक मोठा हॉल आहे तो सुमारें दोनशें फुटी लांब आणि सत्तर फुटी रुंद आहे.

जनरल-पोष्ट-ऑफीस हें सेन्ट पॉलच्या देवळाजवळ आहे. याची ही इमारत बहुत मोठी आहे. हें खातें एवढें मोठें आहे आणि यांत काम इतकें पुष्कळ आहे कीं त्याचें अनुमान वाचणारांस होणार नाहीं. या खात्यांत सुमारें २५००० मनुष्यें लागलेलीं आहेत. याचा वार्षीक खर्च दोन कोटि आणि उत्पन्न साडे तीन कोटि रुपये आहे. प्रतिवर्षीं साठ कोटि पत्रें आणि साडेसात कोटि वर्तमानपत्रें ह्या पोष्ट-ऑफिसांतून जातात. लंडनाच्या लंडनांत कोणा मित्रास सकाळीं पत्र लिहून टपालांत घातलें, तर त्याच दिवशीं संध्याकाळीं त्याचें उत्तर येतें. अशा झपाट्यानें या टपालखात्याचें काम चालतें. समरसेट-हौस ह्मणून अणखी एक सरकारी हवेली आहे ती इतकी मोठी आहे कीं तीस ३६०० खिडक्या आहेत. असें सांगतात कीं ह्या सर्व खिडक्या मोजावयास एका मनुष्यास तीन दिवस लागले. ऑडिट-ऑफिस आणि जन्म, लग्नें व मृत्यु नोंदण्याचें रेजिस्तर-ऑफिस वगैरे हपिसेंही ह्याच हवेलींत आहेत. ही इमारत स्त्राण्ड नांवाच्या आळींत आहे. ही इमारत चौकोनी असून बाहेरून फार शोभिवंत दिसते.

पेमास्तर-जनरल आणि आडमिरल्टी यांचीं हपिसें व्हाइट-हॉल

नांवाच्या इमारतींत आहेत. आरमाराकडील लोकांचा, फौजेचा, व तोफखान्याकडील लोकांचा पगार देण्याचें वगैरे काम पेमास्तर-जनरल याचें आहे. पगार तीन तीन महिन्यांनीं होतो. आरमारासंबंधीं पत्रव्यवहाराचें व हिशेबांचें खातें निराळेंच आहे, त्यास आडमिरल्टी-ऑफीस ह्मणतात. याशिवाय सरकारी दफ्तराचें हपीस निराळ्याच ठिकाणीं आहे.

सरकारी टांकसाळेची इमारत ही मोठी आणि पाहण्यासारखी आहे. या टांकसाळेंत सोनें, रुपें आणि तांबें यांचें नाणें पाडतात. हें नाणें संपूर्ण ग्रेट ब्रिटनांत आणि दुसऱ्याही कित्येक देशांत चालतें. अमुक एक शिक्का अमुक कसाचा आहे किंवा नाहीं हें पाहण्याचें यंत्र फार कुशलतेनें केलें आहे. सोन्याच्या शिक्क्यांत एका वालाची तफावत असली तर ती समजते. एका मिनिटांत साठसत्तर अर्ध शिलिंग ह्मणजे पावल्या पडतात. या यंत्राचें कामही पाहण्यासारखें आहे. ज्या लोकांस सोन्याचें नाणें पाडून घ्यावयाचें असेल त्यांस तें फुकट पाडून देण्यांत येतें. मंगळवार, बृहस्पतवार आणि शनिवार या दिवशीं बारा वाजल्यापासून दोन वाजत तोंपर्यंत यासाठीं सोनें तोलून घेऊन तें देणारांचीं नांवें लिहून घेण्यांत येतात. या वेळीं जी गर्दी होते तिचा कांहीं सुमार नाहीं.

मृत्युपत्रांचें हपीसही निराळेंच आहे. भिन्नभिन्न मनुष्यांनीं भिन्नभिन्न काळीं मृत्युपत्रें करून नोंदविलेलीं अस्तल फार जपून रक्षून ठेविलीं आहेत. ह्या मृत्युपत्रांवरून कित्येक नामांकित पुरूषांविषयीं, त्यांच्या वारशांविषयीं आणि त्यांच्या काळच्या रीतिभातींविषयीं पुष्कळ माहिती होते; याजकरितां ज्यांस जुनीं मृत्युपत्रें पाहावयाचीं असतील त्यांस तीं पाहण्यास परवानगी मिळते. इसवी सन १७०० च्या अगोदरचीं मृत्युपत्रें पाहण्याची ज्यांची इच्छा असेल

त्यांस कांहीं दिल्यावांचून तीं वाचून पाहावयास सांपडतात. शेक्स-स्पियर, न्यूटन आदिकरून प्रख्यात पुरुषांचीं मृत्युपत्रें ह्या ठिकाणीं दृष्टीस पडतात.

## ६. व्यापाराच्या इमारती व गोदी.

### COMMERCIAL BUILDINGS AND DOCKS.

व्यापाराच्या इमारतींत ब्यांक-आव् इंग्लंड ही मुख्य, आणि ज्या ठिकाणीं ती आहे तो शहराचा मध्य भाग असें धरिलें आहे. याप्रमाणें मोठी आणि अगडबंब अशी व्यापाराची इमारत दुसरी एक ही नाहीं. तसेंच हें ठिकाण व्यापारधंद्यास मध्यभागीं आहे. ही हवेली एवढी मोठी आहे कीं तिणें चार एकर जमीन आटोपली आहे. या ब्यांकींत कोणत्या प्रकारें कामकाज चालतें तें पाहण्यास तिच्या डरेक्टरांची परवानगी घ्यावी लागते. एका स्वदेशीय मित्राच्या द्वारें मी ही परवानगी मिळवून इतर मित्रांस बरोबर घेऊन ही ब्यांक पाहावयास गेलों होतों.

या ब्यांकींत काम चालतें तें पाहून माझी नजर चक्क झाली. सोन्याच्या मोठमोठ्या लगडी शेकडों पडल्या होत्या. एक एक सोळा रत्तल वजनाची व आठ हजार रुपयांच्या किंमतीची, अशा त्या होत्या. नक्त ऐवज तेथें होता तो सर्व सुमारें पंधरा कोटि रुपयांचा होईल. एका मोठ्या खोलींत नाणें तोलीत होते. अहाहा! ती तोलण्याची शैली काय वर्णावी! एका कांट्यांतून प्रति मिनिटास ३३ शिक्के एका मागून एक तोलून होतात! यांत अशी युक्ति केली आहे कीं जो शिक्का वालभर कमी वजनाचा असेल तो आपोआप एका पेटींत जाऊन पडतो, आणि भर वजनाचा असेल तो दुसऱ्या एका मोठ्या पेटींत पडतो. असल्या दहा व इतर ताजव्यांनीं नाणें तोलण्याचें काम मोठ्या झपाट्यानें चालतें. सगळ्या दिवसांत सर्व मिळून सुमारें सत्तर हजार शिक्के तोलून होतात असें सांगतात.

चालू नोटी करण्याचें कामही याच हवेलींत चालतें. नोटींवर नंबर बिनचूक पडतात. सुमारें आठ कोटि रुपयांच्या नोटी फिरत्या असतात. या ब्यांकींत सुमारें हजार मनुष्यें काम करीत असतात. हिचा एक गवर्नर, एक डेप्युटी गवर्नर आणि चोवीस डरेक्टर आहेत. ही ब्यांक इसवी सन १६९४ त स्थापित झाली. अवघ्या इंग्लंड देशांत ही ब्यांक सर्वांत मोठी गणिली आहे.

"रॉयल एक्सचेन्ज" नामक, व्यापारी लोक व सराफ लोक यांस जमण्यासाठीं आणि सवदे करण्यासाठीं फार मोठी आणि सुंदर इमारत आहे. ती, ब्यांक—आव इंग्लंड हिच्या शेजारींच आहे. या इमारतीची शोभा फार मोठी आहे. ही बांधण्यास अठरा लक्ष रुपये खर्च झाला आणि ती १८४४ त बांधिली. तिच्या मध्यभागीं मोठा चौक आहे त्यांत महाराणी विक्टोरिया यांचा संगमरवरी दगडाचा पुतळा उभा ठेविलेला आहे. या इमारतीच्या बाहेरच्या बाजूस दुकानें आहेत तीं भाड्यानें दिलीं असतात.

व्यापारी आणि सराफ लोक दररोज दोनप्रहरांनंतर तीन वाजल्यापासून साडेचार वाजत तोंपर्यंत आंतल्या चौकांत जमतात. त्यांस बसण्यास जागा केलेली आहे. मंगळवार आणि शुक्रवार ह्या दिवशीं काम फार चालतें. रॉथ्सचाल्ड नामक प्रख्यात व्यापारी ह्या इमारतीचा दक्षिणेकडील भाग आटोपून बसतात. एथील टैम्स नामक प्रख्यात वर्तमानपत्राच्या हिंमतदार कर्त्यानें व्यापारसंबंधी एक मोठें तर्कट उघडकीस आणून तो खटला मोठ्या अवसानानें चालविला ह्मणून त्याच्या स्मरणार्थ या ठिकाणीं एका भिंतीवर कांहीं कोरलें आहे.

या इमारतीचा एक मुख्य भाग "लॉइड-सब्स्क्रिप्शन-रूम्स" यांणीं आटोपला आहे. कित्येक मुख्यमुख्य व्यापारी, गलबतवाले आ-

णि विमा उतरणारे एथें दररोज एकत्र जमतात. या मंडळीचें काम नऊ गृहस्थ मिळून चालवितात. हिचे एकंदर दोन हजार मेम्बर ह्मणजे सभासद आहेत. प्रत्येक सभासद प्रतिवर्षी चहूंपासून दहा गिनीपर्यंत वर्गणी भरतो. याशिवाय, मंडळीचा सभासद होण्याचे समयीं अणखी पंचवीस पौंड द्यावे लागतात. या मंडळीचा सभासद नाहीं असा लंडनांत एकही मोठा व्यापारी नसेल. या मंडळीचा प्रतिवर्षी एक लक्ष रुपयांचा खर्च आहे.

"त्रिनिती-हौस" नांवाची दुसरी एक व्यापारी मंडळी आहे. तिचें काम नौकागमनाच्या कामांत सुधारणा व मदत करण्याकडे लक्ष द्यावें हें आहे. तारवें चालविण्याच्या आणि जलमार्गें व्यवहार वाढविण्याच्या कामांत दांड्या, दिवे वगैरे यांविषयीं सूचना व साहाय्य करीत असावें; निराश्रित नावाडी लोकांस अथवा त्यांच्या विधवांस साहाय्य करावें; या मुख्य उद्देशानें ही मंडळी उपस्थित करण्यांत आली. शेरांचे व्यापारी अथवा सट्टेवाले यांची जमण्याची जागा आहे, तिला "स्तॉक एक्सचेंज" अशी संज्ञा आहे. ही इमारतही ब्यांक-आव-इंग्लंड हिच्या जवळच आहे. हिजमधील असामी असल्याशिवाय हींत जाऊं किंवा सट्टा करूं देत नाहींत. तिचे सुमारें साडेआठशें सभासद आहेत. प्रत्येकास वर्षाचे एक हजार रुपये द्यावे लागतात. कोणी दिवाळें काढलें असतां तो रुपयाचे तीन आणे निदान फेडील तरच तींत राहतो, नाहीं तर राहत नाहीं. दलाल लोक शेंकडा दोन आणे दलाली घेतात. नवा सभासद करावयाचा असल्यास जुन्या सभासदांनीं पसंत केला तरच होतो.

याला "रेडिमनी-मार्केट" ह्मणजे रोकड पैशाचा बाजार असें ह्मणतात. प्रत्येक दरवाज्यावर ताकीद लिहिली असते कीं सभासदांशिवाय दुसऱ्या कोणी आंत जाऊं नये. कोणी बेमाहीत मनुष्य आं-

त गेला असतां लागलाच पकडतात. ज्याला सभासद व्हावयाचें असेल त्याणें मंडळीच्या तीन सभासदांची ओळख आणि तीन हजार रुपयांचा जामीन दिला पाहिजे. धान्याच्या व्यापाऱ्यांची जमा होण्याची व सवदे करण्याची "कॉर्न-एक्सचेन्ज" नामक एक निराळी इमारत आहे. याप्रमाणेंच कोळशांच्या व्यापारी लोकांची जमून सवदे करण्याचीही एक निराळीच जागा आहे तिला "कोल-एक्सचेन्ज" असें ह्मणतात. या इमारतीही मोठ्या आहेत.

व्यापारी व सराफ लोकांचीं व इतर ब्यांकींचीं हपिसें "ब्यांक-आव-इंग्लंड" हिच्या जवळच आहेत. एकेका इमारतींत पुष्कळ हपिसें असतात. "ग्रशम-हौस" नांवाची एक मोठी हवेली आहे तींत सुमारें दीडशें हपिसें आहेत. आपल्या एथील कामा वगैरे यांचीं हपिसें याच हवेलींत आहेत. मिस्तर दादाभाई नवरोजी यांचें हपीस "ग्रेट-सेन्ट-हिलन्स" यांत आहे. हीं सर्व हपिसें कांहीं मोठ्या रस्त्यांवर नाहींत. लहान लहान गल्लयाबोळांत देखील मोठमोठ्या व्यापाऱ्यांचीं हपिसें असतात. ज्या हवेलींत हपीस असतें तींत राहण्याची सोय नसते; कारण त्या ठिकाणीं भाडें मनस्वी पडतें, आणि पुनः राहावयास पुरेशी जागा नसते. असें असून आपल्या एथील खोजे लोकांनी तेथें एक पेढी घातली ती व आपलें राहण्याचें ठिकाण एकच केलें होतें.

"ब्यांक-आव्-इंग्लंड" हिच्या आजूबाजूस थोड्या जागेमध्यें व्यापारी लोकांचीं जीं असंख्य हपिसें आहेत, त्यांत कोट्यावधि रुपयांची देवघेव नित्यशः होते. प्रत्येक हपिसाचा नेमलेला सराफ अथवा पेढीवाला असतो त्याच्या एथें त्या हपिसांचें सर्व भांडवल असतें. कोणाला रुपये द्यावयाचे असले तर तो आपल्या या नेमलेल्या ब्यांकीवर चेक ह्मणजे चिटी लिहून देतो. ती चिटी पैसा घेणारा धनी आपल्या ब्यांकींत पाठवितो, आणि शनवारच्या शनवारीं प्रत्येक

ब्यांक आपणाकडून एकेकीवर लिहिलेल्या चिठ्या (चेक) रुजू करून जमाखर्च करून टाकते. याप्रमाणें कोट्यावधि रुपयांची घडामोड केवळ हवाल्यांवर किंवा चिठ्यांवर होते.

या देशांतून कापूस वगैरे जो माल विलायतेस जातो तो बहुतकरून परभारेंच वखारींत उतरतो, आणि फक्त नमुना खेरीज करून व्यापाऱ्यांच्या पाहण्यांत बहुधा येत नाहीं. बसल्या बसल्या, केवळ नमुन्यावरून, तोंडानेंच, कोट्यावधि रुपयांचा व्यापार कांहीं गडबड झाल्यावांचून होतो. पुष्कळ एतद्देशीय व्यापारी आपल्या मालाची खरी हकीकत आपल्या अडत्यांस लिहून पाठवीत नाहींत किंवा नमुन्याप्रमाणें माल पाठवीत नाहींत, यामुळें तद्देशीय व्यापारी आणि एतद्देशीय अडत्ये फार नाखूश होतात, आणि येणेंकरून एतद्देशीय व्यापाऱ्यांचेंही मोठें नुकसान होतें. यामुळें एतद्देशीय व्यापाऱ्यांच्या सचोटीस व पतीस धक्का पोंचतो. यास्तव आमच्या व्यापाऱ्यांनीं याविषयीं सावध राहिलें पाहिजे.

इंग्लंडांत तारवें ठेवण्यासाठीं मोठाल्या गोदी आहेत त्या पाहण्यासारख्या आहेत. एकंदर चार गोदी आहेत त्यांणीं सातशें एकर जागा आटोपली आहे. या इतक्या गोदी बांधण्यास कोट्यावधि रुपये खर्च झाले. ह्या सर्व चालू शतकांतच ह्मणजे सुमारें साठ वर्षांच्या आंत बांधून तयार झाल्या. ह्या कांहीं सरकारच्या पैशानें बांधलेल्या नव्हत, निरनिराळ्या मंडळ्यांनीं खर्च करून बांधल्या आहेत. यांचें उत्पन्न ही याच मंडळ्यांस मिळतें.

"वेस्त-इंदिया-डॉक्स" नांवाच्या गोदीनें २९९ एकर जमीन आटोपिली आहे. ती सन १८०२ त बांधली; तींत तीनतीनशें टनांचीं चारशें तारवें राहतील इतकी जागा आहे. हिची मालकी ईस्त-आण्ड-वेस्त-इंडिया-डॉक कंपनी हिजकडे आहे. हिचें भांडवल दोन-

कोटि रुपये आहे. हिचें उत्पन्न वर्षास तिसांपासून पंचेचाळीस ल-क्ष रुपयांपर्यंत आहे असें ह्मणतात. प्रति वर्षी सुमारें बाराशें तारवें ह्या गोदींत येतात. ईस्त-इंडिया गोदीनें एकुणीस एकर जागा आटोपली आहे.

सेन्ट काथेरिन नांवाची गोदी ही सन १८२८ सांत बांधिली. हिला सुमारें पावणेदोन कोटि रुपये खर्च झाला ह्मणून सांगतात. ही गोदी फार मोठी नाहीं. हिणें सगळी चोवीस एकर जमीन आटोपिली आहे. परंतु ही इतकी खोल आहे कीं हींत सातशें टन वजनाचें गलबत राहतें. हींत प्रतिवर्षी नऊशें जहाजें येतात, आणि हिचें उत्पन्न २६०००० रुपये आहे. लंडन-डॉक नामक गोदी हिजहून मोठी आहे, तिणें नव्वद एकर जागा आटोपिली आहे. तीस चार कोटि रुपये लागले असें सांगतात. तिच्या भिंती बांधण्यासच साडेसहा लाख रुपये लागले. या गोदीच्या मालकांचे भांडवल पांच कोटि रुपये आहे असें ह्मणतात. कोणकोणत्या सम यीं हिजमध्यें तीन तीन हजार मजूर काम करीत असतात. या गोदीच्या वखारींत नेहमीं दारूचा मोठा संग्रह पाहण्यांत येतो. कारण लंडनांत दुर्दैवेंकरून या दुष्ट कैफाचा फारच फैलावा झाला आहे

"कामर्श्यल डॉक" ही सुमारें पन्नास एकर असून इसवी स १८०७ तांत तयार झाली. एक नवीन भव्य गोदी बांधल आहे तिला "व्हिक्टोरिया-डॉक" ह्मणतात. तिणें दोनशें एकर जागा आटोपिली आहे. ती सन १८५४ नांत तयार झाली. त बांधावयास एक कोटि रुपये लागले. कामर्श्यल डॉक हिच्या जव "सरे-डॉक" नांवाची "दुसरी एक गोदी आहे. तिला सगळे दह लक्ष रुपये लागले. या सर्व गोदींमुळें विलायतचा व्यापार थोड्या षांत बहुत वाढला आहे.

## ७. न्यायसभा.

COURTS OF LAW AND JUSTICE.

लंडनांत न्यायसभा दहांपेक्षां अधिक आहेत. "वेस्तमिन्स्तर-हॉल" पार्लमेन्टसभागृहांत आहे, त्यांत सर्वांत मोठी न्यायसभा बसते. वेस्तमिन्स्तर-हॉलाचा दिवाणखाना फारच मोठा आणि सुंदर आहे. तो सुमारें तीनशें फुटी लांब, सत्तर फुटी रुंद आणि शंभर फुटींहून उंच आहे. त्याची मोठी खुबी ही आहे कीं मध्यें एकही खांब नाहीं. "कोर्ट-आव-चान्सरी" ही सर्वांत मोठी न्यायसभा होय. तिच्या खालोखाल "कोर्ट-आव-कीन्स-बेंच" ही आहे. तिसरी "कोर्ट-आव-कॉमन-प्लीझ" आणि चौथी "कोर्ट-आव-एक्सचेकर" ही. या चारही कोडतांवर अपील करावयाचें तर तें "हौस-आव-लॉर्ड्स" ह्मणजे मानकऱ्यांच्या पार्लमेंट सभेंत केलें पाहिजे. मुख्य न्यायाधीश ह्मटला ह्मणजे लॉर्ड चान्सेलर" हा होय. तो "कोर्ट-आव-चान्सरी" यांत बसतो, आणि "हौस-आव-लॉर्ड्स यांत ही तोच प्रमुख होय. त्याला एक लाख रुपयें वर्षासन मिळतें. त्याच्या खालोखाल "लार्ड-चीफ-जस्तिस" हा होय; हा "कोर्ट-आव-कीन्स--बेंच" यांत बसतो. यास ऐंशीं हजार रुपये वर्षासन मिळतें. याच्या खालोखाल न्यायाधीश "चीफ जस्तिस" हा होय. यास वर्षास सत्तर हजार रुपये मिळतात. एथील कोडतांत बारिस्तर लोक सफेत केसांची टोपी आणि काळा लांब झगा घालून बसतात. रूस देशाचा चक्रवर्ती लंडनांत असतां या मोठ्या न्यायसभा पाहावयास गेला, तेव्हां बारिस्तर लोकांचा मोठा समुदाय पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें असें सांगतात.

वेस्तमिन्स्तर-हॉल एथील न्यायसभेंत पुष्कळ थोर व नामांकित मनुष्यांचा न्याय मागें झालेला आहे. सर टॉमस मूर व प्रोटेक्टर सॅमरसेट या प्रख्यात पुरुषांस याच कोडतांतून फाशींची शिक्षा झाली. पहिला चार्ल्स राजा याचा न्याय करून त्यास अपराधी ठरविलें तें

याच कोडतानें. ह्या कोडतांत कित्येक मोठमोठ्या मानकऱ्यांचा न्याय झाला आहे. लॉर्ड बायरन याणें खून केल्याबद्दल त्याचा न्याय झाला. वारन हेस्तिंग्स नामक आपल्या देशाचा (हिंदुस्थानाचा) गवर्नर जनरल याचाही न्याय ह्याच ठिकाणीं झाला, त्या समयीं तेथील मोठमोठे लोक पाहावयास गेले होते.

"ओल्ड-बेली-सेशन-हौस" नांवाचें कोडत न्यूगेटाजवळ आहे. त्यांत दोन कोडतें बसतात, एक नवें आणि एक जुनें. जुन्या कोडतांत वेस्तमिन्स्तर-हॉल एथील एक दोन न्यायाधीश बसतात, आणि नव्यांत "रिकॉर्डर" आणि "कॉमन-सार्जंट-आव-धी-कॉर्पोरेशन-आव-लंडन" हे न्यायाधीश बसतात. हें कोडत पाहावयास जाणारास एकादा शिलिंग कोडताच्या माणसांस द्यावा लागतो.

देण्याघेण्याच्या लहान लहान कज्ज्यांचा निवाडा करण्यासाठीं मेत्रापोलिटन-कौंटी-कोर्ट्स संज्ञक लहान कोडतें आहेत तीं आपल्या एथील स्माल-काज कोडतांसारखीं आहेत. असलीं एकंदर अकरा कोडतें आहेत. यांस पांचशें रुपयांपर्यंत कज्जे तपासण्याचा अधिकार आहे. याशिवाय "ब्यांक्रप्ट्सी-कोर्ट" आणि "इन्सॉलवण्ट-डेटर्स-कोर्ट" नांवांचीं कोडतें नादार देणेदारांची सुटका करण्यासाठीं निराळीं बसतात. हीं दोनही कोडतें निरनिराळ्या ठिकाणीं म्हणजे लंडन शहराच्या निरनिराळ्या भागांत बसतात.

याशिवाय पोलीस कोडतें एकंदर बारा तेरा आहेत. सिटी-पोलीस-कोर्ट हें मान्शन-हौस व गिल्ड-हॉल एथें बसतें. या कोडतांत लॉर्ड मेअर व आल्डरमेन हे न्याय करावयास बसतात. मेत्रापोलिटन पोलीस कोडतें दहा अकरा आहेत. त्यांत तेवीस माजिस्त्रेट बसून न्याय करितात. ज्यांणीं सात वर्षें बारिस्तराचें काम केलें असेल त्यांलाच हा मोठा हुद्दा मिळतो.

ज्यांत कायद्यांचें ज्ञान प्राप्त करून घेऊन बारिस्तर तयार होतात त्यांस "इन्स-आव-कोर्ट आणि "इन्स आव-चान्सरी" असें ह्मणतात. अशा इन्स, अथवा बारिस्तरांच्या कामाचा अभ्यास करण्याच्या शाळा एकंदर चार आहेत. एक "इनर-टेम्पल," दुसरी "मिड्ल टेम्पल," तिसरी "लिंकन्स इन," आणि चौथी "ग्रेझ इन." ह्या चार शाळांवर मिळून तीन हजारांपेक्षां अधिक बारिस्तर आहेत त्यांच्या देखरेखीखालीं शाळांचें काम चालतें. यांत एकवीस वर्षांहून कमी वयाच्या विद्यार्थ्यांस घेत नाहींत. यांत निदान पांच वर्षें राहिलें पाहिजे. यूनिवर्सिटीच्या परीक्षा दिलेल्या विद्यार्थ्यांस तीन वर्षांपेक्षां अधिक दिवस राहावें लागत नाहीं. या चार इन्स-आव-कोर्टांच्या जोडीस आणखी नऊ इन्स्-आव-चान्सरी केल्या आहेत. परंतु आतां ह्यांचा एकमेकींशीं कांहीं संबंध राहिलेला नाहीं.

## ८. पाठशाळा व शाळा.

COLLEGES AND SCHOOLS.

ग्रेटब्रिटनांत विख्यात आणि मुख्य विद्यामंदिरें आक्सफर्ड व केम्ब्रिज एथील होत. हीं विद्यामंदिरें पाहण्याची माझी मोठी इच्छा होती, परंतु पाहणें झालें नाहीं. पण पुनः माझें इंग्लंडास जाणें झालें तर तीं पाहिल्यावांचून परत येऊं नये, असा निश्चय केला आहे. लंडनांत यूनिवर्सिटी-कॉलेजांत वैद्यशास्त्राची परीक्षा दिलेल्या विद्यार्थ्यांस इनामें आणि स्कालरशिप देण्याचा समारंभ झाला, तेव्हां मात्र एकदां मी गेलों होतों. यूनिवर्सिटी कॉलेजाची हवेली बहुत मोठी व भव्य आहे. ही मोठी पाठशाळा सन १८२८ या वर्षी बांधण्यांत आली, आणि ही स्थापण्याचा मान मुख्यत्वेंकरून लॉर्ड ब्रूहम ह्या थोर व नामांकित पुरुषास देणें योग्य आहे. हींत धर्माचा व जातीचा भेद न करितां, सर्व जातींच्या आणि धर्माच्या विद्यार्थ्यांस घेतात.

एक धर्म खेरीज करून, बाकीचे सर्व विषय एथें शिकवितात; आणि विशेषेंकरून वैद्यशास्त्रांत ह्या पाठशाळेनें मोठा मान व नांव मिळविलें आहे.

इनामें देण्याची सभा मे महिन्याची तारीख ११ वी, सोमवार रोजीं तीन वाजतां भरावयाची होती. त्या वेळीं मी गेलों होतों. अध्यक्षस्थानीं डाक्तर पार्त्रिस हे बसले होते. अध्यक्ष भाषण करावयास उठले ते समयीं आणि भाषण करीत असतां, विद्यार्थ्यांनीं पुष्कळ वेळां इतका गलबला व गोंगाट केला कीं त्यांची वर्तणूक माझ्यानें चांगली ह्मणवत नाहीं. स्तब्ध राहण्याविषयीं आणि परदेशस्थांसमक्ष चांगली वर्तणूक ठेवण्याविषयीं सभानायक नम्रतेनें त्यांस बोध करीत असे, परंतु विद्यार्थी आनंदानें टाळ्या वाजविण्यांत आणि हर्षाच्या ध्वनींत त्याचें सांगणें मुळींच मोजीत ना. विद्यार्थ्यांच्या या वर्तणुकीवर दुसरे दिवशीं वर्तमानपत्रांत टीका केलेली माझ्या पाहण्यांत आली. या पाठशाळेंत विद्याभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस "डाक्तर-आव-लॉ," "मास्तर-आव-आर्ट्स," "बाचेलर-आव-लॉ," "बाचेलर-आव-मेडिसिन" आणि बाचेलर-आव-आर्ट्स" या पदव्या लंडन यूनिवर्सिटींतून देण्यांत येतात. हिजमध्यें कितीएक एतद्देशीय विद्यार्थीही अभ्यास करीत आहेत. या कॉलेजाच्या हवेलीच्याच एका निराळ्या भागांत एक शाळाही आहे तिला ज्यूनियर स्कूल ह्मणतात. अभ्यासाची वेळ सवा नऊ वाजल्यापासून पावणेचार वाजत तोंपर्यंत आहे. एथें प्रत्येक विद्यार्थ्यास दरमहा पंधरा रूपये द्यावे लागतात. या शाळेंत इंग्रजीखेरीज अणखी लातिन, ग्रीक, फ्रेन्च, जर्मन, संस्कृत व गैरे शिकविण्यांत येतें. भूगोलविद्या, व्याकरण, गणित, हिशेबठिशेव (अथवा बूक कीपिंग) चित्रविद्या व नृत्यही एथें शिकवितात.

दुसरें विद्यालय आहे त्यास "किंग्स कॉलेज आण्ड स्कूल" असें

ह्मणतात. हें समरसेट-हौस या इमारतीमध्यें पूर्वेकडच्या आंगास आहे. ही पाठशाळाही सन १८२८ तच स्थापित झाली. हींत धर्मसंबंधी विषय शिकविणें हें मुख्य धरितात. एथें वैद्यशास्त्रही शिकवितात. या विद्यालयांत नऊपासून सोळा वर्षांचीं मुलें घेतात. कित्येक विद्यार्थी शाळेंतच जेवणखाण करितात आणि निजतात. ही शाळा "प्रोप्रायटरी" ह्मणजे भागीदारांची आहे. हिजमध्यें प्रत्येक मालकास दोन विद्यार्थी पाठविण्याचा अधिकार आहे.

याशिवाय न्यू-कॉलेज ह्मणून दुसरी एक पाठशाळा आहे; परंतु तींत किंग्स-कॉलेजांतल्याप्रमाणेंच अमुक धर्माचे विद्यार्थी असतील तेच बहुतकरून घेण्यांत येतात. किंग्स-कॉलेजांत "चर्च-आव-इंग्लंड" या पंथाचे, आणि न्यू-कॉलेजांत "इण्डिपेण्डण्ट" या पंथाचे विद्यार्थी घेण्यांत येतात. यूनिवर्सिटी-कॉलेजांत आणि या दोन कॉलेजांत बहुधा समर्थांचे मुलगे असतात. जे गृहस्थांत मोडतात त्यांचे मुलगे धर्माच्या अथवा सरकारी शाळांत बहुतकरून शिकत नाहींत. यूनिवर्सिटी-कॉलेज आणि वर सांगितलेल्या दुसऱ्या दोन पाठशाळा ह्या कांहीं सरकारी नव्हत; कांकीं त्यांचा खर्च बहुत करून त्यांच्या उत्पन्नावर चालतो.

"ग्रामर-स्कूल" या नांवाच्या शाळा सुमारें पंचवीस आहेत. या शाळांत उंच प्रकारचा विद्याभ्यास होतो. यांतही गृहस्थांचीं मुलें असतात. ह्या शाळांत लातिन आणि ग्रीक भाषा मुख्यत्वेंकरून शिकविण्यांत येतात. फ्रेन्च आणि जर्मन याही भाषा या शाळांत शिकवितात. असल्या प्रत्येक शाळेमध्यें बहुतकरून एक तालिमखाना असतो. तेणेंकरून मुलांच्या मानसिक शक्ति प्रफुल्लित होतात त्यांबरोबर शारिर शक्तिही होतात.

"वेस्तमिन्स्तर स्कूल" या शाळेची स्थापना एलिझाबेथ राणीच्या

कारकिर्दीत झाली. या शाळेंतील चाळीस विद्यार्थ्यांस "कीन्स स्कॉलर" असें ह्मणतात. कौपर, लॉर्ड जॉन रसल इत्यादि मोठमोठे नामांकित पुरुष या शाळेंत शिक्षक होऊन गेले. या शाळेचे, वर सांगितलेले चाळीस विद्यार्थी प्रतिवर्षी ख्रिस्तमस सणांत, ज्या राज्यसंबंधी विषयांवर त्या वेळीं वादविवाद चालला असेल त्यावर, किंवा नूतन घडलेल्या गोष्टींवर एक नाटक रचून खेळ करून दाखवितात. हा प्रकार फार वर्षें चालत आला आहे. "सेन्टपॉल स्कूल" नांवाची शाळाही सेन्टपॉल देवळांत पूर्वेकडेस आहे. ही शाळा स्थापून साडेतीनशेंपेक्षां अधिक वर्षें झालीं. हींत गरीब लोकांच्या १५३ मुलांस शिक्षण मिळतें. येशू ख्रिस्ताचा शिष्य सेन्ट पीटर याणें १५३ मासे घेतले यावरून या शाळेंत १५३ च मुलगे असावे असा ठराव झाला! एका गृहस्थानें कांहीं जमीन या शाळेस देऊन तिच्या उत्पन्नांतून शाळेचा खर्च चालवावा असा बंदोबस्त केला. हल्लीं या जमिनीची किंमत ५० हजार रुपये होते. या शाळेंत बारा वर्षांचे मुलगे घेतात आणि कोणाही विद्यार्थ्यास एकुणीस वर्षें झाल्यानंतर ठेवीत नाहींत. मुख्य शिक्षकास दरमहा ५०० रुपये पगार मिळतो. त्याच्या हाताखालीं तीन शिक्षक आहेत त्या प्रत्येकास दोनशेंपासून अडीचशें रुपयांपर्यंत मिळतात. जॉन मिल्टन नांवाचा कविराज हा याच शाळेंत शिकलेला.

निराश्रित मुलांसाठी "क्राइष्टऑस्पिटल" यांत शाळा आहे तिला "ब्ल्यू कोट-स्कूल" ह्मणतात; कारण तींत शिकावयास जाणारे मुलगे, अंगरखे ब्ल्यू ह्मणजे अस्मानी रंगाचे, बंड्या पिंवळ्या रंगाच्या आणि टोप्या काळ्या रंगाच्या घालितात. या शाळेची स्थापना इसवी सन १८२९ त झाली. या शाळेंत मुलांस शिक्षा करावयाची असली तर त्यांस एका दगडाजवळ उभे करून ठेवितात.

"मर्चन्ट-टेलर्स-स्कूल" नांवाची शाळा ही सन १५६१ स्थापित झाली. या शाळेंत दोनशें साठ मुलांस शिक्षण मिळतें, आणि प्रत्येक मुलामागें शिक्षणाचा खर्च प्रति वर्षीं शंभर रुपये होतो. एकुणीस वर्षांच्या आंतल्या वयाचे विद्यार्थी या शाळेंत घेतले जातात. हींत लेखन, वाचन व गणित शिकवितात, त्यांबरोबर हिब्रू व दुसऱ्या प्राचीन भाषाही शिकवितात. त्याप्रमाणेंच फ्रेंच भाषा व इतिहासही शिकविण्यांत येतो.

"सिटी-आव-लंडन-स्कूल" ही शाळा संभावित लोकांच्या मुलांसाठीं सन १८३५ मध्यें स्थापण्यांत आली. हींत व्यापारसंबंधी व इतर कामकाजाविषयीं शिक्षण देण्यांत येतें. या शाळेंत जाणारास दरमहा सुमारें सहा रुपये द्यावे लागतात. हींत इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, लातिन, ग्रीक ह्या भाषा शिकविण्यांत येतात. या शाळेंत वर्षास साडे तीनशें रुपयांच्या उत्पन्नाची एक एक अशा आठ स्कॉलरशिप (विद्यार्थ्यांकरितां पगारी जागा) स्थापिलेल्या आहेत. एक टैम्स स्कॉलरशिप दरमहा पंचवीस रुपयांची आहे. ती टैम्सपत्राच्या स्मरणार्थ स्थापिली आहे. यांशिवाय अणखी पुष्कळ शाळा आहेत.

बोर्डिंग-स्कूल ह्मणजे ज्या शाळेंत मुलांनीं शिकावें आणि राहावें (ह्मणजे शिकावें, खावें, प्यावें, आणि निजावेंही तेथेंच) अशा खासगी शाळा पुष्कळ आहेत. लंडनांत आणि त्याच्या आसपास ९० "फौण्डेशन्-स्कूल्स," ७०० न्याशनल आणि पारिश स्कूल्स, २०० "ब्रिटिश आण्ड फॉरेन स्कूल्स" आहेत. या सर्व शाळांमध्यें कितीएक इन्फंट्-स्कूल्स ह्मणजे बाळकांसाठींही शाळा आहेत. ७०० सण्डेस्कूल्स ह्मणजे आदित्यवारच्या शाळा आहेत. भिकाऱ्यांच्या मुलांसाठीं ९० "रगेड स्कूल्स" आहेत.*

* Pictorial Hand Book of London.

बहुतेक गरीब लोकांच्या मुलांचा विद्याभ्यास चवदा पंधरा वर्षांच्या वयांत बंद होतो, कारण इतकें वय झाल्यावर त्यांस शाळा सोडून पोट भरण्याच्या उद्योगास लागावें लागतें. परंतु त्यांच्या कल्याणार्थ संध्याकाळीं शिकविण्याचे वर्ग काढलेले असतात. निरनिराळे धंदे करणाऱ्या लोकांसाठीं निरनिराळ्या शाळा आहेत त्यांत "स्पेशल एज्युकेशन" ह्मणजे त्या त्या धंद्यांसंबंधीं शिक्षण देण्यांत येतें. आंधळ्यांला शिकविण्यासाठीं लंडनांत एक शाळा आहे, तींत ७५ रूपये दिले ह्मणजे सहा महिन्यांत साधारण बुद्धीचा मुलगा उंचवलेलीं अक्षरें आपल्या हातानें वाचावयास शिकतो.

मुलांच्या शाळा आहेत त्यांप्रमाणेंच मुलींच्याही पुष्कळ आहेत. मोठ्या वायकांसाठीं पाठशाळा आहेत. कित्येक हलक्या शाळांमध्यें मुली व मुलगे एकत्र शिकतात, परंतु चांगल्या शाळांमध्यें मुली मात्र शिकतात, आणि त्यांला शिकविणाऱ्या स्त्रिया असतात. श्रीमान् लोकांच्या मुली फारकरून घरींच शिकतात. स्त्रीशिक्षणांत लिहिणें वाचणें आणि त्याप्रमाणेंच नीति, गायन, चित्रें काढणें, नृत्य, शिवण, कशिदा आणि फ्रेंच भाषा शिकविणें हें मोठें अगत्याचें धरिलें आहे.

मुलांस व मुलींस शिकविण्यास शिक्षक तयार करण्यासाठीं आणि त्यांला त्यांच्या कामास योग्य असें शिक्षण देण्यासाठीं निराळ्याच शाळा आहेत त्यांला "ट्रेनिंग स्कूल्स" ह्मणतात. अशा शाळांत शिकून शिक्षक तयार होतात त्यांस आपलें काम बराबर करावयास समजतें. आपल्या एथें बोर्डिंग स्कूल्स आणि अशा प्रकारच्या शाळा (ट्रेनिंग स्कूल्स) यांची फार गरज आहे. स्त्रीशिक्षक तयार करण्याची फार जरूर आहे, यास्तव नॉर्मल स्कूल अथवा अशी पाठशाळा आपल्या एथें अवश्य स्थापिली पाहिजे.

## ९. क्लब-हौसेज.

CLUB-HOUSES.

परस्पर स्नेहाची वृद्धि करण्यासाठीं आणि कर्मणूक व ज्ञान करून घेण्यासाठीं कांहीं लोक मिळून एक "क्लब" (समाज) उपस्थित करतात, आणि ते ज्या ठिकाणीं मिळतात त्यास "क्लब-हौस" (समाजगृह) ह्मणतात. मोठीं बांधलेलीं अशीं सुमारें तिसांपेक्षां अधिक क्लब-हौसेज अथवा क्लबांचीं निरनिराळीं घरें आहेत. हीं घरें कांहीं साधारण किंवा अशींतशीं नव्हत.

पूर्वींच्या क्लबांत आणि हल्लींच्या क्लबांत बहुत अंतर आहे. शंभर वर्षांपूर्वीं विलायतेमध्यें क्लबें होतीं त्यांचा मुख्य उद्देश हा असे कीं, कित्येक मित्रांनीं सगळा दिवस काम करून थकून गेले असतां एक ठिकाणीं मिळून विसावा घ्यावा, आणि सुखाच्या गोष्टी सांगून वेळ घालवावा. कित्येक क्लबांत आठ नऊ मेम्बर ह्मणजे सभासद असत आणि कित्येकांत तीस पस्तीस असत. ते आठ पंधरा दिवसांनीं जेवणाचा बेत करून सर्व एकत्र जेवीत, आणि चांगल्या विचारांच्या गोष्टी सांगून कर्मणूक करून घेत असत; अशा समयीं बुद्धिवर्धनापेक्षां मद्यपानवर्धन अधिक होत असे.

परंतु आतां विलायतेंत जीं प्रख्यात क्लबें आहेत तीं याहून निराळ्याच प्रकारचीं आहेत. हल्लींच्या क्लबांच्या रीतिभाती भिन्न आहेत इतकेंच नाहीं, तर तीं बहुतकरून फार मोठ्या योग्यतेचीं आहेत. त्यांत लोक आठ पंधरा दिवसांनीं मिळण्याच्या बद्दल, तीं आतां लोकांनीं नेहमी एकत्र मिळण्याचीं आणि ज्ञान व कर्मणूक करून घेण्याचीं मुख्य स्थळें झालीं आहेत. आतां, एका क्लबांत आठ दहा किंवा तीस पस्तीस स्नेही जमण्याच्या बद्दल, पांचशें सहाशेंपासून पंधराशें पर्यंत लोक असतात. हल्लींच्या प्रत्येक मोठ्या क्लबांत निजण्याची

सोय चांगली असतेच, परंतु अणखी श्रीमानांच्या घरांस शोभेल अशी सर्व प्रकारें तजवीज पाहण्यांत येते.

क्लब-हौसांत मुख्य दोन दिवाणखाने असतात, एक वर्तमानपत्रें वाचण्याचा आणि दुसरा कॉफी प्यावयास बसण्याचा. यांशिवाय एक पुस्तकांची, एक लिहिण्याची, एक ड्राइंगरूम ह्मणजे संध्याकाळीं सर्वांनीं एकत्र बसण्याची खोली, एक गंजिफा खेळण्याची आणि एक बिल्यर्ड खेळण्याची खोली, एक पोशाक करण्याची व ठेवण्याची, एक एकांतीं जेवावयास बसण्याची, एक तमाखू ओढण्याची, एक कमिटी बसण्याची, अशा अनेक प्रकारच्या सामानानें व शृंगारानें सुशोभित केलेल्या जागा कोणत्याही क्लब-हौसांत दृष्टीस पडतील. याशिवाय आणखी जेवणाचा दिवाणखाना आणि आंघोळीची खोली असते ती निराळीच.

या क्लबांत ह्मटलें ह्मणजे उत्तम प्रतीचें भोजन व उत्कृष्ट पक्कान्नें केवळ रस्त्यांत थोड्या पैशानें मिळतात. असें उंचें जेवण कोणीही आपल्या घरीं जेवीन ह्मणेल तर त्याला याहून फार खर्च पडेल. कोणी एक सभासद क्लबांत जेवला तर त्याचा खर्च निराळाच द्यावा लागतो. घरभाडें व चाकर लोकांचा वगैरे चालू खर्च, पहिल्यानें सभासद होतेवेळीं "फी" व नंतर वार्षिक वर्गणी भरतात, तींत भागतो. ह्या क्लबांचा कारभार कांहीं अडचण किंवा धांदल झाल्यावांचून सुरळीत चालतो. त्यांचें सर्व काम केवळ यंत्राप्रमाणें एकसारखें चालतें. प्रत्येक मनुष्यास अशा रीतीनें निरनिराळें काम लावून दिलेलें असतें कीं कोणास आळस करावयास वेळच मिळत नाहीं.

एका क्लबाचे मुख्य चार कारभारी असतात; एक सेक्रेटरी (चिटणीस), एक पुस्तकालय संभाळणारा, एक कोठीवाला आणि एक घर संभाळणारा. याशिवाय दरवाज्याची रखवाली करणारा अथवा लोकांला आंत

आणणारा नेणारा, एक झाडणारा, एक बुटलेर व एक दुय्यम बुटलेर, एक स्वयंपाकावरील कारकून, कितीएक स्वयंपाकी, कितीएक कामकरिणी, कित्येक हाताखालचे चाकर असेही असतात. ही सर्व पगार देऊन ठेविलेलीं माणसें असतात. यांजवर देखरेख करण्यासाठीं सभासदांपैकीं कित्येकांची, व्यवस्थापकांच्या कामांवर पाळीपाळीनें योजना होते. ही व्यवस्थापक मंडळी खर्चाचा वगैरे नीट हिशेब ठेविते, आणि वर्षांत ते हिशेब बारकाईनें तपासून पाहणारे निराळे "आडिटर्स" (तपासनीस) नेमण्यांत येतात.

कित्येक मुख्य मुख्य गोष्टींत ज्यांचे विचार एक, व योग्यता सारखी, असे गृहस्थ मिळून एका क्लबाचे सभासद होतात. ते पुष्कळ अगत्याच्या विषयांवर तोंडानें वादविवाद करून आपापला अभिप्राय दर्शित करितात, तेणेंकरून मनास विश्रांति आणि ज्ञान हीं दोनही प्राप्त होतात. आपले गवर्नर सर बार्टल फ्रीयर यांणीं एका प्रसंगीं भाषण केलें त्यांत ह्या क्लबांविषयीं असें ह्मटलें कीं:—

"I have frequently thought they (the Clubs) take a very important part in preparing Englishmen for that political life which is more or less the lot of every one of us. We are trained in our Clubs to habitual respect for the verdict of the majority. When a question has once been fairly discussed and voted on and decided, there is for the time at least an end of it in every well ordered Club, and this alone is a habit of no small value in political life. Then, again, in every club there is habited respect for the authority of the ruling body chosen by the members themselves as the most fit to govern them."*

*Speech of H. H. Sir Bartle Frere.*

* Times of India; February, 16, 1867.

याचा अर्थ—"इंग्रज ह्मटला ह्मणजे त्यास थोडें बहुत राज्यप्रकरणांत पडावें लागतेंच, त्यासाठीं त्यास तयार करण्यांत क्लबांकडून मोठें साहाय्य होतें. कोणत्याही बाबतींत अधिक मतें जिकडे पडतील त्या पक्षाचा आदर करून चालण्याचा अभ्यास आपणास क्लबांत होतो. कोणत्याही गोष्टीविषयीं चांगल्या रीतीनें वादविवाद होऊन तिजविषयीं मतें घेऊन एकदां निर्णय झाला, ह्मणजे तूर्त त्या गोष्टीचा निकाल झाला असें सर्व व्यवस्थित क्लबांमध्यें समजतात. अशा प्रकारें वर्तण्याची सवई राज्यप्रकरणांत मोठ्या अगत्याची आहे. दुसरें अणखी क्लबाची व्यवस्था करण्यास सर्वांत योग्य ह्मणून आपणच ज्यांची योजना केली त्यांस मान देऊन चालण्याची सवई लागते तीही मोठी उपयोगी आहे."

एक ग्रंथकार असें ह्मणतो कीं:—

"The moral influence of club life is, upon the whole, a favourable one; if there be no longer that heartiness of sociality which characterized the clubs of the last century, there is more of the polish of gentlemanly manners and decorum and infinitely less of intemperance, or rather intemperance is banished altogether as a low and disgraceful vice, and what, if openly indulged in so as to exhibit its effects, would disqualify for companionship, and lead to loss of caste."

यांतील सारांश—नीतिदृष्ट्या क्लबांपासून एकंदरीनें चांगलेंच होतें. शंभर वर्षांपूर्वींच्या क्लबांत मौजाळूपणा होता तसा आतांच्या क्लबांत नाहीं, तथापि आतां सभ्यपणाची रीतभात अधिक असून मद्यपान वगैरे कमी होतें. अति मद्यपान करणें हें आतां फार हलकट व लाजीरवाणें समजतात, आणि त्याचा अवगुण दृष्टोत्पत्तीस येई इतकें तें करणारा कोणी सभासद आढळला असतां तो जातिभ्रष्टच झाला काय असें समजून क्लबांतून काढून टाकला जातो.



ऑक्सफर्ड-आण्ड-केम्ब्रिज-क्लब-हौस.

मोठें व शोभायमान असें क्लबहौस बांधाव-यास फार खर्च लाग-तो. कोणत्याही क्लबा-चा सभासद होण्याब-द्दल आधीं १००पासून ३०० रुपयांपर्यंत, आ-णि नंतर वर्षाचे ६० पासून १०० पर्यंत द्यावे लागतात; परंतु नुसतें घर बांधण्यासच एक लक्षापासून दहा लक्ष रुपयांपर्यंत खर्च होतो. तो करण्यास ते लोक मागें पुढें पाहत नाहींत. एक क्लब-हौस नुसतें रंगविण्याचाच खर्च २६००० रुपये झाला.

बहुतेक क्लबें श्रीमान् व मधल्या प्रतीच्या लोकांसाठीं आहेत. प-रंतु गरीब लोकांसाठींही एक दोन क्लबें उपस्थित झालीं आहेत. व्हिटिंग्लटन क्लब हें गरीब लोकांनींच आपापसांत काढलें आहे. कि-त्येक क्लबें विद्यार्थ्यांचीं, कित्येक लश्करी कामदारांचीं आणि कित्येक राज्यप्रकरणीं एक विचारानें वागणाऱ्या लोकांचीं आहेत. इंग्लंडांत टोरी आणि व्हिग असे राज्यप्रकरणी दोन मोठे पक्ष आहेत, आणि किती एक क्लबें टोरी पक्षाचीं व कित्येक व्हिग पक्षाचीं आहेत. कि-त्येक क्लबांत परक्यांस जेवावयास घेतात, कित्येकांत घेत नाहींत. क्लबांत बहुतकरून पुरुष असतात, स्त्रिया असत नाहींत. मी एका मित्रासमागमें एका इंग्लिश गृहस्थास भेटावयास त्याच्या क्लबांत गेलों होतों तेव्हां त्यांतील शोभा पाहून फार विस्मय पावलों.

## १०. प्रवाशांकरितां भटारखाने.

HOTELS.

प्रवाशांस उतरण्यासाठीं जागोजाग हाटेल ह्मणजे सुंदर भटारखाने बांधलेले आहेत. आपल्या एथें प्रवाशांसाठीं धर्मशाळा बांधण्याची रीत आहे. या धर्मशाळांत बैरागी उतरतात आणि गृहस्थही उतरतात. ह्या भिकारी धर्मशाळांची कोणत्याही प्रकारें हॉटेलांशीं तुळणा होणार नाहीं. याप्रमाणेंच आपल्या देशांतील "पोचखान्यां"च्यानेंही विलायतेंतील हॉटेलांची बरोबरी करवणार नाहीं. मला असें आठवतें कीं एक वेळ सुरतेंतील एका पारशानें "फर्ष्ट-क्लास-हाटेल" बांधावयास जागा द्यावी ह्मणून सरकारास अर्जी केली होती, त्यास सरकारांतून असा जबाब मिळाला कीं तुम्ही विलायतेस गेलां नसलां तर फर्ष्ट-क्लास-हाटेल कसें असतें हें तुम्हास ठाऊकच नसेल.

हॉटेलाचें बाहेरचें स्वरूप सुंदर असतें त्याप्रमाणेंच आंतल्या डामडौलांतही कांहीं कमी नसतें. कोणत्या एकाद्या हॉटेलांत प्रथमच जावें तेव्हां हें कोणा अत्यंत मोठ्या श्रीमंताचें घर असेल असें आपणांस वाटतें. मोठ्या रुंद जिन्यावर गालिचे घातलेले आणि सुंदर पुतळ्यांच्या हातीं दिवे देऊन ते दादराच्या चौकावर ठेविलेले असतात. गाडींतून उतरतांच आपलें सामानसुमान उंचलून नेण्यास माणसें तयार असतात. आपलें नांव मात्र लिहून द्यावें ह्मणजे रिकाम्या खोलीची किल्ली घेऊन एक जण आपणास आंत घेऊन जातो. कोणत्या खोल्या रिकाम्या आहेत आणि कोणत्या भरलेल्या आहेत याचा बरोबर हिशोब ठेविलेला असतो. आपण आपल्या खोलींत जातांच आंतील व्यवस्था पाहून थक्क होऊन जातों. सुंदर

सोनेरी छप्पर पलंगावर मऊ ऊबदार बिछाना घालून ठेविलेला आहे; एक मोलवान गालिचा घातला आहे; टेबल व खुर्च्या मांडून ठेविल्या आहेत; साबू, पाणी व टोविल ह्मणजे हात व तोंड पुसावयाचा रुमाल तयार आहे, तोंड धुवावयाचें भांडें साफ व स्वछ करून ठेविलेलें आहे; आणि तोंड पाहण्याचा आरसा टांगून नीट व्यवस्थेनें ठेविला आहे. सारांश, प्रवाशास ज्यांची गरज लागणार अशा थोड्याच परंतु सुंदर वस्तु मोठ्या बेतावातानें ठेवून अशा अनेक खोल्या सुशोभित केल्या असतात.

अशी सुखावह खोली आपण वापरावी तिचें भाडें दोन, किंवा फार झालें तर, चार शिलिंग दिवसास पडतें. दोन शिलिंग ह्मणजे एक रुपया; परंतु या एका रुपयांत थकून गेलेल्या प्रवाशास किती सुख प्राप्त होतें! शौचविधि करून आणि तोंड व हात धुवून, वस्त्रें साफ करून अथवा दुसरीं घालून खालीं उतरून जेवणाच्या अथवा चहा घेण्याच्या शृंगारलेल्या दिवाणखान्यांत जावें, ह्मणजे चहा, दूध, वगैरे जें मागावें तें तयार असतें. कांहीं नवें जुनें वर्तमान समजण्याचें अगत्य असल्यास वर्तमानपत्रें जवळ आहेतच. एक चाकर सर्वदां आपल्या खिजमतीस असतो तो बहुतकरून आपणापाशीं उभा असतो. तो कोण्या वेळीं त्याच जागीं अंमळ बसला असला आणि आपणास कांहीं काम लागलें, तर आपण "वेटर" ह्मणून हाक मारावी ह्मणजे तो "सर" ह्मणून तत्क्षणीं येऊन जवळ उभा राहतो. आपण निजावयाच्या खोलींत असतां चाकराची गरज लागली तर घांटेची कडी फिरवावी, ह्मणजे कामकरीण किंवा दुसरा कोणी तरी चाकर आपल्या जवळ येऊन हजर होईल. खोलीचा नंबर घांट असते तेथें लिहिलेला असतो, ह्मणून ज्या नंबराची घांट वाजते त्याच नंबराच्या खोलींत कामकरीण किंवा चाकर जाऊन हजर होतो.

जेवणाचे व चहा पिण्याचे अनेक निरनिराळे दर असतात. मद्यावांचून ज्यांचें चालतें त्यांचा पुष्कळ खर्च वांचतो. खावयास फळें मागितलीं असतां लागलींच आणून ठेवितात. खाण्याचे सर्वोत्कृष्ट पदार्थ हॉटेलांत मिळतात. प्रत्येक भोजनसमयीं धुवट टॉवेल (रूमाल) आणून टेबलावर ठेविला असतो. ज्यांला सर्वांबरोबर जेवावयाचें नसेल ते एका वेगळ्या टेबलावर जेवितात. त्यांच्या खर्चाचा आंकडा किंचित् अधिक होतो. आपण जें जें खातों तें तें चाकर आपणच जाऊन लिहून ठेवितो, आणि आपण जावयास तयार झालों ह्मणजे आपल्या हातांत बिल (याद) देतो. मोठ्या प्रतिष्ठित हॉटेलांत ठरविलेला एक दर असतो. हॉटेलांत दर पुसण्याची किंवा ठरविण्याची बहुतकरून रीति नाहीं.

कित्येक हॉटेलांत तीन तीनशें उतारूंचा समावेश होतो. लंडनांत सगळ्यांत मोठें "वेस्तमिन्स्तर" हॉटेल यांत ३०० खोल्या आहेत; पारिसमधील "डीलुवर" हॉटेलांत अगोदर सांगितल्याप्रमाणें ८०० खोल्या आहेत. याशिवाय अणखी पुष्कळ मोठमोठीं हॉटेलें लंडनांत आहेत, त्यांत "ग्रेट-वेस्तर्न-रेलवे-हॉटेल," "विक्टोरिया हॉटेल" "क्लारेण्डन हॉटेल" वगैरे मुख्य आहेत.

## ११. नाहण्याचीं व धुण्याचीं ठिकाणें.

BATHS AND WASH HOUSES.

आपल्या देशांतल्याप्रमाणें तळ्यावर अथवा विहिरीवर उघड्या जागीं सर्वांदेखत आंघोळ करण्याची अथवा धुण्याची रीत विलायतेंत मुळींच नाहीं. नाहण्याधुण्यासाठीं सुंदर जागा बांधलेल्या असतात त्यांत पाहिजे त्याणें दोन आणे, चार आणे किंवा आठ आणे देऊन स्नान करून यावें. कित्येक राहावयाच्या घरांत आंघोळीची

जागा मुळींच नसते, आणि कित्येकांस चांगल्या रीतीनें आंग धुण्यास सांपडत नाहीं. तसेंच हॉटेलांत उतरणाऱ्या लोकांस बहुधा तेथेंच स्नान करावयास सांपडत नाहीं, ह्मणून अशा बांधलेल्या स्नानालयीं पुष्कळ लोक संतोषानें पैसा देऊन जातात.

मी सात आठ वेळां अशा ठिकाणीं स्नान करावयास गेलों होतों. अशा घरांत जातांच आंत एक मोठा चौक लागतो. चौकाच्या सभोंवार लहान लहान खोल्या असतात. ज्यामध्यें पाण्यांत सपसल पडून स्नान करतां येईल असें एक लांब पात्र प्रति खोलींत असतें. त्यांत दोन नळ्या असतात, एक ऊन्ह कढत पाण्याची आणि एक थंड पाण्याची. आंघोळीच्या खोलींत साबू व टोवेल तयार असतोच. आंगावरचीं मुख्यमुख्य वस्त्रें बाहेर चौकांत काढून ठेवून खोलींत जावें, आणि अर्धा पाऊण तासपर्यंत पाहिजे तितक्या पाण्यांत आंग धुवावें. कित्येक स्नानगृहें मोठीं असून त्यांत पोहण्याचीही सोय केलेली असते. सर्व खोलीचें दार लावून स्नान करतात तरी स्त्रियांची नाहावयाची जागा निराळीच असते. कितीएक स्नानगृहें फक्त पुरुषांसाठींच किंवा फक्त बायकांसाठींच अशींही असतात.

हीं नाहण्याचीं व धुण्याचीं ठिकाणें बांधिलीं त्याला सुमारें वीस वर्षें झालीं. हीं बहुतेक गरीब लोकांसाठीं आहेत. अशा स्थळीं नाहण्याधुण्यांत गरीब लोकांस मोठी सोय व फायदा आहे. धुण्याच्या जागीं वस्त्रें धुऊन वाळविण्याची आणि त्यांस इस्त्री करण्याची चांगली तजवीज केलेली असते. वेस्तमिन्स्तर नांवाचें जें नाहण्याधुण्याचें नवें घर बांधलें आहे त्यांत नाहण्याच्या ६४, आणि धुण्याच्या ६० खोल्या आहेत. तें बांधावयास एक लक्ष तीस हजार रुपये लागले. आपल्या देशांत अशा स्थळांची फार गरज आहे.

## १२. आगगाडीचीं ष्टेशनें.

RAILWAY STATIONS.

लंडनांत सहा मोठीं आगगाडीचीं ष्टेशनें आहेत. याशिवाय अणखी शाखांचीं आहेत तीं निराळींच. याप्रमाणेंच अण्डर-ग्रौण्ड-रेलवे ह्मणजे भुईंतून आगगाडीची सडक बांधली आहे तिचीं ष्टेशनें निराळींच आहेत. सर्वांत मोठें रेलवे ष्टेशन लंडन-आण्ड-नॉर्थ-वेस्टर्न-रेलवेचें हें होय. रेलवेच्या एका चक्रानें १२ एकर आणि दुसऱ्यानें तीस एकर जागा आटोपली आहे, आणि दोहोंस मिळून ऐशीं लक्ष रुपये खर्च झाले. दुसरीं चक्रें लंडन-ब्रिज, किंग्स-क्रॉस, ग्रेट-वेस्टर्न-विक्टोरिया आणि चेरिंग-क्रॉस हीं आहेत. ग्रेट-वेस्टर्न-रेलवेचीं ष्टेशनें दिसण्यांत मोठीं सुंदर आणि भव्य अशीं बांधलीं आहेत.

प्रत्येक चक्रावर जाहिरातींच्या मोठ्या पाट्या मारल्या असतात. आपल्या एथील रेलवे ष्टेशनांवर दोनही बाजूंच्या प्लाटफॉर्मांजवळ भिंतींत मोठे फळे मारले असतात ते जाहिरातींसाठीं असतात. विलायतेमध्यें असे फळे मोठ्या तकाकीदार रंगीत अक्षरांनीं लिहिलेल्या तऱ्हातऱ्हाच्या जाहिरातींनीं भरलेले असतात. आगगाडीच्या प्रत्येक चक्रावर पुस्तकें व वर्तमानपत्रें विकण्याचें दुकान असतें. जो सर्व रेलवे कंपन्यांपासून अशीं दुकानें घालण्याचें कंत्राट घेतो त्याला वर्षास मोठी प्राप्ति होते. अशा रीतीनें लक्षावधि वर्तमानपत्रें व नवलांचीं पुस्तकें खपतात. आगगाडींत बसून दूर जाणारास गाडींत वेळ घालविण्यासाठीं वर्तमानपत्रास आणा दोन आणें आणि पुस्तकांस अर्ध रुपया किंवा बारा आणे खर्च करणें बहुधा कठीण वाटत नाहीं.

रेलवे ष्टेशनांवर मेवामिठाईचेंही एकेक दुकान असतें. कोणा उतारूस भूक लागली असतां, कोणत्याही चक्रावर त्याला "रिफ्रेशमे-

ण्ट" मिळावयास कांहीं अडचण पडणार नाहीं. ज्या मोठ्या ष्टेश-
नांवर रिफ्रेशमेण्ट घेण्यासाठीं गाडी अधिक उभी राहते तेथें मेवा-
मिठाइचींही मोठमोठीं दुकानें असतात. याशिवाय ष्टेशनांवर उतारू
लोकांस बसण्यासाठीं खोल्या असतात त्याही मोठ्या सुखावह अस-
तात. थंडीच्या दिवसांत शेकावयास शेगडीही असते. कित्येक
ष्टेशनांवर पुतळे आहेत. लंडन-आण्ड-नॉर्थ-वेस्तर्न-ष्टेशनावर रॉवर्टष्टी-
फन्सन याचा पुतळा आहे. या चक्रावर कामाचा झपाटा पाहून को-
णासही आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं.



# प्रकरण ५.

## V—PRINCIPAL INSTITUTIONS AND SIGHTS

# मुख्यमुख्य ज्ञानालयें व पाहण्याचीं स्थळें.

लंडनांत ज्ञानालयें आणि पाहण्याचीं स्थळें बहुत आहेत. लंडन इतकें मोठें आहे आणि त्यांत इतकें पाहण्यासारखें आहे कीं लंडनांत फिरणें ह्मणजे जणूं काय संपूर्ण पृथ्वीवर फिरण्यासारखेंच आहे. लंडनांत जन्मून लहानाचे मोठे झालेले अशा लोकांसही लंडनाची पुरती माहिती नाहीं असें मी तेथील कित्येक इंग्रज लोकांच्या तोंडून ऐकिलें आहे. एकानें असें सांगितलें कीं मी अजून टेम्स नदीखालचा विवरमार्ग पाहिला नाहीं. दुसऱ्या एकानें असें सांगितलें कीं मी अजून जमिनीखालच्या आगगाडींत बसलों नाहीं. यांत विशेष आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. अमुक एका नेमलेल्या अवधींत जितकें होईल तितकें पाहून घेण्याविषयीं कोणीही प्रवासी जशी उत्कंठा व काळजी बाळगतो तशी नेहमीचा रहिवासी बाळगीत नाहीं. “उद्यां पाहूं, पुढल्या शनवारीं पाहूं, नाहीं तर त्याच्या पुढल्या शनवारीं खचित पाहूं”, असें ह्मणतां ह्मणतां तो कदाचित् कधींच पाहत नाहीं.

### १. पदार्थसंग्रहालयें.

MUSEUMS.

ब्रिटिश म्यूझियम—मी सुमारें चार वर्षें इंग्रजी शाळेंत आणि अडीच वर्षें पाठशाळेंत अभ्यास करीत होतों तितक्या काळांत झालें नव्हतें असें कांहीं ज्ञान हें ब्रिटिश म्यूझियम पाहिल्यानें मला प्राप्त

झालें. मी ज्या पदार्थांचीं नांवें मात्र ऐकिलीं होतीं असे अनेक आणि अगदीं नवे असे दुसरे सहस्रावधि पदार्थ या ठिकाणीं माझ्या दृष्टीस पडले. एथें सहस्रावधि तर काय, परंतु लक्षावधि वस्तूंचा संग्रह केला आहे. आपणास जी वस्तु पाहण्याची इच्छा असेल ती बहुधा या संग्रहालयांत नाहीं असें व्हावयाचें नाहीं. सर्वांत जुनी वस्तु पाहावयाची असली, अथवा सर्वांत नवी पाहावयाची असली, तर ती एथें दृष्टीस पडेल.

या संग्रहालयात गेल्यावर आपणास असें होतें कीं काय पाहूं आणि काय न पाहूं! हें आधीं पाहूं कीं तें पाहूं! ह्या कामांत आपणास एक दिवसाहून अधिक काळ घालवणें नसलें, तर आपला असा गोंधळ झाल्यावांचून राहणारच नाहीं. फार प्राचीन काळीं इराण, मिश्र, युनान इत्यादिक देशांतील लोक कसे होते, त्यांचीं शस्त्रें व सामान सुमान कोणत्या प्रकारचें होतें, तें सर्व या ठिकाणीं दृष्टीस पडतें. प्राचीन काळच्या मिश्रदेशीय लोकांची गाडी कशी होती ती एथें पाहण्यांत येते. हे लोक प्रेतांत सुगंधी पदार्थ भरून तीं लांकडाच्या पेट्यांत घालून घरांत ठेवीत असत. या प्रेतांस ते लोक "ममी" ह्मणत असत. पुरातन काळच्या अशा किती एक ममी सांपडल्या त्या या संग्रहालयांत आणून ठेविल्या आहेत. या पेट्यांवर बाहेर प्रेताचें चित्र कोरून काढलें असतें.


ममी

मिश्र देशचा प्रख्यात राजा रेमिसिस याचीं किती एक चित्रें एका मोठ्या दिवाणखान्यांत भिंतीवर अस्सलबरहुकूम कोरून काढलीं आहेत. तींही एथें पहावयास मिळतात. एका चित्रांत हा राजा युद्धाच्या रथांत बसला आहे; दुसऱ्या चित्रांत तो सिंहासनावर बसला

आहे; त्याच्या समोरच्या भिंतीवर, त्याणें एशिया खंडांतील राजांस जिंकून जय मिळविला त्याचीं चित्रें पाहण्यांत येतात. एक बंदीवान ह्याच्या पायीं पडत असतां हा त्याचें मस्तक छेदीत आहे असें एक चित्र काढलें आहे. एका चित्रांत त्याणें आपल्या पुढें बंदीवान उभे केले आहेत असें दाखविलें आहे. ज्यांणीं इतिहासाचा अभ्यास केला असेल, त्यांस अशा पुरातन काळच्या वस्तूंचे हुबेहूब आकार या ठिकाणीं पाहून फारच आनंद होतो.



रेमिसिस आणि बंदीवान.

आशुरी लोकही प्राचीन काळीं मोठे प्रख्यात होऊन गेले. त्यांच्या देशांतील पुरातन वस्तूंचाही एथें मोठा संग्रह केला आहे. ते लोक पुतळे करण्याच्या कामांत फार कुशल अशी आख्या होती; ते एक विचित्र आकृतीचा पुतळा करीत असत, आणि त्यांत आपलें कौशल्य फार दर्शवीत असत. ते मोठाल्या घोरपडींस किंवा सिंहांस पक्ष लावून त्यांचें तोंड मनुष्यासारखें करीत असत. असा एक मोठा पुतळा ह्या संग्रहालयांतील एका खोलींत जातांच दृष्टीस पडतो.

या काळीं या देशच्या राजाचा पोशाक कसा होता हें जाणावयाचें असलें तर तोही एथें पाहण्यांत येतो. सारांश, प्राचीन काळच्या प्रख्यात प्रख्यात देशांतील लोक, त्यांचे देव, राजे, तारवें, नावा, शेतकीचीं आवतें, व युद्धाचीं शस्त्रें, त्यांचे पोशाक, भांडींकुंडीं, दागदागिनें, वाद्यें किंवा वाजंत्रें, राहण्याचीं घरें, आणि भिन्न भिन्न विद्या कलाकौशल्यें इत्यादिक कशीं होतीं, त्या अवस्थांचीं स्वरूपें आणि नमुने या संग्रहालयांतील खोल्यांत दृष्टीस पडतात.

हिंदु देवांच्या अनेक मूर्तींचा संग्रह केला आहे; त्यांत बौद्ध मूर्तींही आहेत. या खोलींत जातांना आह्मांस असें वाटलें कीं कोणा मोठ्या हिंदु देवालयांत अनेक निरनिराळ्या देवांच्या मूर्तींचें दर्शन करण्यासच हे इतके लोक आले आहेत. विष्णूच्या निरनिराळ्या अवतारांच्या निरनिराळ्या मूर्ति आहेत.

किती एक खोल्यांमध्यें निरनिराळ्या अनेक धातूंचा मोठा संग्रह करून ठेविला आहे. जमिनींतून खणून काढलेले धातु शुद्ध करण्यापूर्वीं कसे दिसतात, व त्यांचा रंग कसा असतो, त्यांचे आणि साफ व शुद्ध केलेल्या धातूंचे नमुने एथें ठेविले आहेत. कोहिनूर वगैरे किती एक मोठ्या प्रसिद्ध हिऱ्यांसारखेच खोटे हिरे करून त्या खऱ्या हिऱ्यांचें स्वरूप दाखविण्यासाठीं एथें ठेविले आहेत. किती एक खोल्यांत निरनिराळ्या जातींच्या दगडांचे नमुने भरून ठेविले आहेत. आकाशांतून पडलेले दगड ज्यांला तारे पडले असें ह्मणतात त्यांचाही एथें संग्रह आहे. असल्या एका मोठ्या दगडाचें वजन १४०० रत्तल आहे. किती एक खोल्यांत भिन्न भिन्न वनस्पतींचा व औषधींचा पाहण्यासारखा मोठा संग्रह केला आहे.

किती एक खोल्यांत "फॉसिल" ह्मणजे झाडें किंवा प्राण्यांचीं शरीरें बहुतकाळ जमिनींत राहून पाषाणरूप होतात, त्यांचाही मोठा चमत्कारिक संग्रह एथें पाहण्यांत येतो. याप्रमाणें पाषाणरूप झालेले कितीएक प्राणी अशा प्रकारचे सांपडले आहेत कीं तसे जिवंत प्राणी आज काळीं पृथ्वीवर कोठेंही आढळत नाहींत. एक "फॉसिल" जनावर असें



एक "फॉसिल" जनावर.

विलक्षण आहे कीं त्याचें तोंड हत्तीसारखें असून शरीराचे इतर अवयव डुकरासारखे दिसतात. एका हरणाच्या जातीच्या "फॉसिल" प्राण्याच्या हाडांचा पिंजरा आणि घोडा वगैरे पशूंच्या हाडांचे पिंजरेही एथें पाहण्यांत येतात.

परंतु सगळ्यांत अगत्याचा आणि साधारण बुद्धीच्या पाहणारासही संतोष व आश्चर्य उत्पन्न करणारा असा सिद्धपदार्थांचा संग्रह आहे तो होय. यांत सर्व प्रकारचे पशुपक्षी दृष्टीस पडतात. ते पाहतांच आपल्या मनांत असें येतें कीं हे इतके जिवंत प्राणी एथें कसे आणिले असतील. परंतु थोडक्यांतच आपली खात्री होते कीं हे कांहीं जिवंत प्राणी नव्हत. ते जसे काय जिवंतच आहेत किंवा त्यांत प्राण मात्र घालावयाचा आहे असे दिसतात. या सर्व पशुपक्ष्यांच्या आंगाची चामडी आणि त्यांचें सर्व शरीर खरोखरच मुळचें आहे, परंतु त्यांच्या कलेवरांत गवत वगैरे भरून तीं अशा रीतीनें ठेवितात कीं ते जिवंतच आहेत असें वाटतें. अशा रीतीनें रक्षून ठेविलेल्या प्राण्याच्या कलेवरांस इंग्रजींत "स्तफ" ह्मणतात. एथें दृष्टीस पडणार नाहीं असा पशुपक्षी पृथ्वीवर मुळींच नसेल.

एथें एकेका जातीचे अनेक प्राणी पाहण्यांत येतात. वानर एकच नाहीं, तर भिन्न भिन्न जातींचे अनेक आहेत. सांबर एकच नाहीं, तर भिन्न भिन्न जातींचे अनेक आहेत. सरडा एकच नाहीं, तर अनेक जातींचे अनेक आहेत. "फील्डअगामा" ह्मणून जो एक प्राणी आहे तो



सरडा.

सरड्यांतलाच एक प्रकार आहे असें समजतात. त्याला गुजराथेंत

कांचडा ह्मणतात. हा प्राणी जेव्हां फार चिढतो किंवा आनंदांत येतो, तेव्हां तो आपल्या शरीराचा वरचा भाग छत्रीप्रमाणें वाटोळा आपल्या डोकीच्या सभोंवार उभारतो. याप्रमाणें तऱ्हतऱ्हेचे चमत्कारिक प्राणी एथें दृष्टीस पडतात.

परंतु पक्षिसंग्रह आहे तो याहूनही सुंदर आणि मनोरंजक आहे. नाना प्रकारचे अनेक पक्षी अशा रीतीनें ठेविले आहेत कीं त्यांत प्राण मात्र घालण्याचें राहिलें आहे. एथें पोपट म्हणजे एक आहे असें नाहीं, तर अनेक जातींचे अनेक पोपट आहेत. त्याप्रमाणेंच काकाकवाही एक आहे असें नाहीं, तर पुष्कळ प्रकारचे आहेत. सुंदर मोरही एथें पाहण्यांत येतो. विलायत वगैरे देशांतील जे



लांब पुच्छाचा पक्षी.

किती एक पक्षी आपल्या देशांत मुळींच दृष्टीस पडत नाहींत त्यांचा देखील एथें मोठा संग्रह आहे. एक अतिशय लांब पुच्छाचा पक्षी बहुधा चीन देशामध्यें पहाडी आणि थंड प्रदेशांत होतो. तो मोठा पाहण्यासारखा आहे. अशा पक्ष्याचा एक नमुना या संग्रहालयांत आहे. ह्यासारखा सुंदर पक्षी पिकीन शहरांत देखील दुसरा विरळाच दृष्टीस पडतो असें सांगतात. याचें शेंपूट याच्या शरीरापेक्षां चौपट मोठें आहे. हें पाखरूं पहिल्यानें रीव्हज नामक गृहस्थानें चिनाहून विलायतेस पाठविलें, त्यावरून "रीव्हज-फेझंट" असें याचें नांव पडलें.

दुसरा एक लांब पंखांचा पक्षी आहे. त्याच्या लांब पंखांवरून


दुहेरी पुच्छाचें पाखरूं.

आणि तो उडतो तेव्हां ते पंख मोठ्यानें वाजतात त्यावरून इंग्रजींत त्याचें नांव "लाँग्-टेल्ड हमिंग बर्ड" असें पडलें आहे. त्याच्या पंखांचा वर्ण अतिसुंदर असून तकाकतो फार. आणखीही असे सुंदर आणि तकाकणाऱ्या रंगाचे पक्षी आहेत कीं ते पाहून मन तृप्त होतच नाहीं. या सुंदर पक्ष्यांच्या आकृति आणि रंग पाहून ईश्वराच्या कृतीपुढें मनुष्याची कृति तुच्छ आहे असें आपणच म्हणूं. जे पक्षी कधीं स्वप्नामध्येंही आपल्या दृष्टीस पडावयाचे नव्हत ते आपण एथें पाहूं.

ह्या मोठ्या संग्रहालयाचा एक भाग अनेक जातींच्या पुतळ्यांनीं भरला आहे. त्यांत कांहीं पुतळे फार जुने असून किती एकांचे हात पाय मोडून पडले आहेत. एथें युनान देशांतील अनेक भिन्नभिन्न देवांच्या आणि देवींच्या पुतळ्यांचा मोठा संग्रह पाहण्यांत येतो. हे बहुतेक पुतळे संगमरवरी दगडाचे आहेत. त्यांतील किती एकांचा डौल इतका सुंदर आहे कीं ते पाहतांच हे करणारांच्या बुद्धीची धन्य होय असें कोणीही म्हणेल. किती एक हिंदु देवता प्रसिद्ध आहेत त्याप्रमाणेंच युनानी लोकांच्याही किती एक देवता फार प्रख्यात आहेत.


वीनस.

निरनिराळ्या देशांत निरनिराळीं नाणीं चालतात, त्या अवघ्यांचा एथें एका खणांत मोठा संग्रह केला आहे. निरनिराळे लश्करी पोशाक आणि युद्धाचीं आयुधें एका मोठ्या खोलींत सांठवून ठेविलीं आहेत. निरनिराळ्या आकारांचीं कुलपें, किल्ल्या, वजनें, मापें, सुऱ्या, चमचे, इत्यादिकांचाही मोठा संग्रह आहे.

या संग्रहालयांत एक मोठी लायब्ररी ह्मणजे पुस्तकालय आहे. हें पुस्तकालय पारिस एथील पुस्तकालयापेक्षां लहान खरें, परंतु तें खेरीज करून, याची बरोबरी करणारें असें पुस्तकालय संपूर्ण युरोपखंडांत दुसरें एकही नाहीं. यांत सुमारें सात लक्ष पुस्तकांचा संग्रह आहे. त्यांत प्रतिवर्षी ७९००० पुस्तकें नवीन येत असतात ह्मणून सांगतात. अगत्याचा ग्रंथ ह्या ठिकाणीं मिळणार नाहीं असा नाहीं. इंग्लंडाचा तिसरा ज्यॉर्ज राजा ह्याचा ग्रंथसंग्रह सुमारें तेरा लक्ष रुपयांच्या किंमतीचा असून त्यांत ८०००० पुस्तकें होतीं. तो सर्व त्या राजानें या ग्रंथालयास बक्षीस केला. याप्रमाणेंच दुसऱ्या कितीएक महान् पुरुषांनीं लक्षावधि रुपयांच्या किंमतीचीं बक्षिसें दिल्यामुळें, या संग्रहालयांत लक्षावधि ग्रंथ आणि पदार्थ नवीन आले आहेत.

सदरहू पुस्तकालयामध्यें हातानें लिहिलेल्या पुस्तकांचा मोठा संग्रह केला आहे, त्यांत सुमारें तीन हजार पुस्तकें आहेत. त्यांतून कितीएक मोठ्या चमत्कारिक रीतीनें लिहिलेलीं पुस्तकें आणि कितीएक नामांकित पुरुषांचीं हस्ताक्षरें यांचा बहुमोलवान संचय निराळाच केला आहे. त्यांत मोठा प्रख्यात सुधारणारा लूथर याच्या हातचे लिहिलेले लेख आहेत. ते त्याचें अक्षर कसें होतें तें बघण्यासाठीं लोक मोठ्या उत्कंठेनें जाऊन पाहतात. एथें हातानें लिहिलेले किती एक संस्कृत ग्रंथ पाहण्यासारखे आहेत.

संपूर्ण भगवद्गीता एकाच लांब पातळ कागदावर फारच बा-

रीक अक्षरांनीं लिहून नकाशाप्रमाणें पेटींत ठेविली आहे. श्रीमद्-भागवतही एका ६९ फुटी कागदावर फारच सुंदर बारीक अक्षरांनीं लिहिलें आहे. तशीच भगवद्गीता फार बारीक अक्षरांनीं झाडाच्या सालीवर लिहिली आहे. याप्रमाणें ह्या तीन प्रती आहेत. संस्कृत दुर्गापाठ अतिशय पातळ कागदावर लिहिलेला आहे तो नळकुऱ्यांत गुंडाळी करून ठेवितां येतो. दुर्गापाठाची दुसरी एक प्रत बारीक सोनेरी अक्षरांनीं जांबळ्या पत्रावर लिहिलेली आहे. शिवकवचाची एक प्रत बारीक रुपेरी अक्षरांनीं काळ्या पत्रावर लिहिलेली आहे. महिसूरच्या राजाच्या वसुलाचा हिशेब कानडी भाषेंत ताडपत्रावर लिहून त्याचें वाटोळें गुंडाळें केलें आहे. याची एक प्रत तामील लिपींत कूर्माकार ताडपत्रावर लिहिली आहे. आपल्या देशच्या अपूर्व पदार्थांचा हा संग्रह पाहून आपणास खरोखर आनंद होतो.

या संग्रहालयाचा सर्वांत पाहण्यासारखा भाग तो अजून राहिलाच आहे. तो कोणता तर वाचण्याची जागा. अहाहा! या ठिकाणीं जातांच आपली नजर थक्क होऊन जाते. ही जागा वर्तुलाकार असून एवढी मोठी आहे कीं तिचा परिघ ४२० फुटी होईल. या दिवाणखान्याची उंची किती असेल असें आपणांस वाटतें बरें? आपले दिवाणखाने फार उंच ह्मटले ह्मणजे २४ फुटी असले तर मोठें भाग्य. परंतु हा दिवाणखाना १०६ फुटी ह्मणजे आपल्या मुंबईंतील सेन्ट टॉमस देवळापेक्षांही उंच आहे. याचें छप्पर घुमटाकार आहे तें काचीचें केलेलें आहे. तीनशें असामींस वाचावयास बसतां येईल एवढी मोठी ही जागा आहे. आपण एथें जावें तों वाचकांचा मोठा मेळा दृष्टीस पडतो. वाचायाला बसण्यास ३९ टेबलें वर्तुळ साधून ठेविलीं आहेत. त्यांतील दोन टेबलें स्त्रियांसाठीं आहेत. कारण एथें स्त्रियाही वाचावयास येतात.

कोणीही गृहस्थानें अर्जी केली आणि ओळख दिली ह्मणजे त्यास कांहीं पडल्यावांचून या ठिकाणीं जाऊन वाचावयास मिळतें. त्याला पाहिजे तें पुस्तकही मिळतें. पुस्तकांची रचना मोठ्या उत्कृष्ट रीतीनें केली आहे. ती अत्यंत शोभायमान आहे इतकेंच नाहीं, तर जें पुस्तक मांगावें तें तत्क्षणीं सहज मिळतें. पुस्तकें घरीं घेऊन जाण्याची मोकळीक नाहीं. हें स्थळ पाहावयास जावें तों शेंदिडशें गृहस्थ एथें वाचीत बसलेले आहेतच असें आढळतें. इतकी मंडळी असतां एक चकार शब्द देखील निघत नाहीं. याप्रमाणें सर्व ध्यान लावून आपआपल्या व्यासंगांत निमग्न असतात. आपण पहावयास जातों तेव्हां आपल्या पायरवानें त्यांस किरकिर होऊं नये म्हणून अशी युक्ति केली आहे कीं जमिनीवर गटापर्च्याचा गालिचा घातला आहे.

अशा मोठ्या संग्रहालयाची हवेली अर्थात् मोठी असेलच. ही इमारत बांधण्यासच सुमारें एक कोटि रुपये खर्च झाले. हें ज्ञानाचें आणि मनोरंजनाचें मोठें स्थान आहे. एक सगळा दिवस घालविला तरी ही संपूर्ण संग्रहालय पाहून होणार नाहीं. हें संग्रहालय पाहून कोणीही इंग्रज लोकांची धन्य आहे असें म्हणेल.

सौथ-केन्सिंगटन म्यूझियम—हें संग्रहालय गरीबगुरीब मजुरी करणाऱ्या लोकांचें ज्ञान वाढावें आणि सर्व प्रकारच्या लोकांस करमणूक व्हावी एतदर्थ बांधलें आहे. यांतील पदार्थांचा भरणा आणि याची शोभा दिवसानुदिवस वृद्धिंगत होत आहे. हैडपार्क-कॉर्नर एथून हें संग्रहालय सगळें एक मैल दूर आहे. ब्रिटिश म्यूझियम पाहिल्यानंतरही हें संग्रहालय पाहावयास गेलें, तरी आपल्या आशेचा भंग न होतां आपणास संतोष प्राप्त होईल.

ह्या संग्रहालयांत सर्व प्रकारच्या कौशल्याचे नमुने आहेत. मोठ्या डौलदार घरांच्या नमुन्यांचा संग्रह एथें केलेला आहे. घर बांधण्या-

च्या कामास ज्या ज्या वस्तु लागतात त्या त्या सर्वांचे नमुने ह्यांत आहे त. अनेक कारागिरांनीं ज्या नवीन युक्ति शोधून काढून सरकारा वळून सनदा मिळविल्या त्यांचाही ह्या स्थळीं संग्रह केलेला आहे. ताली देशांतील प्राचीन व अर्वाचीन काळच्या कोरींव कामांचेही नमुने एथें पाहावयास मिळतात.

पशुपक्ष्यांच्या शरीरांतील जे पदार्थ मनुष्याच्या उपयोगीं पडतात त्या सर्वांचा ह्या ठिकाणीं संग्रह आहे. जितक्या जातीचे व तऱ्हांचे पदार्थ मनुष्याच्या खाण्याच्या उपयोगीं पडतात तितक्यांचे नमुने एथें आहेत. शाळांत ज्या वह्या व पुस्तकें लागतात त्या सगळ्यांचा एथें संग्रह केलेला आहे. पदार्थविज्ञान, प्रवाहिपदार्थगतिशास्त्र आणि रसायन शास्त्र यांसंबंधी अनेक प्रकारच्या यंत्रांचे नमुने ह्या ठिकाणीं रचून ठेविले आहेत. विद्युद्यंत्र व बाष्पयंत्र यांचेही नमुने आहेत.

ही अशी तजवीज असल्यामुळें कोणत्याही "शास्त्रासंबंधीं किंवा विद्येसंबंधीं पाहिजे त्या विषयाची समजूत करून घेण्यास गरीब लोकांस कठीण पडत नाहीं. रंगवलेलीं उंचीं उंचीं कौलें, रंगीत काच फोटोग्राफ म्हणजे प्रकाशाच्या योगानें काढलेलीं चित्रें, आदिकरून सर्व एथें दृष्टीस पडतें. सोमवारीं व मंगळवारीं संध्याकाळीं ह्या पदार्थसंग्रहालयांत पुष्कळ दिवे लावितात तेव्हां तें फारच शोभतें.

ईस्ट-इन्दियन म्यूझियम—ह्या स्थळीं आपल्या इकडील पदार्थांचा मोठा संग्रह केलेला आहे. एथें आपल्या देशांतील प्राचीन काळच्या कांहीं पदार्थांचे नमुने जमवून ठेविले आहेत इतकेंच नाहीं, तर हिंदुस्थानांत जे अनेक जिन्नस उत्पन्न होतात त्यांचाही संग्रह केला आहे. भरतखंडस्थांच्या कलाकौशल्याचे कांहीं नमुने ह्या ठिकाणी दृष्टीस पडतात. एथें पुतळे व चित्रें आहेत त्यांवरून हिंदुस्थानांतील लोकांच्या भिन्नभिन्न जातींची आणि त्यांच्या भिन्नभिन्न रीतिभातीं-

ची माहिती होते. आपल्या एथील शिंप्याच्या अथवा सोनाराच्या दु-कानापासून राजाच्या दरबारापर्यंत सर्व प्रकार एथें दाखविला आहे.

हिंदुस्थानांत केलेले कागद, धातुकाम, जडावकाम, सोन्या-रुप्याचे दागिने सर्व एथें दृष्टीस पडतें. आपल्या देशांतले लोक मा-तीचे व दगडाचे, सांचे करितात त्यांचेही नमुने आहेत. एथें युद्धाच्या अनेक शस्त्रांचा मोठा संग्रह आहे, त्यांमध्यें गुरखे लोकांचे सुरे, र-जपुतांच्या तलवारी, आणि सांथळ लोकांचे भाले, ढाली, बंदुका व तीरकमटे हीं सर्व आहेत.

काश्मीरच्या शाली, धाका एथील मलमल, तंजावरचा किन-खाप, सुरतचा कलाबतू, त्रिचिनापल्ली एथील सांकळ्या, व कराची एथील कशिदा, हें सर्व एथें जमा केलें आहे. हस्तिदंतावर काढ-लेलें कोरींव काम आहे त्यांत हस्तिदंताच्या तारेची विणलेली आं-थरी अथवा जाळी पाहून आह्मास मोठें नवल वाटलें. लांकडी को-रींव काम फार उत्कृष्ट आहे त्यांत "वर्क-बाक्स" (कुसरकामाची पेटी) ही आहे. रणजीत सिंगाची सोन्याची खुरचीही या ठिकाणीं आहे. एथें जगन्नाथाच्या रथाचा एक नमुना आहे. देवांच्या सोन्याच्या, रुप्याच्या व दगडांच्या मूर्ति आहेत. एक वाघ एका मनुष्याला आतां खाणार आहे अशा अर्थाचा एक पुतळा टिपू सुलतानानें करविला होता तो या स्थळीं आहे. सूर्य सात घोड्यांच्या रथांत बसला आहे त्याचें चित्र आहे. भरतखंडांतील पशुपक्ष्यांचीं कलेवरें त्यांच्या पोटां-त कांहीं भरून या संग्रहालयांत ठेविलीं आहेत.

ईस्त-इन्दिया-हौस याचें पुस्तकालय या पदार्थसंग्रहालयापाशींच होतें, परंतु आतां तें निराळें झालें आहे. तें पुस्तकालय जुनें बोर्ड-आव-कंत्रोल" या पाशींच अद्यापपर्यंत आहे. त्यांत मोठ्या मोलवान् ग्रंथांचा संग्रह आहे असें सांगतात. त्यांत ८००० हातानें लिहिले-

ले ग्रंथ आहेत. त्यांपैकीं २००० संस्कृत भाषेंत आहेत. संस्कृत ग्रंथांचा एवढा मोठा आणि मोलवान् संग्रह दुसऱ्या कोठें नसेल.

वर तीन संग्रहालयें सांगितलीं त्यांखेरीज आणखी पुष्कळ संग्रहालयें लंडनांत आहेत. त्यांतून कित्येकांचीं एथें नांवें सांगतों; "सो न म्यूझियम," "युनैटेड-सर्विस म्यूझियम," "म्यूझियम-आव-प्राक्टिकल जिऑलजी," "मिशनरीज म्यूझियम" इत्यादि. हीं सर्व संग्रहालयें पाहणें मजकडून झालें नाहीं. प्रथमचीं तीन संग्रहालयें पाहून नंतर हीं सर्व पाहावयास मी गेलों असतों, तरी देखील माझे श्रम व्यर्थ गेले नसते असें मला वाटतें.

## २. मोठें ज्ञानमंदिर.

POLYTECHNIC INSTITUTE.

लंडन शहरांत पोलिटेक्निक इन्स्तित्यूत नामक ज्ञानाचें व कर्मणूकीचें एक मोठें मंदिर आहे तें सकाळचे दहा अकरा वाजल्यापासून संध्याकाळचे चार वाजत तोंपर्यंत, आणि रात्रीस सात वाजल्यापासून अकरा वाजत तोंपर्यंत उघडें असतें. ह्या ठिकाणीं एक अर्ध रुपयामध्यें आपणास हजारो रुपयांच्या किंमतीचें ज्ञान व कर्मणूक प्राप्त होते. ह्या स्थळीं काय काय दृष्टीस पडतें तें मी पूर्वींच उपोद्घातांत सांगितलें आहे. (पृ० ४—९)

ह्या ठिकाणीं कितीएक प्रसिद्ध विद्यागुरु साधारण लोकांची समजूत पडेल अशा रीतीनें व्याख्यानें देतात आणि प्रयोग करून दाखवितात. येणेंकरून हजारो लोकांचे भोळे विचार व अज्ञान समजुती दूर होतात. ह्या स्थळीं एक वेळ जाऊन पिशाचगृह पाहिलें ह्मणजे भूतचेष्टा व जादुगिरी यांवरून श्रद्धा खचित उडून जावयाची. प्राफेसर पेपर याणें भूत दाखविण्याची जी नवीन युक्ति काढिली आहे

ती फारच वाखाणण्याजोगी आहे. ती पाहून देवभोळ्या मनुष्याचा भोळेपणा खचित निघून जातो.

नामांकित प्रोफेसर फारडे हाही या ठिकाणीं व्याख्यानें देत असे. कालेज ह्मणजे पाठशाळा हींत जाऊन वरिष्ठ प्रकारची विद्या शिकण्याचें ज्यांस सामर्थ्य नाहीं त्यांचें या स्थळीं मनोरंजन होऊन विद्येचे मोठमोठे चमत्कारही त्यांच्या दृष्टीस पडतात. एथें आपण केव्हांही गेलें तरी दाटी आहे तीच आहे. कांहीं विद्याविषयक अथवा शास्त्रीय नवीन मोठा शोध लागला अथवा युक्ति निघाली तर लोकांची समजूत पाडण्याकरितां तिचा एक नमुना एथें आणून कांहीं दिवस ठेवितात, आणि तिचा प्रयोगही करून दाखवितात. पिशाच दाखवितेवेळेस काळोख मेट करून टाकितात.

## ३. कोलोश्यम.

COLOSSEUM.

ह्या ठिकाणीं रात्रीस पारिस शहर आणि दिवसास लंडन शहर दाखविण्यांत येतें. परंतु या शहरांबरोबर दुसरी आणखी इतकी मौज दृष्टीस पडते कीं त्यांत एक वेळ एक सगळी रात्र आणि दुसऱ्या वेळीं एक सगळा दिवस घालविला, तरी तितका वेळ व्यर्थ गेला असें होणार नाहीं. एथेंही मनास कर्मणूक आणि ज्ञानप्राप्ति दोनही होतात. ह्या ठिकाणीं आपल्या अवलोकनांत व जाणण्यांत काय काय येतें तें मी उपोदघातांत संक्षिप्त रीतीनें वर्णिलेंच आहे.

तथापि या "कोलोश्यमा" विषयीं मी थोडेंसें आणखी सांगावयास इच्छितों. तें हें कीं रात्रीच्या प्रहरीं पारिस शहर दाखवितात तें फारच चमत्कारिक दिसतें. आपण एका उंच ठिकाणीं उभे राहून प्रत्यक्ष पारिस शहर पाहत आहों असें वाटतें. कोलोश्यमांत सर्वांत उंच स्थळीं गेलें ह्मणजे सभोंवार गच्ची आहे तिजवरून हा

चमत्कार दृष्टीस पडतो. हा पडद्यांवर काढलेला आहे असें एकाएकीं कोणाच्यानें म्हणवणार नाहीं. गाड्या आणि माणसें रस्त्यानें चालली आहेत अशीं दिसतात. दुकानांत दिव्यांचा लकलकाट पडला आहे; कोणी ह्या दुकानांतून बाहेर येत आहेत; कोणी त्या दुकानांत जात आहेत; कोणी जाऊन गाडींत बसत आहेत; कोणी धांवत आहेत; कोणी घराचें दार उघडीत आहे, कोणी लावीत आहे; याप्रमाणें पारिसांतील घरें, दुकानें, आळी, लोक वगैरे खरेंच आपल्या दृष्टीस पडत आहेत असे दिसतात.

दिवसास लंडन दाखविण्यांत येतें. तें सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां पडद्यावर काढलेलें असावें असें वाटतें. परंतु रात्रीच्या प्रहरीं पारिसाची मौज पाहतांना तसें कांहीं उमगत नाहीं. पारिस आणि लंडन शहरांचीं हीं स्वरूपें चमत्कारिक दिसतात त्यांहून, लिस्बोन शहरांत झालेल्या धरणीकंपाचें स्वरूप दाखवितात तें कांहीं कमी चमत्कारिक दिसतें असें नाहीं. वीज खरीखुरीच चमकत आहे, तुफान खरेंच झालें आहे, आणि घरें खरोखरच कोसळून पडताहेत, अशीं अनेक मोठीं चमत्कारिक स्वरूपें याठिकाणीं दृष्टीस पडतात. नित्य रात्रंदिवस एथें लोकांचा मोठा मेळा जमलेला असतो.

## ४. प्राणिसंग्रहालय.

ZOOLOGICAL GARDENS.

एका विस्तीर्ण बागामध्यें नाना प्रकारच्या व नाना जातींच्या जिवंत प्राण्यांचा मोठा संग्रह केला आहे. हा बाग रीजन्ट-पार्क या उपवनांत आहे. ह्या स्थळीं कोणीही एक दिवस घालविला असता त्याच्या चित्तास संतोष झाल्यावांचून आणि त्याच्या ज्ञानाची वृद्धि झाल्यावांचून राहणार नाहीं. ब्रिटिश म्यूझियमांत पोटामध्यें कांहीं

भरून ठेविलेले अनेक जातींचे मेलेले प्राणी आह्मी पाहिले, परंतु या जागीं जिवंत प्राणी आमच्या पाहण्यांत आले. हे इतके जिते पशुपक्षी बाळगणें, त्यांच्या खाण्यापिण्याची नीट तजवीज राखणें, आणि त्यांची जागाजुगा स्वच्छ ठेवणें हें मोठें कठीण व खर्चाचें काम आहे. असें सांगतात कीं प्राणिसंग्रहाकडेस इंग्लिश सरकारचे दीड लक्ष रुपये प्रति वर्षी खर्च होतात.

ह्या विस्तीर्ण बागांत निरनिराळ्या प्राण्यांसाठीं निरनिराळीं घरें बांधिलीं आहेत. जे प्राणी उघड्या जागीं राहण्यासारिखे आहेत ते बागामध्यें उघड्या जागेंत निरनिराळ्या ठिकाणीं ठेविले आहेत. एथें एकेका जातीचे अनेक प्राणी आहेत. पृथ्वीवर चहूंकडेस मोठमोठ्या अरण्यांत अथवा मैदानांत वर्षांचा वर्षे फिरलें तरीही दृष्टीस पडावयाचे नाहींत असे अनेक जातींचे व अनेक तऱ्हांचे पशुपक्षी एथें पाहावयास मिळतात.

भयंकर हिंस्र पशु देखील एथें आहेत. जे पशु जंगलांत मोकळे पाहण्याची अथवा त्यांवर नजर ठरविण्याची सुद्धां मनुष्यास ताकद व्हावयाची नाहीं, असले क्रूर पशु ह्या स्थळीं आपणास निर्भयपणें व बिनधास्त पाहून घ्यावयास सांपडतात. ह्या ठिकाणीं आस्वलें, व पटेरे वाघ व सिंह किती पाहावयास मिळतात! त्यांचें विकराळ व भयंकर स्वरूप पाहून आपणास एथें किंचित्ही भीति वाटत नाहीं; कारण एथें ते चांगल्या बंदोबस्तानें ठेविले आहेत. ज्या वेळीं ह्या जनावरांस मांस खावयास घालितात त्या वेळेस तीं अवश्य जाऊन पाहावीं. त्या समयीं तीं तें मांस मिळण्यासाठीं केवढा अट्टहास करितात आणि कशा भयंकर रीतीनें ओरडतात तें सर्व पाहण्याजोगें आहे. एथें एक सिंहांचें जोडपें आहे, तें मुळचें गुजराथेंतून धरून आणलेलें आहे. तें मुंबईचे माजी चीफ जस्तिस सर एर्स्किन

पेरी यांनीं या संग्रहालयास बक्षीस केलें. गायकवाड सरकारानें बक्षी-
स केलेली व्याघ्रांची जोडीही एथें आहे.

एथें कितीएक नवीनच जातींचे प्राणी पाहण्यांत येतात. हिपो-



हिपोपोटेमस.

पोटेमस नांवाचा एक चमत्कारिक पशु एथें आहे. त्याचे पाय, दांत आणि शरीराचा बांधा हीं कांहीं अंशीं हत्तीच्या सारिखीं आहेत; परंतु त्याचें तोंड थोडेंसें डुकराच्या तोंडासारखें दिसतें. हें जनावर एका लहानशा तळ्यांत ठेविलें आहे. याची जन्मभूमि आफ्रिका. मिश्र देशच्या पादशाहानें हें जनावर या संग्रहालयास भेट पाठवून दिलें. तें नुसती वनस्पति खाऊन राहतें. जी वनस्पति पाण्यांत कुजून गेली असेल तीस हें फार लुब्ध आहे. याशिवाय या बागामध्यें एका लहानशा तळ्यांत दोन मोठ्या सुसरी आहेत.



रेन्डीयर.

सांबर वगैरे अनेक जातींचे हरणही या ठिकाणीं आहेत. लाप्लंड देशांतील "रेन्डीयर" म्हणून एक चमत्कारिक जातीचा सांबर एथें आहे. तसाच एकशिंगी गें-

डाही आहे. एथें एक फारच मोठा कासव आहे. स्पेन देशांतील मोठी विशाळ आणि उन्मत्त जी घोरपड तीही या स्थळीं दृष्टीस पडेल.

एथें जिराफ ह्मणून एक प्राणी दिसण्यांत विलक्षण आहे तो पाहावयास मिळेल. असें सांगतात कीं कांहीं वर्षांपूर्वीं इंग्लिश सरकारानें २३००० रुपये देऊन ह्या पशूंचा एक जोडा विकत घेतला होता. त्यांतील मादी कितीएक वेळां व्याली, तीं पोरेंही मोठीं झालीं आहेत. ह्याची लांब मान आणि विचित्र आकृति पाहून बघणारा विस्मित होतो. ह्या बागांत उंट व हत्तीही आहेत. नित्य संध्याकाळीं हत्तीवर अंबारी घालून त्याला एथें फिरवितात. तेव्हां बागांत पाहावयास व हिंडावयास आलेल्या मुलांसही अंमळ अंमळ त्यावर बसूं देतात.



जिराफ.

एथें पक्षीही असंख्यात आहेत. पुष्कळ जातींचे तऱ्हतऱ्हेवार पक्षी आपल्या दृष्टीस पडतात. फ्लेमिंगो म्हणून एक लांब मानेचें व लांब पायांचें पाखरूं आहे, तें पाहून फारच चमत्कार वाटतो. आणखीही पुष्कळ विलक्षण देखणे पक्षी एथें आहेत. कित्येकांचा वर्ण इतका सुंदर व उत्कृष्ट आहे कीं त्यांस पाहून ईश्वराच्या कृतीपुढें मनुष्याची कृति म्हणजे कांहींच नाहीं असा उद्गार आपल्या तोंडावाटे निघाल्यावांचून राहणार नाहीं.



फ्लेमिंगो.

आहा हा! काय सुंदर व देखणे पक्षी हे!! मी त्यांचें काय वर्णन करूं! कितीएकांचा रंग पाहून तर मनुष्याचे डोळे दिपूनच जातात; कित्येक काळे, कित्येक पांढरे, कित्येक पिंवळे, कित्येक हिरवे, कित्येक तांबडे, कित्येक अस्मानी, कित्येक भस्मी रंगाचे, आणि कित्येक पंचरंगी. या सर्व पक्ष्यांचें पालनपोषण करण्यास किती श्रम पडत असतील याचें अनुमान वाचणारेच सहज करतील.


शहामृग.

शहामृग (ऑस्त्रिच) हा विचित्र पक्षीही एथें आहे. कीर, काकाकवा, नुरी आदिकरून आपल्या इकडील धूर्त पक्ष्यांचा देखील मोठा संग्रह आहे. मोठमोठे गिधाड आणि गरूडपक्षीही एथें दृष्टीस पडतात.

या ठिकाणीं वानरांचाही मोठा भरणा आहे. बहुत जातींचे वानर एथें ठेविलेले आहेत. या ठिकाणीं तमासा पाहणारांची मोठी गर्दी होते. पुष्कळ लोक या ठिकाणीं वानरांबरोबर खेळून गमत करून घेतात. "ओरांग-ओतांग" हा वानरजातीय प्राणीही एथें दृष्टीस पडतो. हा प्राणी दिसण्यांत माणसासारिखा दिसतो. परंतु त्याला माणसाप्रमाणें दोन पायांवर उभें राहून चालतां येत नाहीं. परंतु तो मोठा बळकट असावा असें वाटतें. त्याला हातांत हत्यार घेऊन त्याचा उपयोग करितां येतो. तो फळें खाऊन राहतो आणि झाडांवर निजतो.

एथें जिवंत जिवाणवांचाही मोठा संग्रह आहे. असें ह्मणतात कीं एथें संग्रह आहे यासारखा युरोपांत दुसऱ्या कोठेंही नाहीं. हीं जिवाणवें बारीक जाळींमध्यें ठेविलीं आहेत तीं सर्व बाहेरून दिसतात. या जिवड्यांमध्यें एक मोठा सर्प किंवा नाग आहे. त्याणें एकदां बागेंतील एका मनुष्यास दंश केला तो मनुष्य मरण पावला.

जिवंत मत्स्यांचा मोठा संग्रह आहे तोही पाहण्यासारखा आहे. काचीच्या भांड्यांत पाणी घालून आंत तऱ्हतऱ्हांचे मासे सोडले आहेत ते तरत असतात. ते सर्व काचींतून नीट पाहतां येतात. ते पाण्यांत कसे वर खालीं येतात जातात तें आणि त्यांचें सर्व हलनचलन बाहेरून चांगलें दिसतें, आणि तें पाहून चित्तास फार समाधान वाटतें. परंतु मला असें वाटतें कीं पारिस शहरीं जो मत्स्यसंग्रह माझ्या पाहण्यांत आला तो याहूनही चांगला.

## ९. टैम्स छापखाना.

TIMES OFFICE.

हा छापखाना आणि त्यांतील कारभार खरोखर पाहण्यासारखा आहे. हा पाहणें असलें तर कोणा वगीच्या स्नेही गृहस्थाजवळून चिटी घेतली पाहिजे. मी पूर्वीं सांगितलेंच आहे कीं टैम्स या वर्त्तमानपत्राच्या सुमारें साठ हजार प्रती दर रोज खपतात. कधीं कधीं एकाद्या मोठ्या अगत्याच्या विषयांवर त्यांत लिहिलें असलें, तर सत्तर हजारांपर्यंत देखील प्रतींचा खप होतो. या कामास नित्य ७२० मण कागद लागतो. कागदाचा एवढा मोठा पुरवठा नीट होण्याकरितां या पत्राच्या मालकास कागद करण्याचा कारखानाही बाळगावा लागतो. मी आपल्या सोबत्यांबरोबर हा छापखाना पाहावयास गेलों होतों.

तेथें गेलें ह्मणजे प्रथम कागदांची वखार दाखवितात. हें वर्त्तमान-

पत्र छापण्यास किती कागद दर रोज लागतो याचें कांहीं अनुमान, कागदाचे ढीगचा ढीग पडलेले असतात त्यांवरून होतें. कागद छापण्याच्या पूर्वी यंत्रानें पाण्यांत कसा भिजवितात तेंही दाखवितात. टैप ह्मणजे अक्षरांचे खिळे जुळीत असतात त्यांची त्वरा पाहून आपली नजर चक्क होऊन जाते. हे खिळे जुळण्याच्या कामाकडेस शंभरांपेक्षां अधिक माणसें लागलेलीं असतात. मोठे चपळ आणि हुशार अशा खिळे जुळणारांसच एथें ठेवितात. कच्चे आणि मंद मनुष्य ठेविले तर तीनशें देखील पुरणार नाहींत.

टैम्स हें पत्र मोठ्या वाफेच्या यंत्रानें छापिलें जातें. पार्लमेन्ट सभेमध्यें रात्रीस दोन दोन वाजत तोंपर्यंत जीं भाषणें होतात तीं सर्व सकाळीं अक्षरशः छापून प्रसिद्ध होतात. इतकेंच नाहीं, तर कित्येक फारच अगत्याच्या आशा विषयांवर संभाषणें झालीं असल्यास, तीं पत्रकर्त्याच्या अभिप्रायासहित सकाळीं छापून प्रसिद्ध होतात. यावरून एथें छापण्याचें काम किती त्वरेनें व झपाट्यानें चालतें याचें वाचणारांस अनुमान होईल.

पार्लमेन्ट सभा आणि हा छापखाना यांमध्यें "माग्नेटिक टेलेग्राफ" ह्मणजे लोहचुंबक तारायंत्र चालू आहे. ह्या तारेचा एक शेवट पार्लमेन्ट सभेंत आहे आणि दुसरा टैम्स पत्राच्या हपिसांत. लांब भाषणें होतात तीं ह्याताराद्वारें येत नाहींत; परंतु कोणकोणत्या विषयांवर संभाषण चाललें आहे आणि कोणकोण भाषण करीत आहेत, इत्यादि मुख्यमुख्य गोष्टींविषयीं वर्तमान, ह्या लोहचुंबक तारायंत्राच्या योगानें टैम्स हपिसांत वारंवार बसल्या जागीं येऊन पोंचतें.

ह्या पत्राचा मालक पृथ्वीवर जागोजाग बातमीदार ठेवितो व पाठवितो, तेणेंकरून अगदीं नवीन व मोठ्या अगत्याचीं अशीं वर्तमानें ह्या पत्रांत येतात. अमेरिकेंत लढाई चालली होती, तेव्हां टै-

म्स पत्राच्या मालकानें वास्तविक कची हकीकत कळावी एतदर्थ, स्वताच्या खर्चानें एक बातमीदार तेथें पाठविला होता. तसेंच हिंदुस्थानांत मागें बंड झालें त्या वेळींही टैम्सचा बातमीदार या देशीं आला होता. जें पत्र इत्थंभूत वर्तमान समजण्यासाठीं इतका खर्च करितें, आणि ज्यांत उत्कृष्ट रीतीनें लिहिलेलें असतें त्याचा लौकिक आणि प्रतिष्ठा हीं सर्व पृथ्वीवर मोठीं आहेत यांत नवल तें कोणतें?

आणखी जे अनेक विषय या पत्रांत येतात त्यांवर लिहिणारे निरनिराळे असतात. ज्यास ज्या विषयाची विशेष माहिती तो त्या विषयावर लिहितो. यांत मजकूर मोठ्या पोक्तपणें व स्वतंत्रपणें लिहिलेला असतो. कोणत्याही विषयावर ह्या पत्रकर्त्याचा अभिप्राय पत्रद्वारें जसा प्रसिद्ध होतो, त्याप्रमाणें बहुतकरून प्रजेचा विचार होतो. ह्या पत्राचें वजन केवळ राजाच्या वजनासारखें आहे. फ्रान्स देशांतील राज्यप्रकरणी वर्तमान पारिस एथील वर्तमानपत्रांत छापण्याच्या पूर्वीच कधींकधीं टैम्स पत्रांत छापून प्रसिद्ध होतें. एवढी मोठी या पत्राची वग आहे.

या पत्राचे नेमलेले रिपोर्टर (बातमी आणणारे) आहेत त्यांशिवाय दुसरेही किरकोळ खबर लिहून देणारे पुष्कळ असतात. त्यांला "पेनिया लाइनर्स" असें ह्मणतात; कारण ते बातमी लिहून आणतात तिजबद्दल प्रति ओळीस एक पेनी त्यांस मिळते, परंतु कांहीं मोठी अगत्याची बातमी असली तर वेळीं अधिकही मिळतें. कोठें कांहीं चोरी, खून किंवा मारामारी झाली, किंवा कोठें कांहीं आकस्मिक गोष्ट घडली, तर तें वर्तमान हे छोटे बातमीदार लागलेंच कळवितात. यामुळें ह्या पत्रांत अगदीं नवी ताजी आणि अगत्याची अशी बातमी नित्य प्रगट होते. यांत लोक आपल्या कामकाजाबाबत जाहिराती छापवितात त्यांचें उत्पन्न मोठें होतें. जाहीरातींचें खातें निराळेंच आहे.

छापण्याचें यंत्र उभें गोलाकार आहे. साधारण छापण्याच्य यंत्रांत कागदाचे ताव आडवे छापतात, परंतु ह्या यंत्रांत ते उभेच उभेच्च छापतात. एका मिनिटांत दोनशें ह्मणजे एका तासांत बार हजार प्रती छापून होतात. इतक्या त्वरेनें छापतें हें केवळ वाफेच्य यंत्रामुळेंच नव्हे, तर दुसरी एक युक्ति आहे तिणें करून होतें. ती युक्ति ही कीं यंत्राचा एक फेरा होतो त्यांत, एक प्रत निघावी तिच्य जागीं चार प्रती छापून निघतात. ठसे जोडलेल्या तक्या किंव पानें असतात त्यांतील एकेकावरून "स्तिर्योटैपाच्या" योगानें भागा हून चार चार प्रती पाडतात.

अशा रीतीनें नकला करण्याची एक नवीन युक्ति काढिली आ हे. एका प्रकारच्या मिश्रणानें बनाविलेल्या (कुऱ्याच्या चामडीच्य रंगाच्या) कागदावर ठसे जोडलेली तक्ती अथवा पान दाबलें ह्मणजे त्या कागदावर त्याचा छापा चांगला खोल उमटतो. नंतर तो का गद सांच्यांत घालून त्यावर शिशाचा रस ओततात; ह्मणजे त्याव उमटलेल्या अक्षरांची तक्तीचा तक्ती तयार होऊन निघते. याप्रमाणें चार चार तक्या तयार करून छापण्याच्या यंत्रांत घालतात; ह्मण एका फेऱ्यांत चार प्रती छापून निघतात. वर सांगितलेल्या कागदा असा गुण आहे कीं त्यावर कढलेलें शिसें पडलें तरी तो जळत न हीं; त्यावरून ओतींव शिशाच्या तक्तींत बरोबर छापा उठतो.

ज्या मोठ्या यंत्रांत पत्र छापतें तें चालतें तो चमत्कार खरोख पाहण्यासारखा आहे. चारही बाजूंनीं एकेक कागद आपोआप उड यंत्रात जाऊन पडतो, आणि छापून पुनः आपोआप बाहेर निघत हा चमत्कार आणि यंत्र झपाट्यानें चालतें तें पाहून मोठें नवल व टतें. हें मोठें यंत्र एक लक्ष रुपयांच्या किंमतीचें आहे. यापेक्षां लह न अशीं यंत्रें या कारखान्यांत आठ नऊ आहेत.

सकाळीं आणि दोन प्रहरांनंतर प्रती छापून बाहेर निघतात तेव्हां घाऊक घेणारे व फुटकळ घेणारे यांची एका दिवाणखान्यांत आणि जवळच्या रस्त्यावर मोठी गर्दी होऊन जाते. या वेळेस टैम्स पत्र घेण्याचा मोठा तडाका चालतो. ही मौज मी पाहिली नाहीं, परंतु असें सांगतात कीं दाटी मनस्वी होते. ह्या समयीं एथें बोलावयास किंवा उभें राहावयास देखील जागा मिळणें कठीण.

## ६. टेम्स नदीखालचा बोगदा.

THAMES TUNNEL.

लंडनांत कलाकौशल्याचा मोठा चमत्कार पहावयाचा असला तर "टेम्स-टनेल" हा आहे. नदीच्या ह्या तीरावरून त्या तीरावर जाण्यास वरून जसा पूल बांधलेला असतो तसा एके ठिकाणीं नदीखालून पोखरून मार्ग केला आहे. ह्याला "टनेल" ह्मणजे बोगदा किंवा विवर ह्मणतात. आपण नदीच्या खालून ह्या विवरांतून चालतों, आणि आपल्या डोईवरून नदी वाहत असतां, आपण पैलतीरास जातों. असा चमत्कार पृथ्वीवर दुसऱ्या कोठेंही नाहीं.

मला प्रथम असें वाटलें होतें कीं ह्या विवरमार्गांतून गाड्याघोडेही जात असतील, परंतु तसें नाहीं. माणसें मात्र पायीं जातात येतात. ह्यांतून गाड्याघोडे जात नाहींत याचें कारण हें कीं बोगद्याच्या दोनही शेवटांस चडण्याउतरण्यासाठीं पायऱ्या आहेत. बोगद्यांत जातांना पायऱ्यांवरून बहुत खालीं उतरावें लागतें, आणि पलीकडच्या शेवटास जातांना पुनः तेथें पायऱ्या चढाव्या लागतात.

पायऱ्या उतरतांना त्यांच्या भिंतीवरील सुंदर चित्रें दृष्टीस पडतात. पायऱ्यांवरून खालीं उतरून बोगद्यांत जातांना पहिल्यानें "पानोरामा" ह्मणजे चित्रपट काचीमधून पाहावयाचे असले तर विचारितात. आपली मर्जी असली तर थोडासा खर्च करून हे पा-

हावे. बोगद्यांत जातांच रात्र पडल्यासारखें होतें, ह्मणून आंत धुराचे दिवे लाविले असतात. दिवे नसले तर काळोख गडद होऊन जाईल. हा बोगदा १२०० फुटी लांब आणि ३८ फुटी रुंद आहे.

विस्मय वाटण्यास आणखी एक कारण आहे, तें हें कीं बोगद्याच्या एका बाजूस दुकानें बसतात त्यांत अनेक जिन्नस विकतात. बोगद्याच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत एका बाजूस दुकानांची हार लागली आहे. किती एक दुकानांत खेळ विकतात; किती एकांत वाद्यें वाजत असतात, आणि किती एकांत चित्रपट दृष्टीस पडतात. याप्रमाणें ह्या बोगद्यांतून जातांना मनास नाना प्रकारें करमणूक होते.

बोगद्यांत उतरतांच प्रत्येकास एक पेनी जकात द्यावी लागते. ह्या जकातीचें उत्पन्न सालिना सुमारें ६० लाख रूपये आहे. बोगद्याची डागडुजी करण्याचा वगैरे खर्च या उत्पन्नांतून भागतो. हा बोगदा बांधण्याचें काम इसवी सन १८२५ त सुरू झालें, परंतु तो सन १८४३ पर्यंत बांधून पुरा झाला नाहीं. त्याला सुमारें ४७ लक्ष रूपये खर्च लागला.

हा बोगदा बांधतांना मध्यें अनेक विघ्नें आलीं. नदीच्या खालून रस्ता बांधीत असतांना वरचें पाणी पुन:पुन: आंत भरे, त्यामुळें काम वारंवार बंद ठेवावें लागे. हें काम तडीस जाण्याची आशा लोकांनीं सोडली होती, आणि मध्यें सात वर्षें काम अगदीं पडून राहिलें होतें. परंतु कितीही विघ्नें आड आलीं तथापि एकदां हातीं धरिलेलें कार्य न सोडतां, आग्रहानें त्याच्या पिच्छेस लागण्याचा गुण इंग्लिश प्रजेच्या अंगीं असल्यामुळें, अत्यंत दुर्घट व साधारण बुद्धीच्या मनुष्याकडून व्हावयाचें नव्हे असें हें महत्कृत्य, शेवटीं सिद्धीस गेलें. याचें यश सर इसाम्बर्ड ब्रुनेल ह्या पुरुषास देणें योग्य आहे.

परंतु नदीखालून रस्ता बांधला इतकेंच काय तें झालें असें समजलें पाहिजे; कारण मुळच्या बेताप्रमाणें काम झालें नाहीं. मुळच्या संकेताप्रमाणें आंतून गाड्याघोड्यांस जातां यावें, तसें झालें नाहीं. गाड्याघोडे जाण्याजोगा रस्ता करण्यास आणखी १८ लक्ष रुपये खर्चास पाहिजेत असा अजमास केला आहे. त्या बोगद्याची मालकी एका कंपनीकडे आहे. तिणें १८ लक्ष रुपयांचें भांडवल जमा केलें होतें, तें सर्व खर्च होऊन काम बंद पडलें, तेव्हां सरकारानें त्या मंडळीस २४॥ लक्ष रुपये कर्जी दिले. आणखी पैसा तिला देऊन आपला हात गुंतवावा अशी सरकारची इच्छा नाहीं, आणि मंडळीपाशीं भांडवल नाहीं, त्यापेक्षां गाड्याघोडे जाण्याजोगा रस्ता होईल अशी आशा तूर्त बाळगावी नलगे. तथापि मला असें वाटतें कीं, हें काम पुरें होण्याचा सुदिन कधीं तरी आल्यावांचून राहणार नाहीं.

## ७. लंडनचा किल्ला.

TOWER OF LONDON.

हा किल्ला सर्वांत जुना आणि बळकट असून यांत पुष्कळ पाहण्याजोगें आहे. ह्याला "टॉवर-आव-लंडन" असें ह्मणतात. यांतील राजकीय जवाहीर व "आर्मरी" (म्हणजे शिलेखाना) हीं अवश्य पाहावीं. ह्या किल्ल्यामध्यें इंग्लंड देशांतील कित्येक राजवंशी आणि दुसरे नामांकित पुरुष बंदींत होते, आणि कितीएकांचे शिरच्छेद एथें झाले, ह्यामुळें इतिहास शिकणारास हा किल्ला पाहण्याची हौस वाटते, आणि हा पाहून त्यास एका विलक्षण प्रकारचा आनंद होतो.

लंडनचा किल्ला एक ह्मणतात, परंतु त्यांत सुमारें लहान लहान दहा किल्ले आहेत. ह्या सगळ्यांच्या सभोंवार एक खंदक आहे. "व्हैट टॉवर" हा किल्ला मध्यभागीं आहे आणि बाकीचे किल्ले किंवा गढ्या चराभोंवतालच्या तटाला जोडून बांधिल्या आहेत. ज्या कि-

ल्यांत राजकीय जवाहीर आहे तो सर्व किल्ल्यांपासून वेगळाच आहे. ह्या किल्ल्यांत लष्करी शिपाई लोकांस राहावयाला एक निराळेंच बराक आहे. किल्ल्याच्या बाहेर शिपाई पहारा करीत असतात त्यांस "वार्डर" ह्मणतात. यांचा पोशाक विचित्रसा दिसतो. इंग्लंडचा आठवा हेन्‌री राजा याच्या वेळीं योमेन संज्ञक एका प्रकारची फौज होती तिचा पोशाक असे तसा ह्या पहारेकऱ्यांचा असतो. हा किल्ला पाहावयास जाणारे बारा असामी एका खोलींत जमा झाले ह्मणजे एक "वार्डर" त्यांजबरोबर जाऊन सगळें दाखवितो आणि समजावितो. बारा असामी जमण्यास कांहीं फारसा वेळ लागत नाहीं. बहुतकरून प्रति दिनीं अर्ध्या अर्ध्या तासानें बारा जण जमून हा किल्ला पाहावयास जातात.

किल्ल्यामध्यें ज्या महालांत राजकीय जवाहीर आहे त्यांत एका लोखंडी दिवाणखान्याच्या सभोंवार जाड कांच बसविली आहे आणि आंत मध्यभागीं जवाहीर ठेविलें आहे. पाहणारास आंत गेल्याशिवाय आणि जवाहिरास हात लाविल्याशिवाय बाहेरूनच चहूंकडे फिरलें ह्मणजे सर्व जवाहीर नीट पाहतां येतें. यामध्यें रत्नखचित राजमुकुट आहे. तसेंच, इंग्लंडचा दुसरा चार्ल्स राजा यास अभिषेक झाला ते समयीं जो नवा मुकुट केला, आणि जो त्याच्या मागून राजे झाले तेही सिंहासनारूढ होतेसमयीं घालीत असत, तोही या ठिकाणीं आहे.

महाराणी विक्टोरिया गादीवर बसल्या त्या वेळीं नवा मुकुट करण्यांत आला, तोही ह्या ठिकाणीं आहे. त्यांत पुष्कळ हिरेमाणिकें जडलीं आहेत. त्याचें वजन पावणे दोन रत्तल आहे, आणि त्याची किंमत ११ लक्ष रुपये होते. महाराणीच्या स्वर्गवासी भ्रताराचा मुकुटही एथें आहे. तोही हिरेमाणिकांनीं जडित आहे. राणी साहे-

ल्ल्यांत राजकीय जवाहीर आहे तो सर्व किल्ल्यांपासून वेगळाच आहे. ह्या किल्ल्यांत लश्करी शिपाई लोकांस राहावयाला एक निराळेंच बराक आहे. किल्ल्याच्या बाहेर शिपाई पहारा करीत असतात त्यांस "वार्डर" ह्मणतात. यांचा पोशाक विचित्रसा दिसतो. इंग्लंडचा आठवा हेन्‌री राजा याच्या वेळीं योमेन संज्ञक एका प्रकारची फौज होती तिचा पोशाक असे तसा ह्या पहारेकऱ्यांचा असतो. हा किल्ला पाहावयास जाणारे बारा असामी एका खोलींत जमा झाले ह्मणजे एक "वार्डर" त्यांजबरोबर जाऊन सगळें दाखवितो आणि समजावितो. बारा असामी जमण्यास कांहीं फारसा वेळ लागत नाहीं. बहुतकरून प्रति दिनीं अर्ध्या अर्ध्या तासानें बारा जण जमून हा किल्ला पाहावयास जातात.

किल्ल्यामध्यें ज्या महालांत राजकीय जवाहीर आहे त्यांत एका लोखंडी दिवाणखान्याच्या सभोंवार जाड काच बसविली आहे आणि आंत मध्यभागीं जवाहीर ठेविलें आहे. पाहणारास आंत गेल्याशिवाय आणि जवाहिरास हात लाविल्याशिवाय बाहेरूनच चहूंकडे फिरलें ह्मणजे सर्व जवाहीर नीट पाहतां येतें. यामध्यें रत्नखचित राजमुकुट आहे. तसेंच, इंग्लंडचा दुसरा चार्ल्स राजा यास अभिषेक झाला ते समयीं जो नवा मुकुट केला, आणि जो त्याच्या मागून राजे झाले तेही सिंहासनारूढ होतेसमयीं घालीत असत, तोही या ठिकाणीं आहे.

महाराणी विक्टोरिया गादीवर बसल्या त्या वेळीं नवा मुकुट करण्यांत आला, तोही ह्या ठिकाणीं आहे. त्यांत पुष्कळ हिरेमाणिकें जडलीं आहेत. त्याचें वजन पावणे दोन रत्तल आहे, आणि त्याची किंमत ११ लक्ष रुपये होते. महाराणीच्या स्वर्गवासी भ्रताराचा मुकुटही एथें आहे. तोही हिरेमाणिकांनीं जडित आहे. राणी साहे-

यांचे वडील चिरंजीव प्रिन्स-आव-वेल्स यांचा मुकुट सोन्याचा आहे, परंतु तो साधा आहे.

आपल्या देशांतील कोहिनूर नामक प्रसिद्ध हिरा मागाहून रणजीत सिंगाजवळ होता, तो एथें दृष्टीस पडतो. हें कोहिनूररूप तेज हिंदुस्थानांत होतें तें आतां विलायतेस येऊन ह्या किल्ल्यांत पडलें आहे. ह्याशिवाय रत्नजडित राजदंड व रत्नजडित मुठीचें राजखड्ग एथें आहे.

"व्हैट टॉवर" हा किल्ला सर्वांच्या मध्यभागीं आहे. त्यांत जातांना प्रथम एका मोठ्या दिवाणखान्यामध्यें लश्करी स्वारांची रांग उभी दृष्टीस पडते. लोखंडी कवचें घालून आणि भालेबंदुका घेऊन हे समोरून आपल्याच आंगावर घोडे भरधांव घालून येत आहेत असें वाटतें. पुरातन काळीं इंग्लंडाच्या गादीवर एकामागून एक बसलेले राजे युद्धास जशा पोशाकानें आणि डामडौलानें निघत असत, तशा त्यांच्या घोड्यांसहित मूर्तिमंत स्वाऱ्या दृष्टीस पडतात; अशा सुमारें २२ घोडेस्वारांची रांग उभी आहे. इंग्लंडचा राजा आठवा हेन्री याचें मोठें भव्य शरीर आणि स्वरूप यांजकडेस पाहणाऱ्याचें लक्ष विशेषेंकरून जातें.

पुढें जावें तों एका खोलींत भिंतीवर ओळीनें ढाली लावून ठेविल्या आहेत त्या दृष्टीस पडतात. आपल्या देशांतील प्रसिद्ध टिपू सुलतान याची तरवार, बरची आणि टोपी ह्या ठिकाणीं आहे. माल्टा एथील तोफ आहे तीही पाहण्यासारखी आहे. एलिझाबेथराणीच्या वेळच्या युद्धाच्या आयुधांचा संग्रह वेगळाच करून ठेविला आहे त्यास "एलिझाबेथ आर्मरी" ह्मणतात.

ह्या ठिकाणीं एक भुंयार दाखवितात त्याची भिंत १४ फुटी जाड आहे. भिंत एवढी जाड असून भुंयार फारच अरुंद आहे,

आणि आंत काळोखही फार आहे. असें सांगतात कीं सर वॉल्टर राल्फ यास या भुयारांत बंदींत ठेविलें होतें. मागें ज्या लांकडावर कित्येक नामांकित पुरुषांच्या माना ठेवून कुऱ्हाडीनें तोडल्या तीं लांकडें व त्या कुऱ्हाडी दाखवितात. आठवा हेन्री राजा याणें आपल्या दोन बायकांचीं डोकीं या किल्ल्यावर मारविलीं. ह्या किल्ल्यावर शिरच्छेद करण्याची चाल अठराव्या शतकापर्यंत होती. सन १७४६ मध्यें "लॉर्ड लावट" याचा शिरच्छेद झाला तो शेवटला. त्यानंतर कोणाचीही गरदन मारण्यांत आलेली नाहीं.

## ८. सेन्ट पालचें देऊळ.

ST. PAUL'S CATHEDRAL.

संपूर्ण इंग्लंड देशामध्यें सर्वांत मोठें आणि सर्वांत उंच आणि सर्वांत प्रख्यात देऊळ सेन्ट पालचें हें होय. तें बाहेरून धुरामुळें किंचित् काळसर दिसतें, परंतु त्याच्या बांधणींत तिळमात्र कसर किंवा व्यंग नाहीं. हें रूम एथील प्रख्यात देवालयाच्या डौलाचें आहे. नदीवरून तें फारच भव्य व शोभायमान दिसतें. हें बांधण्याचें काम ३९ वर्षें चाललें होतें, आणि यास पाऊण कोटि रुपये खर्च झाला.

ह्या देवालयाच्या आंतील शोभा तरी कांहीं कमी आहे असें नाहीं. ज्या मोठ्या सभामंडपांत धर्मोपदेश ऐकण्यास व प्रार्थना करण्यास मंडळी बसते तो फारच विस्तीर्ण आहे. दिवसांतून तीनदां मंडळी जमते. त्या मंडपांत ३०००लोक सहज बसतात. त्याचा विस्तार व उंची पाहून नजर थक्क होऊन जाते. ह्या देवळांत कितीएक प्रसिद्ध पुरुषांचे पुतळे व कितीएकांच्या कबरी आहेत. जगमित्र जॉन हावर्ड व विख्यात नाविक सेनापति लॉर्ड नेल्सन यांचे पुतळे एथें आहेत. आपल्या देशाचा मागील गव्हर्नर-जनरल लॉर्ड कॉर्नवॉलिस व मुंबईचा मागील गवर्नर मौन्स्त्युअर्त एल्फिन्स्तन यांचेही पुतळे

आहेत. सर चार्ल्स नेपियर व सर विल्यम जोन्स यांचेही पुतळे एथें आहेत. यांशिवाय दुसऱ्या पुष्कळ नामांकित पुरुषांचे पुतळे या ठिकाणीं आहेत. ड्यूक-आव-वेलिंग्टन याची कबर ह्या देवालयांत आहे.

ह्या देवळांत एके जागीं एक मोठी चमत्कारिक युक्ति केली आहे. जिन्याच्या सुमारें २९० पायऱ्या चढलें ह्मणजे "व्हिस्परिंग ग्यालरी" लागते. ही गोलाकार असून फारच मोठी आहे. हिजमध्यें एकमेकाच्या समोर बहुत अंतरावर बसलें तरीही कानीं गोष्ट सांगतां येते. साधारणपणें मोठ्यानें हाक मारिली तरीही ऐकूं जाणार नाहीं इतकें एकमेकाजवळून दूर बसलें असलें, तथापि या देवळाच्या भिंतीला आपला कान लाविला ह्मणजे, कानीं गोष्ट सांगावी इतक्या हलक्या शब्दानेंही, दुरून एकमेकाबरोबर बोलतां येतें. हा मोठाच चमत्कारसा वाटतो. आह्मी चार मित्र मिळून एक दिवस हें देऊळ पाहावयास गेलों होतों. प्रथम आह्माबरोबरचा माहीतगार गोष्ट सांगितल्याप्रमाणें हळू आह्माशीं बोलला तें आह्मी ऐकिलें, परंतु आह्मास असें भासलें कीं समोर माहीतगार आहे हा उगाच बोलण्याचें ढोंग करीत आहे, वास्तविक बोलणारा दुसराच कोणी आमच्या मागें उभा असावा. याविषयीं खातरी करण्यासाठीं आह्मापैकीं एकजण तो माहीतगार उभा होता त्या ठिकाणीं गेला. त्याबरोबर आह्मास बोलतां आलें; ह्याप्रमाणें आह्मी बोललों, तें एकमेकांस ऐकूं आलें, परंतु ग्यालरींत उभें राहिलेल्या दुसऱ्या कोणास तें ऐकूं गेलें नाहीं.

घड्याळाच्या खोलींत जावें तों एक मोठें घड्याळ, त्याचे कांटे, आणि त्यांतील घांट पाहून मोठें आश्चर्य वाटतें. घड्याळाचे फक्त कांटेच १२० रत्तल जड असून त्यांतील मोठा कांटा ८ फुटी लांब आहे. मोठी घांट आहे तिचा परिघ ३० फुटी असून वजन ११ हजार रत्तल आहे असें सांगतात. ही घांट प्रत्येक तासाला वाजते. याशि-

वाय कित्येक विशेष प्रसंगीं ती वाजविण्यांत येते. राजघराण्यांतील कोणी मनुष्य, किंवा कोणी मोठा गृहस्थ मरण पावला ह्मणजे ही घांट वाजवितात. ह्या देवळांत एके जागीं ग्रंथसंग्रहही आहे.

बाहेर रस्त्यावरील गच्चीवर येऊन उभें राहावें म्हणजे संपूर्ण लंडन शहर दृष्टीस पडतें. उघाडी असते, म्हणजे पाऊस किंवा धुकें नसतें, तेव्हां एथून शहर पाहण्याची मोठी मौज आहे. गच्चीवर उभें राहून, खालीं माणसांची व गाड्यांची रहदारी पाहिली तर, आपणास असें वाटेल कीं हें उद्योगाचें रहाटगाडगें चाललें आहे, आणि त्याचा मोठा ध्वनि होत आहे.

परंतु सर्वांत उंचस्थानीं अजून जावयाचेंच आहे. अद्याप ४०८ पायऱ्या चढलें पाहिजे. ह्या कामाचा आतां कंटाळा आला आहे आणि हें जडसें वाटत आहे, परंतु इतक्या उंचावरून लंडन कसें दिसत असेल तें पाहावेंसें वाटतें. ह्या अत्यंत उंचस्थळीं जाऊन एका लहान खिडकींतून डोकावून पाहावें लागतें, आणि त्या दिवशीं धुकें वगैरे नसून उघाडी असली तरच ही एवढी मेहनत सफळ होते.

ह्या देवळांत दिवसांतून त्रिकाळ कांहीं धर्मविधि होतो, एकदां सकाळीं आठ वाजतां, एकदां दोन प्रहरांनंतर तीन वाजतां, आणि एकदां रात्रीस सवा नऊ वाजतां. प्रति रविवारीं आणि सणाच्या दिवशीं धर्मोपदेशक धर्मपर भाषण करितो. हें ख्रिस्ती धर्मांतील प्रॉतेस्तंत पंथाचें "इंग्लिश चर्च" आहे. क्याथलिक पंथाच्या देवळांपेक्षां ह्यांत कर्ममार्गाकडेस फारच थोडें लक्ष देतात. परंतु प्रातेस्तंत पंथांतील "स्काच चर्च" आदिकरून सुधारलेल्या मतांच्या देवळांपेक्षां ह्यांत अधिक कर्मविधि पाहण्यांत येतो.

सन १६६६ त लंडनांत मोठी आग लागली होती, तींत सेन्ट पालचें जुनें देऊळ अगदीं जळून गेलें. त्याच ठिकाणीं नवें देवालय

बांधण्याचें काम सन १६७५ त सुरू झालें, तें १७१० त म्हणजे ३५ वर्षांनीं पुरें झालें. तें बांधावयास सुमारें पाऊण कोटि रुपये लागले, ते कोळशांवर पट्टी बसवून उत्पन्न केले. कोळशांवर कर बसवून जें देऊळ बांधिलें त्याजवर कोळशासारखा काळसरपणा असलाच पाहिजे.

हें देवालय ३७० फुटी उंच आहे. याची लांबी ५०० फुटी, आणि रुंदी १०० फुटी आहे. ह्याणें एकंदर दोन एकर जमीन आटोपली आहे. देवळाच्या चारही बाजूंस लोखंडी जाळी केली आहे, तिलाच सवालक्ष रुपये खर्च झाला. हें देवालय पाहणें असल्यास, मे महिन्यापासून सतेंबर महिन्याच्या अंत पाहावयास जावें. जून महिन्यामध्यें ह्यांत धर्माच्या शाळेंतील मुलें जमा होऊन गातात तें ऐकण्याची संधि कधीं जाऊं देऊं नये.

## ९. वेस्तमिन्स्तर आबी.

WESTMINSTER ABBEY.

हें एक मोठें देवालय असून ह्यांत सात आठ "चापल्स" ह्मणजे लहान देवळें आहेत. ह्या देवळाची बांधणी पाहण्यासारखी आहे. ह्यांत इग्लंडचे राजे, राण्या, आणि मोठमोठे धर्माध्यक्ष यांचे पुतळे व कबरी आहेत. तसेंच किती एक नामांकित विद्वान्, कवि आदिकरून पुरुषांचेही पुतळे व कबरी आहेत. हे पुतळे व ह्या कबरी पाहण्याजोग्या आहेत. इतिहास शिकणारास लंडनचा किल्ला पाहून ज्याप्रमाणें एका प्रकारचा संतोष होतो त्याप्रमाणेंच "वेस्तमिन्स्तर आबी" हें देवालय पाहूनही झाल्यावांचून राहणार नाहीं.

हें देऊळ पार्लमेन्टसभागृहाच्या जवळच आहे. याचें बहुतेक बांधकाम जुन्याकाळचें आहे, परंतु मागच्या बाजूस कांहीं नवीन काम केलें आहे. इंग्लंडचा राजा मरण पावला ह्मणजे नवीन गादीवर बसणारास अभिषेक व्हावयाचा तो या देवळाच्या मोठ्या सभामं-

डपांत होतो. हा विधि "आर्चबिशप-आव-कान्तर्बरी" ह्मणून मुख्य आचार्य आहे तो करितो.

ह्या मोठ्या मंदिरांत अनेक लहान लहान पोटमंदिरें आहेत त्यांस निरनिराळीं नांवें आहेत. सातव्या हेन्री राजाचें मंदिर आहे तें विशेषेंकरून पाहण्यासारखें आहे. त्याचें छत बहुत मूल्यवान् आणि शोभायमान आहे. ह्या एका मंदिरासच वीस लक्ष रुपये खर्च झाला ह्मणून सांगतात. संपूर्ण देवालयास एकंदर ९० लक्ष रुपयांपेक्षां कमी खर्च लागलेला नसावा.

राजांच्या आणि राण्यांच्या कबरींवर बहुतकरून मयताचें चित्र कोरलेलें असतें, आणि प्रेत पेटींत घालतेसमयीं त्याचा पोशाक असतो त्या प्रमाणें त्या चित्राचा काढला असतो. एड्वर्ड नांवाचा राजा मरून सुमारें ९०० वर्षें झालीं, त्याची कबर थोड्या वर्षांपूर्वीं उघडून त्याचें प्रेत पाहिलें, तेव्हां त्याचें शरीर बाहेरून जसेंचा तसेंच सबंध सांपडलें.

## १०. पार्लमेन्टसभागृह.

NEW HOUSES OF PARLIAMENT.

हें गृह फारच मोठें व शोभायमान आहे. तें केवढें मोठें आहे, हें वाचणारांच्या ध्यानांत कांहीं अंशीं यावें ह्मणून मी इतकेंच सांगतों कीं ह्याणें आठ एकर जागा आटोपिली आहे. यांत ११०० मोठमोठे दिवाणखाने आहेत आणि १०० जिने आहेत. सर्व युरोपभर पर्यटन करून आलेले लोक असें ह्मणतात कीं ह्या संपूर्ण खंडांत अशी सुंदर व डौलदार इमारत दुसरी कोठें नाहीं. ही मोठी इमारत बांधण्यास दोन कोटि रुपये लागले असें सांगतात.

ह्या मंदिरास विशेष शोभा यावी ह्मणून याजपाशीं "विक्टोरिया टावर" नामक मनोरा बांधिला आहे. हा मनोरा ३४० फुटी ह्मणजे मुंबईंतील कोटांतल्या मोठ्या देवळाच्या तिप्पट उंच आहे. म-

ाराणीची जावयाची वाट ह्या मनोऱ्यांतून आहे. ह्यांत जातांना एक मोठी खोली लागते, तींत पुष्कळ पुतळे आहेत. त्यांत विक्टोरिया महाराणीचा पुतळा आहे तो फारच शोभा देतो. ह्या पुतळ्यांमध्यें "न्याय" आणि "दया" यांचेही पुतळे आहेत.

लोकांची आंत जाण्याची वाट निराळी आहे. "वेस्तमिन्स्तर हॉल" ह्मणून जी मोठी सदर आहे आणि जींत सर्वांत मोठें कोर्ट बसतें तींतून आंत जातां येतें. आंत जातांना एक मोठी खोली लागते तींतही पुष्कळ पुतळे आहेत. एथें दोहोंकडेस पुतळ्यांच्या हारी असल्यामुळें फारच शोभा येते. आठशें वर्षांमध्यें इंग्लंडांत निरनिराळे राजे होऊन गेले त्या सर्वांचे संगमरवरी दगडाचे पुतळे या जागीं आहेत. याप्रमाणेंच पीट, फॉक्स आदिकरून प्रख्यात राजकार्यधुरंधर पुरुषांचेही अनेक पुतळे आहेत. असे पुतळें पार्लमेन्ट सभागृहांत आणि त्याच्या आसपास एकंदर सुमारें ४९० होतील.

या गृहांत दोन मोठ्या जगप्रसिद्ध सभा भरतात. त्यांतील निदान एकतरी इकडून जाणारानें अवश्य पाहावी. ह्या सभा कांहीं बारमास भरत नाहींत, प्रति वर्षीं बहुधा फेब्रुवारीपासून जुलईपर्यंत, रविवार आणि मोठे सणाचे दिवस खेरीज करून, प्रत्यहीं भरतात. या सभेस जाणें तर कोणा सभासदाची चिठी पाहिजे. एका सभासदाच्यानें एकाहून अधिक चिठ्या देववत नाहींत. या उभय सभांचें काम, बुधवार खेरीज करून, नित्य संध्याकाळीं पांच वाजल्यापासून रात्रीस अकरा बारा आणि कधीं कधीं दोन वाजत तोंपर्यंत सुद्धां चालतें. बुधवारीं तें दोन प्रहरचे बारा, वाजल्यापासून संध्याकाळीं सहा वाजत तोंपर्यंत चालतें.

ह्या दोन सभांपैकीं एकीस "हौस-आव-कॉमन्स" ह्मणतात, आणि दुसरीस "हौस-आव-लॉर्ड्स" ह्मणतात, वेस्तमिन्स्तर हालांत गेलें

ह्मणजे डावीकडेस पहिली सभा भरते आणि उजवीकडेस दुसरी भरते. विक्टोरिया महाराणी प्रत्यहीं सभेस जात नाहींत, कांहीं अडचण नसल्यास वर्षांतून दोनदां जातात, एकदां पहिल्यानें पार्लमेन्ट सभा चालू होते तेव्हां, आणि एकदां वर्षाच्या अखेरीस बंद होते तेव्हां. राणी साहेब सभेस जातात तीं "हौस-आव-लॉर्ड्स" या सभेत जातात; आणि ते समयीं "हौस-आव-कॉमन्स" सभेचे सभासदही त्याच ठिकाणीं जाऊन महाराणीच्या सन्मुख उभे राहतात.

सभेचें काम पाहावयास जाणाऱ्या परकी गृहस्थांस संध्याकाळीं चार वाजल्यापासून पांच वाजत तोंपर्यंत खालीं एके जागीं बसवून ठेवितात, आणि वेळ झाली ह्मणजे, ते आले असतील त्या क्रमानें एकेकास "स्त्रेन्जर्स ग्यालरी"मध्यें पाठवून देतात. निदान ४० सभासद हजर असलें तरच सभेचें काम चालतें. "हौस-आव-कॉमन्स" सभेचे सभासद एकंदर सुमारें ६५० आहेत, आणि "हौस-आव-लॉर्ड्स" सभेचे सुमारें ४५० आहेत. सोमवारीं, शुक्रवारीं आणि मोठ्या अगत्याच्या विषयावर वादविवाद चालतो तेव्हां बहुतकरून सभा भरपूर असते. अशा समयीं सभा पाहण्याची मोठी मौज आहे, आणि ही मौज भोगण्याविषयीं कित्येक लोक अत्यंत आतुर असतात.

ज्या जागीं "हौस-ऑव-कॉमन्स" ही सभा भरते ती जागा पार्लमेन्टसभागृहाच्या मानानें पाहतां, फारच लहान आहे. ती सगळी ६२ फुटी लांब आणि ४५ फुटी रुंद आहे. तथापि तो दिवाणखाना फार उंच व शृंगारलेला असल्यामुळें बहुत शोभतो. त्यांतील काचीच्या रंगीत खिडक्यांवर काढलेलीं चित्रें व काचीचें छत पाहण्यासारिखें आहे. दिवे लावितात ते छताच्या बाहेर लावितात, परंतु त्यांचा उजेड आंत इतका पडतो कीं त्याच्या योगानें वाचतां येतें.

ह्या सभेंतील प्रमुखाचें स्थान, स्त्रेन्जर्स-ग्यालरींत परक्यांस बसवि-

तात त्याच्या समोरच आहे. हा सभानायक पांढऱ्या केंसाचा टोप घालून बसतो. त्याला "स्पीकर" ह्मणजे बोलणारा अशी संज्ञा आहे. आज सभेंत कोणकोणत्या विषयांवर वादविवाद किंवा सूचना होणार व कोणकोण करणार हें, छापलेले कागद असतात त्यांवरून कळतें. सभासदांस बसावयास लांब कोचीसारखे बांक केलेले आहेत. इंग्रज लोकांच्या संप्रदायाप्रमाणें कोठेंही घरांत किंवा चौघांत गेलें तर टोपी काढून बसलें पाहिजे; परंतु या सभेचा परिपाठ असा नाहीं. हिचे सभासद बहुतकरून टोप्या घालून बसतात.

स्पीकर अथवा अध्यक्ष याच्या उजवीकडेस राजाचे प्रधान व त्यांचे इष्टमित्र बसतात, आणि डावीकडेस त्यांच्या समोर त्यांचे प्रतिपक्षी सभासद बसतात. ज्या विषयावर विवाद चालला असेल त्याविषयीं प्रत्येक सभासदास एकदांच भाषण करण्याचा अधिकार आहे.

प्रधान अथवा निरनिराळ्या खात्यांवरील सेक्रेटरी हे सरकारच्या तर्फेचे सभासद होत. हे नित्य सभेस येतात. सरकारचें कांहीं न्यून किंवा दोष काढून कोणी सभासदानें कांहीं प्रश्न केला असतां त्याचा जबाब हे मोठे कामदार देतात. आज कोणते सवाल व्हावयाचे तें अगोदर छापिलेल्या पत्रकावरून कळतें, आणि त्यावरून प्रत्येक प्रधान आपापल्या खात्याविषयीं जबाब देण्याची तयारी करून येतो. इंग्लंडच्या वसुलाबाबद कोणी सभासदानें कांहीं प्रश्न केला, तर त्याचें उत्तर त्या खात्याचा सेक्रेटरी म्हणजे प्रधान देतो. हिंदुस्थानासंबंधी कोणी कांहीं सवाल केला तर हिंदुस्थानचा कारभार पाहणारा प्रधान त्याचा जबाब देतो.

नित्य संध्याकाळीं सात वाजण्याच्या सुमारास सभा पातळ होऊं लागते, ती पुनः नऊ वाजतां भरते. तथापि सभेचें काम चाललेंच असतें, तें कांहीं बहुधा बंद पडत नाहीं. काम बहुतकरून बारा वाजत

तोंपर्यंत चालतें, परंतु सर्व सभासद तेथपावेतों सभेंत राहतात असें नाहीं. कांहीं मोठ्याच अगत्याचें काम चाललें असलें, तर शेवटपर्यंत सभा जशीचातशी भरलेली राहते. साधारणतः, जो विषय चालला असतो त्याशीं ज्या सभासदांचा कांहीं विशेष संबंध असतो तेवढे मात्र राहतात, इतर पाहिजे तेव्हां जातात येतात.

ह्या सर्व सभासदांचे "क्लब" पार्लमेन्टसभागृहाच्या आसपासच असतात, ह्मणून ते मध्यें खाण्यापिण्यास व विश्रांति घेण्यास आपापल्या क्लबांत जातात. कोणत्याही विषयावर सम्मति घ्यावयाची तेव्हां घांट वाजते, ती ऐकून संमत देण्यास सर्व आंत येतात. पुष्कळदां अशीं मतें पडतात कीं तेणेंकरून सरकार हरतें, म्हणजे राजाचे सेक्रेटरी किंवा प्रधान यांच्या मनांत सरकारच्या वतीनें जे कांहीं करावें असें असतें तें न करावें अशीं पार्लमेन्टच्या बहुतेक सभासदांचीं मतें पडतात, तेव्हां सरकार ह्मणजे राजाचे प्रधान हरले असें ह्मणतात.

कोणत्याही अगत्याच्या विषयावर पार्लमेन्ट सभेंत भाषण आणि वादविवाद होत असतो, तेव्हां तो प्रकार अवश्य पाहण्याजोगा असतो. हीं सर्व भाषणें निरनिराळ्या वर्तमानपत्रांचे "रिपोर्टर" शब्दशः उतरून घेतात, आणि सकाळच्या प्रहरीं तीं अक्षरशः छापून प्रसिद्ध होतात. ह्या रिपोर्टरांची बसण्याची निराळीच जागा आहे, "दीस रिपोर्टर-ग्यालरी" ह्मणतात. ह्या रिपोर्टरांची चपलता व त्वरा पाहण्यासारखी आहे. हे रिपोर्टर तासातासानें पालटतात. एकेका पत्राच्या रिपोर्टरानें एका तासांत जितकें लिहिलें असेल तितकें घेऊन तो उठून जातो, आणि त्याच्या जागीं दुसरा रिपोर्टर येऊन बसतो. पहिला रिपोर्टर लागलाच छापखान्यांत जाऊन संक्षिप्त शब्दांनीं आपण जें लिहून घेतलेलें असतें तें आपणच लावू-

न इतरांस वाचतां येईल अशा रीतीनें लिहून देतो. याप्रमाणें या रिपोर्टरांचें काम चालतें.

पाहावयास जाणाऱ्या स्त्रियांस बसण्यास रिपोर्टरांच्या पाठीमागें उंच ग्यालरी केली आहे. त्या ग्यालरीवर बारीक जाळी लाविली आहे, तींतून त्यांस पाहतां येतें. ह्याप्रमाणें स्त्रियांनीं पडद्यांतून पाहण्याचा परिपाठ विलायतेंत पार्लमेन्ट सभेशिवाय दुसऱ्या कोणत्या ठिकाणीं आढळणार नाहीं.

मी दोनदां पार्लमेन्ट सभा पाहावयास गेलों होतों. प्रथम गेलों तेव्हां, पदार्थसंग्रहालयासाठीं नवें घर बांधण्याविषयीं वादविवाद चालला होता. या वेळीं मी "स्ट्रेन्जर्स ग्यालरी"त बसलों होतों. दुसऱ्या वेळीं गेलों तेव्हां सर चार्ल्स वुड यांणीं "हिंदुस्थानच्या जमाखर्चाचा हिशेब" वाचून दाखविला. ते समयीं मुंबईंतील मांडवीचे मागील कमिशनर मिस्तर स्पुनर यांच्या वृद्ध तीर्थरूपांच्या मेहरबानीनें, पार्लमेन्टचे सभासद बसतात त्यांच्या पाठीमागें आह्मास बसावयास जागा मिळाली. ह्या भल्या वृद्ध गृहस्थाच्या डोळ्यांनीं आतां दिसत नाहीं असें असतां, तो स्वतः आह्मास "हौस-आव-लॉर्ड्स" सभेंत बरोबर घेऊन गेला, आणि तेथून "हौस-आव-कॉमन्स" सभेंत आणून या मोठ्या मानाच्या जागीं बसविलें. हा गृहस्थ आणि याचा मुलगा हे दोघे जणही माझे मित्र रावबहादुर रामचंद्र बाळकृष्णजी यांजवर फार लोभ करीत असत. मी प्रथम गेलों तेव्हां नामदार मिस्तर किनार्ड यांणीं, आणि दुसऱ्या वेळीं मेहरबान कर्नल सैक यांणीं मला चिटी दिली होती; आणि ते मजवर बहुत लोभ करीत असत, त्याबद्दल त्यांचे आभार मानण्यास हेंच स्थळ व प्रसंग योग्य असें समजून मी तसें करितों.

"हौस-आव-लॉर्ड्स" या सभेचा डौल व भव्यपणा "हौस-आव-कॉम-

न्स" या सभेपेक्षां अधिक आहे. मानकऱ्यांच्या सभेचा दिवाणखाना प्र-
तिनिधींच्या सभेच्या दिवाणखान्यापेक्षां ३० फुटांनीं लांब आहे. त्यांत
च राणीचें सिंहासन आहे, तेणेंकरून तर त्यास फारच शोभा येते.
आम्ही पाहावयास गेलों तेव्हां सिंहासन रिकामें होतें. त्या सभेमध्यें
मोठमोठे श्रीमंत भाषणें करितात त्यांच्या विद्येशीं व ज्ञानाशीं आपल्या
एथील श्रीमंतांच्या विद्येची व ज्ञानाची तुळणा तिळमात्र होणार नाहीं.
ते मोठे संपत्तिवान असून केवढी रात्रपर्यंत जागत बसतात, आणि ह-
रएक विषयाचें ज्ञान व माहिती करून घेण्याविषयीं किती श्रम क-
रितात! आपले श्रीमंत लोक स्वदेशाच्या कल्याणार्थ याप्रमाणें के-
व्हां श्रम करूं लागतील!

## ११. बिलोरी महाल.

CRYSTAL PALACE.

संपूर्ण लंडनांत किंबहुना इंग्लंडांत ज्ञानप्राप्तीनें व मनोरंजनानें
सर्वांत उत्कृष्ट स्थळ म्हटलें म्हणजे बिलोरी महाल होय. कोणीही
विलायतेस जाऊन हा महाल पाहिल्याविना परत येऊं नये. तो
एकदां तर काय, परंतु पांच सात वेळां पाहिला तरी देखील मनाची
तृप्ति होणार नाहीं. केवळ हा महाल पाहण्याच्याच उद्देशानें को-
णी एतद्देशीय गृहस्थ विलायतेस गेला, तरी सुद्धां त्याच्या त्या भगीरथ
श्रमाचें व खरचल्या द्रव्याचें सार्थक होईल. हा महाल पाहून अति-
शयित आनंद व आल्हाद होईल इतकेंच नाहीं, तर त्यानें ज्ञान आणि
बुद्धीची रसिकताही वृद्धि पावेल. मी हा महाल एकदां पाहिला आ-
हे, तथापि तो केव्हां पुनः जाऊन पाहीन असें मनास वारंवार होतें.

बिलोरी महाल हा राज्यसंबंधी उद्देशानें बांधिला आहे असें ना-
हीं, तर केवळ प्रजेच्या हितार्थ बांधिला आहे. ज्या मंदिरांत महा-
राणी विक्टोरिया राहतात त्याची देखील बाहेरील शोभा याच्या इत-

की नाहीं. याप्रमाणें प्रजेच्याच सुखार्थ बांधलेलें असून शोभायमान असें मंदिर संपूर्ण युरोपखंडांत दुसऱ्या कोठेंही नाहीं म्हणून सांगतात. युरोपांतील प्रवासी लोक देखील हा महाल पाहून स्वदेशीं परत गेल्यावर याची फार वाखाणणी करितात. आपल्या देशांतील कोणीही प्रवासी हा महाल पाहून चकित झाल्यावांचून राहणार नाहीं.

आपल्या कवींनीं स्वकपोलकल्पित सुवर्णमय अथवा रत्नखचित मंदिरांचीं वर्णनें केलीं आहेत, परंतु त्यांणीं हा विलोरी महाल पाहून याचें यथार्थ वर्णन केलें असतें, तर त्यापुढें त्यांचा कल्पित मिथ्या अलंकार खचित् यःकश्चित्सा दिसला असता. आपले (गुजराथी) नर्मद कवि अथवा दलपत कवि यांसच हें मंदिर पाहून त्याचें यथार्थ वर्णन करण्यासाठीं विलायतेस पाठविलें, आणि त्यांणीं त्याचें विवेचन करून एक मोठा ग्रंथ भरला, तथापि तें पूर्ण होणार नाहीं असें मला वाटतें. तात्पर्य, "क्रिस्तल पालेस" ह्मणजे विलोरी महाल याच्या स्तुत्यर्थ मी लिहीन तेवढें थोडेंच असें समजावें.

हा महाल प्रथम ज्या ठिकाणीं बांधिला होता त्या ठिकाणीं तो आतां नाहीं. तो तेथून काढून दुसऱ्या ठिकाणीं बांधिला. संपूर्ण पृथ्वीवर उत्पन्न होणारे पदार्थ आणि कृतीनें केलेल्या वस्तु यांचें प्रदर्शन सन १८९१ त झालें, ते समयीं हा महाल बांधण्यांत आला. त्या वेळेस तर, हें प्रदर्शन जोंपावेतों चालेल तोंपावेतों हा महाल ठेवावा असा विचार होता. परंतु तो पाहून इंग्लिश लोक इतके मोहित झाले कीं लोकहितास्तव तो निरंतर तसाच असावा असें पुष्कळांस वाटूं लागलें.

तेव्हां लागलीच "क्रिस्तल-पालेस कंपनी" उपस्थित झाली, आणि तिणें पन्नास लक्ष रुपयांचें भांडवल जमविलें. विलोरी महाल हैड-पार्कांत होता तो प्रदर्शन समाप्त झाल्यावर तेथून काढून "सिड्-

नम" ह्मणून एक गांव लंडनाहून पंधरा मैल आहे तेथें नेला; ह्मणजे त्याचें सर्व बांधकाम अथवा सामान तजविजीनें जसेंचा तसें उतरून नेऊन सिड्नम गांवीं तो महाल पहिल्याप्रमाणें पुनः उभा केला. हें नवें स्थळ सर्वप्रकारें बिलोरी महालास योग्य असें असून, तेथें आगगाडींतून सुलभपणें जातां येतें.

तेथें जावयास आगगाडी जेव्हां पाहिजे तेव्हां तयार असते. आपण ष्टेशनावर जाण्याच्या किंचित् पूर्वी आगगाडी निघून गेली असली, तथापि फार तर पावतास थांबलें ह्मणजे झालें. कित्येक सणवारीं अथवा मोठ्या प्रसंगीं तर आगगाडी पांच पांच मिनिटांनीं बिलोरी महालास जावयास निघते. नित्य हजारो मनुष्यें तेथें केवळ व्यायाम करावयास जातात. मुंबईमध्यें आपण वाडींत मौज मारावयास जातों त्याप्रमाणें एथें सहस्रावधि लोक नित्यशः ह्या महालांत मौज मारावयास जातात. शनवारीं आणि दुसऱ्या कित्येक मोठ्या दिवशीं बिलोरी महालांत जावयास पांच सात रुपये पडतात, परंतु एऱ्हवींच्या दिवशीं फक्त अर्धरुपया खरचला ह्मणजे तेवढ्यांत ह्या महालाची सर्व मौज भोगावयास मिळते.

बिलोरी महाल पाहून, हा नांवाप्रमाणें खराखुराच बिलोरचा बांधिला आहे असें कोणीही ह्मणेल. त्याच्या भिंतीच काचीच्या आहेत, असें नाहीं तर पाखें सुद्धां काचीचें आहे. ह्या काचीमुळें सूर्य प्रकाशतो तेव्हां सर्व महाल दुरून चकचकीत झळकतो, जसा काय तो हिरेमाणकाचाच आहे. अहाहा! दुरून किंवा जवळून तो किती शोभायमान व भव्य दिसतो! त्याचा बाग केवढा विस्तीर्ण आणि रमणीय आहे! आहाहा! त्याचें छत, खिडक्या, दरवाजे यांचा डौल किती चांगला आणि शोभिवंत आहे!!

हा महाल केवढा मोठा असावा आणि यार्णे किती जागा आटो-

पली असावी बरें? मी सांगितलें तर वाचणारे विस्मय पावून कदाचित् तें खरें मानणार नाहींत. हा महाल सुमारें २८०० फुटी लांब, ४०० फुटी रुंद, आणि १७९ फुटी उंच आहे, आणि त्याणें दोनशें एकर जागा आटोपली आहे!! परंतु कोणी असें विचारतील कीं या महालांत कांहीं पाहावयास आहे किंवा रिकामा महालच पाहावयाचा? तर मित्रहो, ह्यांत इतकें पाहावयास आहे कीं आपण दहा बारा दिवस पाहत राहिलों तथापि तें पाहून होणार नाहीं, आणि एथून जावें असें आपणास वाटणार नाहीं.

ह्या महालांत जातांच असें भासतें कीं पृथ्वीच्या चारही खंडांतील भिन्नभिन्न जातींचीं आणि भिन्नभिन्न रूपांचीं रानटी माणसें एथें येऊन उभींच आहेत. त्यांचे पुतळे उभे करून ठेविले आहेत ते असे आहेत कीं जशीं काय अमेरिका, आफ्रिका आणि आस्ट्रेलिया एथून खरींच रानटी मनुष्यें येऊन आपल्यापुढें उभीं राहिलीं आहेत. तीं बोलत चालत नाहींत एवढाच काय तो भेद. आहाहा! ईश्वरानें अशींही मनुष्यें निर्माण केलीं आहेत असें मनांत येऊन विस्मय होतो. याप्रमाणेंच आपल्या देशांत हिमालयावर राहणाऱ्या पहाडी लोकांचे मुखवटेही एथें दृष्टीस पडतील.

किंचित् पुढें गेलें ह्मणजे एक मोठें बिलोरी कारंजें दृष्टीस पडतें. तें पाहूनच मोठें आश्चर्य होतें. तेथून आसपास नजर फेंकून पाहिलें तर, काय पाहावें आणि काय न पाहावें हें सुचेनासें होतें. जणूं अवघें ब्रिटिश म्यूझियमच या ठिकाणीं आणलेलें आहे. त्यांत फरक तो इतकाच, कीं एथें नाना प्रकारचे पदार्थ ठेविले आहे ते या महालाच्या नांवास आणि योग्यतेस शोभतील असेच ठेविले आहेत. निरनिराळ्या दिवाणखान्यांत निरनिराळ्या देशांतील कारागिरीच्या पदार्थांचा संग्रह केला आहे. या एकेका दिवाणखान्यास "कोर्ट"

म्हणजे दरबार म्हणतात. उदाहरणार्थ, "इजिप्श्यन कोर्ट" म्हणजे मिश्र देशचें दरबार, "आसिरियन कोर्ट" म्हणजे आसुर देशाचें दरबार, इत्यादि.

परंतु याशिवाय पाहावयास दुसरें पुष्कळ आहे. महालाच्या आंत एका जागीं मोठमोठीं झाडें वाढत आहेत. कोणी म्हणेल कीं, काय महालांत झाडें वाढतात? तर मी म्हणतों होय, या बिलोरी महालामध्यें एका जागीं खरींखुरींच मोठमोठीं झाडें वाढत आहेत. ह्या महालांत अनेक यंत्रांचे मासले आहेत. छापतात तें कसें, वस्त्रें विणतात तीं कशीं, काच तयार करितात कशी, वगैरेचे मासले एथें यंत्रें चालवून दाखवितात.

सर्व तऱ्हतऱ्हांच्या जिन्नसा व सामान विकण्याचा बाजारही या बिलोरी महालांत आहे. कोणी विचारतील, काय ह्या महालांत आणखी बाजार भरतो? तर मी सांगतों कीं, होय बाजार भरतो. हा महाल विचित्रच आहे. यांत जिन्नस विकतही मिळतात. ह्यांत आणखी एक दफ्तर आहे; एक तसबीरखाना आहे; आणि एक छापखानाही आहे. सकाळपासून संध्याकाळपर्यंत मौज मारावयास येणाऱ्या लोकांसाठीं मेवामिठाईचीं दुकानें देखील आहेत. एथें दररोज लोकांचा मोठा मेळा मिळतो.

प्रति शनवारीं आणि इतर कांहीं मोठ्या दिवशीं बिलोरी महालांत नेहमीपेक्षां कांहीं विशेष पाहावयास असतें. त्यांत एका दिवाणखान्यांत एक फारच मोठी वाद्याची पेटी आहे; त्या ठिकाणीं गवई लोकांस बसण्यासाठीं वाटोळ्या जिन्यासारखी चढत्या उतरत्या बैठकींची एक जागा केली आहे. तीन चार हजार गवई एकत्र बसून एका रागानें आणि एका सुरानें गातात तें खरोखरच ऐकण्यासारखें आहे. गवयांची संख्या अधिक असेल त्याप्रमाणें एका सुरानें

गाणें अधिक कठीण होतें. असें असून ३००० गवई मिळून एका रागानें आणि एका सुरानें गातात ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. सर्व प्रकारची विद्या आणि कला होईल तितक्या पूर्ण दशेस आणण्याविषयीं विलायतेचे लोक श्रम करीत आहेत, त्याप्रमाणेंच गायनविद्याही त्यांणीं अशा उच्च स्थितीप्रत आणून ठेविली आहे.



विलोरी महालाच्या बागांतील कारंज्याची शोभा.

विलोरी महालाचा बागही विलोरी महालास शोभेल असाच आहे. ह्या बागांत जाऊन अंमळ बसलें असतां जिवास समाधान होतें. झाडाझुडांच्या रचनेंत आणि हिंडण्याफिरण्याच्या जागेंत तिळमात्र व्यंग नाहीं. मी ह्या बागांत बसून विलोरी महाल निरखून पाहूं लागलों. समोर कारंजें मजेनें उडत होतें. ते समयीं माझ्या मनांत

अनेक आनंदकारक विचार आले. मी ह्मणालों मी केवढा भाग्यवान् कीं अशा स्थळीं येऊन बसलों आहें! ज्यांणीं हें अतिसुंदर मंदिर पाहिलें नाहीं त्यांचें जिणें काय कामाचें? मी विलायतेस गेल्यामुळे जे माझा द्वेष करून मला छळूं पाहत आहेत, त्यांस माझें इतकेंच सांगणें आहे कीं या प्रसंगीं मला जो आल्हाद झाला त्याच्या स्मरणमात्रें करून माझ्या मनाला जें समाधान होतें तें तुमच्यानें कदापि मजपासून हिरावून घेववणार नाहीं.

कधीं कधीं मुलांच्या सर्व शाळाचाशाळा हा बिलोरी महाल पाहावयास जातात. मुलांस यापासून ज्ञान आणि विश्रांति दोनही प्राप्त होतात. ज्या देशांत शाळेंतील मुलांस अभ्यासाबरोबर अशी मौज मारावयास मिळते, त्यांची विद्याभ्यासावर भक्ति असली म्हणून नवल तें कोणतें?

आणखी या महालाच्या बागांतून केव्हां केव्हां "बलून" ह्मणजे विमान उडवून दाखवितात. केव्हां केव्हां तऱ्हतऱ्हांचीं फुलें नाना प्रकारच्या रीतींनीं मांडून ठेविलीं असतात. अशा समयीं चाळीसहजारांपासून पन्नास हजार पर्यंत मनुष्यें जमतात. या महालाचें सालिना उत्पन्न बारा लक्ष रूपये आहे, आणि खर्च नऊ लक्ष आहे.

## १२. विन्सर राजमंदिर.

WINDSOR CASTLE.

इंदिया कौन्सिलाचा सभासद कप्तान ईस्विक मजवर फार लोभ व ममता करीत असे, त्याणें लार्ड चेम्बरलेन याजवळून मला हें मंदिर पाहण्याची परवानगी आणून दिली. याविषयीं आणि इतर प्रकारेंही मी ह्या भल्या आणि आमच्या देशाविषयीं शुभचिंतक गृहस्थाचे उपकार मानितों. लार्ड चेम्बरलेन याची चिटी मिळाल्यावर आह्मी हें प्रख्यात विन्सर राजमंदिर पाहावयास गेलों.

हें महत् राजमंदिर मोठ्या राज्यास शोभे असें आहे. बाहेरून

याचा डौल किल्ल्यासारखा आहे. हें लंडनाहून एकवीस मैल दूर आहे. आगगाडींत बसून एका तासांत एथें जातां येतें. हा वाडा बहुत वर्षांचा जुनाट आहे. यास सुमारें ८०० वर्षें झालीं असतील. पुष्कळ वेळां त्याची डागडुजी व सुधारणा करण्यांत आली आहे. असें करण्यासच आज दिवसपर्यंत एक कोटि रुपयांपेक्षां अधिक खर्च झाला आहे. ह्या मंदिरावर महाराणीची फार प्रीति आहे, आणि वर्षांतून कांहीं महिने त्या एथें येऊन राहतात.

ह्या वाड्यांत विशेष हें आहे कीं तो अगदीं एकांत स्थळीं आहे इतकेंच नाहीं, तर आणखी त्याच्या सभोंवतीं सृष्टिस्वरूप फार सुंदर आणि नेत्र गार करून सोडणारें असें आहे. एका मोठ्या वनांतील दाट झाडी त्या मंदिरांतून दिसते. हें वन १८०० एकर आहे. त्यांत ओकाचे वृक्ष बहुत आहेत. आहाहा! आह्मी या महालावर चढून चहूंकडे पाहिलें तेव्हां किती रमणीय आणि सुंदर देखावा दृष्टिस पडला! उष्ण ऋतु असल्यामुळें चारीचा हिरवा गालिचाच जसा काय पसरला होता, आणि त्यावर दाट झाडी लागली होती.

हें मंदिर एवढें मोठें आहे कीं याणें (आणि बागानें मिळून) ९०० एकर जागा आटोपली आहे. अशा मोठ्या वाड्यांत दिवाणखान्यांला आणि खणांला कांहीं पारच नाहीं. तसेंच आंत मोलवान् सामानसुमान किती आहे याचा देखील कांहीं सुमार नाहीं. चित्रांच्या कित्येक तसबिरी फारच मोठ्या आणि मोलवान् आहेत. ह्या एकेका तसबिरीची किंमत अर्धलक्षापासून एक लक्ष रुपयांपर्यंत होते असें आमच्या समजण्यांत आलें! यांतील प्रत्येक चित्रांची किंमत इतकी, त्यापेक्षां यांत जें इतर सुंदर सामान आहे त्याच्या किंमतीचें अनुमान कसें होईल?

या महालांतील निरनिराळे मोठमोठे खण किंवा दिवाणखाने यांचें वर्णन मी काय करूं ? यांतील सामान, शृंगार आणि मोठमो- ठ्या तसबिरी हीं मी काय वाणूं? आहाहा ! काय ते सोनेरी छत, का- य ते रंगीत पडदे आणि काय ते उंची गालिचे!! या आरशांची कि- मत होणारच नाहीं.

या वाड्यामध्यें एका दिवाणखान्यांत आपल्या हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांपासून प्राप्त झालेलें जवाहीर एकत्र करून ठेविलें आहे. यापैकीं बहुतेक जवाहीर, लढाईंत राजेरजवाड्यांना पराजय करून मिळविलेलें असावें असें वाटतें. एक मयूरासन आहे ते आणि दुस- रें तऱ्हतऱ्हांचें जवाहीर नजरेस पडतें. आहाहा! कोणत्या देशांतील आणि कोणत्या राजांचें जवाहीर, आणि कोठें येऊन पडलें आहे! इंग्रजी राज्याचा झेंडा हिंदुस्थानांत सुरक्षित राहावा अशी माझी ई- श्वरापाशीं प्रार्थना आहे, तथापि इंग्रज सरकारानें हें माझ्या देशांतील जवाहीर माझ्याच देशांत राहूं दिलें असतें तर चांगलें होतें, असें मला वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

विक्टोरिया महाराणीचा भ्रतार प्रिन्स ऑल्बर्ट हा याच वाड्यांत मरण पावला. ज्या दिवाणखान्यांत ही अत्यंत शोककारक गोष्ट घ- डली तो आह्मास दाखविला. वाड्यांतील निरनिराळ्या खणांत अ- थवा दिवाणखान्यांत पांच तासपर्यंत एकसारखें पाहत फिरत होतों, तथापि आमची पाहून तृप्ति झाली नाहीं. "रेड" नांवाचें मासिक किताब सरकारांतून ज्यांना मिळतात त्यांच्या नांवांची यादी एका मोठ्या दिवाणखान्यांत ठेविली आहे. कोणकोणत्या पुरुषांस कोण- कोणत्या वर्षी हे किताब देण्यांत आले त्याचा सर्व तपशील तेथें लि- हून ठेविला आहे. या यादींत आपले प्रख्यात नागरिक सर जमशे- टजी यांचें नांव असेलच असें समजून आम्ही तें शोधावयास लागलों;

परंतु नांवें पुष्कळ होतीं आणि आम्हांस वेळ फार नव्हता, यामुळें तें आम्हांस सांपडलें नाहीं.

हिंदुस्थानांतील पंधरा कोटि लोकांवर राज्य करणारी जी राणी तिच्या मोठेपणास आणि नांवास शोभे असें हें मंदिर आहे. हें मंदिर पाहून मी फारच संतुष्ट झालों. तेथून जातेसमयीं मी मनांत म्हणालों, हे भगवान ! या राजमंदिराचें सुख भोगण्यास महाराणी विक्टोरिया आणि त्यांच्या कुटुंबांतील मनुष्यें बहुत वर्षें वांचोत. तथास्तु.



# प्रकरण ६.

# विश्रांतिस्थळें व प्रदर्शनें.

## VI—PLACES OF RECREATION AND EXHIBITIONS.

विलायतेंत आपण सर्व दिवस श्रम करून थकलों अथवा कं-
लों असलों तर, आतां जिवास कोणत्या रीतीनें सुख होईल अ-
रावें, अशा विचारांत पडावें लागणार नाहीं. तेथें कोठें तमा-
ात असतात; कोठें नाचरंग चालले असतात; कोठें गाणेंब-
णें होत असतें; आणि कोठें तमासे पाहण्यासाठीं नित्य रात्रीस
ांचे मेळेचामेळे जमले असतात.

यांतील कितीएक तमासे फार मोठे होतात; कितीएक तमासे
ावयास सर्व लोक मोठे उत्कंठित होतात; कितीएक तमासे बार-
होत असतात; कितीएक उष्ण काळांत मात्र होतात; आणि
येक कांहीं नेमिलेल्या दिवशींच होतात.

### १. नाटकगृहें.

#### OPERAS AND THEATRES.

या देशांतून जाणाऱ्या प्रवाशानें विलायतेंत कितीएक नाटकगृहें
ेत तीं अवश्य पाहावयास जावें. इंग्लंडांतील लोकांच्या गृहस्थिती-
ान निरनिराळीं नाटकें पाहिल्यानें थोडक्या काळांत होईल तसें
्या रीतीनें होणें कठीण आहे. तेथील नाटकगृहांमध्यें निर-
ळीं नाटकें होतात त्यांत इंग्लंडांतील लोकांच्या गृहस्थितीचें य-
स्वरूप आपल्या डोळ्यांसमोर दिसतें. ह्मणून जितकीं नाटकें
ाक पाहावीं तितकी त्या लोकांच्या गृहसंबंधी स्थितीची अधिक
हती होईल, आणि त्यांच्या चाली कोणत्या प्रकारें चांगल्या आहे-
आणि कोणत्या प्रकारें वाईट व दोषार्ह आहेत हें समजेल.

आतां, सर्व प्रकारच्या तमाशांपेक्षां नाटकाची प्रशंसा अधिक करणें योग्य आहे. कारण यापासून दोन कार्यें होतात; एक तर रिकामपणाच्या वेळीं मनाची कर्मणूक होते आणि सगळ्या दिवसाचा शीण जाऊन मनास विश्रांति मिळते. दुसरें, नाटक पाहणारास बोध व शिक्षा प्राप्त होते; कारण कोणत्याही नाटकांत वाईट कर्माचा परिणाम वाईट होतो आणि चांगल्याचा चांगला होतो हें दाखविलें असतें. बहुतेक नाटकांत शृंगाररसाचें प्राधान्य असतें हें खरें आहे, तथापि खरा जो करुणारस तोही त्यांत असतो. या देशांत शृंगाररस ह्मटला ह्मणजे बहुतकरून व्यभिचारकर्माकडेस लावितात. परंतु तेथें तसें नाहीं. कित्येक प्रसंगीं खऱ्या प्रेमाचा ओत आलासा दिसतो, परंतु त्यांत कांहीं दुष्ट हेतु असतो असें मला वाटत नाहीं. कोठें कांहीं वाईट हेतु असलाच तर त्याचा परिणाम अंतीं वाईटच होतो, असें या नाटकांत दाखविलें असतें.

लंडनांत नाटकगृह एक आहे असें नाहीं, बहुत आहेत. त्यांत "हर माजेस्तिज थिएटर," "रॉयल इतालियन ऑपरा," "प्रिन्सेस थिएटर," आदिकरून नाटकगृहें प्रख्यात आहेत. या नाटकगृहांची शोभा आणि भव्यपणा कांहीं साधारण नाहीं. तीं बाहेरून दिसण्यांत जशीं सुंदर आहेत तशीच त्यांच्या आंतील व्यवस्थाही नीट, शोभायमान आणि सुखावह अशी आहे. मी निरनिराळ्या नाटकगृहांत मिळून एकंदर सहा सात वेळां गेलों होतों.

"रॉयल इतालियन ऑपरा" यांत मी तीन वेळां गेलों होतों. अहाहा! हें नाटकगृह किती सुंदर आहे! आंत जातांच दोन मोठे पुतळे दृष्टीस पडतात. एक पुतळा "त्राजेडी" चा ह्मणजे करुणारसप्रदर्शक किंवा विलापप्रदर्शक आहे. दुसरा पुतळा "कॉमिडी" चा ह्मणजे हास्यरसप्रदर्शक आहे. (इंग्रजींत) नाटकें दोन प्रकारचीं आहेत.

एक असें कीं जेणें करून रडूं यावें आणि नेत्रांतून अश्रु गळूं लागावे. दुसरें असें कीं जेणें करून हंसूं यावें. हे दोन प्रकार दर्शविण्यासाठीं एक करुणारसाचा आणि एक हास्यरसाचा असे दोन पुतळे ह्या नाटकगृहांत करून ठेविले आहेत, ते आंत जातांच दृष्टीस पडतात.

ह्या नाटकगृहांत नाटकें होतात त्यांत आणि साधारण नाटकांत फार अंतर आहे. ह्या नाटकांस "ऑपरा" अशी संज्ञा आहे. "ऑपरा" यांत सर्व नाटक गायनाच्या योगानेंच करून दाखवितात. हें गायन फार उत्कृष्ट असतें आणि तें ऐकणें तेथील लोकांस फार आवडतें. उत्तम गायन ऐकावयाचें असलें तर आपरास जावें. गायनविद्या किती उच्च स्थितीप्रत पोंचूं शकेल हें पाहणें असलें, तर तें या स्थळीं दृष्टीस पडेल. कोयाळ पक्ष्याप्रमाणें बारीक आणि मधुर अलाप इतक्या उंच सुरावर कसा घेतां येतो म्हणून आपणास आश्चर्य वाटतें. कोणी असें ह्मणतील कीं गाणारी आपल्या घशांत कांहीं युक्तीनें पेपेरें किंवा बारीक नळी घालून असा बारीक मधुर सूर काढीत असेल; परंतु तसें कांहीं नाहीं. गाणारीचा सूरच असा मधुर आणि मध्यें तुटल्याशिवाय उंचच उंच चढेल असा असतो.

ऑपरांतील गायनांत दुसरी एक मोठी खुबी आहे ती ही कीं नाटकसंबंधी सर्व बोलणेंचालणें गायनेंकरूनच होतें. गायनेंकरून एकाचें बोलणें झालें नाहीं तोंच, दुसरा येऊन त्याच द्वारें त्याजबरोबर रागाचें अथवा आनंदाचें भाषण करूं लागतो, आणि त्याचें बोलणें ऐकतच नाहीं. अशा समयीं दोघे जण निरनिराळें बोलत असतील, परंतु उभयतांचें गाणें एकाच रागावर असतें. ह्या संभाषणाच्या गायनाबरोबर वाद्येंही वाजतात. वाद्यें वाजविणारीं कांहीं पंधरा वीस मनुष्यें असतात असें नाहीं, तर शंभर सवाशें असतात

त्यांला वसावयास जी जागा केलेली असते तीस "ऑर्चेस्त्रा" अशी संज्ञा आहे.

ऑपरांत नाटककारांची संख्या फार मोठी असते. केव्हां केव्हां तर जसें काय मोठें लश्करच येऊन नाटकगृहांतील रंगभूमीवर उभें राहतें. इतके असामी असतां, प्रत्येक नाटकी आपापलें काम अगदीं बरावर बजावितो. स्त्रियांशिवाय नाटकास शोभा नाहीं, यास्तव स्त्रिया आणि पुरुष दोनही नाटकांत असतात. नाटकसंबंधी कितीएक स्थळांची आणि कितीएक गोष्टींची "सीनरी"(हुबेहूब चित्रें) पाहून मोठें नवल वाटतें. अशी "सीनरी" करावयास बहुत खर्च लागतो. "सीनरी" ह्मणजे पडद्यांची आणि इतर अनेक प्रकारची अशी रचना केलेली असते कीं जशीं पाहिजेत तशीं स्थळें आणि पाहिजेत त्या त्या घडलेल्या गोष्टी नाटकाच्या रंगभूमीवर पाहावयास सांपडतात. मोठ्या भयंकर अरण्याचें किंवा राजाच्या मोठ्या वाड्याचें, पर्वताचें किंवा नदीचें, घोर अंधाऱ्या रात्रीचें किंवा चंद्राच्या चांदण्याचें, विजेचें किंवा वादळाचें, पाहिजे तें स्वरूप एथें दृष्टीस पडतें.

ह्याला "इतालियन ऑपरा" म्हणतात याचें कारण हें कीं यांत सर्व गायन इतालियन भाषेंत होतें. यामुळें इंग्रज लोकांत देखील तें समजणारे असे थोडेच, मग आपणाला कोठून समजणार? परंतु त्याची अशी कांहीं खुबी आहे कीं तें पाहिल्यानेंच त्यांतील भावार्थ समजतो, आणि गायन इतकें गोड असतें कीं तेंच ऐकण्यासाठीं पुष्कळ लोक जीव तोडतात. याशिवाय, इतालियन भाषेंतील प्रत्येक गाण्याचें इंग्रजी भाषांतर ही वाचावयास सांपडतें. केव्हां केव्हां तें मधुर गायन ऐकून ऐकणारे सभासद इतके सुप्रसन्न होतात कीं गाणाऱ्यांवर पुष्पांची वृष्टि करितात, आणि फुलांचे मोठमोठे तुरे वरून रंगभूमीवर टाकून आणि टाळ्यांचा गजर करून आपली सुप्र-

सन्नता प्रदर्शित करितात. अशा समयीं पाहणारे लोक यांस इतका हर्ष आणि परमानंद होतो कीं तो सर्व प्रकार खरोखरच पाहण्यासारखा आहे.

"ऑपरा" मध्यें गायन झाल्यावर शंभर पाऊणशें तरुण स्त्रिया व मुली अत्यंत बारीक आणि सुंदर असा पोशाक करून नृत्य करितात. ह्या नाचास "ब्यालट" असें म्हणतात. हा खचित पाहण्यासारखा आहे. पंधरा पंधरा वीस वीस जणींची एक अशा टोळ्या करून त्या येतात. एका टोळीचा पोशाक गुलाबी, दुसरीचा अस्मानी, तिसरीचा जांबळा, चौथीचा स्वच्छ पांढरा असे अनेक रंगांचे पोशाक करून त्या येतात आणि नाचूं लागतात. अहाहा! त्यांचें नृत्यकौशल्य केवढें!! क्षणांत त्या मुली सर्व एकत्र मिळून नाचतात आणि क्षणांत निरनिराळ्या नाचतात. ह्या "ब्यालट" नृत्याची मोठी खुबी ही कीं केवळ हावभावांनींच मनांतील अभिप्राय कळवितां येतो.

त्यांचा पाय जसा काय जमिनीस लागतच नाहीं अशा कुशलतेनें त्या नाचतात. हातांचा आदा असा करितात कीं सर्वांचे हात एकदमच वर होतात आणि अवघ्यांचें चमकणें ठमकणें बरोबरच होतें. तसेंच दुसऱ्या हाताचा किंवा दोहों हातांचा आदा निराळ्या रीतीनें सर्व जणी एकाच वेळीं करितात.

नाचतांना सर्वांचें पाऊल एकसारखें पडतें. सर्व मुलींच्या पायांचा आणि हातांचा ताल वाद्यांशीं अगदीं मिळून असतो. हा प्रकार पाहावयास अत्यंत मनोरंजक आणि आल्हादकारक असा असतो. त्या सुंदर सस्मित तरुण मुली नाचतात तेव्हां आकाशांतील सुंदर यक्षिणीच उत्तम वस्त्रें परिधान करून आपणापुढें नृत्य करीत आहेत असें भासतें.

या नाटकगृहांत मोठमोठे श्रीमंत आणि त्यांच्या रूपवती स्त्रि-

या सुंदर पोशाक करून येतात. कधीं कधीं युवराजही पत्नीसहवर्तमान नाटक पाहावयास येतात. कित्येक नाटकी आणि गाणाऱ्या स्त्रियांस एका रात्रीचे पंधरा पंधराशें रुपये नाटकाचे मालक देतात. निरनिराळ्या नाटकांत निरनिराळी "सीनरी" तयार करण्यासही बहुत खर्च होतो. तसेंच नाटक्यांच्या वस्त्रांला आणि शृंगारालाही मोठा खर्च लागतो.

अशा मोठ्या नाटकशाळांत जो मोठा खर्च होतो त्याचीं कांहीं मुख्यमुख्य कलमें मी एथें सांगतों. नाटकाचा समा बहुत करून एप्रिल महिन्यापासून आगस्त किंवा सप्तेम्बर महिन्यापर्यंत असतो. ह्या इतक्या दिवसांत खर्च होतो त्याचा तपशील येणेंप्रमाणें:— गायनसहित नृत्य करणाऱ्यांचा खर्च दहा हजार रुपये; ब्यालेट नाच करणाऱ्या मुलींचा खर्च एक लक्ष रुपये; गवयांचा खर्च पस्तीस हजार रुपये; पोशाकाचे आणि सीनरीच्या पडद्यांचे साठ हजार रुपये; दिव्यांचा खर्च तेरा हजार रुपये; निरनिराळ्या लोकांच्या पगाराचे तीस हजार रुपये; दरवाज्यावर लश्करी लोकांच्या पहाऱ्याचे पंधराशें रुपये. याप्रमाणें खर्चाचा आकार एकंदर अडीच लक्ष रुपये होतो.

"प्रिन्सेस थिएटर" नांवाचें दुसरें एक विख्यात नाटकगृह आहे त्यांत मी दोनदां गेलों होतों. एकवेळ "रोमियो आणि जूलियट" हें नाटक पाहिलें, आणि एकवेळ "वेनिस एथील व्यापारी" हें नाटक पाहिलें. अहाहा! या नाटकगृहांत "सीनरी" किती सुंदर होती!! "रोमियो आणि जूलियट" या नाटकाचा खेळ पाहतां पाहतां नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. हें नाटक होण्यापूर्वी शृंगाररसप्रधान खेळ झाला होता. तिसऱ्या एका नाटकगृहीं मी एकदां गेलों होतों तेथें "म्याक्बेथ" नाटकाचा खेळ पाहिला.

शेक्सपीयर याणें रचिलेल्या नाटकांतल्या ज्या खऱ्या खुब्या त्या या नाटकगृहामध्यें चांगल्या लक्षांत येतात. तीं एथें पाहिलीं असतां त्यांचा ठसा मनावर उठतो तो बहुत काळ राहतो. शेक्सपीयर याचें कोणतेंही नाटक वाचून जो आनंद होतो त्याच्या दशगुणित आनंद त्याच नाटकाचा खेळ या ठिकाणीं पाहिला असतां होतो. मनुष्याच्या ठायींचे चांगले वाईट मनोविकार शेक्सपीयर याच्या नाटकांमध्यें पूर्णपणें दृष्टीस पडतात. "प्रिन्सेस थिएटर" या नाटकगृहांत जूलियट हिचें सोंग एका फ्रेन्च नटीनें घेतलें होतें. ती इंग्रजी भाषा समजण्यासारखी बोले, परंतु तिचा उच्चार चांगला नव्हता. तथापि तिणें आपला कार्यभाग मोठ्या कुशलतेनें वजाविला. तिणें रोमियो याविषयीं जो विलाप केला तो इतका करुणारसभरित होता कीं तेणेंकरून पुष्कळांचीं मनें विरघळून गेलीं आणि नेत्रांस अश्रुधारा लागल्या.

आपल्या मुंबईतील ग्रांट-रोड एथील नाटकगृह आणि विलायतेंतील नाटकगृहें यांमध्यें फार अंतर आहे. आपल्या या नाटकगृहाची विलायतेंतील तिसऱ्या किंवा चौथ्या प्रतीच्या नाटकगृहाबरोबर तुलना होईल, परंतु पहिल्या प्रतीच्या बरोबर होणार नाहीं. त्यांमध्यें मोठा भेद ह्मटला म्हणजे गृहाच्या भव्यपणाचा आणि आंतील सामानसुमानाचा व शृंगाराचा हा आहे. याशिवाय आणखी चार चार पांच पांच मनुष्यांस बसावयास पुरतील असे "बॉक्स" विलायतेंतील नाटकगृहांत केलेले असतात. निरनिराळ्या खोल्या असतात तसे हे निरनिराळे बॉक्स. हे सर्व लोकांस बसावयास असतात असें नाहीं, तर जे कोणी, त्यांला अधिक पैसा पडतो तो देतील, त्यांसच त्यांत बसायास मिळतें. रॉयल इतालियन ऑपरामध्यें असे बॉक्स सुमारें दोन हजार होतील. दुसरें, नाटकगृहामध्यें धुराचे दिवे असतात त्यामुळें पाहिजे तेव्हां क्षणांत काळोख पाडण्यास अथवा

जेड अधिक उणा करण्यास अवकाश लागत नाहीं. अशी तजवीज आहे म्हणून घोर अंधारी रात्र करून दाखवावयाची असली अथवा वादळ किंवा वीज किंवा चंद्र यांचें स्वरूप दाखवावयाचें असलें, तर तसें करण्यास फार सुलभ पडतें.

आपल्या देशांतून गेलेल्या प्रवाशांस विलक्षण वाटेल असा एक प्रकार एथें नाटक पाहणाऱ्यांमध्यें घडतो. नाटकाचा एक भाग होऊन मध्यें विसावा घेतात तेव्हां स्त्रिया व पुरुष "ऑपरा-ग्लास" हातीं घेऊन एक एकमेकांकडेस टेहळून पाहूं लागतात. रस्त्यांत किंवा दुसऱ्या कोणत्या ठिकाणीं अशा रीतीनें कोणाकडेस पाहिलें तर तें शिष्टाचाररीतीच्या अगदीं विपरीत होईल. परंतु एथें तसें समजत नाहींत, आणि अशा प्रकारें पाहण्याची मोकळीक पुष्कळ जण घेतात.

## २. गायनशाळा.

CONCERTS.

नाटकगृहांखेरीज आणखी गायनशाळा लंडनांत पुष्कळ ठिकाणीं आहेत. गायनाचे जे भोक्ते असतात त्यांची या ठिकाणीं तृप्ति होण्याचा संभव असतो. ज्यांची भक्ति नाटकापेक्षां गायनावर अधिक ते या गाण्याच्या अड्यांत जातात. किती एक गायनशाळांत नुसतें गायनच होतें; किती एकांत गायन करून सोंगें वगैरे आणतात, आणि कित्येकांत गायन आणि नृत्य दोनही होतात. सर्वोत्कृष्ठ गायन ऐकावयाचें असेल तर बिलोरी महालांत अथवा "ऑपरा" यांत जावें. परंतु "फिल-हार्मोनिक सोसायटीच्या" अथवा "सेक्रेड-हार्मोनिक सोसायटी"च्या गायनशाळेंत गेलें असतांही, केवळ आशाभंग होईल असें नाहीं.

आपणांमध्यें गाण्याचा धंदा हा वेश्यांच्या सारखा होऊन गेला आहे, परंतु विलायतेंत असें नाहीं. यावरून विलायतेंतील गाणा-

ऱ्या सर्वच निष्कलंक आहेत असें माझें ह्मणणें नाहीं. माझ्या ह्मणण्याचा आशय एवढाच कीं हें काम वेश्यांनींच अथवा दुराचारी स्त्रियांनींच करावें अशी समजूत तेथील लोकांची नाहीं. यामुळें गायनविद्येवर ते लोक बहुत परिश्रम करितात. आपणांमध्यें कोणी गृहस्थाची स्त्री गायन शिकावयास लागली असतां तें मोठें दूषण मानतात; परंतु विलायतेंत स्त्रीचा विद्याभ्यास गायनावांचून अपुरता असें समजतात. यास्तव सांप्रत आपण गायनविद्येंत पाठीं पडलों आहों ह्मणून कांहीं नवल नाहीं.

आपल्या गाण्याच्या रीतींत आणि इंग्रजी गायनाच्या रीतींत फार अंतर आहे. इंग्रजी गाणाराचा सूर जेवढा उंच चढतो तेवढा एतद्देशीय गवयांचा चढत नाहीं. कित्येक उत्तम हिंदुस्थानी गवई जेव्हां उंच स्वरानें गातात तेव्हां ते सूर बराच चढवितात, परंतु तो युरोपियन गवयांच्या इतका उंच चढत नाहीं.

माझ्या कित्येक स्वदेशीय मित्रांनीं मुंबईत युरोपियन लोकांचें उंचें गाणें ऐकिलें आहे, ते असें ह्मणतात कीं हें गायन आह्मास पसंत नाहीं. परंतु याचें कारण इतकेंच कीं ज्याला जें गाण्याचा आणि ऐकण्याचा अभ्यास झाला असतो तेंच त्याला आवडतें. सप्तसुरांतील खरजाप्रमाणें नीच स्वराचें गायन ऐकणें ज्यांला आवडतें त्यांला निषादासारख्या उच्च स्वरांत गोडी वाटणारच नाहीं. याप्रमाणेंच इंग्रजी गायनाविषयीं समजलें पाहिजे. त्या गवयांस तालसूर जितका उंच चढवितां येतो तितका एतद्देशीय गवयांस चढवितां येत नाहीं. आणि ते जसे उंच स्वरानें गातात तसे गाणारे आपल्या गवयांमध्यें क्वचित् सांपडतील. यावरूनच उघड परीक्षा होते.

आतां, हें खरें आहे कीं यांत एतद्देशीय गायनाचा कांहीं दोष नाहीं. हा एतद्देशीय गवयांचा दोष होय. गायनविद्येवर जितके

परिश्रम केले पाहिजेत तितके ते करीत नाहींत. ह्या विद्येचे गुण-ग्राहकही आजकाळीं आमच्या लोकांत थोडेच राहिले आहेत. वेश्यांचे ख्याल आणि ठुंबऱ्या ऐकूनच आमचे लोक इतके खूश होऊन जातात कीं उच्चस्वरानें गाणाऱ्या हिंदुस्थानी गवयांस विचारणारे असे हल्लीं थोडेच आहेत. आपल्या देशांत गायनविद्या अशा निकृष्टावस्थेंत येऊन पडली आहे ती सुधारून चढत्या कळेस लावण्याची तजवीज केली पाहिजे.

विलायतेंत गाण्याची आणि गायन ऐकण्याची इच्छा बहुधा लहान मोठ्या सर्व प्रकारच्या लोकांस आहे. गायनें करून मनुष्याचें मन रिझतें आणि साऱ्या दिवसाचा शीण निघून जातो. याजकरितां सायंकाळीं कामकाज आटोपल्यावर गायनाचें सुख भोगणें लंडनांतील लक्षावधि मनुष्यांस आवडतें. सदरीं गायनांचीं स्थळें सांगितलीं यांशिवाय आणखी सेन्ट जेम्सच्या हॉलांत प्रति सोमवारीं आठ वाजल्यापासून साडेदहा वाजत तोंपर्यंत गायन होत असतें. यास "मंडे पॉप्युलर कॉन्सर्ट" अशी संज्ञा आहे. तसेंच "विलिस रूम" या स्थळीं गायन होतें त्याला "म्यूझिकल युनियन कॉन्सर्ट" असें ह्मणतात. याशिवाय खासगी वगैरे लहान सहान गायनस्थळें लंडनांत अगणित आहेत.

एकेका पेनीच्या ह्मणजे पैशाच्या नाटकशाळा आणि गायनशाळा ही बहुत आहेत. त्यांत मजूर, फेरीवाले वगैरे अगदीं हलके लोक जातात. हे पाहणारे सर्व हलक्या प्रतीचे लोक, तेव्हां त्यांची बुद्धि ही हलकीच, अणि त्यांस अनीतीची गोडी विशेष असते, त्यामुळें असल्या ठिकाणीं जे खेळ व गमती होतात त्या बहुधा अनीतीला उत्तेजन देणाऱ्या अशा असतात. "आठांपासून वीस वर्षांपर्यंत वयाचे तरूण मुलगे आणि मुली असल्या हलक्या नाटकगृहां-

त व गायनगृहांत थोड्या पैशानें मौज पाहावयास मिळावी ह्मणून नित्य जातात. परंतु येणें करून त्यांची नीति न सुधरतां उलटी विघडून जाते." *अशा हलकट ठिकाणीं एतद्देशीय प्रवाशानें कधीं जाऊं नये.

### ३. क्रीमोर्न नामक मोठा बाग.

CREMORNE GARDENS.

ह्या मोठ्या बागांत नित्य रात्रीस मोठा तमासा होतो. ह्यांत नित्यशः एकाच प्रकारचा तमासा होतो असें नाहीं, तर अनेक प्रकारचे तमासे होतात. मी ह्या बागाविषयीं या ग्रंथाच्या आरंभींच थोडेंसें लिहिलें आहे (पृ० ५). ह्यांत नित्य मोठा दीपोत्साह होतो. सुंदर वाद्यें वाजतात. एथें नाचावयासाठीं मोकळी जागा ठेविली आहे तींत गरीब लोक जाऊन आपली हौस भागवितात. स्त्रिया व पुरुष परस्परांस ओळखीत नसलीं तरीही एथें एकमेकांच्या हातांत हात घालून नाचूं लागतात. ह्या बागांत ज्याला जसें मानेल तसें त्याणें बसावें, उठावें, नाचावें, उड्या माराव्या, हिंडावें फिरावें, धांवावें, खावें, प्यावें, आणि मौज भोगावी.

अहाहा! बागांत काय दीपप्रदर्शन केलेलें आहे! वाद्यांचा काय मधुर ध्वनि होत आहे! लोक किती सुप्रसन्न झाले आहेत व रंजले आहेत!! ह्या बागांत दररोज हजारो लोकांचे मोठे मेळे मिळतात, परंतु बाग एवढा विस्तीर्ण आहे कीं इतके लोक असूनही दाटी झाली असें वाटत नाहीं. नित्यशः रात्रीस एकामागून एक अनेक तमासे ह्या बागांत पाहावयास सांपडतात. पहिल्या तमाशास आरंभ होण्यापूर्वी बाजेवाले जेथें उभे राहून वाजवीत असतात तेथून निघून वाजवीत वाजवीत बागांतील सर्व तमाशांच्या ठिकाणीं जातात. यावरून

* London Labour and London Poor: Vol. I. p. 42

सर्व लोकांस कळतें कीं पहिल्या तमाशास आतां लौकरच प्रारंभ होईल.

पहिला तमासा होतो त्यांत भरधांव घोड्यांवर अनेक कसरती करून दाखवतात. असे तमासे करून दाखविण्यास युरोपियन तमासगीर लोक कधीं आपल्या देशांत येतात. भरधांव घोड्यांवर नाचणें ही कसरत वाखाणण्यासारखी आहे खचित; परंतु तिजविषयीं नवीन सांगण्यासारखें कांहीं नाहीं.

हें झाल्यावर ऑपराचा तमासा करून दाखवितात, तो सीनरि आणि पोशाक यांविषयीं मोठी प्रशंसा करण्यासारखा आहे. पडदा वर उंचलला म्हणजे झाडाझुंडांजवळ पुतळे निजलेले किंवा बसलेले असून त्यांस अवचित जीव यावा त्याप्रमाणें मनुष्यें उठून नाटकास आरंभ होतो. एथें नृत्य करणाऱ्या मुलींचीं संख्या मोठी असते. त्यांतील किती एक यक्षिणींप्रमाणें निराधार वरून खालीं उतरत आहेत अशा दिसतात. पोशाकाची आणि पडद्यांची शोभा व सौंदर्य वाढवण्यासाठीं एथें मोठा खर्च करितात. त्यांच्या शोभेंत आणि डौलांत किंचित्‌ही न्यून नाहीं.

हें झाल्यानंतर पुरातन काळीं राजांच्या स्वाऱ्या मोठ्या इतमामानें निघत असत तशा काढून दाखवितात. या स्वाऱ्यांबरोबर इतकीं माणसें निघतात कीं तीं पाहून कोणासही आश्चर्य वाटेल. सुमारें तीनशें मनुष्यांचें मोठें लश्करच निघतें. ही मौज अगत्य पाहावी अशी आहे. नंतर पुष्कळ दारू लागते तीही पाहण्याजोगी असते. हे सर्व तमासे एकाच बागांत एकाच रात्रींत करून दाखवितात. अज्ञान देवभोळ्या लोकांस या बागांत जाण्यास लालूच लागावी आणि त्यांच्या देवभोळेपणाच्या इच्छा परिपूर्ण व्हाव्या, म्हणून एका कोनांत एक गुहा केली आहे. तींत एक योगी बसून देवभोळ्या लोकांस भविष्य सांगत असतो. आम्ही या भोंदू बावाचें ढोंग पाहावयास गेलों होतों.

गुहेंत गेल्यावर आम्हांस भविष्यवादी बावाचें दर्शन झालें नाहीं, कारण तो दिसूं नये अशा रीतीनें आंत जाऊन बसला होता. त्याणें आमचीं नांवें विचारिलीं तीं आम्ही सांगितलीं, परंतु तीं फारच कठीण म्हणून त्यास लिहितां आलीं नाहींत. म्हणून R. K. W. M. हीं चार अक्षरें आम्ही चार असामींनीं लिहून दिलीं. हीं नांवें एका लहानशा खिडकींतून आंत टाकून दिल्यावर, कांहीं वेळानें त्या ढोंग्यानें खिडकींतून चार चिठ्या बाहेर टाकल्या. मी आपली K अक्षराची चिठी बहुत काळपर्यंत जवळ बाळगली होती, तींत त्या भोंदूनें खालीं लिहिल्या प्रमाणें मला भविष्यकथन केलें होतें :—

K.—"In your nativity the signs presage improvement, for you are destined to rise in credit and influence; a speedy change in your present affairs; a lasting friendship from which you will reap a golden harvest; your greatest trouble will soon be removed."

"क—तुमच्या राशिनक्षत्रावरून असें दिसतें कीं तुमची स्थिति सुधरेल, कारण तुमची प्रतिष्ठा आणि वजन वाढून लौकरच तुमची हल्लींची स्थिति पालटेल, आणि तुह्मांस असा मित्रलाभ होईल कीं त्यापासून तुह्मांस सोन्याचें पीक येईल. आणि तुमची सर्वांत मोठी जी अडचण ती लौकर दूर होईल."

मी स्वतः देवभोळा असतों तर हा भविष्यवाद खरा मानला असता. हें भविष्य शब्दशः खरें झालें नाहीं, तथापि त्याचा भावार्थ कांहीं अर्थी माझ्या हल्लींच्या स्थितीबरोबर मिळून येतो. परंतु भविष्य खरें होणें तर तें अक्षरशः खरें झालें पाहिजे. दुसरें असें कीं भविष्यवाद्यांच्या युक्ति मला पक्क्या माहीत आहेत. ते अशा कित्येक साधारण गोष्टी सांगतात कीं त्यांतील कांहीं मजकूर सर्व मनुष्यांस एकसारखा लागू पडेल. याविषयीं मला किंचित्ही संशय नाहीं. तेव्हां अशा खोट्या देवभोळेपणास मी कसें उत्तेजन देऊं?

आपल्या लोकांत भोंदू बावा अथवा जोशी भविष्य सांगतो त्यांत आणि यांत कांहीं अंतर नाहीं; असें असून किती लोक हा हर्मिट म्हणजे योगी याच्या गुहेंत आपली प्रारब्धरेषा कळावी म्हणून जातात! ही गोष्ट खरी आहे कीं सर्वच लोक देवभोळेपणामुळें जातात असें नाहीं, कितीएक जण आपल्या मनास कर्मणूक करण्यासाठीं आणि ठकाची लबाडी बाहेर पाडण्यासाठीं जात असतील, परंतु त्यांबरोबर किती भोळे लोक या वैराग्याचें भविष्यकथन सत्य मानून जात असतील वरें! कारण विलायतेंत देवभोळीं आणि अज्ञान समजुतीचीं मनुष्यें नाहींत असें कोणी समजूं नये.

## ४. मेणाच्या पुतळ्यांचा मोठा संग्रह.

TUSSAUD'S WAX WORKS.

हा संग्रह मोठा पाहण्यासारखा आहे. मडम टूसा आणि तिचे लेंक ह्या संग्रहाचे मालक असल्यामुळें "मडमटूसाचा मेणकामाचा संग्रह" असें यास म्हणण्याचा परिपाठ पडला आहे. एथें मेणाचे पुतळे असे बनवून उभे करून ठेविले आहेत कीं हीं खरींखुरीं माणसेंच आहेत काय असें वाटतें; त्यांत जीव मात्र कायतो कमी. हे पुतळे जसे काय आतांच आपणाबरोबर बोलूं लागतील असे दिसतात.

जे मनुष्य आपणांस पाहवे सारखे वाटतात अशांचे हे पुतळे आहेत. इंग्लंड देशाच्या कितीएक राजांचे व राण्यांचे पुतळे एथें आहेत; त्याप्रमाणेंच कित्येक प्रधानांचे आणि राज्यधुरंधर पुरुषांचेही आहेत. युरोपखंडांतील इतर देशांच्या राजांचे आणि राण्यांचे देखील पुतळे एथें पाहण्यांत येतात. महाराणीचा जेष्ठ पुत्र आणि त्याची पत्नी यांचें लग्न आपणांसमक्षच होत आहे अशा रीतीनें त्यांचे पुतळे करून ठेविले आहेत.

हिंदुस्थानांतील बंड मोडून टाकणारे सेनापति सरकॉलिन कांबेल आणि जनरल हावलाक् ह्यांचेही पुतळे एथें आहेत. हिंदुस्थानचे हल्लींचे गवर्नर जनरल सर जान लारेन्स यांचा पुतळा एथें आहे. उत्तर अमेरिकेचा माजी प्रेसिडेंट लिंकन आणि इताली देशांतील शूर सेनापति गारिबाल्डी यांचे पुतळे एथें दृष्टीस पडतात. सुधारणेचे पुरस्कर्ते नॉक्स, काल्विन आणि लूथर यांचेही पुतळे या ठिकाणीं आपल्या दृष्टीस पडतील.

एथें एकंदर मेणाचे पुतळे सुमारें २०० असतील. त्यांची संख्या प्रतिवर्षीं वाढत चालली आहे. हे सर्व पुतळे असे उत्कृष्ट केले आहेत कीं आपण ज्या कोणाचा पुतळा नीट लक्ष लावून पाहिला असेल त्या मनुष्याची आपली पुढें कधीं गांठ पडली असतां आपण त्याला खचित ओळखूं. अशा कुशलतेनें प्रत्येक पुतळा हुबेहूब केला आहे. एका खोलींत एक पुतळा असा बसविला आहे कीं तो पाहून कोणासही हंसूं आल्यावांचून राहणार नाहीं. हा पुतळा अशा रीतीनें स्थापिला आहे कीं तो बसून सभोंवारच्या पुतळ्यांकडेस रेखून पाहत आहे, अशा रीतीनें तो आपली मान फिरवीत असतो. मी तर पहिल्यानें असेंच समजलों कीं हें कोणी जिवंत माणूस न्याहळून पाहत बसलें आहे.

## ९. चित्रसंग्रह.

THE NATIONAL GALLERY

केवळ नांवावरून हा चित्रसंग्रह किती चांगला आणि मूल्यवान आहे हें वाचणारांच्या ध्यानांत येणार नाहीं. परंतु एथें पन्नास पन्नास हजार किंवा लाख लाख रुपयांपर्यंत किंमतीचीं चित्रें आहेत असें सांगितलें असतां, ज्या ठिकाणीं अशा उंच्या चित्रांचा संग्रह केला आहे तें जाऊन पाहावें असें वाचणारांच्या मनांत लागलेंच ये-

ईल. ते ह्मणतील कीं अशा मोठ्या किंमतीचीं चित्रें तीं कशीं आहेत तें पाहूं तर खरें. चित्रांस इतकी मोठी किंमत पडेल असें कोणीं मानणार देखील नाहीं. परंतु एथें खरींखुरींच अशा मोलाचीं चित्रें आहेत.

"न्याशनल्-ग्यालरी-आव-आर्ट्स" नांवाचें घर त्रफाल्गार चौकासमोर आहे त्यांत हा मोठा मोलवान चित्रसंग्रह आहे. हें घर आपल्या टौनहॉलासारखें भव्य व शोभायमान आहे त्या अर्थी त्यांत किती चित्रें असावीं बरें? प्रयेक चित्र आपण कितीही निरेखून पाहिलें तरी तें सोडावें असें वाटत नाहीं. ह्या संग्रहासाठीं पहिल्यानें ३८ चित्रें एका गृहस्थाजवळून विकत घेतलीं, त्यांला पावणे सहा लक्ष रुपये पडले. दुसऱ्या एका गृहस्थानें १६ चित्रें बक्षीस केलीं तीं पाऊण लाख रुपयांच्या किंमतीची होतीं. या देशांतील लोकांची चित्रांवर एवढी भक्ति आहे.

अहाहा! काय सुंदर चित्रें! मी त्यांचें काय वर्णन करूं! आपण अधिकाधिक लक्ष लावून पाहावें तशा प्रत्येकाच्या खुब्या अधिकाधिक ध्यानांत येतात. इंग्रज लोकांस मनुष्याच्या चित्रांपेक्षां सृष्ट पदार्थांचीं चित्रें अधिक आवडतात. अशा प्रकारच्या चित्रांस ते लोक "लांड्स्केप" ह्मणतात. लांड्स्केपाची खुबी कांहीं निराळ्याच प्रकारची आहे. हीं चित्रें काढण्याची विद्या आपल्या देशांतील लोकांस माहीत नाहीं. असलीं चित्रें पाहावीं कशीं हें जाणणारे देखील आपणांमध्यें थोडेच असतील. युरोपियन आणि, त्यांत विशेषेंकरून, इंग्रज लोकांस या चित्रांच्या खुब्या चांगल्या समजतात, आणि ते त्यांत हजारों रुपयें घालण्यास मागें सरत नाहींत.

मी उदाहरणार्थ ह्मणून अशा एक दोन चित्रांचें थोडेंसें वर्णन करितों. मी या न्याशनल ग्यालरींतील ५५ नंबरचें चित्र पाहिलें त्यांत

एक वन काढलें आहे, सूर्य प्रकाशतो आहे, मध्यें दाट झाडी आहे. जवळच एक लहानसें सरोवर आहे. सरोवराच्या कांठीं एक लहानसा गांव आहे. एक हरीण डोंगरावरून सरोवराकडेस येत आहे. तेथें एका स्त्रीचें प्रेत पडलें आहे. तिच्याच भ्रताराच्या हातून बाण सुटून तिला लागला आणि ती मरण पावली. त्यामुळें तो भ्रतार अत्यंत विलाप करीत आहे आणि त्याच्यामागें शिकारी कुत्रे उभे आहेत. आपण नीट लक्ष लावून पाहिलें ह्मणजे हा सर्व प्रकार आपल्या डोळ्यांसमोर होत आहे असा दिसतो.

एक चित्र आहे त्याचा नंबर आतां मला आठवत नाहीं, त्यांत एक मोठी नदी काढली आहे. त्या नदीवर एका ठिकाणीं चक्की उभी केलेली आणि दुसऱ्या ठिकाणीं पूल बांधलेला दिसतो. त्या पुलावरून गांवांत जातां येतें. डोंगरही दाखविले आहेत. उंच झाडें असून त्यांच्या मागें पाण्याचा झोत पडत आहे. एका ठिकाणीं निर्मळ वाहत्या झऱ्यावर गुरें पाणी पीत आहेत. त्याच्या उजवीकडेस लोक लग्नाच्या धामधुमींत आहेत. हा सर्व प्रकार आपल्यासमक्ष होत आहे असा दिसतो.

अशीं अनेक चित्रें अशा रीतीनें काढलीं आहेत कीं तीं पाहत, असतां टाकून जाण्याविषयीं मन होणारच नाहीं. आपण तीं अधिक पाहावीं तशी आपणांस त्यांची अधिक गोडी लागते. चित्रांचे भोक्ते आहेत ते अशीं चित्रें पाहून फारच आनंद पावतात. ते तीं पुनः पुनः निरेखून पाहतात. हीं बहुतेक चित्रें किंतानावर तेलानें काढलेलीं आहेत. पाण्याच्या रंगानें काढलेल्या चित्रांचाही संग्रह या ठिकाणीं पाहण्यांत येतो.

वेनिस एथील एका मोठ्या महालाचें एक चित्र एथें आहे त्याच्या किंमतीचा आकार १४०००० रूपये केला आहे. तीस, पस्ती-

स, चाळीस, पन्नास हजारांचें एकेक अशा भारी मोलवान चित्रांचा एथें संचय आहे. अगदीं हलकें ह्मटलें तरी एक हजार रुपयांहून कमी किंमतीचें चित्र एथें सांपडणार नाहीं. आतां, ज्या देशचे लोक चित्रांच्या खुब्या समजून त्यांकडेस इतका मोठा खर्च करितात त्यांचें हा विद्या शिकण्याकडेस फार लक्ष असलें म्हणून त्यांत नवल तें को-णतें? एतद्देशीय लोकांस चित्रें पाहण्याची इतकी आवड आहे कीं प्रति वर्षी सुमारें दहा लक्ष मनुष्यें हा चित्रसंग्रह पाहावयास जातात.

## ६. नवीन चित्रांचें वार्षिक प्रदर्शन.

ROYAL ACADEMY OF ARTS.

वर सांगितलेली न्याशनल-ग्यालरी-आव-आर्ट्स हिच्या डाव्या आंगास प्रतिवर्षी उष्ण काळामध्यें नव नव्या पसंत पडलेल्या सुंदर चि-त्रांचें प्रदर्शन होतें. हें चित्रप्रदर्शन करण्यास व तीं चित्रें विकण्यास "रॉयल सोसायटी-आव-आर्ट्स" नामक मंडळी उपस्थित झाली आ-हे. लंडन शहरांत हिची गणना मोठ्या प्रख्यात मंडळ्यांत होते. ही मंडळी चित्रविद्येस मोठें उत्तेजन देते. ज्या चित्रकारांनीं फारच श्रम घेऊन उत्कृष्ट चित्रें काढलीं असतील त्यांचींच चित्रें पसंत करून ह्या प्रदर्शनांत ठेवण्यांत येतात. हीं चित्रें या ठिकाणीं बहुतकरून विकलीं जाऊन त्यांच्या कर्त्यांस मोठा लाभ होतो इतकेंच नाहीं, तर सदरील मंडळी उत्तम चित्रकारांस त्यांच्या योग्यतेप्रमाणें बक्षीस देते.

मी पाहावयास गेलों तेव्हां अशीं नवीं पसंत केलेलीं अजमासें बाराशें चित्रें दाखविण्यासाठीं ठेविलीं होतीं. त्यांतील कितीएक अशीं उत्कृष्ट होतीं कीं तीं माझ्यानें पुरतेपणें वाखाणवत नाहींत. तीं दृष्टि लावून अधिक पाहावीं तशा त्यांच्या खुब्या अधिक लक्षांत येता-त. कितीएक तर अशीं सर्वोत्कृष्ट असतात कीं तीं पाहून आपलें

मन तृप्त होतच नाहीं. या नवीन चित्रसंग्रहांत कितीएक २००० चीं, कितीएक ५००० चीं, कितीएक १०००० चीं आणि याहूनही अधिक किंमतीचीं चित्रें असतात. आपल्या देशांत याप्रमाणें चित्रांस किंमती देणारे कोणी सांपडतील काय?

## ७. पुष्पप्रदर्शन.

FLOWER-SHOW.

विलायतेंत उष्ण काळामध्यें प्रतिवर्षीं फुलें, भाजीपाला, शेतकीचीं आवतें, गुरेंढोरें, घोडे, कुत्रे, मासे, इत्यादिक पदार्थांचीं व प्राण्यांचीं निरनिराळया स्थळीं मोठीं प्रदर्शनें होतात. तेथें पुष्कळ लोक जमतात. त्यांत जे पदार्थ अथवा प्राणी नजरेस उत्कृष्ट येतील त्यांच्या धन्यास इनामें मिळतात. अशीं प्रदर्शनें आतां आपल्या देशांत होऊं लागलीं आहेत ही मोठी संतोषाची गोष्ट आहे. एथें अनेक जातींचीं पुष्कळ फुलें असतात तीं पाहून मोठें नवल वाटतें. यावरून कोणास आश्चर्य वाटून ते असें म्हणतील कीं अनेक जातींचीं अनेक फुलें जमा करून त्यांत दाखवावयाचें तें काय असणार! परंतु तसें नाहीं. कोणीही हें फुलांचें प्रदर्शन पाहिलें तरी त्यावरून उद्योग, वृद्धीचा उत्साह, आणि कुशलता यांविषयीं या लोकांची धन्य आहे असें म्हटल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या देशांत अनेक जातींचीं अनेक फुलें करण्याविषयीं अशी मेहनत कोण घेणार? त्यांत आपणास विशेष आश्चर्य वाटण्याचें कारण तें हें कीं आपला देश इंग्लंड देशाहून फलद्रूप आणि त्यांतील हवा फुलें फळें होण्यास अधिक अनुकूळ असतां, अशा अनेक जातींच्या फुलांची अशी सुंदर मांडणी क्वचितच आपल्या पाहण्यांत येते.

हीं फुलें दिसण्यांत सुंदर दिसतात तशीं सुवासिक नाहींत.

आपल्या एथील मोगरा व गुलाब यांच्या वासापुढें या फुलांचा वास केवळ तुच्छ होय. तथापि अनेक रंगांची आणि अनेक आकृतिनीं साधून केलेली रचना अशी दिसते कीं आपले डोळे दिपून जातात. रीजंटपार्क यामध्यें फुलांचें मोठें प्रदर्शन होतें, तेथें फुलांच्या किती कुंड्या असतात याची कांहीं गणना नाहीं. माळी लोक इनामाच्या आशेनें होईल त्या रीतीनें नव्या तऱ्हेचीं सुंदर सुंदर फुलें झाडांस आणण्याविषयीं भारी श्रम घेतात. ज्या कुंड्या पसंत होतात त्याच्या एथें प्रदर्शनांत ठेवितात. एका इंग्रजानें मला असें ह्मटलें कीं तुह्मी आपल्या देशांत फुलांचें स्वरूप व मांडणी याहून चांगली पाहत असाल. मी ह्मटलें मला सांगण्यास मोठी लाज वाटते कीं आमच्या लोकांस तुह्मांप्रमाणें हौस नाहीं; नाहींपेक्षां आह्मीं तुह्मांस ह्या गोष्टींत पुढें जाऊं दिलें नसतें.

## ८. कुत्र्यांचें प्रदर्शन.

THE INTERNATIONAL DOG SHOW.

मी लंडनांत असतां अनेक जातींच्या कुत्र्यांचें मोठें प्रदर्शन झालें. लोकांस त्याविषयीं पूर्वींच कळावें म्हणून जागोजाग जाहिरातीचे कागद फिरविले होते. आगगाडीच्या मुख्य मुख्य टेशनांवर मोठमोठे कागद मारले होते. हें प्रदर्शन चालू झालें, तेव्हां अविच्छिन्न लोक जमले होते आणि तें कितीएक दिवसपर्यंत चाललें होतें.

ह्या प्रदर्शनाला मी गेलों होतों. जे विलायतेस गेलेले नाहींत त्यांच्या लक्षांत हा समारंभ येणें कठीण आहे. त्यांत शेंकडो निरनिराळ्या जातींचे सहस्त्रावधि कुत्रे आणिले होते. हा तमासा पाहण्यास कितीएक दिवसपर्यंत लोकांची मोठी गर्दी होत असते. आपण हें प्रदर्शन पाहून असें ह्मणूं कीं हे इतके कुत्रे कसे जमा केले असतील, आणि इतके ठेवण्याची आणि पोसण्याची कडाकूट कशी होत असेल!

बोकडापेक्षां मोठ्यापासून मांजरीच्या पोरांप्रमाणें लहानापर्यंत सर्व जातींचे कुत्रे एथें दृष्टीस पडले. ते सर्व भुंकत तेव्हां त्या अवध्या श्वानगृहांत मोठी ओरड व कल्होळ होत असे. प्रत्येक कुत्र्यावर किंमत मांडली होती. त्यांतील कितीएक कुत्रे सुंदर होते, आणि कितीएकांवर ५०० आणि कितीएकांवर १००० रुपये किंमत मांडली होती. कितीएक असे सुंदर आणि देखणे होते कीं इतकें मोल देऊन ही केवळ शौकासाठीं घेणारे असे पुष्कळ निघाले. अहाहा! काय हा चमत्कार! माणसांचा मोठा समुदाय कुत्र्यांचा मोठा जमाव पाहण्यासाठीं मिळाला होता!

### ९. दहा हजार मुलांचें एक सुरानें गायन.

EXHIBITION OF THE CHARITY SCHOOLS.

निराश्रित मुलांसाठीं अनेक धर्माच्या शाळा घातलेल्या आहेत. त्या सर्वांचा "एक्झिबिशन" ह्मणजे परीक्षासमारंभ प्रतिवर्षी ज्यून महिन्यांत होतो. त्या प्रसंगीं सेन्ट पॉल्च्या मोठ्या देवालयांत सुमारें दहा हजार मुलें जमतात. बसण्याच्या जागा एकापेक्षां एक उंच अशा करून मुलें अशा रीतीनें बसवितात कीं तीं सर्वांच्या दृष्टीस नीट पडावीं. निरनिराळ्या शाळांतील मुलें निरनिराळ्या तऱ्हेचे पोशाक करून येतात. तीं पाहूनच मोठा आनंद होतो. समारंभ पाहावयास आलेले लोकही पुष्कळ असतात. सुमारें दहा हजार मनुष्यें पैसा खर्चून टिकिटी घेऊन पाहावयास येतात. प्रथम एक पाद्री धर्मपुस्तकांतून कांहीं पाठ वाचतो. तें झाल्यावर मोठा धर्माध्यक्ष उपदेश करतो. नंतर गाण्याची तयारी होते. मुलें जीं गीतें गाणार तीं पूर्वींच कागदांवर छापलीं असतात.

आतां, आपण एक चित्तानें ऐकून चहूंकडेस नजर फेंकावी. म-

धुर वाद्यांचा मंजुळ व गंभीर ध्वनि निघूं लागतो. थोडक्याच वेळानें सर्व मुलें एका सुरावर बरोबरच गाऊं लागतात. अहाहा! ह्या समयीं पाहणारांस किती संतोष होतो, आणि त्यांच्या मनांत किती गंभीर विचार येतात! कोणा मोठ्या कवीच्यानेंही त्या आनंदाचें आणि त्या गंभीर विचारांचें वर्णन करवणार नाहीं, तर माझी काय शक्ति आहे?

आपल्या देशांत दहावीस मुलें बरोबर गाऊं लागलीं तर त्यांचा एक सूर होत नाहीं. कितीएकांचा सूर उंच चढतो, कितीएकांचा चढतच नाहीं, आणि कितीएकांचा मध्येंच खुंटतो. परंतु हीं दहा हजार मुलें एक रागावर, एक तालावर आणि एक सुरावर मधुर गातात. आणि त्यांचा आणि वाद्यांचा एक ताल जमतो तेव्हां तो प्रकार खरोखरच चमत्कारिक व आनंदकारक होतो. रूस देशाचा मागील चक्रवर्ती निकलस याविषयीं असें सांगतात कीं त्याणें इग्लंडांत असतां हा चमत्कार पाहिला तेव्हां त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रु निघाले, आणि तो ह्मणाला मी आपल्या देशांत असा प्रकार कधीं पाहीन?

## १०. आंगबळ पाहण्याच्या पैजा.

NATIONAL SPORTS.

विलायतेंत आंगबळाच्या मोठ्या पैजा होतात. त्या कांहीं एकाच प्रकारच्या नाहींत. धांवण्याच्या, पोंहण्याच्या, वार मारण्याच्या, क्रिकेट ह्मणजे चेंडूफळीच्या, बोटी ह्मणजे पडाव चालविण्याच्या, घोड्यांच्या वगैरे ह्या मुख्य पैजा होत. यांतून मोठ्या पैजांच्या दिवशीं सर्व लोकांस हर्ष होतो आणि कांहीं मोठा दिवस किंवा सण आहे याप्रमाणें जिकडे तिकडे दिसूं लागतें. ज्या ठिकाणीं पैजा होतात त्या ठिकाणीं लोक पुष्कळ जमतात. ती मौज पाहण्यासारखी आहे.

ह्या पैजांत कांहीं हलके अथवा साधारणच लोक असतात असें नाहीं, तर मोठ्या पदवीचे अणि प्रख्यात असे पुरुषही असतात. किती एक पैजांत तेथील प्रख्यात पाठशाळांतील विद्यार्थी असतात. ऑक्सफर्ड आणि केम्ब्रिज या दोन यूनिवर्सिटींच्या विद्यार्थ्यांमध्यें चेंडूफळीच्या, व पडावांच्या पैजा होतात, अणि ज्या यूनिवर्सिटीचे विद्यार्थी जिंकतात त्यांस मोठा मान मिळतो. ह्या बोटरेसी ह्मणजे पडावांच्या पैजा पाहण्याविषयीं सर्व लोक मोठे उत्कंठित झाले असतात. मी ज्या वर्षी विलायतेस गेलों त्या वर्षी मी जाऊन पोंचण्यापूर्वींच ह्या पैजा झाल्या होत्या. परंतु त्यांविषयीं लोकांमध्यें गोष्टी होत असतात, अणि प्रतिवर्षी त्यांची हकिकत वर्तमानपत्रांत छापतात, त्यावरून त्या पैजा मोठ्या प्रसिद्ध होतात असें दिसतें. घोड्यांच्या पैजांमध्यें डर्बी नामक पैजांची मोठी आख्या आहे त्याप्रमाणेंच ह्या "यूनिवर्सिटी बोटरेसी"ची आहे. ह्या पैजा मारणारे विद्यार्थी स्वहस्तें वल्हीं मारून अशा त्वरेनें आपले पडाव चालवितात कीं त्यांच्या पुढें लहान आगबोटी देखील मागें पडतात. असें सांगतात कीं ते एका मिनिटांत पन्नास वल्हीं मारतात. ते समयीं कितीएक पाहणारे लोक लहान लहान आगबोटींत बसून त्यांच्या मागून जातात. कितीएक लोक नदीच्यातीरीं उभे राहून मोठ्यानें ओरडून जय पराजयाचा घोष करितात, आणि कोण जिंकतो तें जाणण्याविषयीं अति उत्कंठा दाखवितात.

### ११. घोड्यांच्या सर्वांत मोठ्या पैजा.

THE DERBY DAY.

वर्षांतून एक दिवस घोड्यांच्या एवढ्या मोठ्या पैजा होतात कीं संपूर्ण लंडन शहर त्या दिवशीं अत्युत्कंठित झालेलें दिसतें. लंडनांत लोकांचा सर्वांत मोठा समूह आणि ढोंगांची मोठी मौज पाहा-

वयाची असली, तर डर्बी नांवाच्या पैजा होतात त्या पाहावयास जावें. पूर्वींच किती एक दिवसपर्यंत लोकांमध्यें या पैजांविषयीं गोष्टी चालल्या असतात, आणि जो तो त्या पाहावयास जाण्याविषयीं आपल्या मित्रांबरोबर किंवा सोबत्यांबरोबर तजवीज करून ठेवितो. इंग्रज लोकांची सर्वांत मोठी जी ही गमत ती वाखाणण्यासारखी नाहीं, कारण या प्रसंगीं जुगार फार चालतो, आणि घोड्यासारख्या भल्या आणि उपयोगी प्राण्यावर मोठा क्रूरपणा करण्यांत येतो. तथापि या पैजांची कीर्ति ऐकून मी त्या पाहावयास गेलों होतों.

ह्या पैजा एप्सम ह्मणून एक गांव लंडनापासून सोळा मैल दूर आहे तेथें होतात. आगगाडी थेट तेथपर्यंत जात नाहीं, ह्मणून एकेकास दहा वीस रुपये गाडीभाड्याला लागतात तितके खर्च करून, लोक ह्या पैजा पाहावयास जातात. ह्या पैजा पाहावयास राजापासून रंकापर्यंत सर्व लोक जातात. आह्मी गेलों तेव्हां युवराज "प्रिन्स-आव-वेल्स" आणि त्यांची पत्नी हीं उभयतां आलीं होतीं. ज्यांस धक्याबुक्या खाणें आवडत नसेल त्यांसाठीं एक उंच ठिकाण केलें आहे तेथें भाडें घेऊन त्यांस जाऊं देतात. आह्मी तेथें गेल्यावर एका उंच उघड्या जागीं जाऊन उभे राहिलों. खालीं लोकांची गर्दी केवढी झाली होती याचा कांहीं सुमार नाहीं. सुमारें दोन अडीच लक्ष मनुष्यें जमलीं होतीं, परंतु इतक्यांत आभाळ व पाऊस येऊन रंगाचा भंग झाला, तथापि लोकांच्या दाटींत अंतर पडलें नाहीं. लोकांस त्या पैजा पाहण्याची इतकी हौस व उत्सुकता कीं कितीएक छत्र्या उघडून व कितीएक तर अगदीं भिजतच उभे राहिले. आह्मी ही छत्र्या उघडल्या तरी अर्धे भिजतच होतों. ही मौज पाहावयास आलों त्यापक्षीं आतां पुरती पाहावी ह्मणून तेथून आह्मी हाललों नाहीं. बारा वाजल्यापासून उभे राहून आमचे पाय दुखूं लागले, आणि थंडीनें

कांकडल्यासारखे झाले. त्याला मी कांहीं जुमानलें नाहीं, परंतु ह्या गर्दींतून परत येण्याचें काम फारच कठीण होतें. हलक्या प्रतीचे लोक रस्त्यांत अनेक ढोंगें करीत आणि नाना प्रकारचीं सोंगें घेऊन फिरत होते. ताबूतांमध्यें मुसलमान लोक सोंगें घेतात त्यांप्रमाणें किती एकांनीं घेतलीं होतीं; कोणी कुस्ती खेळत होते; कोणी एकमेकांस बुक्या मारीत होते; कोणी नाचत होते; कोणी उड्या मारीत होते; कोणी कुस्तींत इतरांस पाडीत होते, कोणी आपण पडत होते; कोणी खात होते, कोणी पीतहोते, कोणी विडी ओढीत होते. अशा ढोंगांसोंगांमध्यें घोडे निघण्याची तयारी झाली, तेव्हां सर्व पाहूं लागले. घोडे बाहेर निघतांच बहुतेक लोक आपापल्या सामर्थ्याप्रमाणें पैजा मारूं लागले. कोणी पांच रुपयांच्या, कोणी पांचशेंच्या, कोणी पांच हजारांच्या, याप्रमाणें दर फेऱ्यास पैजा मारीत असत. माझ्या जवळ लोक उभे होते ते आपापसांत अशा रीतीच्या पैजा मारीत असत.

असा जुगार दुसऱ्या कोठें होत नसेल. ह्या जुगारास राजा, प्रधान इत्यादिक मोठे अधिकारी उत्तेजन देतात. हें इंग्लंडाच्या कितीस मोठें लांच्छन आहे असें त्याच वेळीं माझ्या मनांत आलें. शेवटील पैज तीस घोड्यांची होती. इतके सगळे घोडे निघण्यांत कांहीं अंतर पडत असे त्यामुळें नऊ दहा वेळां "फाल्स स्तार्त" झाला, ह्मणजे घोडे निघालेले थांबले. शेवटल्या खेपेस सर्व घोडे बरोबर सुटले तो चमत्कार एक प्रकारें पाहण्या सारखा होता. यांत जो जिंकतो त्यास सात हजार रुपयांचा आणि एकाद्या वेळेस एक लक्ष रुपयांचा लाभ होतो. त्याचा अगदीं दम निघतो हें खरें आहे. हे शर्तीचे घोडे मोठ्या किंमतीचे असतात.

जे घोडे व स्वार या शेवटच्या पैजेंत जिंकतात त्यांविषयीं पैजा

झाल्यानंतर बरेच दिवसपर्यंत लोकांमध्यें गोष्टी चालतात. त्या घो-ड्यांचे आणि स्वारांचे फोटोग्राफ ह्मणजे प्रकाशाच्या योगानें तसवि-री काढितात. रुमालांवर त्यांचीं चित्रें काढून ते रुमाल जागोजाग विकायास ठेविले असतात. अशा रीतीनें घोड्यांच्या सर्वांत मोठ्या आणि शेवटल्या पैजांची समाप्ति होते. यांस "डर्बी" पैजा असें ह्मणतात.

## १२. प्रिन्स आल्बर्ट याच्या पुतळ्याचें प्रतिष्टापन.

INAUGURATION OF THE LATE PRINCE CONSORT'S STATUE.

विक्टोरिया महाराणीचा पति प्रिन्स आल्बर्ट याच्या आठवणी-करितां "इण्टरनाशनल एक्झिबिशन" याच्या मोठ्या सुंदर गृ-हाजवळ एक पुतळा तयार झाला, त्याच्या प्रतिष्टापनेच्या समारंभास पुष्कळ लोक जमले होते. हा समारंभ पाहावयास मी किती एक मित्रांबरोबर गेलों होतों. "रॉयल-हॉर्टिकल्चरल गार्डेन्स" नांवाचा एक मोठा अतिसुंदर बाग आहे, त्याजवळ सन १८६२ त "एक्झि-बिशन" ह्मणजे प्रदर्शन झालें होतें तेथेंच हा समारंभ झाला. सु-मारें वीस हजार मनुष्यें पैसा खर्चून टिकिटी घेऊन हा समारंभ पा-हावयास आलीं होतीं.

प्रथम तर हा सुंदर आणि रमणीय बाग पाहूनच आह्मी संतुष्ट झालों. त्यांत फुलांची रचना केली होती तिच्या सौंदर्यानें डोळे दि-पूनच जात असत. नंतर ज्या ठिकाणीं समारंभ व्हावयाचा, त्याच्या समोरच्या ग्यालरीवर आह्मी जाऊन बसलों. समय होत आला तेव्हां निरनिराळे प्रधान, लश्करी कामदार आणि परराष्ट्रांचे वकील येऊं लागले. खुरच्यांवर नांवें लिहून ठेविलीं होतीं त्याप्रमाणें सर्व आपाप-ल्या ठिकाणीं बसत गेले. मुख्य प्रधान लॉर्ड पामर्स्तन आला तेव्हां आनंदाची टाळी वाजली. राजकुटुंबासाठीं त्याच्या योग्यतेप्रमाणें

आसन केलें होतें. महाराणीचा पतिशोक अद्यापि गेला नव्हता, ह्मणून त्या यावयाच्या नव्हत्या.

आतां, सर्व लोक युवराजाची, त्याच्या पत्नीची आणि महाराणीच्या इतर कुमारांची मार्गप्रतीक्षा करूं लागले. इतक्यांत मोठ्यानें ब्यूगल ह्मणजे तुतारी वाजली त्यावरून विदित झालें कीं प्रिन्स आणि प्रिन्सेस-आव-वेल्स (महाराणीचा ज्येष्ठ पुत्र आणि त्याची पत्नी) आणि इतर राजपुत्र आले. अहाहा! त्यांच्या दर्शनेंकरून माझ्या मनांत जो आनंद आणि हर्ष उत्पन्न झाला त्याचें वर्णन करण्यास मला यथायोग्य शब्द सुचत नाहींत. संपूर्ण इंग्लंड देशावर अथवा वास्तविक ह्मटलें तर संपूर्ण ब्रिटन देशावर आणि त्याच्या संस्थानांवर आणि आपल्या सकल भरतखंडावर पुढें राज्य करणारा असा जो हा राजाधिराजकुमार याला आह्मीं मोठ्या प्रेमानें निरखून पाहूं लागलों. याप्रमाणें आह्मींच केलें असें नाहीं, तर तेथें जमलेले सर्व लोक याप्रमाणेंच त्याजकडे पाहूं लागले.

ह्या जेष्ठ राजपुत्राच्या स्वरूपांत तिळमात्र न्यून नाहीं. नाक, डोळे, तोंड हीं फारच सुरेख आहेत. हा सुरेखपणा तारूण्याच्या भरामुळें आणि राजप्रभावामुळें फारच तेजःपुंज दिसत होता. राजपुत्र प्रसन्नवदन असून त्याच्या ठायीं गांभीर्य अणि लीनता दिसून येत असे. राजपदाचा मद अथवा अहंकार त्याच्या ठायीं मुळींच दिसला नाहीं. तो पातळांगी उंच असून त्याचें नाक सुरेख, आणि कपाळ तेजस्वी असें आहे. त्याची कांति अशी सुंदर आहे कीं आपल्या (गुजराथी) प्रेमानंद कवीनें त्याला चंद्राची उपमा दिली असतां ती अयोग्य होणार नाहीं. त्याची तरूण पत्नी ही अत्यंत सुंदर दिसत होती. तिच्या स्वरूपांतही कांहीं उणें नाहीं.

अहाहा! हा किती आनंदकारक देखावा! ह्या महान् राजपुत्रा-



THE GREAT INTERNATIONAL EXHIBITION 1862.

सन १८६२ चें महाप्रदर्शन.

स मान देण्यासाठीं सहस्रावधि लोक डोकीच्या टोप्या काढून उजव्या हातांत घेऊन तो हात वर करीत असत. पुढें इंग्लंडाच्या गादीवर बसणाऱ्या आणि लक्षावधि तर काय, परंतु कोट्यावधि लोकांवर राज्य करणाऱ्या राजपुत्रास अशा रीतीनें मान दिलेला पाहून मला अत्यंत संतोष झाला. या समयीं माझा आनंद व हर्ष पोटांत मावेनासा झाला. मी मनांत इतकेंच ह्मणालों कीं हा राजकुमार एव्हां मान पावत आहे, याप्रमाणेंच निरंतर पावो. हल्लीं प्रजेची प्रीति यावर आहे अशीच सदा राहो, आणि, हे परमेश्वरा, ह्याच्या कारकीर्दींत ब्रिटन आणि हिंदुस्थान हे उभय देश समृद्धिमान् होवोत.

आतां प्रधान, लश्करी कामदार, परराष्ट्रांचे वकील, सर्व उठून उभे राहिले. सर्व राजकुमाराला फार नम्रपणें लवून आपापल्या पदवीप्रमाणें एकामागून एक चालूं लागले. राजपुत्रानें मान हालवून प्रत्येकाचा सत्कार केला. याप्रमाणें सभेस आलेल्या सर्वांनीं राजपुत्रास नमन केल्यावर तुतारीवाले तुतारी वाजवीत पुढें चालले. त्यांच्या मागून राजकुटुंबाचीं मनुष्यें आणि त्यांच्या मागून दरबारचे मानकरी आपापल्या पदवीप्रमाणें एकामागून एक निघाले. हें सर्व पाहण्यासारखें होतें. इमारतींत आणि सर्व बागांत पाहावयास लोकांची मोठी दाटी झाली होती. ज्या पाहणाऱ्या लोकांजवळून हा समाज गेला त्या सर्वांनीं टोप्या काढून सलाम केला. ज्याज्याकडे राजपुत्राची दृष्टि जाई त्याला त्याला मान हालवीत तो हळूहळू पुढें चालला. ह्या समारंभांत मी आणि माझे स्वदेशीय मित्र मिस्तर डोसाभाई फ्रामजी कडाका हे बरोबर होतों. आह्मी आमच्या देशच्या रीतीप्रमाणें या महान् राजपुत्रास सलाम केला तो त्याणें स्वीकारिला. महाराणीचे दोघे लहान पुत्रही फार चांगले दिसत होते. त्यांणीं हैलंडर लोकांचा पोशाक केला होता. बागांत जो पुतळा क-

रून ठेविला होता त्यावरला पडदा युवराजानें काढून तो उघडा केला. तो उघडतांना काय विधि झाला तो आह्मांस दिसला नाहीं. तिकडील दाटी कमी झाल्यावर आह्मी तो पुतळा जवळ जाऊन पाहिला. तो आह्मी मोठ्या प्रेमानें पाहिला. तो सुमारें चाळीस फुटी उंच होईल. त्याच्या कारागिरींत तिळमात्र उणें नाहीं. त्याजवळ एक सुंदर पाण्याचा झोत पडत आहे. आतां गर्दी हळूहळू कमी होऊं लागली. आह्मीही आतां बाहेर पडलों आणि बहुत संतुष्ट होत्साते घरीं आलों.



# प्रकरण ७.

## लोकांची गृहस्थिति आणि रीतिभाती.

### VII—SOCIAL STATE AND HABITS OF THE PEOPLE.

कोणताही देश सुधारलेला असेल त्याप्रमाणें त्यांतील लोकांची गृहसंबंधी स्थिति चांगली असते. गृहसंबंधी स्थितीच्या मानानें पाहतां, इग्लंड देशांतील लोक आपल्या देशांतील लोकांपेक्षां फारच चांगले आहेत हें कोणाच्यानें नाहीं ह्मणवणार नाहीं. त्यांची गृहस्थिति अणि रीतिभाती सर्वच प्रकारें चांगल्या आणि कित्ता घेण्याजोग्या आहेत असें मी ह्मणत नाहीं, परंतु अनुभवावरून, लक्षपूर्वक अवलोकनावरून अणि इंग्लंडांत प्रवास केल्यावरून, एवढ्या ह्या गोष्टीविषयीं माझी पक्की खात्री झाली आहे कीं पुष्कळ अगत्याच्या मुख्यमुख्य गोष्टींत त्या लोकांची स्थिति अणि रीतिभाती आपल्यापेक्षां फारच चांगल्या आहेत.

#### १. श्रीमान् लोक.

##### ARISTOCRATIC CLASS.

ज्यांचें वार्षिक उत्पन्न वीस हजार रुपयांपेक्षां अधिक आहे त्यांचीच श्रीमान लोकांच्या कोटींत गणना होते. असे श्रीमान ग्रेटब्रिटन (ह्मणजे इंग्लंड आणि स्कॅाटलंड) देशांत पांच हजारांहून अधिक आहेत असें तेथील "इन्कमटाक्साच्या" छापलेल्या तेरिजावरून कळून येतें. एका युरोपियन मित्राच्या मेहरबानीनें सन १८६३ सालचें पार्लमेंट सभेनें छापविलेलें तेरिजपत्र नंबर ५२६ चें माझ्या हस्तगत झालें आहे, त्यावरून असें दिसून येतें कीं सदरहू सालीं

संपूर्ण ग्रेटब्रिटन देशांत वीस हजार रुपयांपेक्षां ज्यांची वर्षाची प्राप्ति अधिक असे एकंदर ५१८९ लोक होते. कदाचित् यांहून अधिक होतील परंतु कमी नाहीं; कारण सरकारास कर द्यावयाचा म्हणून सर्व लोक आपल्या प्राप्तीचें वास्तविक पत्रक भरून देत असतील असें मानतां येत नाहीं. यास्तव ५१८९ ही संख्या निदान असें समजलें पाहिजे. यांच्याही चार प्रती लावितां येतील, त्यांतून प्रत्येकींतील संख्या येणेंप्रमाणें:—

| वार्षिक उत्पन्न | लोक संख्या. |
|---|---|
| २० हजार रुपयांपासून ५० हजारांपर्यंत | ३४७२ |
| ५० हजार रुपयांपासून १ लक्षापर्यंत | १०१९ |
| १ लक्ष रुपयांपासून ५ लक्षांपर्यंत | ६१८ |
| ५ लक्ष रुपयांहून अधिक | ८० |

याप्रमाणें चार प्रतींत श्रीमान् लोक विलायतेंत आहेत. ज्यांचें वार्षिक उत्पन्न पांच लक्षांहून अधिक ते पहिल्या प्रतीचे. तेथील श्रीमानांत दोन तीन श्रीमंत असे आहेत कीं त्यांचें उत्पन्न वर्षास ४५०००००० रुपयांपेक्षां अधिक आहे असें म्हणतात!! लंडनांतील बोर्ड-आव-ट्रेड याच्या संबंधाच्या एक गृहस्थाची चिठी मजपाशीं आहे तिजवरून मी हा वरील मजकूर लिहिला आहे. अशा श्रीमानांच्या तुलनेंत इंग्लंडासारख्या देशामध्यें काय न्यून असावयाचें आहे?

आपल्या देशांत ज्यांचें उत्पन्न प्रति वर्षी एक लक्ष रुपये किंवा त्याहून अधिक आहे असे श्रीमान (लोकसंख्येच्या मानानें पाहतां) आजकालीं फारच थोडे राहिले आहेत. मुंबई शहरांत कदाचित् शंभरएक होतील. परंतु त्यांत काठेवाडांतील तालुकदार आणि महाराष्ट्र देशांतील सरदार धरले, तरी संख्या विशेष वाढेल असें नाहीं. काठेवाडांत एकंदर दोनशें तालुकदार आहेत. त्यांमध्यें ज्यांचें वर्षाचें

उत्पन्न एक लक्ष रुपये किंवा त्यांहून अधिक आहे असे सोळांपेक्षां अधिक सांपडणार नाहींत.* याप्रमाणेंच दक्षिणेंतील सरदारांमध्येंही वर्षास एक लक्ष किंवा त्याहून अधिक उत्पन्नाचे असे फार आढळणार नाहींत. याशिवाय आपल्या एथील श्रीमान लोकांच्या वैभवांत आणि विलायतेंतील श्रीमान लोकांच्या वैभावांत फार अंतर दिसून येईल.

विलायतेंतील श्रीमान दिसण्यांत फार साधे दिसतात. ते घरांतून बाहेर निघतात तेव्हां बरोबर मोठा डामडौल बाळगीत नाहींत. अग्निरथांत आपणाबरोबर कोणी लक्षाधीश अथवा कोट्याधीश बसला असला तथापि हा कोणी मोठा श्रीमान् आहे असें आपणास वाटणार नाहीं. आणि मी कोणी मोठा श्रीमान् आहें किंवा अमुक गृहस्थ आहें असें कळविण्याविषयीं अथवा दाखविण्याविषयीं तो तिळमात्र यत्न करणार नाहीं. असें असून ते लोक घरांत मोठें वैभव भोगतात, तें इतकें कीं आपल्या एथील श्रीमानांनीं पाहिल्यावांचून तें त्यांच्या लक्षांत येणारच नाहीं.

आपले श्रीमान लोक बाह्यात्कारें मोठा भवका दाखवितात, आणि बाहेर निघते समयीं बरोबर मोठा डामडौल बाळगतात. ते हिरे, माणकें, मोत्यें, जरी पोशाक वगैरेच्या उपभोगानें आपली श्रीमंती दाखवितात इतकेंच नाहीं, तर ते जेथें जातील तेथें बरोबर पुष्कळ मनुष्यें घेऊन जातात. परंतु घरांत त्यांचें वैभव पाहिलें तर विलायतेंतील श्रीमान लोकांच्या वैभवापुढें तें कांहींच नाहीं. खऱ्या वैभवाच्या सुखाविषयीं एतद्देशीय श्रीमान लोक अनभिज्ञ आहेत इतकेंच नाहीं, तर विलायतेंतील मध्यम प्रतीचे गृहस्थ जसें आणि जितकें वैभव भोगितात तसें आणि तितकें वैभव एतद्देशीय श्रीमानांतून थोडेच भोगीत असतील.

* Kâttyâwâr Political Agency Gazette; 23rd July. 1863.

"ड्यूक-आफ-ब्रिजवॉटर नामक एक सरदार मरण पावला तेव्हां त्याच्या घरांतून नुसतीं चित्रेंच १० लक्ष रुपयांचीं निघालीं म्हणून सांगतात!!* सर हान्स स्लोन नामक एक गृहस्थ मरण पावला तेव्हां त्याच्या घरांतून ५ लक्ष रुपयांचा म्यूझियम (पदार्थसंग्रह) निघाला!!* एक वतनदार श्रीमंत (Duke of Argyle) ह्याच्या जमिनींत वीस लक्ष झाडें रुजलीं होतीं त्या सर्वांची किंमत ४० लक्ष रुपये झाली!!† एका श्रीमानाचा बाग (Loddiges Gardens) आहे त्यांतील नाना प्रकारच्या रोप्यांचीच किंमत वीस लक्ष रुपये करितात!!† एका श्रीमंताच्या जमिनींतून नदी वाहते तींतील मासळीनें उत्पन्न प्रतिवर्षी ८० हजार रुपये होतें!!† यावरून तेथील श्रीमान लोकांची संपत्ति कांहींशी लक्षांत येईल.

हे सर्व श्रीमान् लोक नेहमीं लंडनांत राहत नाहींत. त्यांचें नेहमींचें राहणें बहुधा विलायत देशांत बाहेर गांवीं होतें. ते उष्णकाळांत मात्र लंडनास येतात. यांपैकीं पुष्कळ श्रीमान लोक पार्लमेंट सभेचे सभासद असतात, म्हणून फेब्रुवारीपासून जुलईपर्यंत पार्लमेंट सभेचें काम चालतें तितके महिने ते लंडनांत राहतात. जे श्रीमान् लोक पार्लमेन्ट सभेचे सभासद नाहींत ते एप्रिलपासून जुलईपर्यंत लंडनांत असतात. याप्रमाणें उन्हाळ्यामध्यें लंडनांत श्रीमान लोकांची मोठी मंडळी असते. अशा रीतीनें प्रतिवर्षी लंडनांत जाऊन राहिल्यानें त्या लोकांस मोठा खर्च होतो. त्यांला आपल्या योग्यतेप्रमाणें गाड्याघोड्यांचा वगैरे मोठा खर्च चालवावा लागतो. ऑपेरा आदिकरून नाटकें बहुधा नित्य पाहण्याचा आणि दुसऱ्या मौजा भोगण्याचा आणि स्त्रियांस नवेनवे उंचे पोशाक वगैरे देण्याचा भारी खर्च होतो. याशिवाय, एकमेकांच्या देखादेखीनेंही खर्च वाढतो. हा एका

* Murray's Modern London, p. 17, 150.
† Howitt's Rural Life of England, p. 66, 69, 26.

अर्थीं मोठा गैरफायदा आहे. याखेरीज आणखी कितीएक श्रीमान लोक लंडन शहरीं कुमार्गवर्ती होतात, हा दुसरा मोठा गैरफायदा.

अशा रीतीनें कांहीं अनहित होतें खरें, परंतु त्याबरोबर त्यांचें आणि देशाचें मोठें हितही होतें. ते लोक आपापल्याच गांवांत कोंडून राहिले तर, त्यांच्या संपत्तीमुळें त्यांला आपल्या गांवचे लोक मोठा मान देतात तेणेंकरून फुगून जाऊन, आपल्या देशांतील थोड्या उत्पन्नाच्या वतनदार लोकांच्या मिजासीस जसा कांहीं पार नाहीं, तसेंच त्यांचें होईल. परंतु लंडनांत पुष्कळ आपणासारखे आणि कितीएक आपणापेक्षां श्रेष्ठ आहेत हें व त्यांचा खर्च आणि त्यांचा डामडौल पाहून, त्यांचा गर्व परिहार पावतो. दुसरें असें कीं लंडनांत नवनव्या "फ्याशन्स" (तऱ्हा) पाहून त्या ते आपापल्या गांवांत चालू करितात. हाही एक मोठा लाभच असें समजलें पाहिजे.

परंतु देशास यापेक्षांही मोठा लाभ आहे. हरएक प्रसंगीं त्यांची गांठ पडते तेव्हां त्यांस परस्परांचे राज्यप्रकरणी विचार कळतात; याविषयीं एकमेकांबरोबर त्यांचे वादविवाद होतात. त्यापासून फार चांगलें फळ निष्पन्न होतें. हरएक ठिकाणीं आणि प्रसंगीं मंडळीमध्यें विद्येच्या किंवा राज्यप्रकरणाच्या गोष्टी निघतात. ह्मणून त्यांविषयीं माहिती ठेवणें त्यांस प्राप्त होतें. त्यांतून कोणास ह्या विषयांत अथवा वादविवादांत कांहीं बोलतां करतां येत नाहीं, अथवा समजत नाहीं असें झालें, तर त्याची गणना मूर्खांत होते. आपल्या प्रतीच्या मंडळींत जाण्यास चांगलीं वस्त्रें असलीं पाहिजेत; त्याप्रमाणेंच विद्येची, राज्यप्रकरणाची आणि वर्तमानपत्रांत चाललेल्या वादविवादाची माहितगारी असणें जरूर पडतें.

आपल्या देशांतील श्रीमान् मोठमोठ्या विद्यासंबंधी आणि राज्य प्रकरणी विषयांबाबद बहुतकरून अज्ञान असतात इतकेंच नाहीं,

तर साधारण गोष्टींची देखील माहिती त्यांस कचितच असते. या स्थळीं मी स्वदेशीय श्रीमंतांस नम्रतापूर्वक अशी सूचना करण्याची आज्ञा घेतों कीं जोंपर्यंत आपण उत्तम प्रकारची विद्या शिकून राज्यप्रकरणी आणि विद्यासंबंधी अनेक विषयांची माहिती करून घेणार नाहीं, तोंपर्यंत आपल्या ठायीं श्रीमंतीच्या लक्षणांची गणना होणार नाहीं, आणि आपल्या देशाचें महत्व वाढणार नाहीं.

"Among the nations which now bear rule in every part of the earth, there is no instance of a class of nobles retaining its position without being superior in intelligence and education to the mass of the people."

*Speech of H. E. Sir Bartle Frere.*

आपले प्रख्यात गवर्नर साहेब सर बार्ट्ल फ्रीयर, ज्यांणीं आमच्या देशाची स्थिति सुधारण्याविषयीं बहुत श्रम घेतले अणि आस्था दाखविली आहे त्यांणीं, तारीख ३१ वी माहे आक्टोबर सन १८६६ रोजीं त्यांस मान देण्यासाठीं पुणें मुक्कामीं एकत्र जमलेल्या सरदारांस कितीएक अगत्याच्या गोष्टी सुचविल्या; त्यांतून एक वाक्य मी एथें उतरून घेतलें आहे. याचा अर्थ असा कीं "पृथ्वीवर चहूंकडेस हल्लीं सत्ता धारण करणारीं जीं राष्ट्रें आहेत त्यांमध्यें, साधारण लोकांपेक्षां विद्येनें अणि शहाणपणानें श्रेष्ठ नसतां आपल्या पदवीची बूज ज्यांस ठेवतां आली अशा श्रीमंत (अथवा सरदार) लोकांचें उदाहरण एकही सांपडणार नाहीं."

त्यावरून असें होतें कीं आपले श्रीमंत लोक विद्येनें आणि ज्ञानानें साधारण लोकांपेक्षां श्रेष्ठ होतील तेव्हांच त्यांच्या श्रीमंतीची बूज राहील; ते हल्लीं ज्या स्थितींत आहेत तींतच राहिले, तर त्यांच्या श्रीमंतीची बूज दिवसानुदिवस कमी होत जाणार. याजकरितां त्यांणीं

सावध राहून, परमेश्वरानें त्यांच्या हातांत स्वदेशाचें कल्याण करण्याचें साधन दिलें आहे, त्याचा चांगला उपयोग केला पाहिजे. सर बार्ट्ल् फ्रीयर हे ह्या देशाचे खरे शुभचिंतक आहेत, तर वर उतरून घेतलेलें त्यांचें वचन माझ्या स्वदेशीय श्रीमंतांनीं आपल्या हृदयांत लिहून ठेविलें पाहिजे.

अहो, हरएक ठिकाणीं आणि हरएक प्रसंगीं चौघांत विद्येच्या अथवा राज्यप्रकरणाच्या गोष्टी निघाल्या असतां, ज्या श्रीमानाचें मोठें अज्ञान दृष्टोत्पत्तीस येईल त्याची गणना अगदीं मूर्खांत होईल, असा सुदिन आपल्या देशास कधीं येईल? असें जेव्हां होईल तेव्हांच आमच्या देशांतले ठाकूर, सरदार अणि शेटलोक यांस अशा विषयांचा अभ्यास करण्याचें अगत्य वाटूं लागेल. आपल्या लेजिस्लेटिव कौन्सिलांत (कायदे करणाऱ्या सभेंत) एतद्देशीय श्रीमान् लोकांच्या नेमणुकी होतात हें ठीकच आहे; परंतु ज्यास राज्यप्रकरणी विषयाचा चांगला अभ्यास आहे असा कोणता पुरुष त्यांमध्यें आहे? मी अशी पृच्छा करितों म्हणून स्वदेशीय श्रीमान् लोकांचा अपमान करितों असें कोणी समजूं नये. माझ्या ह्मणण्याचा आशय इतकाच कीं ईश्वरानें अशा विषयांची माहितगारी करून घेण्यास श्रीमान् लोकांस अनुकूळ केलें आहे त्याप्रमाणें न चालून, ते जोंपर्यंत विद्यासंबंधी आणि राज्यप्रकरणी विषयांची माहिती करून घेणार नाहींत तोंपर्यंत या देशाचा ऊर्जित काळ येणार नाहीं.

विलायतेंतील श्रीमान लोकांचें पूर्ण वैभव पाहावयाचें असलें तर तें बहुतकरून लंडनांत दृष्टीस पडणार नाहीं. त्यांचीं लंडनांतील घरें पाहून आपल्या मनांत कदाचित् विपरीत कल्पना येईल; त्यांचा पुरा डौल आणि वैभव पाहणें असलें तर, तीं त्यांच्या स्वताच्या गांवीं दृष्टीस पडतील. इंग्लंडांत कोणाही श्रीमंताच्या वतनी गांवांत जाऊन

त्यांचें कंत्री-लैफ" ( Country life ह्मणजे खेड्यापाड्यांत राहण्याची रीति) पाहीं तोंपर्यंत त्याची श्रीमंती आणि वैभव वास्तविक लक्षांत येणार नाहीं.

अहाहा! त्यांच्या गांवांत त्यांचे वाडे किती मोठे आणि सुंदर! त्यांच्या बागबगिच्यांतील झाडेंझुडें आणि फुलेंफळें यांची काय शोभा! कित्येक झाडें कापून कशीं तऱ्हेवार आकृतींचीं केलेलीं असतात! कितीएक झाडांवर जसा काय हिरवा पोपट बसला आहे, कितीएकांवर हिरवें पांखरूं उडतें आहे, कितीएकांवर दुसरीं झाडें रुजलीं आहेत, अशा नाना प्रकारच्या आकृतींचीं झाडें कापून करून आणि तऱ्हततऱ्हेचीं झाडें लावून बागास किती शोभा आणिली असते! त्यांच्या घरांतील सामान व शृंगार किती चांगला व उंची असतो! दहींदुधाची जागा आणि फुलांचा बाग हा डोळ्यांस किती सुंदर दिसतो! अहो, त्यांच्या स्त्रिया किती सुंदर व भल्या दिसतात! त्यांच्या अंगीं शिष्टाचाररीति किती असते! आणि घरांतील बहुतेक माणसांचा स्वभाव किती साधा व भला असतो!

आपल्या देशांत जमीनदार लोकांच्या जमिनीचे दरपिढीस वांटे होऊन मुलांमध्यें समविभाग होतात यामुळें प्रत्येक पिढीस जमिनी अधिकाधिक लहान होतात, त्याप्रमाणें विलायतेंत होत नाहीं. तेथें एका श्रीमानास पुष्कळ मुलें असलीं, तर त्या सर्व बहीणभावंडांस त्याच्या जंगम मिळकतीचे सारखे वांटे मिळतात, परंतु याप्रमाणें त्याच्या वतनाची, जमिनीची अथवा घरइमल्यांची वांटणी होत नाहीं. त्याची स्थावर मिळकत वडील पुत्रास मिळते, तिजवर त्याच्या बहीणभावंडांचा वारसा पोंचत नाहीं. दौलत कितीही मोठी असली, तथापि तिचे पुष्कळ वांटे झाल्यानें तींत हंशील नाहींसें होतें. याजकरितां वारशाहिशाचा हा कायदा विलायतेंत मोठा हितावह झाला आहे.

## २. मध्यम स्थितीचे लोक.

MIDDLE CLASSES.

ज्यांचें उत्पन्न वर्षास तीन हजार रुपयांपासून वीस हजारांपर्यंत आहे, ते लोक मध्यम स्थितीचे होत. ग्रेटब्रिटन ह्मणजे इंग्लंड आणि स्कॉटलंड यांत एवढ्या उत्पन्नाचे एकंदर पन्नास हजार लोक आहेत. सन १८६३ सालच्या उत्पन्नाचें तेरीज पार्लमेंट सभेनें छापून प्रसिद्ध केलें त्यावरून सदरहू वर्षीं वर लिहिलेल्या प्रतीचे लोक ४८५९७ होते असें दिसतें. त्यांच्या चार प्रती येणेंप्रमाणें:—

| वार्षिक उत्पन्न. | लोकसंख्या. |
|---|---|
| ३००० रुपयांपासून ४००० पर्यंत | १७६७२ |
| ४००० रुपयांपासून ६००० पर्यंत | १५३६७ |
| ६००० रुपयांपासून १०००० पर्यंत | ९१५४ |
| १०००० रुपयांपासून २०००० पर्यंत | ६४०४ |

या लोकांच्या राहण्याच्या रीतिभातींत आणि आपल्या एथील मध्यम प्रतीच्या लोकांच्या राहण्याच्या रीतिभातींत फार भेद आहे. सदरील चार प्रतींतून खालच्या प्रतीच्या लोकांस तद्देशीय रीतीप्रमाणें गृहस्थी बाणा राखणें फार कठीण पडतें. कारण त्या लोकांची राहण्याची रीति कांहीं साधारण नव्हे. आपल्या एथील मध्यम स्थितींतल्या लोकांची बसण्याउठण्याची आणि निजण्याची जागा एकच असली तरी चालतें; तसेंच जेवणाची आणि स्वयंपाकाची ही एकच असली तरी चालतें; परंतु विलायतेंत तसें चालत नाहीं. तेथें ह्या चारही जागा निरनिराळ्या असल्या पाहिजेत. त्यांतून बसण्याउठण्याची जागा (ड्राइंगरूम) ही फार स्वच्छ व दिसण्यांत चांगली असली पाहिजे. त्याप्रमाणेंच जेवणाखाणाची जागा (डायनिंगरूम) सुशोभित असली पाहिजे.

आपल्या एथील मध्यम स्थितींतले लोक गाडीघोडा ठेवितील, परंतु घाणेरड्या खराब घरांत राहतील, आणि तें घर "फर्निश" करणें अथवा शृंगारणें ह्मणजे काय याची परवा थोडीच बाळगतील. विलायतेंत घरचा गाडीघोडा नसला तरी चालतें, परंतु चांगल्या सुशोभित घरांत राहिल्यावांचून आणि अगत्याचें तेवढें सामानसुमान व शृंगार बाळगल्यावांचून चालतच नाहीं. ज्याची बसण्याउठण्याजी जागा दिसण्यांत चांगली नाहीं, त्याची गृहस्थांत ह्मणजे सभ्यलोकांत गणना होत नाहीं. चौघांत कोणाचीही गणना गृहस्थांमध्यें होण्यास पहिल्यानें त्याचें घर चांगलें स्वच्छ असलें पाहिजे. घर लहान असलें तरी चिंता नाहीं, परंतु भिंतीस कागद लावलेले असले पाहिजेत, खिडक्यांवर "कर्टन" ह्मणजे पडदे असले पाहिजेत, आणि घरांत भुंईवर नेहमी गालिच्या घातलेला असला पाहिजे.

सामानसुमान ह्मटलें ह्मणजे टेबलें, खुर्च्या, आणि कोची पाहिजेत. साइड-बोर्ड, पियानो-फोर्ट किंवा हार्मोनियम (वाद्य) पाहिजे. दोनचार सुंदर चित्रें आणि एक दोन टांगावयाचे शोभिवंत दिवे पाहिजेत. ड्रॉइंग-रूम ह्मणजे बसण्याउठण्याच्या जागीं निदान इतकें तरी असलें पाहिजे. आतां जेवणाखाणाच्या ठिकाणीं काय पाहिजे तें सांगतों. तेथेंही खिडक्यांवर पडदे, भिंतींस कागद, आणि भुंईवर गालिचा असला पाहिजे. जेवावयास मोठें टेबल आणि कितीएक टांगलेलीं चित्रें असलीं पाहिजेत. निजावयाच्या खोलींतही खिडक्यांवर पडदे, भिंतींस कागद आणि भुंईवर गालिचा असला पाहिजे. याशिवाय छप्परपलंग, वॉर्डरोब ह्मणजे वस्त्रें ठेवण्याचें कपाट, एक तोंड धुण्याचें आणि एक आरसा ठेवण्याचें टेबल, इतकें पाहिजे. हें सर्व सामान मोठ्या कुशल बुद्धीनें ठेविलें पाहिजे, आणि त्यावर, भिंतींवर, ढुलकीवर खिडक्यांवर, किंवा दरवाज्यांवर मळ किंवा केर किंचितही नसावा.

मध्यम स्थितींतल्या वरल्या प्रतीच्या एका कुटुंबास प्रति वर्षी दहाबारा हजार रुपये खर्च लागतो.* या खर्चांतून मोठी रकम मुलांच्या विद्येकडेस जाते. प्रत्येक मुलाच्या विद्याभ्यासाचा खर्च वर्षास एक हजार रुपये होतो. एका कुटुंबांतील चार पांच मुलांचा खर्च सरसकट धरला तर, त्यांच्या विद्येकडेस वर्षाचे चार हजार रुपये होतील. आपल्या एथें मध्यम स्थितींतल्या वरील प्रतीच्या लोकांच्या मुलांस विद्या शिकविण्याचा खर्च इतका थोडा होतो कीं तो हिशोबांत मुळींच धरिला नाहीं तरी चालेल. कोणी एतद्देशीय गृहस्थानें आपल्या मुलांच्या विद्येकडेस वर्षास पन्नास रुपये खर्च केले ह्मणजे पराकाष्ठा झाली; आणि मुलीच्या विद्येविषयीं तर तो दरकार बाळगीतच नाहीं.

मध्यम स्थितींतल्या वरील प्रतीच्या लोकांत दुसरा एक मोठा खर्च वस्त्रांचा. विवाहित स्त्री प्रति वर्षी बहुधा एक हजार रुपयांपर्यंत पोशाकाकडेस खर्च करिते. श्रीमंतांच्या स्त्रियांस एक एकीस वर्षास पांच हजार रुपयांपेक्षां कमी खर्च होत नाहीं. यावरून विलायतेमध्यें स्त्रियांच्या कपड्यांचा खर्च आपल्यापेक्षां सहा सातपट अधिक आहे, असें होतें. एक श्रीमान स्त्री इतकी उधळी होती कीं तिच्या वस्त्रांचा खर्च वर्षास वीस हजार रुपयांपेक्षां जाजती होत असे.† वस्त्रांत असा पैसा उधळणें हें खचित चांगलें नव्हे, परंतु तेथील लोक "फ्याशन" ( Fashion ह्मणजे तऱ्हा ) च्या पाशांत सांपडले आहेत. आपल्या स्त्रिया वस्त्रांकडे अधिक खर्च न करितां दागदागिने करितात हें ठीकच आहे. परंतु ते दागिने असे नसावे कीं शरीरास त्यांचें ओझें होऊन शोभा नाहींशी व्हावी. पायांत रुप्याच्या वेड्या बाळगाव्या, नाकांत नथडा लटकवावा, आणि असेच दुसरे जड जड दागिने घालावे यासारखा रानटीपणा दुसरा कोणता ?

* Pall Mall Gazette, September 15; 1865.
† Habits of Good Society p. 164.

संभावित इंग्लिश लोक मुलांस विद्या शिकविण्यास मोठा खर्च करितात. ही त्यांची चाल खरोखर स्तुत्य व इतरांनीं घेण्यासारखी आहे. जमीन सुधारण्यास खर्च करावा त्याचें फळ प्राप्त होतें ह्याप्रमाणेंच, मुलांचें शरीर आणि बुद्धि सुधारण्यास मोठा खर्च करावा त्याचेंही फळ येतें. कोणी असें म्हणतील कीं आपल्या एथील मध्यम स्थितींतल्या लोकांस मुलांच्या विद्याभ्यासाकडेस इतका खर्च करण्याचें सामर्थ्य नाहीं. ही गोष्ट खरी असेल, परंतु आपले लोक मोठ्या डामडौलानें आपल्या मुलांचीं लग्नें करितात तेव्हां आपल्या शक्तीचा विचार कां करीत नाहींत? ते मुलांचीं लग्नें करण्याविषयीं आणि त्यांस मोठा खर्च करण्याविषयीं काळजी बाळगतात तशी त्यांस विद्या शिकविण्याविषयीं बाळगतील तर केवढा लाभ होईल बरें? ते मुलांच्या लग्नास खर्च करितात तेवढा त्यांच्या विद्येस करितील तर ते मुलगे मोठेपणीं बहुत सुखी होतील. बाळपणांत मुलांचीं लग्नें करून त्यांस प्रपंचाच्या घोटाळ्यांत घालावें त्यापेक्षां, ते स्वतः पैसा मिळवून आपण आपले लग्न करतील आणि आपला खर्च आपणच चालवूं शकतील अशा रीतीची विद्या त्यांस शिकविली असतां किती चांगलें होईल?

मध्यम स्थितींतल्या गृहस्थास आपल्या स्वतांच्या वस्त्रप्रावर्णाचा खर्च प्रति वर्षीं पांच सहाशें रुपये होतो.* तेथील हवा आणि दुसऱ्या कित्येक गोष्टी ध्यानांत आणिल्या असतां एका गृहस्थास वर्षास चारशेंपासून पांचशें रुपयांपर्यंत खर्च लागावाच. एवढ्या रकमेंत कोणकोणतीं वस्त्रें लागतात हें मी बाजूस तपशीलवार लिहिलें आहे.

| | रुपये. |
|---|---|
| डगले किंवा कोट नग ७... | १८० |
| पाटलून व पायजमें जोड ७... | ९० |
| वास्कुटें किंवा बंड्या नग ५... | ४० |
| टोपी, मोजे, स्कार्व वगैरे.... | १०० |
| बूट ...................... | ५० |

* Habits of Good Society p. 147.

ज्याची वर्षाची प्राप्ति तीन चार हजार रुपयांचीच आहे त्याचा लंडनांत निभाव लागणें कठीण पडतें. त्यास केवढी अडचण पडते हें वाचणारांच्या ध्यानांत यावें एवढ्यासाठीं पॉलमॉल ग्याझेट नामक एक प्रख्यात वर्तमानपत्र लंडनांत निघत असतें त्यांत याविषयीं माझ्या वाचण्यांत आलें, त्यांतील थोडासा मजकूर मी उतरून घेतला आहे तो एथें दाखल करितोंः—

"If he (e. i. a gentleman in London) has only £400 (a year) he must either not marry, or he must pinch frightfully; he must count every shilling, he must grumble or lament over each fresh child that makes its appearance; he must deny himself a host of recreations and luxuries that have become almost necessity to us now; and it is only if he has a very clever wife and escapes the calamity of sickness that he can hope to have a tidy, elegant and gentlemanly home."

*Pall Mall Gazette, September* 15; 1865.

"लंडनांत ज्या गृहस्थाचें वर्षाचें उत्पन्न ४००० रुपयेच असेल त्याणें लग्नच करूं नये, किंवा केलेंच तर त्याचा निभाव लागणें फार कठीण पडतें. त्याला एकेक शिलिंग मोजावा लागणार; आणि प्रत्येक नवें मूल होईल तें त्याला त्रासाचें किंवा संतापाचें कारण होणार. जीं सुखें आणि ज्या गमती आतां केवळ जरूरीच्या अशा झाल्या आहेत त्यांतील पुष्कळांचा त्यास त्याग करावा लागणार; आणि त्याची बायको मोठीच हुशार असून घरांत दुखणेंवाणें न आलें तरच त्याणें सुंदर, नीटनेटक्या आणि गृहस्थास शोभे अशा घरांत राहण्याची आशा बाळगावी."

अशा स्थितींतल्या गृहस्थास लंडनांत ( तेथील रीतीप्रमाणें ) राहणें किती कठीण आहे याचें एक उदाहरण माझ्या पाहण्यांत आलें. मी एकवेळ जनरथांत बसून जात असतां माझ्यापाशीं बसले-

ल्या एका इंग्रजानें, आपण मुंबईचे पारशी आहां काय ह्मणून मला विचारिलें. मी सांगितलें कीं मी वाणी जातीचा हिंदु आहें. तो ह्मणाला तर मग तुह्मी पारशांसारखें पागोटें कां घालतां? मी ह्मटलें पारशांचें मुळचें पागोटें निराळेंच होतें, आणि त्यांणीं हल्लींचें आपलें पागोटें आमच्या पागोट्यावरून बनविलें आहे. नंतर तो मला ह्मणाला "कदाचित् आपण मला ओळखीत नसाल. मी मद्रासचा मुख्य सेनापति होतों, आणि एथें मला जनरथांत बसलेला पाहून तुह्मास कदाचित् आश्चर्य वाटेल; परंतु ज्यांपाशीं द्रव्य नाहीं त्यांची एथें कांहीं बूज नाहीं."

## ३. स्त्रियांची स्थिति.

### SOCIAL POSITION OF WOMEN.

कोणत्याही देशाच्या स्थितीचें मान तेथील स्त्रियांच्या स्थितीवर असतें. ज्या देशांतील स्त्रियांची स्थिति वाईट तेथील लोकांची गृहसंबंधी स्थितिच वाईट असें समजावें. गृहसंबंधी स्थितीचें मान स्त्रियांच्या स्थितीवर असतें. कोणाही पुरुषाची स्त्री वाईट निघाली, तर त्याचें घर बुडालें असें आपण ह्मणतों. ही गोष्ट प्रत्येक मनुष्याविषयीं आहे, त्याप्रमाणेंच प्रत्येक राष्ट्राविषयींही आहे. चांगली, भली आणि सुशिक्षित स्त्री जशी घरास भूषण होय, तशाच चांगल्या, सुशील आणि सुशिक्षित स्त्रिया संपूर्ण देशास भूषण होत.

विलायतेंतील वरल्या प्रतीच्या लोकांच्या स्त्रिया बहुत करून चांगल्या, भल्या आणि सुशिक्षित असतात, असें सांगितलें असतां हें कोणाच्यानें खोटें करवेल असें नाहीं. परंतु यावरून कोणी असें समजूं नये कीं विलायतेंतील वरील प्रतीच्या लोकांच्या सर्वच स्त्रिया चांगल्या, भल्या आणि शिकलेल्या आहेत. कोणाही एका सर्व मंडळीस साधारण गुण किंवा दोष लावणें हें मोठें कठीण व विचाराचें काम



स्त्रिया व पुरुष मिळून तीर मारताहेत

आहे; तथापि कोणत्याही एका मंडळींत पुष्कळ मनुष्यें चांगलीं असून दहांत एकादें वाईट असलें, आणि मंडळीविषयीं साधारण अभिप्राय प्रगट करावयाचा असला, तर ती मंडळी चांगली आहे असें आपण ह्मणूं. तर आतां, अशा रीतीनेंच विलायतेंतील गृहस्थांच्या स्त्रियांविषयीं मी सांगतों.

विलायतेंतील स्त्रिया आपल्या स्त्रियांप्रमाणें विद्याभूषणानें अनलंकृत नाहींत. त्या देशीं अशिक्षित स्त्रीस कोणी नवराच मिळत नाहीं. कोणत्याही चांगल्या लोकांच्या मंडळींत तिचा पाय शिरकत नाहीं. एवढ्यावरूनच वाचणारांच्या लक्षांत येईल कीं तेथें गृहस्थांच्या स्त्रियांस आपलीं मनें विद्येनें भूषित करणें अवश्य पडतें. आईबापांस मुख्य काळजी ही पडते कीं मुलीस चांगली विद्या शिकविली

पाहिजे, नाहीं तर तिला भर्त्याशिवाय आणि सज्जनसमागमाशिवाय राहून जन्मपर्यंत दुःखानें दिवस काढावे लागतील, आणि जन्म व्यर्थ जाईल. ज्या देशांत मुलीच्या विद्येविषयीं आईबापांस एवढी मोठी काळजी असते, तेथील स्त्रिया बहुतेक अर्थात् सुशिक्षित आणि चतुर अशा असल्याच पाहिजेत.

आपल्या देशांतील स्त्रिया बहुधा अशिक्षित व अज्ञान अशा आढळतात. त्या अशिक्षित असल्यामुळें बहुतकरून अल्पबुद्धि आणि असमंजस असतात. त्या शिकलेल्या नसतात ह्मणून आपल्या भर्त्यास कसें प्रसन्न करावें आणि तो उद्योग करून थकूनभागून घरीं आला ह्मणजे कसें व कोणत्या रीतीनें भाषण करून त्याच्या मनास विश्रांति होईल असें करावें, हें आपल्या स्त्रियांस बहुतकरून कळत नाहीं. त्यांस विद्या नाहीं ह्मणून त्या रिकामपणाचा वेळ लिहिण्या वाचण्यांत न घालवितां, शेजारणींबरोबर लोकांच्या घरच्या निरर्थक गोष्टी सांगण्यांत आणि ऐकण्यांत घालवितात. त्या शिकलेल्या नसल्यामुळें आपल्या मुलांस बाळपणीं कसें शिकवावें, आणि बोलण्याचालण्याविषयीं, बसण्याउठण्याविषयीं आणि खाण्यापिण्याविषयीं कशी रीतभात लावावी हें त्यांस ठाऊक नसतें.

याजकरितां एतद्देशीय गृहस्थांनीं आपल्या स्त्रियांत विद्या शिकविण्याविषयीं यत्न केला पाहिजे. त्यांत विशेषेंकरून वरील प्रतीच्या एतद्देशीय लोकांनीं आपल्या बायकांस व मुलींस उत्तम विद्या शिकविण्याविषयीं तजवीज केली पाहिजे. याविषयीं पुणे मुकामीं आपले नामदार गवर्नर साहेब सर बार्टल फ्रीयर यांणीं सरदार लोकांस उपदेश केला तो सरदारांनीं आणि त्यांच्या प्रतीच्या इतर एतद्देशीय लोकांनीं ध्यानांत ठेवून त्याप्रमाणें चालावें हें त्यांस उचित आहे. गवर्नर साहेबांनीं सरदार लोकांस असें सांगितलें कीं :—

"You are well aware, that, as a body, the ladies of Sardârs are secluded, not according to your own ancient Hindu usage but according to a comparatively modern fashion, derived from the Mahomedans; and there is hardly a Sardâr's mother or wife, who can do more than read or write, and few can even do that. A poor man's poverty may often force him to learn and improve himself; but the son of a great or rich man has little chance of learning, if his mother be ignorant or insensible to the value of education; and this is the reason why I would urge on you most strongly the education of your wives and daughters, not only for the same reasons which apply to all female education, but as a matter of paramount importance to your order."

*Speech of H. E. Sir Bartle Frere.*

"आपल्या लक्षांत असेलच कीं सरदारांच्या स्त्रिया बहुतकरून प्रसिद्ध ठिकाणीं चौघांत जाण्यायेण्याविषयीं प्रतिबंधित आहेत. हीं आपली हिंदूंची प्राचीन चाल नव्हे, परंतु मध्यंतरीय मुसलमान लोकांच्या चालीवरून घेतलेली आहे. जिला लिहिण्यावाचण्यापेक्षां कांहीं अधिक येतें अशी सरदाराची आई किंवा बायको हलीं विरळीच असेल; आणि लिहितां वाचतां येतें अशा देखील थोड्याच सांपडतील. गरीब मनुष्यास आपल्या गरिबीमुळें विद्या शिकून सुधारणें भाग पडतें, परंतु मोठ्या किंवा संपत्तिवान गृहस्थाच्या मुलाची आई अज्ञान अथवा विद्येचें मोल जाणणारी नसल्यास, त्या मुलास विद्या शिकण्याचा संभव थोडाच असतो; आणि आपण आपल्या बायकांस आणि मुलींस विद्या शिकवावी ह्मणून आह्मी आपणास इतकी मजबूत शिफारस करितों याचें कारण हेंच. सामान्यतः स्त्रीशिक्षणाविषयीं जीं कारणें आहेत त्यांवरूनच केवळ आह्मी ही शिफारस करितों असें नाहीं, तर आपली पदवी आणि योग्यता रक्षण्यासच स्त्रीशिक्षण पराकाष्ठेचें आवश्यक आहे ह्मणून करितों."

स्त्री शिकलेली आणि हुशार असली तर नवऱ्यास आपल्या हुकमांत वागवूं पाहील अशी लटकी भीति बाळगण्याची कांहीं गरज नाहीं. अशिक्षित स्त्री पतीची मर्जी संभाळील त्यापेक्षां शिकलेली स्त्री अधिक संभाळील. इंग्लंडांत महाराणी व्हिक्टोरिया आदिकरून मोठ्या कुलीन स्त्रिया शिकलेल्या व सुशिक्षित असून त्यांणीं भ्रतारांस हुकमांत न ठेवितां, त्यांस संसाराच्या व व्यवहाराच्या कामांत मोठी अगत्याची व उपयोगाची मदत केली आहे, हीगोष्ट प्रसिद्ध आहे.

नुसतें लिहावयास व वाचावयास शिकणें हीच कांहीं विद्या नव्हे, हा विद्येचा एक भाग होय. कोणत्या प्रकारची विद्या शिकली म्हणजे विलायतेंत स्त्री सुशिक्षित म्हणतात याविषयीं आठव्या प्रकरणांत "सभ्य स्त्रीचीं लक्षणें" सांगतांना मी लिहीन. आपल्या देशांत स्त्रीशिक्षणास अजून केवळ आरंभच आहे. मुली लिहावयास, वाचावयास शिकतात हें ठीकच आहे, परंतु हा विद्येचा अथवा शिक्षणाचा एक हात झाला. एका हातानें कांहीं अवघें मनुष्य बनत नाहीं. दोन हात, दोन पाय, दोन डोळे, दोन कान, नाक इत्यादि मिळून अवघें मनुष्य होतें, त्याप्रमाणेच विद्येविषयीं समजावें. ज्या मुली विद्या शिकलेल्या नाहींत त्या आपल्या मुलांस करूंच नये असा ठराव आपल्या देशांतले वरिष्ठ प्रतीचे लोक करितील, तेव्हांच आपले लोक मुलींस विद्या शिकविण्याविषयीं काळजी वाळगतील.

स्त्रियांस बरोबर घेऊन हिंडण्याफिरण्याची, अथवा कांहीं वस्तु देखण्याकरण्याची, अथवा उघड रीतीनें त्यांबरोबर बसून बोलण्याचालण्याची आपल्या लोकांतु लटकी लाज आहे तशी इंग्रज लोकांत नाहीं. अशी मिथ्या लज्जा नसल्यानें स्त्रीपुरुषांस परस्पर मोठा लाभ आहे. कोणतीही चांगली वस्तु पाहण्यास, चांगली गोष्ट ऐकण्यास, चांगल्या मंडळींत जाण्यास आणि चांगली मौज भोगण्यास मिळतें,

हा स्त्रीस लाभ होतो; आणि कोणत्या ही ठिकाणीं आणि प्रसंगीं नवरा बायको बरोबर गेल्यानें आणि बरोबर असल्यानें उभयतांची एकमेकां-बरील प्रीति आणि ममता वाढते.

स्त्रीच्या समागमानें पुरुषास किती संतोष होतो! स्त्रीच्या मधुर वाणीनें आणि गोड भाषणानें पुरुषाचें मन आनंदित आणि प्रफुल्लित होतें. तेवढा वेळ तो प्रपंचाची चिंता विसरून जातो. आणि अशा प्रकारें त्याच्या मनास विश्रांति झाल्यानें तें पुनः ताज्या आणि नव्या उत्साहानें उद्योगास लागतें. स्त्रीस केवढा लाभ आहे! तिला हरएक वस्तूची माहिती होते, आणि तेणेंकरून तिचें ज्ञान दिवसानुदिवस वृद्धि पावत जातें. बरें, संपूर्ण मंडळीस केवढा लाभ आहे तो पहा. मंडळींत स्त्रिया असल्यानें सर्वांस मर्यादेनें व अदबीनें वर्तणें आणि बोलणें चालणें प्राप्त होतें; आणि दांडगाई करण्यास सवड मुळींच सांपडत नाहीं.

आमचे लोक याविषयीं लटकीच लाज घेऊन बसले आहेत. वरल्या प्रतीच्या स्त्रिया घरांतल्या कारकुनाबरोबर व चाकर माणसांबरोबर हंसल्या बोलत्या तरी चालतें, परंतु आपल्या नवऱ्याबरोबर अथवा नवऱ्याच्या मित्राबरोबर बोलण्यास त्यांस लज्जा वाटते. वरल्या प्रतीच्या लोकांच्या स्त्रिया साधारणपणें रस्त्यांतून तोंड उघडें ठेवून जातात, परंतु आपला नवरा किंवा त्याचा स्नेही किंवा कोणी नातलग भेटला असतां त्याला पाहून लुगड्याचा पदर ओढून तोंड दडवितात. ही कोणत्या प्रकारची लाज हें मला कळत नाहीं.

आमच्या लोकांनीं हें पक्कें समजावें कीं खरी लज्जा ह्मटली ह्मणजे अमर्यादेनें बोलणें चालणें आणि कुमार्गानें वर्तणें यांत आहे. अहो! आपल्या लोकांतील कितीएक स्त्रिया किती बारीक वस्त्र नेसतात आणि रस्त्यानें काय नखरे करीत जातात! घरांत केवढ्या मोठ्यानें बोलतात! यांत त्या लज्जा बाळगीत नाहींत, आणि आपल्या नवऱ्याब-

रीवर हिंडण्याफिरण्याची आणि कोणत्याही ठिकाणीं जाण्याकरण्याची लटकी लाज कशासाठीं बाळगावी?

आपल्या लोकांची बहुत करून अशी समजूत आहे कीं स्त्रियांस दास्यांत ठेविल्यानें आणि बाहेर जाऊं न दिल्यानें त्यांच्या नीतीचें अधिक रक्षण होतें; आणि त्यांस बाहेर हिंडण्याफिरण्याची मोकळीक दिल्यानें अथवा पुरुषमंडळींत त्यांस मिसळूं दिल्यानें त्यांची नीति बिघडते. परंतु ही समजूत खोटी आहे, असें एथें स्पष्ट सांगणें प्राप्त आहे. कोणीही पुरुष सर्वदा घरीं रिकामा बसून राहिला, तर त्याच्या मनांत दुष्ट विचार आणि कुमार्गानें जाण्याविषयीं कल्पना येतात. असाच प्रकार स्त्रियांचा आहे. ज्याप्रमाणें अनेक वस्तु त्यांच्या पाहण्यांत आणि ऐकण्यांत येतील त्याप्रमाणें त्यांचीं मनें अनेक वस्तूंविषयीं विचार करण्यांत गुंतून राहतील, मग त्यांच्या मनांस वाईट गोष्टींविषयीं कल्पना व विचार करण्यास अवकाश क्वचित् सांपडेल.

स्त्रियांस दास्यांत ठेवण्याची आणि चौघांत न जाऊं देण्याची चाल ही बहुतकरून मुसलमान लोकांनीं आपल्या देशांत आणलेली असावी. परंतु सुधारलेल्या देशांमध्यें आणि लोकांमध्यें स्त्रियांस दास्यांत किंवा प्रसिद्ध ठिकाणीं जाण्याविषयीं प्रतिबंधित ठेवण्याचा संप्रदाय मुळींच आढळत नाहीं. यामुळें तेथील स्त्रियांस बहुत सुख भोगावयास मिळतें. ही गोष्ट तर साधारण आहे कीं जी बायको वाईट तीस अधिक दाबांत किंवा प्रतिबंधांत ठेवावें त्याप्रमाणें ती अधिक बिघडते. ह्मण आहे कीं" राहणार तर आपोआप राहील, आणि जाणार तर सख्या बापाजवळून जाईल." स्त्री सुशील, कुलीन आणि पतिव्रता धर्म जाणणारी असली तर बाहेर हिंडल्याफिरल्यानें आणि पतिसमागमें पुरुषमंडळींत बसल्याउठल्यानें ती कधीं बिघडणार नाहीं. याविषयीं उगीच चिंता करून तिला घरांत बसवून ठेवावें हेंच मुळीं मोठें वाईट आहे.

इतिहास वाचणारे आपणास सांगतील कीं ज्या लोकांनीं आपल्या स्त्रिया दास्यांत आणि प्रसिद्ध ठिकाणीं चौवांत जाण्याविषयीं प्रतिबंधांत ठेविल्या त्यांची स्थिति सुधरली नाहीं, आणि ते लोक सुधारलेल्या लोकांच्या पदवीस कधीं चढले नाहींत. कोणत्याही मंडळींत स्त्री असल्यानें त्या मंडळीचा मान वाढतो. त्या मंडळींतून दांडगाई निघून जाते. अशा मंडळींत पुरुषांस मर्यादेनें व आदरपूर्वक वागावें लागतें, आणि तेणेंकरून वाईट गोष्टी सांगण्याची आणि ऐकण्याची सवई मोडते. जर आपली स्त्री आपल्या घरांतील कारकुनाबरोबर किंवा चाकरमाणसांबरोबर तोंड न झांकतां बोलते त्याला कांहीं चिंता नाहीं, तर आपल्या मित्राबरोबर ती मर्यादेनें बोलली असतां काय चिंता आहे बरें? ज्यावर कारकून किंवा चाकर याच्या इतका देखील आपला विश्वास नाहीं तो आपला मित्र कसला?

विलायतेमध्यें स्त्रियांस पुरुषांच्या मंडळींत जाऊं देतात ह्मणून त्यांस संसारसुख अधिक प्राप्त होतें. याविषयीं आपली खातरी करण्यासाठीं, आपले प्रख्यात गवर्नर सर बार्टल फ्रीयर यांच्या एका भाषणांतील एकच वाक्य एथें उतरून घेतों:—

*"I would refer to Sir Jamsetjee Jeejeebhoy and other gentlemen who have been in England, who will understand me when I say that, if you take away the society of the ladies of London from the men of business or lawyers, or statesmen of that city, you take away half their powers and more than half their enjoyment in life."

*Speech of H. E. Sir B. Frere.*

"सर जमशेटजी जीजीभाई आदिकरून जे गृहस्थ इंग्लंडास जाऊन आले आहेत त्यांस विचारावें; कारण लंडनांतील कामकाजाचे किंवा कायद्यांत वाकब किंवा राज्यकारणी पुरुष यांस तेथील स्त्रियांचा समागम नाहींसा केला तर त्यांची अर्धी शक्ति आणि अर्ध्याहून

अधिक ऐहिक सुख गेल्यासारखें होईल, असें मी ह्मणतों याचा अर्थ ते समजतील."

विलायतेंतील लोक स्त्रियांस मोठा मान देतात. स्त्री ह्मटली ह्मणजे अबला असून तिचें शरीर व मन कोमळ आहे. तिच्या नाजूक तनूस दुखापत न व्हावी आणि कोमळ मनास दुःख न व्हावें अशी तजवीज ठेवण्यास विलायतेंतील लोक जपतात. ते होईल तितकें करून स्त्रियांची मर्जी संभाळतात. स्त्री बसल्यावांचून पुरुषाच्यानें बसवत नाहीं. कोणी पुरुष बसला असला आणि कोणी अनोळखी स्त्री त्याजवळ उभी असली तरी त्याणें उठून तीस जागा दिली पाहिजे. कोणत्याही ठिकाणीं स्त्रीचा मान पहिल्यानें केला पाहिजे. स्त्री बोलत असली तर तिचें पहिल्यानें ऐकिलें पाहिजे. मंडळींत खाण्यापिण्याचा कांहीं पदार्थ आणला तर स्त्रियांस प्रथम दिला पाहिजे. त्यांला कांहीं हावें असलें तर तें पहिल्यानें दिलें पाहिजे. सारांश, विलायतेंतील लोक हरएक प्रकारें आणि हरएक रीतीनें स्त्रियांचा मान ठेवून आदर करितात.

आपल्या देशांत स्त्रीजातीस मान नाहीं. कित्येक एतद्देशीय लोक बायको ह्मणजे खेटराप्रमाणें मानतात! एक बायको मरण पावली तर पायांतलें खेटर गेलें असें ह्मणून, लागलीच दुसरी करितात. "स्त्री ह्मणजे वेठ वळण्यास आणि मजुराप्रमाणें खपण्यास उत्पन्न झाली आहे; ती नेहमी दाबांतच ठेविली पाहिजे; ज्याच्या पदरीं पातक फार त्यासच मुली होतात; मुलगी झाली ह्मणजे त्या 'रांडेस' टपल्या माराव्या;" इत्यादि वचनें आपल्या लोकांच्या तोंडचीं वारंवार ऐकूं येतात. विलायतेंतील स्त्रियांची वर सांगितलेली स्थिति पाहा, आणि आपल्या एथील स्त्रियांची ही दशा पाहा; दोहोंमध्यें किती अंतर आहे!

ज्या देशांत स्त्रियांस मान नाहीं त्याचें वजन सुधारणुकीच्या तागडींत पडणार नाहीं. तो देश जगामध्यें कधींही महत्वास चढणार नाहीं. जीबरोबर आपण लग्न लावून जन्माची गांठ बांधिली, तिचा आपण अशा रीतीनें अपमान करितों, आणि ज्या अर्भक कन्येनें आपल्या पोटीं जन्म घेतला तिचा असा तिरस्कार करितों, हें ऐकून विलायतेंतील लोकांस फारच विस्मय वाटतो. आपण आपल्या घराचा मान ठेविला नाहीं, तर लोकांमध्यें आपला मान कोठून वाढणार? स्त्री ह्मणजे आपलें घर, तिचा मान अवश्य ठेविला पाहिजे. आपण स्त्रीचा असा मान ठेविल्यावांचून, आपला देश कधींही उंच पदवीस चढणार नाहीं.

"All who have aspirations for a high political future for this country should know that those great changes which they look for cannot be achieved without raising the social position of the *women* of this country generally."

*Speech of H. E. Sir B. Frere.*

याप्रमाणें आपले गवर्नर सर बार्टल फ्रीयर यांणीं एका भाषणांत ह्मटलें होतें. या गवर्नर साहेबांस आपल्या देशाविषयीं पुष्कळ अनुभव आहे. ते आपणांस सांगतात कीं तुह्मी आपल्या स्त्रियांची योग्यता व मान वाढविल्यावांचून तुमचे मोठमोठे राज्यप्रकरणी मनोरथ कधीं परिपूर्ण होणार नाहींत. गवर्नर साहेबांच्या या ह्मणण्यांत खोल अर्थ आहे, तो आमच्या देश बधूंनीं समजून त्याप्रमाणें वर्तणूक करावी हें योग्य आहे.

मी हें कबूल करितों कीं जोंपर्यंत आपल्या स्त्रिया विद्याभूषणानें अनलंकृत राहतील तोंपर्यंत, विलायतेंतील स्त्रियांस जसा आणि जितका मान मिळतो तसा आणि तितका मान आपल्याच्यानें आपल्या स्त्रियांस देववणार नाहीं. एकाद्या अडाणी व मूर्ख मनुष्यास मान मिळाला असतां तो फुगून जाऊन त्याचा वाईट उपयोग करितो. त्याप्रमा-

णेंच अडाणी व मूर्ख स्त्रियांविषयीं समजावें. असें आहे तथापि स्त्रियांस घरच्या दासींसमान मोजावें, सहज बोलतांना त्यांस धमकावावें आणि शिव्या द्याव्या; बायको मेली असतां पायपोस तुटला असें समजून लागलीच दुसरी करावी, आणि आपणांस कन्या झाली असतां "त्या रांडेस टपल्या माराव्या," अशा रीतीनें आपले लोक जोंपर्यंत स्त्रीजातीचा अपमान करितील तोंपर्यंत आपली स्थिति सुधरणार नाहीं, हें त्यांणीं पक्कें समजावें.

विलायतेंतील स्त्रिया आपापल्या कुटुंबांस मोठी मदत करितात. त्या स्वयंपाक करण्याची अथवा त्यावर देखरेख ठेवण्याची मेहनत करितांत इतकेंच नाहीं, तर घरांत सर्व गोष्टींची तजवीज ठेवितात. बाजारांतून जिन्नस आणणें, घरांतल्या खर्चविचाचा हिशेब ठेवणें, वस्त्र प्रावर्ण विकत घेणें किंवा शिवविणें, मुलांच्या कपड्यालत्त्यास जपणें याची; सारांश, घरसंबंधीं सर्व कामकाजाची काळजी त्या बाळगितात. पुरुषांनीं घरसंबंधी कोणत्याही कामाची काळजी करावी नलगे, ती एथपर्यंत कीं पुरुषाच्या वस्त्रास किंचित् मळ किंवा डाग लागला असला, अथवा कोठें तें किंचित् फाटलें असलें, तर त्याणें न सांगतां बायकोनें तें स्वच्छ व नीट करून ठेवावें. कोठेंही चौघांत पुरुषाच्या वस्त्रांवर मळ राहिलेला दिसला, अथवा वस्त्र फाटलेलें दिसलें, तर त्याची बायको वाईट आहे असें सर्व मनांत ह्मणतील. अहो, आपल्या एथील स्त्रिया घरचा सर्व कारभार आंगावर घेऊन स्वतः करावयास केव्हां शिकतील बरें!

विलायतेंत कितीएक स्त्रिया श्रेष्ठ उद्योग करितात. मुलींस शिकविण्याचा किंवा ग्रंथ लिहिण्याचा प्रचार तेथील स्त्रियांमध्यें फार आहे, हें वाचणाऱ्यांस ठाऊक असेलच. परंतु कितीएक स्त्रिया वैद्यकीचें काम करणाऱ्या सांपडतील. उंच प्रतीच्या स्त्रियांस बहुतकरून उ-



घरांत बसलेलें एक कुटुंब

द्योग करावा लागत नाहीं, आणि लागलाच तर त्या वर सांगितलेलीं कामें करून संसारास मदत करतात. खालच्या प्रतीच्या स्त्रिया, शिवण्याचें, गुंफण्याचें आणि कितीएक गुमास्त्याचेंही काम करितात. हलक्या लोकांमध्यें धंदे करणाऱ्या बायका पुष्कळ निघतील. अशा प्रतीच्या लोकांविषयीं मी लिहीन तेव्हां त्यांच्या स्त्रियांच्या स्थितीविषयीं कांहीं गोष्टी सांगेन.

## ४ घरची रीतभात.

DOMESTIC LIFE.

लंडनांतील लोकांच्या घरच्या रीतीभातींत आणि आपल्या लोकांच्या घरच्या रीतीभातींत पुष्कळ अंतर आहे. तेथें वरल्या प्रतीचे लोक घरांत फार मर्यादेनें वागतात. एका घरांतील अनेक माणसें आपापल्या खोलीचें दार उघडें ठेवून बसत नाहींत, प्रत्येक खोली-

चें दार बहुतकरून लावलेलें असतें. कोणाला दुसऱ्याचे खोलीचें दार उघडावयाचें असलें तर अगोदर बोटानें टिचकी मारली पाहिजे. आंतून "यस" अथवा "कम इन" ह्मणजे "हां" अथवा "आंत या" असे शब्द आल्यावर दार उघडून आंत जावें. खोलींत दोघे चौघे बसलेले असले तरीही दार बंदच असतें.

घरांत एकमेकाच्या दृष्टीस पडेल अशा रीतीनें उघडें फिरतां कामा नये. सर्व शरीर वस्त्रानें झांकावें तेव्हांच परस्परांच्या खोलींत अथवा ड्राइंगरूमांत जातां येतें. कमरेपासून वरचा शरीराचा भाग उघडा ठेवून फिरलें तर चालणार नाहीं. अशा रीतीनें अर्धें आंग उघडें टाकून फिरलें तर ते लोक अर्धनग्न ह्मणतील. अशा अवस्थेंत आपण आपल्या निजावयाच्या खोलींत बसलों अथवा निजलों असलों, तर आपली दासी देखील एकाएकीं आंत येणार नाहीं. आपल्या हिंदु लोकांत अशा रीतीनें अर्धें उघडें अथवा विलायतेंतील लोकांच्या समजुतीप्रमाणें अर्धनग्न फिरण्याची मुळींच लाज नाहीं. अशा अवस्थेंत परकी स्त्रियांसमक्ष देखील बसण्याचा अथवा उभें राहण्याचा प्रचार हिंदु लोकांत फार आहे. परंतु विलायतेमध्यें याची मोठी लाज मानितात.

शरीर सगळें अथवा अर्धें झांकण्याची जी मर्यादा हिजविषयीं निरनिराळ्या लोकांचे समज निरनिराळे आहेत; तथापि हें खचित आहे कीं जे लोक अगदीं रानटी असतात, तेच अगदीं नग्न अथवा अगदीं उघडे फिरतात. ह्याप्रमाणें पाहतां, जे लोक अर्धे उघडे फिरतात ते अर्धे रानटी समजलें पाहिजे. मी अणखी हेंही खचित ह्मणतों कीं आपणामधील वरील प्रतीचे लोक अर्धे उघडे फिरतांना पाहून इंग्लिश गृहस्थांस आणि, विशेषेंकरून स्त्रियांस, फार तिरस्कार येत असेल. आपण इंग्लिश गृहस्थांचा स्नेह करूं इच्छित असलों, तर

त्यांला असा त्रास करण्यास, आपला उपाय चालेल तितकें करून आपणाकडून कारण न होईल असें करावें हें चांगलें.

विलायतेंत जे लोक दाढीमिशी ठेवीत नाहींत ते प्रत्यहीं आंथरुणांतून उठतांना दाढीमिशी बहुतकरून आपल्या हातानें काढतात; कारण त्या देशीं आपल्या एथल्याप्रमाणें नाहवी दारोदार फिरत नाहींत. तद्देशीय हवा थंड असल्यामुळें डोकीचे केंस राखावे लागतात. हे केंस फार वाढले ह्मणजे हजामास घरीं बोलावून किंवा आपण त्याचे दुकानीं जाऊन ते कातरवितात. कितीएक इंग्रज लोक दाढीमिशी ठेवूं लागले आहेत, त्यांस नित्य वस्त्रा लावण्याची गरज पडत नाहीं. दाढीमिशी राखणाऱ्यांची संख्या लहान आहे, परंतु ती नित्यशः वाढत आहे. दररोज दाढीमिशी काढणारे आहेत ते ती काढल्यावांचून बाहेर जात नाहींत.

विलायतेंतील लोक "टुथ-ब्रशानें" (ह्मणजे दांत चोळायाच्या कुंचीनें) दांत घांसतात. ते आपल्या लोकांप्रमाणें दांतवणाचा उपयोग करीत नाहींत. तसेच ते लोक आपल्या लोकांप्रमाणें खिडकींत उभे राहून अथवा ओटीवर बसून दांत घांशीत नाहींत. ते आपापल्या निजावयाच्या खोलींत हात व तोंड धुवावयाच्या टेबलापाशीं उभे राहून दांत घांसतात. ह्या टेबलावर हात व तोंड धुवावयाचें भांडें नेहेमी ठेविलेलें असतें त्यांत ते हात व तोंड धुतात.

ते लोक दररोज आंघोळ करीत नाहींत, तथापि बहुतकरून स्वच्छ आणि चापचोप असतात. (वाचणारांनीं हें लक्षांत ठेवावें कीं मी हलक्या लोकांविषयीं लिहीत नाहीं.) इंग्लिश गृहस्थांची स्नान करण्याची रीत देखील निराळी आहे. ते थोडथोडें पाणी आंगावर घेऊन आंघोळ करीत नाहींत. ते अनेक तऱ्हांचे "बाथ" घेतात, ह्मणजे पाण्यांत बसून नाहतां येईल अशा पात्रांत आंग धुतात; ते ब-

हुतकरून लांब रंगीत भांड्यांत पाणी भरून आंत आपण सपसील पडून आंघोळ करितात. "शॉवर बाथ" घेतात त्यांत उंचावरून चाळणीसारख्या भांड्यांतून पाण्याच्या पुष्कळ धारा पावसाप्रमाणें डोक्यावर पडतात. "फुट-बाथ" घेतात त्यामध्यें पाय धुतात अणि स्पंज भिजवून सर्व आंग स्वच्छ करितात. त्यांच्या स्नान करण्याच्या खोल्या निराळ्या असतात, ह्मणून स्नानाच्या वेळीं आंगावर वस्त्र ठेवण्याची त्यांस कांहीं गरज नाहीं.

ते लोक आंथरूणांतून उठल्यावर हात व तोंड धुतल्याशिवाय, किंवा आंघोळ करावयाची असली तर ती केल्याशिवाय, व केंस ब्रशानें विंचरून साफ केल्याशिवाय, व पुरा पोशाक केल्याशिवाय, बहुधा दिवाणखान्यांत जात नाहींत. त्या ठिकाणीं अथवा जेवणाच्या खोलींत स्वच्छ होऊन व पोशाक करून गेलें पाहिजे. घरांतील मुलांस देखील नागडें उघडें, किंवा मळकीं वस्त्रें घालून तेथें जातां येत नाहीं. लहान मुलांची निजण्याची आणि त्यांस पोशाक वगैरे करण्याची वेगळीच खोली असते. तीस "नर्सरी" असें ह्मणतात.

ते लोक रिकामपणीं घरांत किंवा बाहेर काळक्रमण कसें करितात याविषयीं मी आतां थोडक्यांत सांगतों. बायका मुलें घराजवळ बागबगिचा असलातर त्यांत कांहीं वेळ फिरून झाडेंझुडें पाहतात. तीं दिवाणखान्यांत बसतात तेव्हां बहुतकरून हातांत कांहींतरी काम घेऊन बसतात. कोणी पुस्तक वाचतें आणि त्यांत कांहीं चमत्कारिक आणि जाणण्याजोगें आढळल्यास तें इतरांस वाचून दाखवितें. कोणी चित्रें काढीत आहे, कोणी काढलेलीं चित्रें पाहत आहे. कोणी आल्बम ह्मणजे फोटोग्राफांचें पुस्तक उघडून पाहत आहे. विलायतेंत घरांतील बहुतेक माणसें आपापला फोटोग्राफ ह्मणजे सूर्याच्या किरणांनीं चित्र काढवितात, ह्मणून प्रत्येक घरांत" फामेली-आल्बम"



बागांतील मौज.



गायनाची आणि वाद्यांची मौज.



Specially prepared for "Karsande's Travels in England"



एक बाई दोन मुलींसहित आपला फोटोग्राफ काढविते आहे.

ा जे कुटुंबांतील माणसांच्या चित्रांचें पुस्तक बहुतकरून टेबला-
ठेविलेलें असतें. घरांतल्या बायकांपैकीं कोणी शिवीत आहे, को-
कशिदा काढते आहे, कोणी गुंफ-
ाचें काम करीत बसली आहे. बहुत
रून घरोघर शिवण्याचें यंत्र दिवाणखा-
ांत किंवा दुसऱ्या कोणत्या तरी जागीं
त तेंच; ह्या यंत्रानें टांके मारण्याचें काम
र सोपें व झपाझप होतें. सर्व बायकांस ब-
ा शिवावयास, कशिदा काढावयास व


शिवण्याचें यंत्र.

फावयास येत असतें. आणि कित्येक ओढगस्त घराण्यांतल्या स्त्रिया
ं कामें करून संसारास मोठी मदत करितात. लोंकरीच्या कशिद्या-
व जाळी वगैरे विणण्याचें, हीं कामें करण्याचा प्रचार तद्देशीय स्त्रि-
ंत फार आहे, आणि तीं त्या मोठ्या चलाखीनें करितात.



बुधबळांचा खेळ.

अशा प्रकारें उद्योग करीत असतां ते लोक मनास विश्रांति व कर्मणूकही करून घेतात. यासाठीं ते अनेक प्रकारच्या गोष्टी सांगून त्यांत आनंद पावतात. त्यांच्या भाषणांत मर्यादा, प्रेम, माधुर्य व नम्रता असते. ते लोक जिवास संतोष आणि मनास कर्मणूक व्हावी ह्मणून कांहींतरी खेळ मांडून बसतात. ते कोणे समयीं कार्ड ह्मणजे गंजिफा खेळतात, कोणे समयीं पैसे लावून खेळतात, आणि कोणे समयीं बुधबळें मांडतात. बुधबळांचा खेळ हा जगप्रसिद्ध आहे. त्याच्या योगें करून मनास जसें शिक्षण व रंजन होतें, तसें दुसऱ्या थोड्याच खेळांनीं होत असेल. परंतु हा खेळ अंमळ कठीण असून यांत बुद्धिबळ फार खर्चावें लगतें. यास्तव ह्यापेक्षां दुसऱ्या कितीएक खेळांचा या लोकांत प्रचार फार आहे. एका लांब टेबलावर हस्तिदंताचे चेंडू अनुक्रमानें चढत्या उतरत्या नंबरांच्या खळग्यांत काठीच्या टोंकानें ढकलावे; या खेळास ते लोक "बिल्यर्ड्स" ह्मणतात. हा खेळ या लोकांत



बिल्यर्ड्स नामक खेळ.

आहे. तो खेळतांना त्यांस फार आनंद होतो. घरांत खेळण्याचे
र पांच खेळ मुख्य होत. याशिवाय अणखी अनेक प्रकारचे खेळ
त्यांविषयीं सविस्तर लिहिण्याची मला कांहीं गरज दिसत ना-
लोक एकादे वेळेस पियानोफार्ट (वाद्य) वाजवितात आणि ता-
तात तेव्हां गाऊं देखील लागतात. नवऱ्यानें बायकोस "प्रिये, गा-
," ह्मटलें ह्मणजे ती बारीक मधुर सुरानें एकादुसरें गाणें गाऊन
आणि सर्व कुटुंबाचें मनोरंजन करिते. एकादे वेळेस घरांतील मु-
गाऊं लागतात. थंडीच्या दिवसांत सर्व कुटुंबचाकुटुंब विस्त-
ऽ शेकत बसतें, आणि अनेक प्रकारच्या गोष्टी सांगून आनंद
विलायतेंतील कोणाही गृहस्थाच्या घरचें खरें सुख पाहावयाचें
, तर याप्रमाणें कुटुंबाचीं सर्व माणसें विस्तवाजवळ धग घेत आ-
नंदानें व प्रीतीनें गोष्टी सांगत बसतात, तेव्हां पाहण्यांत येईल.



गोल्फ ह्मणजे चेंडूदांडूंचा खेळ.

कोणे समयीं सर्व कुटुंबचाकुटुंब बाहेर फिरावयास निघतें. ते लोक लंडनांत असतां उपवनांत फिरावयास जातात, अणि बाहेरगांवीं असतात तेव्हां रानांत जातात. ते कधीं कधीं घोड्यावर बसूनही सहल करावयास निघतात. ह्या लोकांत चेंडूफळी खेळण्याची चाल फार आहे. बाहेर उघड्या जागीं पुष्कळ हा खेळ खेळतांना आपल्या दृष्टीस पडतील. क्रिकेट नांवाची चेंडूफळी या लोकांत मोठी प्रसिद्ध आहे. ह्या खेळांत झपाट्यानें धांवणें आणि चेंडू फेंकणें, समोरून चेंडू येत असतो तो लांकडाच्या टिकोऱ्यानें जोरानें मागें फिरवणें, आणि जमिनींत पुरून उभ्या केलेल्या काठ्या असतात त्या जोरानें पाडून टांकणें वगैरे कसरती कराव्या लागतात.

गोल्फ ह्मणजे चेंडूदांडू हा खेळ स्कॉच लोकांत फार आहे, परंतु कितीएक इंग्रज लोकही तो खेळतात. ह्या खेळांत हातावर मोठा



स्केट म्हणजे बर्फावर चालणें.

( १५४ )



“ क्रिकेट ” म्हणजे चेंडूफळी.

( ३१३ )



समुद्रतीरीं विहार.



समुद्रांत नौकाविहार.



तीरकमठ्यांची कसरत.

जोर पडतो. याप्रमाणें अनेक प्रकारचे खेळ खेळण्यांत मोठे वयस्कर पुरुषही असतात. मोठें वय झाल्यानंतर कोणताही आंगबळाचा खेळ खेळण्याची आपल्या लोकांत मोठी लाज मानतात. परंतु कोणत्या गोष्टीची लाज मानावी व कोणतीची मानूं नये याविषयीं आपल्या लोकांचा समज बरोबर नाहीं. आपण आंगबळाची कांहींच कसरत करीत नाहीं यामुळें असे नाजूक आणि अशक्त होऊन गेलों आहों. विलायतेंतील लोक अशा प्रकारचे खेळ खेळतात कीं जेणें करून आंगबळ वाढावें, शरीर कसावें, आणि प्रसंगीं युद्धांत स्वरक्षणार्थ ती कसरत उपयोगी पडावी.

तेथें तीरकमठ्यांचा खेळही फार प्रचारांत आहे. हा खेळ पुरुषांबरोबर स्त्रियाही खेळतात. कारण ते लोक सर्व चांगल्या प्रकारच्या खेळांत आणि गमतींत स्त्रियांस घेऊन त्यांस सुख द्यावें असें इच्छितात. तीर मारण्यास शिकल्यानें निशाण मारावयास येऊं लागतें. याप्रमाणेंच घोडें भरधाव सोडण्याच्या पैजा आणि पडावांत बसून वल्हीं मारण्याच्या पैजा ह्याही तेथें फार आहेत. ह्या खेळांच्या योगेंकरून त्यांस मोठी मौज वाटून अंगांत जोर येतो.



वल्हीं मारण्याची कसरत.



पारध.

इंग्रज लोकांस मृगया ह्मणजे हरिणादिकांची पारध करण्याची फारच आवड व अभ्यास असतो. आपल्या देशीं प्राचीनकाळीं मृगया करण्याचा प्रचात फार होता. सांप्रतकाळीं ही चाल नाहींशी झाली आहे. राजेरजवाड्यांत ती राहिली आहे, परंतु इतर लोकांत मुळींच नाहीं ह्मटलें तरी चिंता नाहीं. याप्रमाणेंच बार व निशाण मारण्याचाही अभ्यास इंग्रज लोक ठेवितात. यामुळें ते लोक "व्हॉलंटीयर" ह्मणजे विनपगारी लोकांच्या फौजेंत लष्करी कवाईत शिकण्यास पुष्कळ जातात. येणेंकरून त्यांच्या देशाचें अणि त्यांचें स्वतांचें मोठें हित होतें. व्यापारी, विद्यार्थी इत्यादिक लोक बंदूक वगैरे लढाईच्या शस्त्रांचा कसा उपयोग करावा हें शिकतात. अशा प्रकारची कसरत प्रसंगीं



बार मारण्याची कसरत.



घोड्यावरून शिकार.



प्रेतसंस्कार.



पक्ष्यांची पारध.



स्वयंपाक घरांत बायको वावरत आहे.



Specially prepared for "Karsanda's Travels in England."

Macinre. Macdonald & Macgregor Lith. London

त्यांस आपलें आणि आपल्या देशाचें संरक्षण करण्यास किती उपयोगी आहे, हें वाचणारांच्या ध्यानांत सहज येईल. अशा गमतींची आणि कसरतींची आवड बाळगणारे लोक विलायतेंत पुष्कळ पाहण्यांत येतात. त्यांच्या मुख्य मुख्य खेळांची आणि कोण जिंकले आणि कोण हरले यांविषयींची हकीकत तेथील वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होते, इतकेंच नाहीं, तर त्यांविषयीं निरनिराळ्या प्रसंगीं मंडळींत गोष्टी सांगण्याचाही प्रघात आहे. व्यापाऱ्या व्यापाऱ्यांची रिकामपणच्या वेळीं गांठ पडली असतां ते व्यापाराविषयीं किंवा कामकाजाविषयीं गोष्टी न सांगतां, असल्या खेळांविषयीं, गमतींविषयीं आणि कसरतींविषयीं भाषण करून अधिक आनंद पावतात. ते लोक कामकाजाविषयीं बोलणें चालणें बहुधा कामकाजाच्या ठिकाणींच करितात. परंतु रिकामपणीं पारधी, पैजा वगैरे मोठ्या खेळांच्या गोष्टी सांगण्याची व ऐकण्याची चाल त्या लोकांत फार आहे.

आपल्या लोकांत शूरत्वाचे खेळ आणि कसरती फारच थोड्या आहेत. असे खेळ आणि कसरती यांचा अभ्यास नसल्यामुळें आमच्या देशांतले लोक इतके दुर्बळ होऊन गेले आहेत कीं आपलें व आपल्या देशाचें रक्षण करण्यास समर्थ असे वीर आजकाळीं आपणांमध्यें फारच थोडे सांपडतील; त्यांत विशेषेंकरून, व्यापारी, विद्यार्थी वगैरे प्रतीच्या एतद्देशीय लोकांमध्यें निशाण मारणारे किंवा पारध करणारे असे आढळणें कठीण आहे. आपल्या देशांत शूरत्वाचे खेळ आणि कसरती वरील प्रतीच्या लोकांत अवश्य चालू करून, मोठ्या वयांत असे खेळ व कसरती करण्याची वृथा लज्जा आहे ती टाकून दिली पाहिजे.

विलायतेंतील लोक बहुधा दिवसांतून चार वेळां खाणें खातात; सकाळीं ब्रेकफस्त ह्मणजे न्यहारी करितात, दोनप्रहरीं लंचन अथवा टि-

फिन करतात, संध्याकाळीं डिनर ह्मणजे भोजन करितात, आणि रात्रीस चहा अथवा काफी घेतेसमयीं कांहीं मेवा मिठाई खातात. या सर्वांत भोजनसमय हा मोठा व मुख्य गणितात. ते समयीं नानाप्रकारचीं पक्वान्नें असतात. एकेका पक्वान्नास त्या लोकांची "डिश" अशी संज्ञा आहे. त्या लोकांची जेवणास बसण्याची आणि जेवणाची रीत मोठी वाखाणण्याजोगी आहे. परंतु ती निराळ्याच प्रकारची आहे. तिजविषयीं मी आठव्या प्रकरणांत लिहीन.

## ९. अभ्यास.

STUDY.



अभ्यास.

विद्यासंबंधी आणि राज्यप्रकरणी विषयांचा अभ्यास ठेवण्याची सवई विलायतेंतील वरील प्रतीच्या लोकांस बहुतकरून फार असते. ह्या सवईमुळें त्यांचें आणि त्यांच्या देशाचें बहुत कल्याण झालें आहे, आणि नित्य होत आहे. अशी सवई एतद्देशीय गृहस्थांस मुळींच नाहीं असें ह्मटलें तरी चिंता नाहीं. आपल्या एथील मध्यम स्थितींतल्या लोकांच्या अभ्यासांत व्यत्यय येतात हें मी कबूल करितों. आपल्या स्त्रिया अशिक्षित असल्यामुळें मध्यम स्थितींतल्या गृहस्थांचा फुरसतीचा बहुतेकवेळ संसारकृत्यांत जाऊन त्यांस अभ्यासास थोडाच राहतो. नित्य बाजारांतून जिन्नस आणणें किंवा आणविणें, आपणांसाठीं आणि घरांतल्या इतर माणसांसाठीं कपडेलत्ते विकत घेणें, शिवविणें, धोब्याकडेस देणें, आणि धुऊन आल्यावर ते मोजून घेऊन ठेवणें, दाणा, तेल, तूप आणणें किंवा आणविणें, घरखर्च लिहिणें, घरांत कोणती वस्तु आहे आणि कोणती नाहीं हें पाहणें वगैरे दरोबस्त संसाराचें काम विलायतेंत स्त्रियांस करावें लागतें; आणि पुरु-

षांस याविषयीं तिळमात्र काळजी करावी लागत नाहीं. तितका वेळ त्यांस अभ्यास करावयास सांपडतो.

यामुळें विलायतेंत मध्यम स्थितींतल्या लोकांस अभ्यासास जसा वेळ मिळतो तसा आपल्या एथील त्याच प्रतीच्या लोकांस मिळत नाहीं, हें माझ्या लक्षांत वागत आहे. तथापि एतद्देशीय श्रीमानांस पुष्कळ वेळ मिळत असून त्यांस अभ्यास करण्याची सवय मुळींच नाहीं, आणि मध्यम स्थितीच्या लोकांस फारच थोडा वेळ मिळतो त्यांलाहीं फारशी नाहीं, ही गोष्ट सर्व कबूल करतील. विलायतेंत मोठ्या वयांत आणि कामकाजांत किंवा संसारखटल्यांत पडल्यावरही विद्यासंबंधी आणि राज्यप्रकरणी विषयांचा अभ्यास,ठेवण्याचा आणि त्यासाठीं वेळ राखून ठेवण्याचा नियम श्रीमान् आणि मध्यम स्थितीच्या गृहस्थांमध्यें बहुधा पाहण्यांत येतो.

विलायतेंत विद्याकलाकौशल्यसंबंधीं कांहीं नवीन शोध झाला असतां त्याविषयीं सदरहू प्रतीचे लोक आपणांस माहिती करून ठेवितात. राज्यप्रकरणी गोष्टीविषयीं कांहीं वादविवाद चालला असला, तर ते त्याविषयीं माहिती ठेवितात. त्यांणीं याप्रमाणें न केलें तर हरएक प्रसंगीं,मंडळींत तत्संबंधी गोष्ट निघाली ह्मणजे त्यांचें अज्ञान दिसून येईल, आणि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्यांची गणना मूर्खांत होईल. सर्वांस बहुधा साधारण विषयांची माहिती ठेविलीच पाहिजे. यासाठीं पुस्तकें व वर्तमानपत्रें वाचण्याचा अभ्यास त्यांस सर्वदा ठेवावा लागतो.

हा तर साधारण विषयांचा अभ्यास झाला. परंतु जे ज्या कामांत पडले असतात ते त्या कामाची माहिती करून घेण्याविषयीं याहूनही अधिक काळजी वाळगतात. ज्याचें मन ज्या विद्येकडे लागतें तो तिच्या व्यासंगांत निमग्न झाला असतो. प्रारब्धवशात् ज्या कुळामध्यें

जो सल्लग्न झाला असतो, त्याला तो धरून राहतो. जे श्रीमान् अथवा पार्लमेंट सभेचे सभासद असतात त्यांचें सर्व लक्ष राज्यप्रकरणाकडेस लागलें असतें. विलायतेमध्यें जे कोणी प्रसिद्ध किंवा नामांकित होण्याची उमेद बाळगतात ते पैशाच्या बळावर बाळगीत नाहींत, तर ज्ञानाच्या बळावर बाळगतात. लोकांमध्यें आपली कीर्ति व्हावी आणि सरकारामध्यें आपणाला मान असावा असें सर्व देशांतल्या लोकांस वाटतें, परंतु ह्या हेतूनें आपल्या देशांतले श्रीमान् लोक सहस्रावधि किंवा लक्षावधि रुपये धर्मार्थ किंवा परोपकारार्थ खर्चून कीर्ति मिळवूं पाहतात, तसें विलायतेंतील लोक करीत नाहींत.

ते धर्मार्थ अणि परोपकारार्थ पैका खर्चीत नाहींत असें माझें ह्मणणें नाहीं. माझ्या बोलण्याचा आशय असा कीं ते बहुधा पैशाच्या जोरावर लौकिक मिळवूं इच्छीत नाहींत. ते राज्यप्रकरणांत किंवा विद्याकलाकौशल्यांत अभ्यासेंकरून प्रवीण होऊन प्रशंसा मिळविण्याची इच्छा बाळगतात. मला असें वाटतें कीं आपल्या देशांत पैसा खर्चून मान खरेदी करणारे शेठ्ये लोक यांस जेव्हां मान मिळेनासा होऊन, स्वताच्या उद्योगानें आणि अभ्यासानें मान मिळवूं इच्छिणारे असतील त्यालांच तो मिळूं लागेल, तेव्हांच एतद्देशीय श्रीमान् लोकांस अभ्यास करण्याची आवश्यकता वाटून या देशाचा ऊर्जित काळ येईल.

## ६ देशाटन.

TRAVELS.

विलायतेंतील श्रीमान् आणि मध्यम स्थितीच्या लोकांस देशाटन करण्याची मोठी आवड आहे इतकेंच नाहीं, तर ज्या गृहस्थानें कोठें पर्यटन केलेलें नाहीं त्याचें ज्ञान अल्प आणि अनुभव थोडा असें समजतात. तेथें पर्यटन हा विद्याभ्यासाचा एक मुख्य आणि अगत्याचा भाग आहे असें समजतात. विलायतेंत विद्याकलाकौशल्याचीं साधनें

परिपूर्ण असतां तेथील लोक देश फिरणें हें इतकें अगत्याचें मानता-त. त्यापक्षीं आमच्या लोकांनीं तें किती अगत्याचें मानिलें पाहिजे हें वाचणारांच्या ध्यानांत सहज येईल.

विलायतेंत श्रीमान् आणि मध्यम प्रतीचे लोक बहुधा उन्हाळ्यांत पर्यटन करावयास निघतात. कितीएक लोक इंग्लंड, स्कॉटलंड आ-णि ऐर्लंड यांतील निरनिराळीं शहरें आणि गांव पाहावयास जातात. कित्येक फ्रान्स, जर्मनी, इताली आदिकरून युरोपखंडांतील देशांमध्यें फिरावयास निघतात. कित्येक अमेरिकेकडे जातात आणि कोणी कोणी शुद्ध देशाटनाच्याच बुद्धीनें आपल्या इकडेसही येतात. मी हें लिहीत असतां, आपल्या देशांत या वर्षी (ह्मणजे सन १८६६ त) दोन प्रख्यात पुरुष पर्यटन करावयास आले आहेत, ते मला आठव-तात. एक आफ्रिका खंडांतील प्रख्यात प्रवासी डाक्तर लिविंग्स्तन आणि दुसरा लार्ड एड्वर्ड सिमोर.

विलायतेंतील श्रीमान् लोक प्रवासास निघतात तेव्हां आपणांब-रोबर पुष्कळ माणसें घेत नाहींत. आपल्या एथील श्रीमान् असें सम-जतात कीं आपणाबरोबर जितकीं अधिक माणसें घेऊन बाहेर पडावें तितका मोठेपणा अधिक दिसतो. अशी लटकी फुशारकी दाखवावी असें विलायतेंतील श्रीमान् लोकांस मुळींच वाटत नाहीं. विलायतें-तील राजे देशाटन करावयास निघतात तेव्हां ते देखील अगत्य अ-सेल त्यांपेक्षां अधिक लोक बरोबर नेत नाहींत. आपल्या देशांतील कोणी सरदार किंवा ठाकूर मुंबईस येतात तेव्हां ते केवढें मोठें खट-लें बरोबर आणितात! येणेंकरून खर्च अधिक होऊन पर्यटनास अड-चण होते. याविषयीं आपले गवर्नर सर बार्ट्ल फ्रीयर यांणीं बेळगांव एथें दरबारांत भाषण केलें ते समयीं जो अभिप्राय दर्शविला तो आ-पल्या देशांतील श्रीमान् लोकांनीं अवश्य ध्यानांत ठेवावा असा आहे.

अहो! आपल्या देशबांधवांस प्रवास करण्याची हौस किती थोडी आहे! स्वदेशांतीलच मोठमोठीं शहरें फिरून ज्ञान आणि अनुभव करून घेण्यांत ते किती मागें आहेत! या देशांत मुख्य मुख्य बंदरीं आगबोट नेहमी जाते येते; आणि सांप्रत आगगाडीही पुष्कळ ठिकाणीं चालू झाली आहे. तर आमच्या लोकांनीं यांचा, होईल तितकें करून, सुखानुभव घ्यावा आणि या देशांतील मुख्य मुख्य शहरीं जाऊन ज्ञान, अनुभव आणि परस्परस्नेहभाव संपादावा, हें योग्य आहे. याशिवाय, आपले लोक सुधारलेल्या देशांत प्रवास करावयास जाणार नाहींत तोंपर्यंत या देशास सुदीन येणार नाहीं. अहो, अशी देशाटनाची अभिरुचि आमच्या श्रीमान् लोकांस केंव्हां उत्पन्न होईल! त्यांत विशेषेंकरून आमचे हिंदु श्रीमान लोक जातीचें भय बाळगून कोठपर्यंत घरांत कोंडले राहणार! याविषयीं त्यांणीं अवश्य विचार केला पाहिजे.

याविषयीं आपले गवर्नर सर बार्ट्ल फ्रीयर यांचा अभिप्राय मी एथें प्रविष्ट करितों. मी विलायतेहून परत आल्यानंतर थोड्या महिन्यांनीं मुंबईच्या यूनिवर्सिटींतून पदव्या देण्याचा समारंभ टौनहॉलांत झाला (तारीख ११ वि एप्रिल सन १८६४). त्या प्रसंगीं गवर्नर साहेबांनीं विलायतेंत प्रवास करण्याविषयीं फार शिफारस केली, तेवढ्यासाठीं या साहेबांच्या भाषणाचा उतारा एथें करण्याची आणि त्याकडेस स्वदेशबांधवांचें लक्ष लावविण्याची मी आज्ञा घेतों.

देशाटनाविषयीं या प्रख्यात गवर्नर साहेबानीं भाषण केलें तें येणेंप्रमाणें.

"This passion for foreign travel has gone on increasing among all the advancing nations of Europe, down to the present day. Among the Under-graduates of our own Universities, there are few destined to hold a high place in acade-

mical honors, who do not habitually either travel as far and as often as their means will allow without serious interruption of their studies, or who look forward to be enabled to travel as one of the best rewards which can follow some temporary pause in the labour of learning. I think we see around us many reasons for hoping that in this respect, there is a movement going on in the awakening intellect of India, which, in fact, has marked the dawn of a new era of civilization in every age of which we have any record. It may be necessary to wait with patience till the prejudices which prevent the gratification of this most natural and wholesome form of education shall be counted among the things of the past; but it would be an insult to the intellect of India at this period, to suppose that many years can elapse before men will think with something like incredulity, that it was ever seriously contemplated to treat as outcastes men who had sought to improve their minds by foreign travel. In this, as in many other respects, the Pârsis have shewn themselves worthy to lead their fellow countrymen, and scores of your fellow townsmen are now living and laboring in England, drinking in, as they walk the streets on their daily avocations, knowledge as valuable in its way as any that they could derive from books, and quite unattainable by any man who never stirs from his own native province. I trust that we shall not long be able to count travellers of other races by units. Every religious and domestic objection which ingenuity could raise has now been dissipated, and the educated youth of this part of India must be well aware, that if they would save themselves from the contempt of their fellow scholars in every other civilized country of the universe, they will talk and think of no other obstacle to foreign travel than such as the benefactions lately made to this University for the benefit of its poorer scholars are intended to remove."

*Speech of H. E. Sir Bartle Frere.*

यांतील सारांश—"देशाटन करण्याची आवड युरोप खंडांतल्या

सुधारलेल्या लोकांमध्यें वाढत गेली ती आजदिवसपर्यंत वाढत आहे. आमच्या (इंग्लिश) यूनिवर्सिटींत जे विद्यार्थी मान पावतात त्यांतील बहुतेक स्वशक्त्यनुसार देशाटन केल्यावांचून राहत नाहींत. आपणास ज्या सुट्या मिळतात त्यांत पर्यटन करावयास मिळालें ह्मणजे त्यांचें सार्थक झालें असें ते समजतात. हिंदुस्थानचे लोक, ज्यांच्या बुद्धि आतां जागृत होत आहेत, त्यांमध्यें या गोष्टीचा आरंभ इतक्यांतच झाला आहे असें ह्मणण्यास पुष्कळ कारणें दिसतात. येणेंकरून या देशास सुदिन प्राप्त होईल असें दिसतें; कारण कोणत्याही काळांत सुधारणुकीस आरंभ होणें तो देशाटनाच्या योगानेंच होतो. याविषयीं लोकांचे दुरभिमान निघून जात तोंपर्यंत थांबणें कदाचित् जरूर असेल; परंतु ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं जे कोणी देशांतरास जातील त्यांस जातिबहिष्कृत करावें असें लोकांच्या मनांत सुद्धां येईनासें होण्यास अद्याप बहुत वर्षें पाहिजेत अशी कल्पना करणें हें हिंदुस्थानच्या हल्लींच्या समंजस लोकांच्या बुद्धीचा उपमर्द केल्यासारखें होईल. या आणि दुसऱ्या अनेक बाबतींत पारशी लोकांनीं पुढारीपणा घेऊन स्वदेशीय लोकांस कित्ता घालून दिला आहे. हल्लीं पुष्कळ पारशी इंग्लडांत राहून उद्योग करीत आहेत, आणि जे कोणी स्वदेश सोडून बाहेर जात नाहींत त्यांला जें ज्ञान कदापि प्राप्त व्हावयाचें नाहीं तें, आणि पुस्तकांपासून होणारें जें ज्ञान तें नित्य रस्त्यानें चालतां चालतां ते मिळवीत आहेत. मी आशा बाळगतों कीं थोड्याच काळांत पारशांशिवाय इतर जातींचे एतद्देशीय लोकही विलायतेस पुष्कळ जाणारे निघतील. घरगुती किंवा धर्मसंबंधी ज्या कांहीं अडचणी होत्या त्या सर्वांचें निवारण झालें; आणि या देशांतील सुशिक्षित तरूणांनीं आतां पक्कें समजावें कीं इतर सुधारलेल्या देशांतील विद्वानांकडून आपला उपहास होऊं नये असें त्यांच्या मनांत असलें तर, त्यांणीं दुसरी कोणती हरकत

न काढतां, ह्या यूनिवर्सिटींतील गरीब विद्यार्थ्यांसाठीं जो धर्मादाय पैसा मिळाला आहे त्याचाच विचार करावा."

## ७. शिक्षण.

EDUCATION.

विलायतेंतील श्रीमान् आणि मध्यम स्थितींतले लोक आपल्या मुलांस शिक्षण देण्यासाठीं फार खर्च करितात. यावरूनच ते विद्येचें रूप चांगलें समजतात



हें आपल्या लक्षांत येईल. विलायतेमध्यें जे लोक गृहस्थांमध्यें मोडतात ते आपल्या मुलांस धर्माच्या शाळेंत पाठविण्याचा विचार कदापि मनांत आणणार नाहींत. ते लोक आपल्या लोकांप्रमाणें आपल्या मुलांच्या विद्येस खर्च करावयाचें सामर्थ्य असतां, धर्माच्या शाळेंत त्यांस पाठवावें अशी इच्छा मुळींच बाळगीत नाहींत. फुकट शिक्षण घ्यावें आणि भीक घ्यावी हें बरोबर असें ते समजतात. कोणापासून अन्नदान किंवा वस्त्रदान घेणें याची जशी लज्जा आहे तशीच विद्यादान घेणें हीही आहे असें माझे देशबांधव केव्हां समजूं लागतील?

विलायतेमध्यें मुलांस लहानपणापासूनच चांगलें शिक्षण मिळतें. कां कीं त्यांच्या माता शिकलेल्या, सुशिक्षित आणि सुज्ञ असतात. आपल्या लोकांप्रमाणें मुलांदेखत दुर्भाषण करण्याची अथवा घाणेरड्या शिव्यागाळी देण्याची चाल त्या लोकांमध्यें मुळींच नाहीं, यामुळें आपल्या मुलांप्रमाणें तेथील मुलांच्या मनांत दुष्ट कामाची आ-



शारीर शिक्षण—तालीमखाना.

णि दुष्ट गोष्टींची कल्पना येतच नाहीं. तीं लहानपणापासून स्वच्छ चापचोप राहावयास शिकतात. हरएक प्रकारें मर्यादेनें व शिष्ट रीतीनें चालण्याविषयीं त्यांस शिक्षा लाविली असते. गृहस्थांचीं मुलें लहानपणापासूनच बसण्याउठण्याची, खाण्यापिण्याची आणि बोलण्याचालण्याची रीत शिकतात. आणि हें विलायतेमध्यें विद्येचें पहिलें आणि अगत्याचें भूषण आहे असें समजतात.

विलायतेंत मुलांस मानसिक शिक्षणाबरोबर शारीर शिक्षणही मिळतें. शरीर प्रफुल्लित झाल्याशिवाय मन प्रफुल्लित होत नाहीं. शरीरशिक्षणावांचून शारीर बळ येत नाहीं. इंग्रज लोक बळकटपणाविषयीं किती प्रसिद्ध आहेत हें सर्वांस ठाऊक असेलच. त्या लोकांस चालणें, धांवणें, उड्या मारणें, घोड्यावर बसणें, पारध करणें, पट्टा खेळणें, ह्या कसरतींचा अभ्यास बहुधा लहानपणापासूनच असतो. खेळतां-



मुलांचा खेळ.




पाठशाळा.



Specially prepared for "Karsanda's Travels in England"

Maclure, Macdonald & Macgregor, Lithrs London

ना कोणी पडलें, कोणी आपटलें, कोणाचें तोंड रंगलें तरच तो खेळ; नाहीं तर तो खेळ कसला! ज्याला एक बुकी खातां येत नाहीं अथवा देतां येत नाहीं तो गांडू, आणि त्याची गणना मुलीं मध्यें.

नुसत्या मानसिक शिक्षणेंकरून शाळेंतील शिक्षण पूर्ण झालें असें नाहीं. पाठशाळेंत अध्ययन करून अनेक गहन गहन विषयांचें ज्ञान प्राप्त करून घेतलें पाहिजे; देशोदेशचे इतिहास वाचले पाहिजेत; भूगोलखगोल शिकलें पाहिजे; संपत्तिशास्त्र, तर्कशास्त्र, भूगर्भशास्त्र, पदार्थविज्ञान, जलशास्त्र, वायुशास्त्र, रसायनशास्त्र, गणितशास्त्र इत्यादिकांचें अध्ययन केलें पाहिजे. आमच्या देशांतील श्रीमान् लोक असें समजतात कीं आमच्या मुलांस इंग्रजी बोलतां चालतां बरोबर आलें ह्मणजे झालें. जलशास्त्र, वायुशास्त्र आणि दगडशास्त्र आह्मांस कशाला पाहिजे? अशा समजुतीचे जे स्वदेशीय श्रीमान् लोक आहेत त्यांला मी एवढेंच सुचविण्याची आज्ञा घेतों कीं विलायतेंतील लोकांचा असा समज मुळींच नाहीं. भाषा ही कांहीं विद्या नव्हे, तर विद्याप्राप्तीचा केवळ मार्ग होय.

विद्याबळ नसून विद्वान् इंग्रजांबरोबर भाषण करावयाचें असल्यास कधीं कधीं फजिती झाल्यावांचून राहणार नाहीं. मूर्ख मनुष्यास वेळीं चांगलें बोलतां येईल, परंतु त्याच्या आंगीं विद्येचें बळ नसल्यानें त्याचें मूर्खत्व भाषणांमध्यें सहज दृष्टोत्पत्तीस येतें. मर्यादेस्तव कोणी त्याच्या तोंडावर त्याला सांगत नाहीं, आणि मी भाषणांत किंवा वादविवादांत काय मूर्खपण केलें हें त्या बिचाऱ्यास कळत नाहीं. विलायतेंत उत्तम विद्या शिकलेले असे श्रीमान् आणि मध्यम प्रतीचे लोक कांहीं थोडेथोडके आहेत असें नाहीं, सहस्रावधि आहेत. जोंपर्यंत आमच्या देशांतील श्रीमानांचीं मुलें अशी श्रेष्ठ प्रकारची विद्या शिकणार नाहींत तोंपर्यंत या देशाचा उदयकाळ येणार नाहीं, हें मी खचित सांगतों.

विलायतेमध्यें कित्येक "बोर्डिंग स्कूल्स" आहेत. ह्या शाळांत मुलें

रात्रंदिवस राहतात. त्यांस तेथेंच खाण्यापिण्यास व निजावयास मिळतें. त्यांस शिकावयास मिळतें आणि तसेंच खेळावयासही मिळतें. तीं आठा दिवसांनीं एकदां आईबापांस भेटावयास जातात, आणि एकरात्र घरीं राहून पुनः शाळेंत येतात. यापासून मोठा लाभ हा होतो कीं तीं आईबापांच्या लाडांपासून दूर राहतात. तेणेंकरून त्यांचें चित्त शिकण्याकडे चांगलें लागतें, आणि तीं बाळपणापासून आपणास जपावयास शिकतात. अशा शाळा आपल्या एथें नाहींत त्या लवकर झाल्या पाहिजेत; कारण त्यांचें फार अगत्य आहे.

याशिवाय हलक्या लोकांच्या मुलांस शिकविण्याच्या पुष्कळ शाळा विलायतेंत आहेत. कितीएक "सण्डे स्कूल्स" नामक शाळा आहेत त्या रविवारीं मजूर लोकांचीं मुलें कामावर जात नाहींत त्यांस शिकविण्यासाठीं स्थापिल्या आहेत. यांशिवाय आणखी "चारिटी स्कूल्स" ह्मणजे धर्माच्या शाळा पुष्कळ आहेत. सुताच्या आणि कापडाच्या कारखान्यांलगत कित्येक शाळा आहेत त्यांत कारखान्यांत काम करणाऱ्या मुलांस तास अर्धतास विद्या शिकविण्यांत येते. अशी एक शाळा मी मांचेस्तराजवळ रॉचडेल एथें पाहिली. कित्येक "रगेड-स्कूल्स" संज्ञक शाळा आहेत. अशा प्रकारची एक शाळा एडिंबरो एथें माझ्या पाहण्यांत आली. याप्रमाणें गरीब निराश्रित मुलांसाठीं अनेक शाळा असतांही, ज्यांला लिहितां वाचतां मुळींच येत नाहीं अशा प्रतीचीं मुलें आणि मोठीं माणसें ही विलायतेंत पुष्कळ सांपडतील. परंतु एवढी गोष्ट खचित आहे कीं आपल्या देशापेक्षां ह्या देशांत विद्येचा प्रसार फारच अधिक झाला आहे आणि होत आहे.

## ८. नीति.

MORALITY.

विलायतेमध्यें नीतीचीं उदाहरणें अशीं सांपडतील कीं तशीं आपल्या देशांत मिळणें कठीण आहे. त्याप्रमाणेंच अनीतीचीं उदाहरणें

ही तेथें अशीं आढळतात कीं तशीं आपल्या एथें क्वचितच दृष्टीस पडतील. तेथें कितीएक असे दयाळू पुरुष आहेत कीं तसे आपल्या देशांत थोडेच सांपडतील. कित्येक असे निर्दय आणि खुनशी स्वभावचे आहेत कीं तसे दुसऱ्या देशांत दृष्टीस पडावयाचे नाहींत. एथें परोपकारबुद्धि, प्रामाणिकपणा, सचोटी, भलेपणा आणि शुद्धाचरण यांविषयीं कित्येक पुरुष असे आढळतात कीं त्यांवरून तद्देशीय नीतीविषयीं कोणाच्याही मनांत फार चांगली कल्पना आल्यावांचून राहणारच नाहीं. बरें, त्याप्रमाणेंच तर्कट, लुचेगिरी, लबाडी, ठकबाजी, व्यभिचार यांत अट्टल अशीं इतकीं मनुष्यें दिसून येतील कीं तीं पाहून अशी अनीति दुसऱ्या कोठेंही नसेल असें आपणांस वाटेल. परंतु इतकें मला खचित वाटतें कीं विलायतेंतील वरील प्रतीच्या लोकांची नीति आपल्या देशांतील वरील प्रतीच्या लोकांच्या नीतीपेक्षां चांगली आहे. त्यांमध्यें अनीतीचा तिटकारा आहे तितका किंवा त्याच्या निमे आपल्या लोकांत नाहीं. आपल्या एथें कोणास "तूं लबाड आहेस" असें ह्मटलें तर बहुतकरून राग येणार नाहीं. विलायतेंत कोणास लबाड ह्मटलें तर तो रक्ताप्रमाणें लाल होईल, आणि आपणास मोठी शिवी दिली असें समजेल.

विलायतेंत अमुक पुरुष तर्कटी व लुचा किंवा दुर्व्यसनी आहे, किंवा अमुक स्त्री वाईट आहे असें एकदां समजलें ह्मणजे त्याला किंवा तिला कोठेंही गृहस्थमंडळींत बोलावणार नाहींत. कोणा मनुष्याजवळ पैसा असला तथापि तो दगलबाज किंवा व्यसनी असला तर कोणीही संभावित गृहस्थ त्याची संगत करणार नाहीं, रस्त्यांत त्याचा सलाम देखील घेणार नाहीं; तो आपल्या घरीं भेटावयास आला असतां त्याला भेटणार नाहीं. कोणा मनुष्यावर तर्कट, चोरी किंवा दुर्व्यसन एकदां शाबूत झालें ह्मणजे तो संसारांतून गेला असें

विलायतेंतील लोक समजतात. येणेंकरून मी कांहीं अनीति किंवा दुराचार केला तर संसारास मुकेन अशी त्या देशांत ज्याला त्याला दहशत असते.

आपल्या देशांत असें कांहींच नाहीं. कित्येक तर तर्कट व लबाडी करून द्रव्यसंचय करणें किंवा कोणा सुंदर कुलीन स्त्रीच्या पातिव्रत्याचा भंग करणें हा मोठा पराक्रम असें समजतात; आणि तो पराक्रम आपल्या मित्रांजवळ मोठ्या फुशारकीनें सांगतात! कित्येक गृहस्थ दिवसा ढवळ्या भररस्त्यावर वेश्यांच्या घरीं जातात. कित्येक गृहस्थ मोठीं तर्कटें करून आणि अनाथ विधवांस रडायास लावून द्रव्यवान् झाले आहेत, असें असतां त्यांच्या द्रव्यावरून लोक त्यांला मान देतात, आणि त्यांचे अवगुण कोणाच्या दृष्टोत्पत्तीस न येतां पैक्याच्या जोरानें दडून जातात.

विलायतेंतील नीति आणि आपल्या देशांतील नीति कसास लावून पाहण्याची ही मोठी कसोटी आहे. ह्या कसोटीवरून विलायतेंतील लोकांच्या नीतीची आणि आपल्या देशांतील लोकांच्या नीतीची परीक्षा सहज होईल. कोणीही अनुभवावरून एवढें सांगेल कीं बहुतेक मनुष्यें ईश्वराच्या भयापेक्षां जनाचें भय अधिक बाळगतात. आपल्या लोकांत अनीतीचा तिरस्कार फार कमी आहे, यावरून ते जनांचें भय फारच थोडें बाळगतात असें होतें, परंतु इंग्रज लोकांत तसें नाहीं. यावरून विलायतेंतील वरील प्रतीच्या लोकांची नीति एकंदरीनें आपल्या एतद्देशीय वरल्या प्रतीच्या लोकांच्या नीतीपेक्षां चांगली आहे.

## ९. धर्म.

RELIGION.

विलायतेंतील लोक ख्रिस्ती धर्म पाळितात हें वाचणारांस ठाऊक असेलच. ख्रिस्ती धर्माचा मूळसिद्धांत हा आहे कीं मनुष्यमात्र

जन्मतःच पापी आहे ह्मणून त्यास कोणी तारणारा पाहिजे. येशू ख्रिस्तानें मनुष्यांस पापांतून मुक्त करण्यासाठीं व तारण्यासाठीं पृथ्वीवर अवतार घेतला. तो ईश्वराचा पुत्र असून त्याणें मनुष्यजातीच्या पापहरणार्थ आपला प्राण दिला, ह्मणून जे त्याच्याच नांवानें परमेश्वरास भजतील आणि पापांची क्षमा मागतील त्यांलाच पापाची क्षमा होईल व त्यांच्याच आत्म्यांचा उद्धार होईल, आणि इतर सर्व मनुष्यें नरकवासास जातील, असें हे लोक मानितात.

या लोकांत धर्मसंबंधी भोळेपणा कमी आहे असें कोणी समजूं नये. सामान्यबुद्धीनें आणि विद्येच्या प्रकाशानें जी गोष्ट सत्य मानवत नाहीं ती गोष्ट मानून तिजवर विश्वास ठेवावा हाच धर्मप्रकरणीं भोळेपणा होय. निराकार परमेश्वरानें पृथ्वीवर मनुष्याच्या पोटीं जन्म घेतला, अथवा आपल्या पुत्रास आपला ईश्वरांश देऊन पृथ्वीवर पाठविलें आणि त्याणें असंभाव्य चमत्कार करून दाखविले; धरणी, आकाश, आणि पर्वत फुटले; आकाशवाणी झाली; वायु, समुद्र त्याच्या आज्ञेंत राहिले; केवळ त्याच्या हाताच्या स्पर्शेकरून रोग्यांचे रोग गेले आणि मेलेलीं जिवंत होऊन उभीं राहिलीं, इत्यादि गोष्टी, ज्या साधारण बुद्धीला विद्येच्या प्रकाशानें असंभाव्यशा दिसतात त्या मानाव्या हाच धर्मसंबंधीं भोळेपणा होय.

या लोकांचें धर्मपुस्तक "बैबल" हें आहे. हें ईश्वरप्रणीत (Divine Revelation.) आहे असें ते मानितात. बैबलाचे दोन मुख्य भाग आहेत; त्यांतून एकास नवा आणि दुसऱ्यास जुना भाग ह्मणतात. जुना भाग मोठा असून तो अस्सल हीब्रू भाषेंत लिहिला आहे. नवा भाग ख्रिस्त झाल्यानंतरचा आहे. तो फार लहान असून अस्सल युनानी भाषेंत लिहिला आहे. बैबलाचें भाषांतर हल्लीं बहुतकरून सर्व भाषांत झालें आहे. प्राकृत भाषांत तर तें आहेच, परंतु संस्कृतांत

देखील झालें आहे. बैबलाची आणि ख्रिस्ताची मूळउत्पत्ति यहुदी लोकांत झाली, परंतु ते यहुदी लोक बैबलाचा जुना भाग मात्र मानितात, नवा भाग व ख्रिस्त यांस मानीत नाहींत. ते असें ह्मणतात कीं खरा ख्रिस्त अजून यावयाचा आहे.

बैबलांत लिहिलेल्या गोष्टी, विषय आणि विधि यांचा निरनिराळे लोक निरनिराळा अर्थ करितात. यामुळें अपल्या देशांतल्याप्रमाणेंच विलायतेंत अनेक मतभेद पडून पुष्कळ पंथ झाले आहेत; या निरनिराळ्या पंथांचे लोक एकमेकांस असें ह्मणतात कीं तुह्मी ह्मणतां तें खोटें आणि आह्मी ह्मणतों हेंच खरें. ह्यांत कोणाचें खरें आणि कोणाचें खोटें ह्मणावें यासारखें कठीण काम दुसरें कोणतेंच नाहीं.

ख्रिस्ती धर्मांत दोन मोठे मुख्य पंथ आहेत. त्यांचे आणखी हजारों पोटभेद झाले आहेत. हे दोन मोठे मुख्य पंथ कोणते ते वाचणारांस माहीत असतीलच. एक "रोमन क्याथलिक" आणि दुसरा "प्रॉतेस्तंत." प्रॉतेस्तंत हा सुधारलेला पंथ होय. इंग्लंडाची राणी आणि बहुतेक लोक या सुधारलेल्या पंथाचे आहेत. ख्रिस्ती धर्मांत ही मोठी सुधारणा होऊन सुमारें तीनशें वर्षें झालीं. त्यापूर्वी रूम एथील पोपाची सत्ता अविच्छिन्न होती; त्या सत्तेबरोबर जुलूमही फार होता. या जुलमाबरोबर जर्मनी देशांतील लूथर याणें पहिल्यानें धैर्य करून टक्कर मारली. नंतर ख्रिस्ती धर्मांत पहिली मुख्य सुधारणा होऊन, रोमन क्याथलिक आणि प्रॉतेस्तंत असे दोन मोठे पक्ष पडले.

रोमन क्याथलिक पंथानुसारी लोक अधिक देवभोळे आहेत. ते असें मानितात कीं एक बैबल ईश्वरप्रणीत आहे इतकेंच नाहीं, तर ज्या कित्येक गोष्टी व कृत्यें पुष्कळ वर्षें धर्माबरोबर चालत आलीं आहेत त्यांलाही अनुसरलें पाहिजे. ते असें ह्मणतात कीं पृथ्वीवर होऊन गेलेल्या साधुसंतांस देखील भजावें, कारण ते आपणांविषयीं ईश्वराज-

वळ प्रार्थना करतील तरच आपलें कल्याण होईल. ते आणखी असें ह्मणतात कीं लातिन हीच भाषा पवित्र आहे. हिजशिवाय इतर कोणत्याही भाषेंत बैबल वाचणें किंवा प्रार्थना करणें हें व्यर्थ आहे. ते आणखी असें मानितात कीं मनुष्यानें धर्मगुरूपाशीं आपले दोष कबूल केले तर त्याला पापाची क्षमा होईल. याप्रमाणेंच मरणसमयीं मनुष्यदेहास पवित्र पदार्थांचा स्पर्श झाला असतां तेणेंकरूनही त्याचें पाप परिहार पावून त्यास मुक्ति मिळते.

या रोमन क्याथलिक मताचे धर्मगुरु लहान बाळकांस धर्मसंस्कार (Baptism) करितात, तो येणेंप्रमाणें; "बाळकास देवळांत घेऊन गेलें ह्मणजे धर्मगुरू त्याच्या तोंडावर तीन वेळां फुंक मारितो आणि कांहीं मंत्र ह्मणतो, तो एवढ्यासांठीं कीं त्याच्या शरीरांत कांहीं भूतवारें असलें तर तें निघून जावें. त्यानंतर त्या आकृतीची प्रतिमा जिला ते लोक 'क्रॉस' (ह्मणजे क्रूस) ह्मणतात ती घेऊन त्याच्या हृदयास व कपाळास लावितो. नंतर तो मिठाची भुकी त्या बाळकाच्या तोंडांत घालितो आणि ह्मणतो 'शहाणपणाचें मीठ ग्रहण कर'. नंतर त्याच्या नाकाकानांस आपली थुंकी लावितो. इतकें झाल्यावर त्याच्या हृदयास पवित्र तेल व त्यानंतर तीन वेळां पवित्र पाणी लावितो."*

रोमन क्याथलिक देवळांत ख्रिस्त आणि त्याची "कुमारी माता" मेरी यांच्या मूर्ती असतात. या मूर्तिनीं, आणि आंत भक्ति व विधि होतात तेणेंकरून देवळाच्या थाटास फार शोभा येते. या देवळांतील पुजारी यांस अविवाहित राहावें लागतें. ते लग्न करून प्रपंचाच्या खटल्यांत पडले असतां देवसेवेंत त्यांजकडून अंतर पडेल, ह्मणून त्यांस लग्न करण्याविषयीं प्रतिबंध आहे. देवळांत मेणवाती व धूप जळत असतो व दरवाज्यावर "पवित्रोदक" देण्यांत येतें.

* Chambers' Religious Churches and Sects.

अर्ध्या अधिक युरोपांत रोमनक्याथलिक धर्म चालतो. ह्या धर्मा च्या लोकांवर इताली देशांतील रूम एथील पोपाची सत्ता फार आहे पूर्वी या पोपाची सत्ता युरोप खंडांतील सर्व राजांवर चालत असे. को णी विपरीत वागले असतां तो मोठी शिक्षा करीत असे. तो मोठमो ठ्या राजांस दूरदूरच्या देशांहून आपणांजवळ बोलावून आणीत असे तो त्यांजकडून त्यांच्या अपराधांस्तव उपोषणें करवी, त्यांस दंड करी त्यांची फजिती करून रस्त्यांतून त्यांला अनवाणी चालवी, अथवा रस्त्यांत आपल्या घोड्याची लगाम त्यांकडून धरवी. याप्रमाणे पोपाची सत्ता मनस्वी होती ती आतां कमी झाली.

इंग्लंडांतील बहुतेक लोक प्रॉतेस्तंत मताचे आहेत. प्रॉतेस्तंत धर्मांत मूर्तिपूजा नाहीं आणि विधि फार थोडे आहेत. हे लोक बैबला त सांगितलें नाहीं तें मानीत नाहींत, आणि रूमच्या पोपाचा अधि कार अगदींच कबूल करीत नाहींत. या धर्माच्या लोकांची संख्या वा ढत चालली आहे. परंतु रोमनक्याथलिक लोकांच्या संख्येपुढें या लोकांच्या संख्येची गणति फारशी नाहीं. ह्या सुधारलेल्या धर्मांतही पुष्कळ मतभेद होऊं लागले, तेव्हां इंग्लंडच्या राजानें एका स्थाप लेल्या मताप्रमाणें चालावें असा ठराव झाला. या ठरावाचीं एकुण तीस कलमें आहेत. त्याप्रमाणें इंग्लंडचा राजा न चालेल तर त्या च्यानें गादीवर बसवत नाहीं. ह्या मतास "एस्ताब्लिश्ड चर्च-आव इंग्लंड-आण्ड-ऐर्लंड" असें ह्मणतात. ख्रिस्ती धर्मांतील कितीएक पंथांची नांवनिशी एथें लिहितों† :—

| | |
|---|---|
| एस्ता० चर्च आव इंग्लंड. | वेहेमिनिस्तस. |
| एपिस्कोपल चर्च आव स्कॉटलंड. | बारोलिस्तस. |
| फ्रीचर्च आव स्काटलंड. | कामेरोनाइटस. |

† "The Denominational Reason Why."

सिसीडर्स.
 बर्घर्स.
 आन्तिबर्घर्स.
प्यूरिटन्स.
 प्रेस्बिटेरियन्स.
 युनैटेड प्रेस्बिटेरियन्स.
 रीफार्म्ड प्रेस्बिटेरियन्स.
 इण्डिपेण्डण्ट्स.
 बापतिस्त्स.
 फ्रीविल बापतिस्त्स.
 स्काट बापतिस्त्स.
 ओल्ड स्कूल बापतिस्त्स.
बेरियन्स.
युनिटेरियन्स.
सोसायटी-आव-फ्रेण्ड्स.
मेथोडिस्त्स.
 वेस्लियन्स.
 काल्विनिस्तस.
काएतिस्त्स.
रिगोरिस्त्स.
सब-टेरियन्स.
साण्डिमेनियन्स.
सौथ-कॉटर्स
क्रिस्पाइट्स.
डिस्त्रक्षनिस्त्स.
ग्लासाइट्स.
नॉस्तिक्स.
हल्,डनाइट्स.
हाप्किन्सोनियन्स.
हस्सेआइट्स.
हटिंग्टोनियन्स.
इन्धमाइट्स.
इर्विंगाइट्स.
जान्सेनिस्त्स.
जेसूइत्स.
जोन्सोनियन्स.
जंपर्स.
मोरेवियन्स.
मॉर्मन्स.
मॉरिसोनियन्स.
पंकर्स किंवा टंकर्स.
 स्वीडन बोर्ज्यन्स.
 स्वॉडलर्स.
 शेकर्स.
 सेक्रेड सोडालाइट्स.
 प्लिमथ ब्रेद्रेन.

ह्या सर्व पंथांमध्यें "सोसायटी-आव-फ्रेण्ड्स" या पंथाचें मत फारच भिन्न व कित्येक प्रकारें जाणण्यासारखें आहे, ह्मणून त्या मताचा ता-

रांश मी एथें थोडक्यांत सांगतों. ह्या पंथाच्या लोकांस "क्केकर" असेंही ह्मणतात. त्यांचें मत खालीं लिहिल्याप्रमाणें आहे:—

(१) शपथ कधीं घेऊं नये, कोडतांत किंवा कोणत्याही ठिकाणीं बैबलावर शपथ घेऊं नये. (२) लग्नविधि किंवा धर्मसंबंधी दुसरा कोणताही विधि करण्याची गरज नाहीं. (३) कोणी कितीही मोठा असला तरी त्यास "तुह्मी" ह्मणूं नये, "तूं"च ह्मणावें. (४) कोणीही मोठा आचार्य किंवा राजा किंवा गवर्नर किंवा कोणी पुरुष असला तरी त्यास "युअर होलिनेस" अथवा "युअर माजेस्ती" अथवा "युअर एक्सेलन्सी" इत्यादि बहुमानाचीं वचनें लावूं नयेत. (५) मंडळींत किंवा चौघांत टोपी काढूं नये. (६) होईल तितका साधा पोशाक करावा. (७) मेल्याचें दुःख धरूं नये. (८) देवळांत प्रार्थना करण्यास लोकांस बोलावण्यासाठीं घांट वाजवूं नये. (९) मुलांस नांव ठेवण्यास देवळांत नेऊं नये. (१०) कधीं वैर धरूं नये आणि कोणाबरोबर लढाई करूं नये.

एथें स्थलसंकोचामुळें इतर पंथांचीं निरनिराळीं मतें सांगतां येत नाहींत. "युनिटेरियन" पंथाच्या लोकांस बहुतेक ख्रिस्ती लोक नास्तिक ह्मणतात, कारण ख्रिस्ताच्या ठायीं ईश्वरत्व होतें असें ते ह्मणत नाहींत. हे लोक बैबल मानितात तथापि ते एकच ईश्वर मानणारे होत. त्यांच्या मतांत आणि इतर ख्रिस्ती लोकांच्या मतांत फार अंतर आहे. मॉर्मन लोकांचा पंथ हा फारच अलीकडला आहे. या पंथाची उत्पत्ति सन १८०९ चांत अमेरिकेमध्यें झाली. ह्याचा प्रवर्तक जोसेफ स्मिथ ह्यास ईश्वरानें स्वप्नांत येऊन असें सांगितलें कीं तूं नवा पंथ स्थापून त्याचें धर्मपुस्तक शोधून काढ. असें सांगतात कीं जुनीं अक्षरें लिहिलेले सोन्याचे पत्रे त्याच्या हातीं लागले. असल्या ह्या भोंदूस मानणारेही लोक निघाले, आणि इंग्लंडांत त्याचा पंथ पाळण्यास लोक मिळाले. ते ख्रिस्तास मानतात, परंतु असें ह्मणतात कीं जोसे-

क स्मिथ हा आमचा पैगंबर होय, आणि ख्रिस्त पुनः येऊन आह्मांवर एक हजार वर्षें राज्य करील. ते अनेक स्त्रिया करण्यास कांहीं हरकत मानीत नाहींत.

ख्रिस्ती धर्मांत याप्रमाणें अनेक मतें व पंथ झाल्यामुळें विलायतेंतील लोकांची धर्मसंबंधीं स्थिति दुर्बळ झाल्यासारखी दिसते खरी, परंतु त्यांच्या स्थितीची आपल्या देशांतील लोकांच्या धर्मसंबंधी स्थितीशीं तुळणा करून पाहिली असतां ती फार चांगली अशी दिसते. ती कोणत्या रीतीनें चांगली तें मी सांगतों. आपल्या देशांतल्या प्रमाणें धर्माचें भोळेपण विलायतेंत नाहीं. आपल्या देशामध्यें रस्त्यांत एक दगड पडलेला असला आणि त्यास कोणी शेंदूर किंवा कुंकूं लावलें ह्मणजे पुष्कळ लोक त्याला देव मानूं लागतात. हाय हाय! असे दगडाचे देव आमच्या देशांत किती झाले आहेत !!

दुसरें असें कीं आमचे देशबंधु स्वधर्माविषयीं अज्ञान असतात तसे विलायतेंतील वरील प्रतीचे लोक असत नाहींत. आपल्या एथील वरील प्रतीच्या लोकांस कोणकोणतीं धर्म पुस्तकें आहेत आणि त्यांत काय काय लिहिलें आहे असें कोणी विचारलें असतां त्यांस त्यांविषयीं कांहीं माहीत नाहीं असें दिसून येईल. टिळेपट्टे करावे, देवदर्शनास जावें आणि लोकांस दाखविण्या साठीं बाहेरून सोवळ्यांचा डौल करावा, हाच "धर्म" होऊन राहिला आहे. आपल्या एथील "धर्माची" अशी दशा होऊन राहिली आहे. विलायतेंतील धर्माची स्थिति निःसंशय याहून चांगली आहे.

आणखी विलायतेंत धर्मगुरु धर्मपर व नीतिपर कसा उपदेश करितात! आणि लोक तो ऐकून गंभीरपणानें व एकचित्तानें कशी प्रार्थना करितात! आपल्या देशांत यासारखें कांहींच नाहीं. दगडाच्या मूर्तींच्या दर्शनास तोंडानें "जयजय" ह्मणत धांवत जावें आणि हा-

त जोडून त्यांचें दर्शन करावें हीच ईश्वराची भक्ति आणि प्रार्थना झा-ली आहे. अशा धर्माच्या स्थितीची आणि विलायतेंतील धर्माच्या स्थितीची तुळणा करावी हेंच मुळीं नीट दिसत नाहीं. सर्व धर्मांत ख्रिस्ती धर्म हा ईश्वरप्रणीत आहे असें मी ह्मणत नाहीं, परंतु एवढें हें मी खचित मानितों कीं या धर्मांची स्थिति आपल्या धर्माच्या स्थि-तीपेक्षां फार चांगली आहे.

ख्रिस्ती धर्माचा मुख्य सिद्धांत हाच आहे कीं आपण मनुष्यमा-त्रास बांधवांप्रमाणें समजून शत्रूचेंही कल्याण चिंतावें. खरे ख्रिस्ती आहेत ते या सिद्धांताप्रमाणें वागून मनुष्यजातीचें कल्याण करण्या-स आपलें तन, मन, धन सर्व वेंचितात. विलायतेंत जे खरे ख्रिस्ती आहेत आणि ज्यांस आमच्या देशाविषयीं माहिती आहे ते या देशा-च्या कल्याणाविषयीं जसे श्रम करितात तसे श्रम करणारे थोडेच सांपडतील, हें मी प्रत्यक्ष अनुभवावरून सांगतों.

## १०. धंदे व पदवीभेद.

OCCUPATION; DISTINCTION OF RANKS.

आपले वाडवडील जो धंदा करीत आले तोच आपण करावा दुसरा करूं नये, असें विलायतेंतील लोक समजत नाहींत. जो धंदा ज्यांस आवडतो व सोईचा पडतो तो ते करितात. "माझा बाप सुता-राचें काम करितो तर मलाही तेंच केलें पाहिजे," अथवा "माझ्या बा-पानें गांध्याचें दुकान घातलें आहे तर मी दुसरें काम कसें करूं?" ही वेडी समजूत त्या लोकांमध्यें नाहीं. ज्या धंद्याकडे बाळपणापासून क-ल असतो तो केल्यानें जसा फायदा होतो तसा वडिलांच्या धंद्यास चिकटून राहिल्यानें होत नाहीं हें ते लोक जाणतात.

आपल्या वडिलांचा धंदा सोडून आपल्या मनाच्या कलाप्रमाणें नवाच धंदा पतकरल्याचीं शेकडों उदाहरणें विलायतेंत सांपडतील. ज्यांणीं असें केलें ते मोठ्या योग्यतेस चढले. रिचर्ड आर्कराइट मु-

चा नहाव्याचा धंदा करीत असे त्याणें सूत काढण्याचें यंत्र शोधून काढलें, आणि "सर" हा किताब मिळविला. ऐझाक न्यूटन हा धनगराचा मुलगा होता, त्याणेंही मोठे शोध करून "सर" ही पदवी संपादिली. शेकस्पीयर हा पिंजारी असून ह्याचा बाप खाटीक होता, परंतु हा मोठा सर्वोत्कृष्ट कवि झाला. कूक हा मजूर असून मोठा नौकागमनवेत्ता झाला. कार्डिनलवुल्सी हा कसायाचा मुलगा होता तो मोठा प्रधान झाला. असे दृष्टांत दहावीस नव्हत, पण शेंकडो सांपडतील.

आपल्या देशांत कदाचित् पुरातन काळीं घडलेलीं अशीं उदाहरणें सांपडतील. वाल्मीक मुळचा भिल्ल होता तो मोठा ऋषि झाला. व्यास हा कोळी होता. वसिष्ठ वेश्यापुत्र असून मोठा ऋषि आणि रामचंद्राचा गुरु झाला. विश्वामित्र क्षत्रिय असून ब्राह्मणापेक्षां अधिक श्रेष्ठत्व पावला. परंतु असे दाखले आतां मिळणें कठीण आहे. आफ्रिकेंत पर्यटन करणारा डाक्तर लिविंग्स्तन प्रथम कोष्टी होता. हल्लींचा प्रख्यात विद्यागुरू प्रोफेसर फारडे हा अगोदर लोहार होता. मी विलायतेंत असतां हिंदुस्थानच्या सनदी चाकरीची (सिविलसर्विसची) परीक्षा ऐशीं उमेदवारांची उतरली होती, त्यांपैकीं अकरा असामी भटारी, चांभार वगैरे हलक्या प्रतीच्या लोकांचे मुलगे होते.

हल्लीं आपल्या देशांत वडिलांचा धंदा सोडून दुसरा करण्यांत मोठी लाज आहे असें लोकांस वाटतें. कोणा हजामास तूं परटाचा धंदा कर ह्मटलें, तर त्यास राग येईल आणि तसेंच परटास नहाव्याचा धंदा कर ह्मणून सांगितलें तर त्यासही राग येईल. कोणा सोनारास लोहार कामाचा मोठा कारखाना घाल ह्मटलें तर तो ह्मणेल "काय, मी सोनार असून लोहाराचें काम करूं!" मी एका घोडेवाल्यास घोड्याची चाकरी सोडून दुसरी कर असें ह्मटलें, तेव्हां तो ह्मणाला मी तसें केलें तर मला जातींतून बाहेर घालवितील!

कोणाची बुद्धि एका कामांत चालते, कोणाची दुसऱ्या कामांत चालते. यास्तव वडिलांचेंच काम करावें अशा समजुतीपासून आमच्या लोकांचें मोठें अनहित होतें. विलायतेंतील कोणा व्यापाऱ्यास वाटलें कीं लोहारकामाचा मोठा कारखाना काढला असतां मला मोठा लाभ होईल, तर लोहाराचें काम करण्यास त्याला लाज वाटणार नाहीं. जो धंदा केल्यानें फायदा होईल तो धंदा करण्यास मागें सरूं नये, मग तो कोणत्याही प्रकारचा असो. चोरी, लुच्चेगिरी, दगलबाजी करण्यांत मात्र लज्जा आहे; परंतु कोणताही धंदा प्रमाणिकपणें करण्यांत कांहीं लाज नाहीं असें ते लोक समजतात.

हलक्या उंच्या धंद्यांवरून हलक्या उंच्या पदव्या होतात. हलक्या उंच्या पदव्यांवरून विलायतेंत पदवीभेद करण्यांत येतो. हलक्या पदवीच्या मनुष्याबरोबर बसून जेवणें किंवा त्याला जवळ बसविणें हें ते लोक हलकें असें समजतात. असें आहे तरी हलक्या प्रतीचा कोणी पुरुष कांहीं मोठें कृत्य करून लौकिकास चढला असतां त्याजबरोबर बसणें उठणें किंवा व्यवहार करणें हें ते हलकें समजत नाहींत. असें झाल्यावर तो कोणत्याही जातीचा असला तरी त्याबरोबर व्यवहार ठेवण्यास लोक अधिकच चाहतात.

यावरून वाचणाऱ्यांच्या ध्यानांत येईल कीं विलायतेंत पदवीभेद आहे, परंतु जातिभेद नाहीं. एकमेकांच्या हातचें खाण्यापिण्यांत विटाळ आहे असें ते लोक मानीत नाहींत. कोणत्याही जातीच्या मनुष्याच्या हातचें अन्न खाल्लें तरी बाटण्याची लटकी भीति ते बाळगीत नाहींत. यामुळें ते लोक बहुत सुख पावतात. ह्मणून त्यांस थोड्याशा मनुष्यांच्या दाबांत किंवा दास्यांत राहावें लागत नाहीं. जोंपर्यंत आपल्या लोकांच्या ठायीं स्वतंत्रता येणार नाहीं, तोंपर्यंत हा देश जातिबंधनांतून मुक्त होणार नाहीं. अहो, ज्याला स्वतंत्रता नाहीं




पांव बिस्कुटें विकणारा.

त्याणें ह्या पृथ्वीवर व्यर्थ जन्म घेतला असें आपले लोक केव्हां समजूं लागतील!

आपल्या देशांत जातिबंधनामुळें सुधारणुकीचीं मोठमोठीं कामें अडकून राहिलीं आहेत. जेव्हां एकाद्या मोठ्या झपाट्यामुळें जातिबंधनें तुटतील तेव्हां सुधारणुकीचे सर्व मार्ग मोकळे होतील. सूक्ष्म दृष्टीनें पाहतां असें दिसून येईल कीं जातिभेदाचा मूळपाया तर ढळून गेलाच आहे, आणि ह्या देशांत आगगाडी झाल्यामुळें तो फार ढासळूं लागला आहे. परंतु हा ढासळलेला पाया आपल्या जाड मुळांसकट उपटेल तेव्हांच या देशाचा ऊर्जितकाळ येईल.

## ११. हलक्या प्रतीचे लोक.

LOWER ORDERS OF THE PEOPLE.

फुटकळ माल विकणारे, दुकानदार व फेरीवाले, चाकर व गाडीवान, मजूर व रस्त्यानें भटकणारे वगैरे हे हलक्या प्रतीचे लोक हो-

त. अशा प्रतीचे लोक सर्व देशांत असतात त्याप्रमाणेंच विलायतें-तही पुष्कळ आहेत. असे लोक जगांतील व्यवहारास फारच कामाचे व उपयोगी आहेत, ह्मणून कोणत्याही देशांत श्रीमान् आणि मध्यम प्रतीच्या लोकांपेक्षां यांचा भरणा अधिक असला पाहिजे; यासाठींच ईश्वरानें सर्व ठिकाणीं ते अधिक ठेविले आहेत.

इंग्लंड देश सुखी असल्यामुळें या लोकांची स्थिति आपल्या दे-शांतील अशा प्रकारच्या लोकांच्या स्थितीपेक्षां कांहीं प्रकारें चांगली आहे. ह्या हलक्या प्रतीच्या निरनिराळ्या लोकांची आणि आपल्या देशांतील तसल्याच निरनिराळ्या लोकांची तुळणा करून पाहिली तर, बहुत अंतर दृष्टीस पडेल. आपल्या एथें कोणी दुकानदार, फे-रीवाले, चाकर, गाडीवान, मजूर, व रस्त्यानें भटकणारे वगैरे हलक्या प्रतीचे लोक दिसण्यांत जसे कंगाल दिसतात तसे विलायतेंत त्याच प्रतीचे लोक बहुतकरून दिसत नाहींत.

आपल्या एथील दुकानदार किंवा फेरीवाला याच्या पेक्षां विलायतें-तील दुकानदराचीं किंवा फेरीवाल्याचीं वस्त्रें, खाणेंपिणें आणि स्थि-ति बहुत चांगली असते. आपल्या एथील मजूर, हेलकरी व भिकारी हे लोक नुसती लंगोटी लावून उघडेबाघडे कामावर जातात येतात, आणि वेळीं चणेकुरमुरे खाऊन निर्वाह करितात. परंतु विलायतेंत असें आपल्या पाहण्यांत येणार नाहीं. तेथील गरीब मजूर किंवा भि-कारी लोक यांच्या आंगावर देखील वस्त्रें असून सर्व शरीर झांकलें अ-सतें. तीं वस्त्रें विरळ खादीचीं नसतात, तर जाड ऊबदार असतात. तसेच त्यांचे खाण्याचे पदार्थही पौष्टिक असले पाहिजेत.

अशा प्रकारच्या लोकांस तेथील हवा थंड असल्यामुळें याप्रमाणें सर्व शरीर झांकण्याचें अगत्य पडतें, ही गोष्ट खरी आहे; परंतु हेंही विसरतां कामा नये कीं विक्रम राजाच्या काळीं विलायतेंतील लोक अ-गदीं जंगली अवस्थेंत असतां, त्यांस लंगोटीस देखील वस्त्र मिळत नसे, आणि ते रंग लावून शरीराचे गुह्य अवयव झांकीत असत. त्या काळीं वि-लायतची हवा कांहीं निराळी होती असें नाहीं. ह्यावरून असें सि-

द्ध होतें कीं विलायतेंतील गरीब लोक आपलीं सर्व शरीरें वस्त्रांनीं झांकतात हें या देशाच्या चढत्या कळेचें मोठें लक्षण होय.

विलायतेंतील निरनिराळे धंदे करणारे लोक कसे दिसतात हें जाणण्याची वाचणारांस इच्छा असेल. मी विलायतेहून जाऊन आल्यानंतर मला माझ्या कित्येक देशबांधवांनीं विचारिलें कीं विलायतेंत सर्व प्रकारचे हलके लोक सुद्धां गोरेच आहेत काय? मी ह्मटलें, होय. तेथें सर्व लोक गोऱ्या चामडीचे आहेत. उंच नीच प्रतीप्रमाणें त्यांच्या रूपांत आणि तोंडवळ्यांत फरक असतो. मी वर सांगितलेंच आहे कीं विलायतेंत कोणी वस्त्ररहित दृष्टीस पडावयाचें नाहीं, त्याप्रमाणेंच अनवाणीही थोडेच सांपडतील. कित्येक उदमी लोकांचीं फोटोग्राफावरून काढलेलीं चित्रें एथें दाखवितों, त्यांवरून त्यांचें स्वरूप आणि स्थिति वाचणारांच्या लक्षांत येईल.

विलायतेंत गरीब निराश्रित भिकाऱ्यांसाठीं फार चांगली तजवीज केलेली पाहण्यांत येते. आपल्या देशांत रस्तोरस्तीं व दारोदार भिकारी फिरत असतात त्याप्रमाणें भीक मागणारे कोणी कोणी लोक तेथें रस्त्यांत दृष्टीस पडतात, परंतु ते कांहींतरी मेहनत करणारे भिकारी असतात. रस्त्यानें आपण चाललों असतां कांहीं मिळण्याच्या आशेनें रस्ता झाडणारा पोरगा आपणाजवळ येतो. कोणी आगीच्या काड्या वगैरे कांहीं हलका जिन्नस विकून भीक मागतात. कित्येक आंधळे भिकारी कांहीं विकण्याचा जिन्नस गळ्यांत बांधून बरोबर कुत्रा घेऊन फिरतात. कित्येक हातांत कांहीं विकण्याची चीज व कुबडी घेऊन चालतात आणि “I was Born Cripple” ह्मणजे मी जन्मापासून पंगू आहें असें एका पाटीवर लिहून ती गळ्यांत बांधून फिरत असतात. कित्येक भिकारी वाद्यांची पेटी गळ्यांत घालून लोकांच्या दारापुढें उभे राहून वाजवितात. याप्रमाणें वाद्य वाजवून पोट भरणाऱ्या भिकाऱ्यांची संख्या मोठी आहे असें वाटतें. वाद्यें करून मनुष्याचें मन रंजतें, आणि असल्या भिकाऱ्यांस देतांना पुष्कळ लोकांचीं मनें न दचकतां संतोष पावतात.




कंदमूळ व भाजी विकणारा.

"Here Pertaters! Kearots and Turnups! fine Brockello-o-o!"




शिजलेलीं बटाटीं विकणारा.
"Baked 'taturs! All'ot, all'ot!"




नारिंगें विकणारी.

"Sweet Chany. Two a Pinny Orr-r-ranges—two a Pinny !"




कालवे विकणारा.

"Penny a lot, Oysters! Penny a lot!"




गवतकाडी विकणारा.



कुत्र्याच्या गळ्यांत बांधावयाचे पट्टे विकणारा.



झारेकरी.

"Dust Hoi! Dust Hoi!"



हाडें गोळा करणारा.



बुटांत घालावयाची फीत विकणारा आंधळा भिकारी.



रस्ता झाडून भीक मागणारे पोरगे.

अशा रीतीनें भीक मागणारे कित्येक ठिकाणीं दृष्टीस पडतात, परंतु केवळ भीक मागण्यासाठींच सरकार कोणास रस्त्यांत फिरूं देत नाहीं. जीं जन्मापासून काम करण्यास असमर्थ असतील किंवा ज्यांस उद्योग मिळत नसेल अशा गरीब निराश्रित मनुष्यांचें, त्यांच्या गांवच्या लोकांनीं आपापसांत पैसा जमवून, पोषण करावें असा कायदा पुष्कळ वर्षें झालीं सरकारानें केला आहे. ह्या वर्गणीस Poor rates ह्मणजे

गरिबांचा कर असें ह्मणतात. गरीब निराश्रित लोकांसाठीं गांवोगांव आणि शहरोशहर धर्माच्या उद्योगशाळा (Work-Houses) स्थापिल्या आहेत. त्यांचा खर्च ह्याच पैशांतून चालतो. यांत अशी तजवीज केली आहे कीं ज्यांस काम करण्याची शक्ति असेल त्यांजकडून काम करवावें.

विलायतेंत अशी व्यवस्था असल्यामुळें, आळस कमी झाला आहे. ज्यांस ईश्वरानें हात पाय दिले आहेत आणि जे उद्योग करण्यास समर्थ आसतां भीक मागून इतरांवर ओझें घालतात आणि चाकरी किंवा उपयुक्त श्रम कांहीं करीत नाहींत, अशा लोकांस देण्यांत कांहीं धर्म नाहीं. अशा लोकांस दिल्यानें देशांत आळसाची वृद्धि होऊन उद्योग कमी होतो. आपल्या देशांत खऱ्या निराश्रित लोकांसाठीं योग्य तजवीज केलेली नसल्यामुळें, निरुद्योग्यांस, भीक मागून उद्योगी लोकांच्या शिरावर ओझें होऊन राहावयास उत्तेजन मिळतें.

आपल्या एथें ब्राह्मण तर बहुधा असें समजतात कीं भिक्षा मागावी आणि दान घ्यावें हा आमचा धर्म व धंदा आहे. अशा समजुतीमुळें पुष्कळ ब्राह्मण लहानपणापासून खरा उद्योग सोडून देऊन, भिक्षा मागावयास लागतात. अशा समजुतीचे बावा, बैरागी, जोगी, जती आणि तसेच मुसलमान फकीर पुष्कळ सांपडतील. स्वकष्टानें आंगांतून घाम काढून पोट भरण्याची कल्पना त्यांच्या मनांतच येत नाहीं. अशा लोकांमुळें आपल्या देशांत आळसाची वृद्धि होऊन उद्योगास क्षीणत्व आलें आहे. ब्राह्मण वगैरे जे वास्तविक निराश्रित असतील त्यांस न द्यावें असें माझें ह्मणणें नाहीं, परंतु अशांसाठीं देशांत धर्मार्थ उद्योगशाळा स्थापाव्या, आणि ज्यांस काम करण्यास शक्ति असेल त्यांजवळून त्यांच्या योग्यतेप्रमाणें काम घेऊन त्यांचें पोषण करण्याची तजवीज या देशांतील परोपकारी गृहस्थांनीं अगत्य करावी.

ब्राह्मण होत्साता धर्मशास्त्राचें अध्ययन करीत असेल, लोकांस नीतीचा बोध करीत असेल, तर अशा उपयुक्त व उद्योगी ब्राह्मणास देणें यांत वास्तविक धर्म आहे; परंतु ज्यांस शास्त्राचें ज्ञान तिळमात्र नाहीं आणि नीतिबोध करण्याची शक्ति नाहीं, त्यांस ब्राह्मण कोण ह्मणेल? आणि त्यांस दान करण्यांत पुण्य कसलें? असले ब्राह्मण फुकाचे लाडू खाऊन खाऊन माजतात आणि कांहींच उद्योग किंवा मेहनत करीत नाहींत, ह्यामुळेंच आपल्या देशांत एवढी मोठी वस्ती असून ज्या कामास जशीं माणसें पाहिजेत तशीं त्यास मिळत नाहींत, आणि जीं मिळतात तीं इतकीं मिजासी कीं त्यांची मिजास संभाळतां संभाळतां पुरे होतें.

विलायतेंत हलक्या लोकांची मिजास मुळींच संभाळावी लागत नाहीं. एक चाकर काढून टाकिला, तर त्याच्या जागीं दुसरा मिळण्यास कांहीं अडचण पडत नाहीं. आपणास चाकर पाहिजे असल्यास आपल्या आळींतील चाकरांच्या दलालाच्या दुकानावर जाऊन आपलें नांव लिहून द्यावें, ह्मणजे आपल्या मर्जीप्रमाणें आपणास घरीं बसून चाकर मिळतो. ज्या चाकराजवळ आबरूपत्र (Certificate) नसेल त्याला चाकरी मिळणें कठीण, ह्मणून मी माझ्या यजमानाच्या चाकरींत कांहीं कसूर केली तर मला आबरूपत्र मिळणार नाहीं अशी चाकरास भीति असते. आपल्या एथें आबरूपत्र मागतो कोण? आपला चाकर वाईट चालीमुळें आपल्या घरांतून निघाला तरी त्यास चाकरीस ठेवण्यास दुसरे लोक तयार होतात. ही गैरशिस्त वहिवाट बंद झाली पाहिजे.

विलायतेंतील चाकर लोक आणि आपल्या देशांतील चाकर लोक यांत बहुत अंतर आहे. विलायतेंत घरचाकरी करणाऱ्या बहुतकरून बायका असतात. मोठ्या श्रीमानाच्या घरीं बायकांशिवाय आणखी पु-

रुष चाकर असतात, त्यांस त्यांच्या कामाप्रमाणें "बॉय" अथवा "फु-टमन" असें ह्मणतात. बायका कामकरणी असतात त्या बहुधा अ-विवाहित मुली किंवा अविवाहित मोठ्या बायका असतात. घरचें सर्व काम त्याच करितात. आपल्या एथील दोनतीन चाकरांस काम होणार नाहीं इतकें काम एक कामकरीण करिते. अशी एक कामक-रीण कोणी घरांत ठेविली तर तिच्या पोटासघालून तिला दर आठ-वड्यास चार पांच शिलिंग ह्मणजे वर्षास शंभर सवाशें रुपये द्यावे ला-गतील; याशिवाय बीर दारूसाठीं रोजची एक पेनी द्यावी लागेल.

परंतु या कामकरणीचें काम आणि उद्योग पाहून आपणास सं-तोष होईल. ती खाण्यापिण्याविषयीं यजमानाच्या वेळेस फार जपे-ल. ज्या वेळीं जें काम करून ठेवावयास आपण सांगावें तें होण्यांत ती एका क्षणाचेंही अंतर पडूं देणार नाहीं. एकवेळ तिला आपण कां-हीं काम सांगून ठेविलें ह्मणजे बहुधा दुसऱ्या वेळीं तें सांगण्याची अ-थवा आठवण करण्याची गरज लागणार नाहीं. ती सर्वदा आपली मर्जी आणि मर्यादा राखील. ती आपणाशीं कांहीं बोलतांना अथवा जबाब देतांना "सर" ह्मणजे जी ह्मटल्यावांचून बोलणार नाहीं. ती आपल्या समक्ष कधीं मोठ्यानें बोलणार नाहीं. लवी टाकून भांडें साफ करण्याचें काम माझें नव्हे असें ती कधीं ह्मणणार नाहीं. हें काम तर कोणत्याही घरीं तिला अगोदर केलें पाहिजे.

याप्रमाणें घरांतली कामकरीण किंवा चाकरच यजमानाचा मान राखतो असें नाहीं, तर हपिसांत क्लार्क अथवा पेढीवरील कारकूनही रा-खितो. आपल्या एथील क्लार्क अथवा कारकून करितो त्याप्रमाणें यज-मानाच्या समक्ष अकडीनें किंवा डौलानें उभें राहण्याचें धैर्य त्यास होणार नाहीं. आपण त्यास जें जें सांगावें त्याला त्याला "यस, सर" आ-णि "रेडी, सर" ह्मणजे हाजी, जी साहेब, असें मोठ्या मर्यादेनें तो ह्मण-

तो. आपल्या एथील चाकर व कारकून लोकांच्या आंगीं मर्यादा व रीत कांहींच नसून ताठा फार असतो. अहो, आपल्या देशांतील कारकून आणि चाकर लोक ह्यांस रीत व मर्यादा केव्हां लागेल?

उदाहरणार्थ, विलायतेंतील भाडोत्री गाडीवाला घेऊन, त्याची आपल्या एथील गडीवाल्याशीं तुळणा करूं. आपण त्याच्या गाडींत बसावयास जातों तेव्हां किंवा बसलेले असलों तर उतरावयाच्या वेळीं तो गाडीचें दार उघडून टोपी काढून मर्यादेनें उभा राहतो. गाडीचें भाडें द्यावें तें घेऊन तो आपला आभार मानितो. आपल्या एथील भाडोत्री गाडीवाले किती दांडगाई करितात? कोणे समयीं तर त्यांची मिजास संभाळणें फारच कठीण पडतें.

ह्याप्रमाणेंच कोणाही दुकानदाराजवळून किंवा फेरीवाल्याजवळून कांहीं जिन्नस विकत घेतला तर तो आपला आभार मानल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या एथील दुकानदार अथवा फेरीवाला ह्मणेल, माल घेऊन पैसा दिला यांत उपकार तो कसला मानावयाचा? परंतु विलायतेंत असें नाहीं. आपण एक दोन पैशांची वस्तु विकत घेतली तरीही तिचा पैसा आपण मालकास देतांना त्याच्या तोंडांतून (Thank you) असें आभारवचन आल्याविना राहणार नाहीं. आपल्या एथील दुकानदार व फेरीवाले यांस किती ताठा असतो हें सर्वांस ठाऊक आहेच.

ह्या थोड्याशा दृष्टांतांवरून विलायतेंतील हलक्या प्रतीच्या लोकांमध्यें प्रशंसा करण्यासारखी रीत व मर्यादा असते अशी वाचणारांची खात्री होईल. याप्रमाणेंच त्या लोकांस आपल्या देशांतील त्यांच्या प्रतीच्या लोकांपेक्षां ज्ञान फारच अधिक आहे. त्यांच्या धंद्यांप्रमाणें त्यांस अधिक उणें ज्ञान असतें. फेरी करणारा, मजुरी करणारा, ह्या बहुतेकांस लिहितां वाचतां येत नाहीं, तथापि सुधारलेल्या देशीं



एका आनंदित गरीब कुटुंबाचें स्वरूप.

त्यांचा वास असल्यामुळें रस्त्यानें चालतां चालतां अशा शेंकडो वस्तु त्यांच्या पाहण्यांत व समजण्यांत येतात कीं लिहिल्यावाचल्यावांचून त्यांचें ज्ञान वृद्धि पावतें. याशिवाय, अनेक प्रकारच्या यंत्रांच्या कारखान्यांत नेहमी मजुरी करून व नित्यशः नव्या नव्या युक्ति पाहून मजूर लोकांचें ज्ञान किती वृद्धि पावत असेल, याचें अनुमान वाचणारांस सहज होईल.

फेरीवाले, मजूर, रस्त्यानें भटकत फिरणारे, यांपैकीं कितीएकांची संसारस्थिति बरीच असते, कित्येकांची कठीण असते, आणि पुष्कळांची वाईट व भयंकर असते. ज्यांची स्थिति बरी आहे अशांतील प्रत्येकाची रोजची प्राप्ति अर्धरुपया पासून दोन रुपयांपर्यंत असते. ते जुगार, दारूबाजी वगैरे छंदांपासून राहवेल तितके दूर राहतात; आणि साध्या लहानशा घरांत राहून आपल्या बायकामुलांमध्यें आनंदानें आणि सुखानें आपले गरिबीचे दिवस काढितात.

अहाहा! ते आपल्या घरांत बायकामुलांस घेऊन बसतात, आणि आनंदांत येऊन लहान लहान मुलांबाळांस हंसवितात, व खेळवितात, आणि गोष्टी सांगून व गाणें गाऊन आनंद करितात, त्या समयीं त्यांच्या सुखाची किंमत कोण करील? त्यांच्या आनंदाचें वरील चित्र पाहून, खरें सुख कशांत आहे हें कोणी सांगेल काय? सुखदुःख हें केवळ मनावर आहे. द्रव्य असल्यानें कांहीं सदा सुख होतें असें नाहीं; तसेंच गरिबीमुळें सर्वदा दुःख होतें असेंही नाहीं. अशी ह्मण आहे कीं "जिथे शांति तिथे सुख."

जे दररोज सहा आण्यांपासून रुपया दीड रुपयापर्यंत कमावितात परंतु दारूबाजी जुगार वगैरे वाईट छंदांत पैसा उधळितात त्यांची स्थिति फारच कठीण असून त्यांला राहावयास लहानसें घर देखील मिळणें फार कठीण पडतें. त्यांस दिवस फार दुःखानें काढावे लागतात. परंतु ज्यांस नित्य सहा आणे देखील मिळत नाहींत आणि जे चोरीचपाटी करून पोट भरतात त्यांची स्थिति फारच वाईट व भयंकर असते. विलायतेंत दरिद्रानें अगदीं पीड़ित असून लोक लज्जेस्तव अथवा आळसामुळें ज्यांच्यानें धर्माच्या उद्योगशाळेंत (Work-House) जाववत नाहीं त्यांची अवस्था पाहून कोणासही दया व कळवळा आल्यावांचून राहणार नाहीं. दरिद्रानें पिडलेले असे लोक बहुतकरून अनीतिसागरांत पडलेले असतात. त्यांला घर ना दार. त्यांणीं सगळा दिवस भटकून रात्रीस कोठें जावें? अशा लोकांस निजण्या करण्यासाठीं लहान लहान घरें बांधिलीं असतात, त्या एकेका घरांत रात्रीस सुमारें पन्नास लोकांचा निर्वाह होतो; अशीं घरें सुमारें दोनशें आहेत.* अशा अगदीं हलकट घरांत देखील एक रात्र पडून राहण्याबद्दल निदान सोळा पै (दोन पेन्स) द्यावे लागतात. ज्याजवळ

* London Labour and the London Poor. Vol. I. p. 271.

इतकेंही देण्यास नाहीं त्यास चोरी केल्यावांचून परिणाम लागणें कठीण. कारण या देशाची हवा अशी आहे कीं उघड्या मैदानांत निजवत नाहीं, आणि लोकांच्या ओटीवर निजावें तर तेथील घरांस ओव्या मुळींच नाहींत.

ह्या हलक्या घरांस "लॉजिंग-हौस (Lodging-House.) ह्मणतात. हरहर! तीं किती वाईट आणि केवढ्या अनीतीचीं घरें आहेत! कैफी, जुगारी, वगैरे व्यसनी लोक ह्या ठिकाणीं जमतात. ह्या घरांचे मालकही वाईट प्रकारचे लोक असतात आणि पैशाच्या लोभानें आणि चोरीचा माल मिळावा ह्यासाठीं एक दोन खोल्यांत चाळीस पन्नास मनुष्यांस निजवितात. बिच्छाने थोडे असतात यामुळें एका बिच्छान्यावर चारपांच मनुष्यांस निजावें लागतें. असलीं कित्येक ठिकाणें घरांतील अगदीं खालच्या जागीं ह्मणजे भुयारांत असतात, तेथें ताजी हवा येण्यास मुळींच मार्ग नसतो. ह्या ठिकाणीं केवळ पुरुष आणि तरुण मुलगेच असतात असें नाहीं, तर बायका आणि तरुण मुलीही असतात. या ठिकाणीं घाणीचा आणि ढेकणांचा तर कांहीं सुमारच नाहीं.

या ठिकाणीं जो अनाचार चालतो त्याचा विचार कोणाच्यानें करवेल! अहो, एथें किती वाईट गोष्टी चालतात आणि किती दुष्कर्में घडतात! "कित्येक ठिकाणीं पुरुष आणि बायका, मुलगे आणि मुली यांचें एकमेकांशीं जमून जातें." "तरणे मुलगे खोलींत ह्या शेवटाहून त्या शेवटापर्यंत ऐकूं जाई इतक्या मोठ्यानें आपापसांत वाईट घाणेरड्या गोष्टी बोलत बसतात. मुली त्या गोष्टी ऐकून खूश होतात, आणि केव्हां केव्हां त्याच गोष्टी पुनः सांगाव्या असें सुचवितात. तीन चार किंवा सहा तरणे मुलगे व मुली लहानशा एका आंथरुणावर एकत्र निजतात. त्यांत कित्येक अशीं असतात कीं त्यां-

ची जन्मांत कधीं एकमेकाशीं ओळखही नसते. या वेळीं अंगावर कांहीं वस्त्र ठेविलें तर उलटी अडचण होते"† मग जी अनीति होते ती सांगवत नाहीं.

विलायतेंत चोऱ्या, दगे, खून होतात ते बहुतकरून अशा लोकांकडून होतात. त्यांस नीति आणि धर्म ह्मणजे काय हें मुळींच ठाऊक नाहीं. त्यांची स्थिति सुधारण्याविषयीं परोपकारबुद्धीचे गृहस्थ पुष्कळ श्रम करीत आहेत. असे वाईट लोक जगामध्यें सर्व ठिकाणीं आहेतच. सर्व देशांत मनुष्यजातीचा स्वाभाविक कल सारखाच आहे. परंतु दुष्ट लोक अज्ञान व अडाणी असले तर त्यांस दुष्ट कृत्यें करावयास फारसे उपाय सुचत नाहींत. दुष्ट लोकांच्या आंगीं ज्ञान आणि कळा असली तर त्यांच्या योगानें वाईट कामें करण्याविषयीं सहस्त्रावधि युक्ति त्यांस सुचतात. विलायतेंतील वाईट लोकांमध्यें ज्ञान आणि कळा त्यांच्या प्रतीच्या एतद्देशीय लोकांपेक्षां अधिक असल्यामुळें, त्या लोकांस हजारो युक्ति माहीत आहेत. त्यांतील कोणती एकादी युक्ति वाईट कामाकडेस योजिली जाऊन उघडकीस येते, तेव्हां त्यांच्या वाईट वृत्तीचें बळ तितकें अधिक दृष्टोत्पत्तीस येतें.

## १२. कृषिकर्म.

AGRICULTURE ; SCIENTIFIC FARMING.

विलायत देश आपल्या देशाइतका फलद्रूप नाहीं व तेथील जमीन आपल्या एथील जमिनीइतकी सुपीक नाहीं, तथापि तेथें शेतकीच्या कामांत बहुत सुधारणा झाली आहे. विलायतेंत पुष्कळ ठिकाणीं शेत भात करितात त्यांत विद्याकलाकौशल्याचा उपयोग होतो. यास तेथील लोक (Scientific-Farming) सशास्त्रकृषि ह्मणतात. ते यंत्रशास्त्र, रसायनशास्त्र आणि जलशास्त्र यांचा कृषिकर्मांत उपयोग करितात आणि तेणेंकरून शेतकी चांगली होते.

† London Labour and the London Poor. Vol. P. 276.



शेतकरी लोक शेत नांगरताहेत.

आपल्या देशांत कृषिकर्म प्राचीन काळीं होतें तसेंच आज रोजीं आहे. शेतकीच्या कामांत जीं आवतें शंभर किंवा हजार वर्षांपूर्वी वापरीत असत तींच आज वापरीत आहेत. त्यांत विशेष किंवा कांहींच फेरफार दिसून येत नाहीं. विलायतेंत शेतकीचीं जुनीं आवतें बदललीं आहेत इतकेंच नाहीं, तर शेंकडो नव्या प्रकारचीं आवतें बनवून तीं शेतकीच्या कामीं लाविलीं आहेत.

विलायतेंत कृषिकर्माची इतकी सुधारणा झाली याचें मुख्य कारण हें कीं तेथील श्रीमान लोकांनीं ह्या उत्कृष्ट कामांत हात घातला. तेथील कित्येक मोठे प्रख्यात श्रीमंत लोकच शेतकी करितात असे नाहीं, विकटोरिया महाराणीचा स्वर्गवासी भ्रतार प्रिन्स आल्बर्ट याणें देखील केली होती. हें कर्म त्या थोर राजपुरुषानें राजपदास उणेपणा अथवा हीनत्व आणणारें असें मानलें नाहीं. त्याणें ऑस्बोर्न आणि विन्सर या राजवाड्यांजवळ शेतें करून, शेतकीच्या

कामांत सुधारणा केल्यानें केवढा लाभ होण्यासारखा आहे हें दाखवून दिलें.*

हजारो बिघे जमिनीची लागवड करून तींत नव्या युक्ति चालू करणें हें काम श्रीमान लोकांचें आहे. आपल्या देशांतील श्रीमान लोकांस ह्या उत्तम कामांत हात घालण्याविषयीं बुद्धि केव्हां होईल? पुरातन काळीं आपल्या एथें शेतकी हें उत्तम कर्म मानीत असत, आणि यावरून "उत्तम शेती, मध्यम व्यापार, कनिष्ठ चाकरी, आणि अधम भीक" अशी आपणामध्यें ह्मण पडली आहे. ह्या वचनाप्रमाणें वागण्याचें आपल्या लोकांनीं सोडून दिलें, व्यापार उत्तम गणिला आणि कृषिकर्म कनिष्ठ समजून टाकून दिलें. आपल्या देशांत आतां आगगाडी चालू झाली आहे, ह्मणून मला अशी आशा आहे कीं माझे स्वदेशीय श्रीमान लोक डोळे उघडतील, आणि शेतकीच्या उत्तम कर्मांत मन घालण्याची त्यांस बुद्धि होईल.

यावरून कोणी असें समजूं नये कीं विलायतेंत शेतकी श्रीमान लोक मात्र करितात. मध्यम स्थितींतले शेतकरी लोक १००–२५० पर्यंत एकरांची आणि त्यांच्या खालचे लोक शंभर एकरांपेक्षां कमी जमिनीची लागवड करितात. असे शेतकरी पुष्कळ आहेत आणि त्यांच्या संसाराची स्थिति कशी असते ती पहा.

ह्या शेतकऱ्यांची स्थिति आपल्यादेशांतील शेतकऱ्यांच्या स्थितीपेक्षां फार चांगली आहे, हें वाचणारांस ठाऊक असेलच. आपले कुणबी, अमेरिकेंत लढाई चालू झाली आणि विलायतेंत कापूस खपूं लागला तेणेंकरून कांहीं अंशीं ताजे झाले खरे, परंतु ते पैका बहुतकरून जमिनींत पुरून ठेवितात, आणि आपण दिसण्यांत दरिद्री व कंगाल असे दिसतात. विलायतेंतील शेतकरी आपल्या पैशाचा याहून चांगला उपयोग कसा करावा तें जाणतात.

* "The Royal Farms."



शेतकरी बसून विसावा घेताहेत

ह्या शेतकऱ्यांप्रमाणें थोड्याच लोकांस सुख असेल. ते शेतांत काम करून आपल्या कुटुंबाच्या मनुष्यांबरोबर बसून विसावा घेतात, अथवा आपल्या घरांत कुटुंबसहित बसून गोष्टी सांगतात, तेव्हांच्या त्यांच्या सुखाचें वर्णन कोण करील! ते बहुतकरून आनंदानें व मौजेनें आपले दिवस घालवितात. त्यांला आपल्या शेतभाताशिवाय दुसऱ्या कशाचीही काळजी नाहीं. त्यांला साध्या जेवणांत जी गोडी वाटते ती मोठ्या राजासही आपल्या उंच्या भोजनांत वाटत नसेल.

विलायतेंतील शेतकरी लोकांस बहुत करून लिहितां वाचतां येत असतें; आणि ते वर्तमानपत्रें व पुस्तकें वाचून पुष्कळ गोष्टींविषयीं माहीतगार झाले असतात. आपले कुणबी इतके अज्ञान व अडाणी असतात कीं त्यांस विसांच्या पुढें मोजतां देखील येत नसतें, आणि कित्येक अगदीं साधारण शब्दही माहीत नसतात. त्यांस लिहितां वाच-

तां तर बहुत करून येत नसतेंच. त्यांच्या अज्ञानास व देवभोळेपणास
कांहीं पार नाहीं.

आपल्या देशांतल्याप्रमाणें विलायतेंतही आठवड्यांत कोणत्या त
री एका नेमलेल्या दिवशीं मोठाल्या शहरांत बाजार भरतो. लंडनांत
प्रति शनवारीं बाजार भरतो. बाजाराच्या दिवशीं ज्या गांवच्या शेत
कऱ्यांस जें शहर जवळ पडतें, त्या गांवचे शेतकरी त्या शहरीं जावयास
जमून निघतात. कंदमुळें, भाजी, फुलें, फळें, लोणी, अंडीं वगैरे
आपल्या जमिनीपासून व शेतकीच्या गुरांढोरांपासून उत्पन्न झालेलें
असेल तें घेऊन ते जातात. त्या दिवशीं ते बहुत खुशींत आणि आ
नंदांत आलें असतात.

हे शेतकरी मोठे उद्योगी असतात. धनी स्वतः उद्योगी असला
ह्मणजे त्याच्या चाकरांस व मजुरांस उद्योगी व्हावें लागतें. शेतकरी
लोक आणि त्यांच्या बायका सकाळीं पांच वाजण्याच्या पूर्वीं उठतात
चाकर व मजूर निजलेलेच असले तर त्या त्यांस धमकी देऊन उठ
वितात. ह्या मजुरांस बरोबर घेउन शेतकरी लोक सकाळपासून सं
ध्याकाळपर्यंत शेतांत खपतात. शेतकरी लोक आपल्या मजुरांबरोबर
आपण काम करूं लागतात. कारण मजुरांबरोबर बसावें उठावें आ
णि काम करावें हाच त्यांचा धंदा.

कधीं मोठ्या प्रसंगीं अथवा सणवारीं शेतकरी लोक आपआपणांत
जेवण करितात. ते समयीं जाऊन त्यांस जेवतांना पाहावें.* ते शेत
करीच, तेव्हां त्यांचीं प्रकारें काय विचारावयाचीं? सर्वोत्कृष्ट पदार्थ टे
बलावर आणून ठेवितात, आणि सर्व जण जेवावयास बसतात. जेव
तांना त्यांच्या अनेक प्रकारच्या गोष्टी चालतात. कोणी आपल्या शे
तकीच्या बैलांविषयीं बोलतो. कोणी आपल्या मित्राच्या किंवा नात

* Rural Life of England; p. 96.

लगाच्या लग्नाविषयीं बोलतो. कित्येकांच्या बोलण्यांत असा रस असतो कीं सर्व एकदम हंसूं लागतात. ते जेवतांना दारूचीं गलासेंही वरींच झोंकतात.

जेवण झाल्यावर स्त्रिया उठून जातात, आणि पुरुष जवळ जवळ बसून गुडगुडी किंवा विडी ओढूं लागतात. तंबाखू ओढतां ओढतां शेतभातांत सुधारणा करण्याविषयीं आणि राज्यप्रकरणीं पुष्कळ गोष्टी निघतात. ह्या गोष्टी चहाची वेळ होई तोंपर्यंत चालतात. चहाच्या वेळेस बायकामुलें पुनः येऊन बसतात, आणि सर्व एकत्र बसून चहा पितात. पुनः सर्व आनंदानें व प्रेमानें गोष्टी सांगूं लागतात. नंतर सर्व घरीं जावयास निघतात आणि एक मेकाचा "शेकहांड" करून ह्मणजे हात हालवून आपापल्या गाडींत बसून निघून जातात. खेड्यापाड्यांत राहणारे गरीब लोक आपले दिवस कोणत्या रीतीनें काढतात हें मी थोडक्यांत सांगतों. इंग्रज लोक ज्याला "कॉटेज-लैफ, (Cottage-life ह्मणजे झोंपड्यांत राहणें) ह्मणतात त्याविषयीं थोडेंसें लिहून* मी हें सातवें प्रकरण समाप्त करितों. गांवढ्यांतील गरीब लोक झोंपड्यांमध्यें राहतात. परंतु त्यांच्या झोंपड्या आपल्या देशांतील गांवढळ लोकांच्या झोंपड्यांसारख्या नसतात. कारण त्यांत ताडपत्री किंवा बांबू दृष्टीस पडत नाहीं. परंतु झोंपडी ती झोंपडीच, ती दिसण्यांत वाईट दिसायाचीच. "तींत एक दोन खोल्या असतात. जमीन मातीची अथवा फरसबंदी केली असते, परंतु तिजवर कांहीं घातलें नसतें. आंत लांकडाच्या अथवा सळ्यांनीं विणलेल्या कित्येक खुर्च्या असतात. एक जुनेंपानें टेबल असतें. एक लहानशी आगटी असते, अथवा चूल आणि आगटी एकच असते. तपेलीं वगैरे कित्येक भांडीं असतात. हा इतका गांवढ्यांतील मजुरांचा माल व घरसंसार होय.

* Rural Life of England ; p. 404.

तो बिचारा गरीब मनुष्य संध्याकाळीं थकून कामावरून घरीं येतो आल्यावर कांहीं वेळ बायकोमुलांबरोबर बोलत बसतो, नंतर साध्या अं थरूणावर जाऊन निजतो. हिंवाळ्यांत दिवस उगवण्याच्या पूर्वींच तो कामावर जातो. तो झाडीझुडीखालीं बसून जेवतो. घरीं थोडेंसें का- म त्याला स्वत: करावें लागतें. पुष्कळ प्रसंगीं त्याला चूल पेटवून आ- पल्याच हातानें न्यहारी तयार करावी लागते.

"आदितवारीं आणि सणाचे दिवशीं तो हजामत करून खडेघा ट पोशाक करून तयार होतो. नंतर बायको व मुलें बरोबर घेऊन फि रावयास अथवा देवळांत जातो, अथवा शेजाऱ्याबरोबर गोष्टी सांगत बसतो. आपल्या घरांत मुलें असलीं तर त्यांस तो मांडीवर घेऊन बस तो, आणि वडिलांच्या तोंडून ऐकिलेल्या दंतकथा त्यांस सांगून आपण आनंद पावतो, आणि त्यांला खूश करितो."

"हे मजूर लोक रोज किती कमावीत असतील? खेडेगांवांतल एक मजूर आठवड्यास निदान नऊ शिलिंग ह्मणजे साडेचार रुपये आणि फार झालें तर बारा शिलिंग ह्मणजे सहा रुपये मिळवितो यांशिवाय त्याची बायको आणि मुलें मिळवितात तें निराळेंच. स कुटुंबाची प्राप्ति पाहिली तर दर आठवड्यास दहा रुपये होईल आपल्या एथील गांवढ्यांतील मजुरांस इतकी प्राप्ति ह्मटली ह्मणजे पुष्कळ झाली. परंतु विलायतेंत साधारण गृहस्थास दर आठवड्या किरकोळ खर्च इतके रुपये होतो. तेथें ही प्राप्ति कांहींच नाहीं.

हें इतकें सांगितलें. आतां मी हें सातवें प्रकरण पुरें करण्याचं आज्ञा घेतों. कोणत्याही देशाच्या गृहसंबंधी स्थितीचें खरें आणि पूर्ण स्वरूप वर्णणें यासारखें कठीण काम दुसरें कोणतेंच नाहीं. मी हें स्वरूप वर्णितांना इंग्लंड देशांतील लोकांच्या स्थितींतील उत्त गुणांकडेस अधिक लक्ष दिलें आहे, तें एवढ्यासाठींच कीं माझ्या दे

शवंधूंनीं त्यांचे उत्तम गुण ग्रहण करावे. ह्या लोकांच्या गृहसंबंधी स्थितीचें जें वर्णन केलें आहे तें फार अपूर्ण आहे असें मला वाटतें. तथापि हें प्रकरण वाचून याविषयीं लोकांस कांहीं माहिती व्हावी आणि स्वदेशीय लोकांची गृहसंबंधी स्थिति सुधारण्याविषयीं कांहीं विचार सुचावे अशी आणि एवढीच आशा वाळगून मी हें प्रकरण लिहिलें आहे.



# प्रकरण ८.

# लोकांचे शिष्टाचार व रीति.

## VIII.—ETIQUETTE AND USAGES OF SOCIETY.

बोलण्याचालण्यांत, खाण्यापिण्यांत, पोशाक करण्यांत, अलंकार घालण्यांत, भेटावयास जाण्यांत, सभेंत बसण्याउठण्यांत व मेजवानीच्या थाटांत, नाचरंगांत, लग्न सजविण्यांत आणि लग्नाचा विधि वगैरे करण्यांत या लोकांच्या रीतिभाती कशा आहेत आणि ते कोणत्या प्रकारचा शिष्टाचार करितात, याविषयीं या प्रकरणांत कांहीं लिहिण्याची मी आतां आज्ञा घेतों. या शिष्टाचाररीतीस इंग्रजींत "एटिकेट" ह्मणतात. हीस व्यवहारचातुर्य किंवा आदरोपचाररीति ह्मटलें तरीही चालेल.

### १. गृहस्थाचीं लक्षणें.

CHARACTERISTICS OF A GENTLEMAN.

ज्या पुरुषास गृहस्थांमध्यें मोजला जावयाची इच्छा असेल त्यामध्यें गृहस्थाचीं लक्षणें असलीं पाहिजेत. विलायतेमध्यें गृहस्थाचीं लक्षणें कोण कोणतीं समजतात, तें पहिल्यानें जाणलें पाहिजे. गृहस्थाच्या अंगीं मुख्यत्वेंकरून सभ्यता असली पाहिजे. ज्याच्या ठायीं सभ्यता कमी आणि उद्धटपणा अधिक तो गृहस्थांत मोडणारच नाहीं. ते लोक कोणालाही "अरे तुरे" ह्मणत नाहींत. ते बायकोस किंवा मुलीस, कारकुनास, चाकरास किंवा कामकरणीस बोलावयाचें असलें तरी "तूं" ह्मणत नाहींत. ते बहुधा सर्व प्रकारच्या मनुष्यांस बहुवचनी ह्मणजे "तुह्मी" ह्मणतात. ते साधारण कामांत व साधारण बोलण्यांतही आभार मानितात. कोणी आपल्या मित्राचें अथवा दुसऱ्या

कोणाचें श्रम पडल्यावांचून सहज कांहीं काम केलें तरी thanks (थ्यांक्स) अथवा thank you (थ्यांक यू) असें आभारवचन त्याच्या तोंडांतून निघाल्यावांचून राहावयाचें नाहीं.

कोणा गृहस्थास त्याच्या मेहनतीबद्दल पैसा दिला तरी तो घेतांनाही तो देणाराचे आभार मानितो. आपल्या लोकांत साधारण भाषणांत उपकार मानण्याची रीति नाहीं ह्मणून ज्या इंग्रज लोकांचें एतद्देशीय लोकांशीं दळणवळण पडलें आहे, त्यांतील कोणी असें ह्मणतात कीं एतद्देशीय लोकांत आभार मानण्यास शब्दच नाहीं! विलायतेंत घरच्या चाकरानें अथवा कामकरणीनें अमुक वस्तु आणूं अथवा अमुक काम करूं असें धन्यास विचारिलें असतां, धन्यानें आण किंवा कर असें ह्मटलें तर तो असभ्य ठरेल. सभ्य गृहस्थ अशा प्रसंगीं चाकरास if you please ह्मणजे "तुमची मर्जी असली तर" (आणा अथवा करा) असें ह्मणेल. अशा सभ्य व नम्र रीतीनें बोलण्याची चाल आमच्या लोकांत बहुधा नाहींच.

गृहस्थांत मोडण्यासही एवढी सभ्यता दाखविली ह्मणजे झालें असें नाहीं. दुसऱ्याही बहुत गोष्टींत चतुरपणानें वागण्यास शिकलें पाहिजे. ज्या मनुष्याबरोबर जशी ओळख अथवा ज्या प्रकारचा संबंध असेल त्याबरोबर त्याप्रमाणेंच बोलणेंचालणें व पत्रव्यवहार ठेवणें याकडे त्या लोकांचें फार लक्ष असतें. अनोळखी गृहस्थाबरोबर भाषण करण्याचा अथवा त्याला पत्र लिहिण्याचा प्रसंग पडला तर परस्पर "साहेब" (अथवा महाराज) असें ह्मणतात. अशा अनोळखी गृहस्थाशीं ते विशेष मर्यादेनें वागतात. खरे गृहस्थ असतात त्यांस खुशामत आवडत नाहीं, आणि साधारण बोलण्यांत कोणा गृहस्थाच्या तोंडावर ते त्याची स्तुति कधीं करीत नाहींत.

विलायतेमध्यें गृहस्थांत मोडण्यास दुसरी एक गोष्ट आवश्यक

आहे. ती ही कीं घर स्वच्छ असलें पाहिजे. तें लहान असलें तरी चिंता नाहीं, परंतु त्यांत किंचितही केर किंवा दुर्गंधी नसावी, आणि तें शोभिवंत असावें. त्यांत विशेषेंकरून दिवाणखाना ह्मणजे बसण्याउठण्याची जागा ही चांगली ठेविली पाहिजे. ज्याचें घर घाणेरडें, मळीण किंवा वाईट असेल, त्याची गणना गृहस्थांत होणारच नाहीं. याप्रमाणेंच गृहस्थाचीं वस्त्रें वाईट व मळकट असतां कामा नयेत. तीं साधीं परंतु स्वच्छ आणि सफाईदार असलीं पाहिजेत. ज्यांचीं वस्त्रें मळीण, फाटलेलीं किंवा वाईट ते गृहस्थांत मोडणार नाहींत.

याशिवाय गृहस्थ ह्मटला ह्मणजे त्यास साधारण व चालू गोष्टींची माहिती असली पाहिजे. त्याला स्वभाषा शुद्ध बोलतां व लिहितां आली पाहिजे, आणि एक दोन परभाषांचेंही थोडेंसें तरी ज्ञान असलें पाहिजे. त्याला गातां, वाद्य वाजवितां, व नाचतां आलें पाहिजे; तसेंच घोड्यावर बसतां, निशाण मारतां, व घोड्यावरून शिकार करतां आलें पाहिजे. ह्यांतील बहुतेक गोष्टी ज्याच्या अंगीं असतील त्यामध्यें गृहस्थाचीं लक्षणें आहेत असें समजतात.

एकाद्या पुरुषामध्यें हीं सर्व लक्षणें असून कित्येक दुर्लक्षणें असलीं तर त्याची गणना गृहस्थांत होणार नाहीं. दोन अथवा अधिक गृहस्थांच्या मंडळींत बसलें असतां बोटानें नाक किंवा कान कोरणें हें दुर्लक्षण आहे. याप्रमाणेंच दांत कोरणें, आंगमोडा देणें, रुमाल आड धरल्यावांचून मोठ्यानें शिंकणें अथवा लोकांस दिसण्यासारख्या रीतीनें नाकांतून शेंबूड काढणें हीं दुर्लक्षणें समजतात.

कोणालाही मोठ्यानें हाक मारणें हेंही दुर्लक्षण आहे. आमच्या ज्या लोकांमध्यें यांपैकीं बऱ्याच खोडी असतील त्यांणीं इंग्लिश गृहस्थांस अथवा प्रतिष्ठित स्त्रियांस भेटतांना आणि त्यांजबरोबर भाषण करतांना संभाळून चालावें. यांपैकीं कांहीं दुर्लक्षणें आपल्या आं-

गीं दिसून आलीं असतां आपण गृहस्थमंडळींत बसण्यास योग्य नाहीं असें त्यांला वाटल्यावांचून राहणार नाहीं.

## २. सभ्य स्त्रियांचीं लक्षणें

CHARACTERISTICS OF A LADY.

कुलीन स्त्री अथवा गृहस्थाची बायको ह्मटली ह्मणजे, तिजमध्यें पुरुषापेक्षां अधिक सभ्यता असली पाहिजे. तिचें भाषण पुरुषाच्या भाषणापेक्षां मृदु व गोड असलें पाहिजे. विलायतेंत कुलीन स्त्रिया आपल्या आंगीं सभ्यपणा असून मृदुत्व व माधुर्य असण्याविषयीं फार जपतात. याशिवाय सर्व प्रकारच्या गोष्टींत शिष्टाचाररीतीनें व चातुर्यानें वागण्यास त्यांस शिकलें पाहिजे. तिला बसतांना, उठतांना, चालतांना, बोलतांना, हंसतांना, मर्यादेनें वागलें पाहिजे. जी असें करणार नाहीं तिला कुलीन अथवा गृहस्थाची स्त्री असें कोणी ह्मणणार नाहींत.

याशिवाय शिष्ट स्त्री ह्मटली ह्मणजे तिला चांगल्या वळणशुद्ध अक्षरानें चिठ्या, व पत्रें लिहितां आलीं पाहिजेत. तिला गातां, वाजवितां, नाचतां, चित्रें व कशीदा काढतां, गुंफतां व शिवतां आलें पाहिजे. याशिवाय आणखी घरांतील सर्व व्यवस्था राखतां व मुलांचें पाळण करतां आलें पाहिजे. याप्रमाणेंच तिला घोड्यावर बसतां, पियानो फोर्ट वगैरे वाद्यें वाजवितां, नवरा उद्योग करून थकून घरीं येतो तेव्हां त्यास आनंदवितां आलें पाहिजे. विलायतेंतील कुलीन अथवा गृहस्थांच्या स्त्रियांमध्यें बहुतकरून हे सर्व गुण दिसून येतात.

## ३. शृंगार.

TOILET AND DRESSING MATERIALS.

शृंगार करण्याचें काम हें बहुतकरून बायकांचें आहे, तथापि विलायतेंत गृहस्थ देखील हात व तोंड धुतल्याशिवाय, केंस उगवून साफ

केल्याशिवाय, किंवा सगळा पोशाक केल्याशिवाय बाहेर जात नाहींत; इतकेंच नाहीं, तर बहुत करून इतका शृंगार केल्यावांचून दिवाणखान्यांत देखील जाऊन बसावयाचे नाहींत, किंबहुना आपल्या निजण्याच्या खोलींतूनही बाहेर येणार नाहींत. गृहस्थाचें पोशाक करण्याचें टेबल बहुत करून वेगळेंच असतें. विलायतेंतील स्त्रियांची शृंगार करण्याची रीत आपल्या देशांतील स्त्रियांच्या रीतीहून अगदीं निराळी आहे. त्यांस सजण्यास जितका वेळ लागतो, तितका आपल्या एथील बायकांस लागत नाहीं. शृंगार करतांना त्यांस जितके वेळां आरशांत पाहावें लागतें तितके वेळां आपल्या स्त्रियांस बहुधा पाहावें लागत नाहीं. शृंगार करण्यास ज्या वस्तु त्यांस लागतात त्या एतद्देशीय स्त्रियांस लागत नाहींत. त्यांची शृंगार करण्याची खोली फारकरून निराळी असते. तींत टेबलावर शृंगाराचें सर्व साहित्य अशा रीतीनें ठेविलें असतें कीं जी पाहिजे ती वस्तु लागलीच मिळावी.

विलायतेंतील स्त्रिया फणी आणि "हेरब्रश" ह्मणजे केंसाची कुंची यांणीं केंस विंचरतात. त्या बहुतकरून दिवसांतून दोनदां केंस विंचरतात. आपल्या हिंदु बायका डोकींत केतक, चंद्रकोर घालितात त्यांच्या जागीं ह्या स्त्रिया टांचण्या, फणी वगैरे घालितात. ह्या टांचण्या व फण्या निराळ्याच असतात. एतद्देशीय स्त्रिया आंबाडा किंवा वेणी घालितात तशा त्या घा-


केंस बांधण्याची रीत.



AN ENGLISH LADY.

इंग्रजी स्त्री.

लीत नाहींत. डोईचे केंस हलक्या विनिगर मद्याच्या पाण्यानें अथवा आंड्यांतील पांढऱ्या बलकानें धुतात.

कित्येक स्त्रिया आपण चांगल्या दिसण्यासाठीं अनेक युक्ति करितात. कोणा स्त्रीचे केंस थोडे असले अथवा भुऱ्या रंगाचे असले तर ती दुसरे केंस विकत घेऊन आपल्या डोईस लावते. कित्येक स्त्रिया तोंडाला तजेला आणण्यासाठीं पर्ल-पौडर ह्मणजे पराग लावितात. कित्येक कंबर बारीक दिसावी ह्मणून घट्ट कंबरपट्टा घालितात. अशा रीतीनें कंबरपट्टा बांधण्याची चाल कांहीं वर्षांपूर्वी फारच होती! आतां ती जात चालली आहे. बहुतेक स्त्रिया लवेंण्डर वगैरे सुगंधी पदार्थांचा उपयोग करतात.

शृंगार करण्याची ही रीत सर्वच वाखाणण्याजोगी आहे असें मी ह्मणत नाहीं. ईश्वरानें जें सौंदर्य दिलेलें असेल त्याचें वास्तविक स्वरूप नदाखवितां त्याला मसाला (पौडर) लावावा आणि कंबर गच्च बाधांवी ही चाल सुधारलेल्या देशाच्या सुधारणुकीस हीनत्व आणते. आपल्या देशांत बायकांमध्यें छातीवर चोळी किंवा कांचोळी गच्च बांधण्याची चाल फार आहे. स्त्रियांला शृंगार आवश्यक आहे ही गोष्ट खरी, परंतु तो असा नसावा कीं तेणेंकरून शरीरास इजा होऊन लोकांनीं हंसावें.

## ४. पोशाक.

DRESS.

गृहस्थाच्या बायकोस शृंगार ह्मटला ह्मणजे पहिल्यानें पोशाक चांगला पाहिजे, नंतर असले तर कांहीं दागिने. दागिने कांहींच नसले तरी चालेल, परंतु चांगल्या पोशाकावांचून गृहस्थाच्या बायकोचें चालणारच नाहीं. याजकरितां शृंगार ह्मटला ह्मणजे त्यांत पोशाक हाच मुख्य होय. आपल्या लोकांत पोशाक कसाही असला

तरी चालतो, परंतु दागिने अगोदर पाहिजेत. आपल्या देशांत कोणी गृहस्थ कितीही गरीब असला तरी त्याची बायको दागिन्यांवांचून उकी व उघडी असें समजतात. आपल्या लोकांत अमकी अमकीनें काय दागिने घातले आहेत हें पहिल्यानें विचारितात.

विलायतेंत तसें नाहीं. तेथें अमुक बाईनें पोशाक कसा केला आहे हें पाहण्याकडेस सर्वांचा रोख असतो. विलायतेंत गृहस्थांच्या स्त्रियांस नव्यानव्या तऱ्हा (फ्याशन)च्या पोशाकाचा फार शौक व आवड असते. त्या पोशाकाकडेस किती खर्च करितात याविषयीं मी सातव्या प्रकरणांत एके ठिकाणीं लिहिलें आहे. विलायतेंत मध्यम स्थितींतल्या गृहस्थास उधळी बायको मिळाली तर त्या बिचाऱ्याचें पुरें दुर्दैव. बायकोची मर्जी संभाळण्यासाठीं नव्यानव्या तऱ्हांचे पोशाक पुरवितांना त्या बिचाऱ्यास पुरेपुरे होतें. पुष्कळ तरूण पुरुष लग्न केल्यावांचून राहतात याचें एक मुख्य कारण हेंच समजलें पाहिजे.

गृहस्थाच्या स्त्रीस निरनिराळ्या समयीं आणि प्रसंगीं करावयास निरनिराळे पोशाक पाहिजेत. सकाळीं घरांत घालून बसावयाचा एक आणि संध्याकाळीं घालावयाचा एक; बाहेर पायीं चालत जातांना करावयाचा एक, गाडींतून जातांना करावयाचा एक, आणि घोड्यावर बसून जावयाचा एक; कोठें भोजनसमारंभास जावयाचा पोशाक एका तऱ्हेचा, आणि नाचास (बॉलास) जावयाचा दुसऱ्या तऱ्हेचा; पुनः नाटक पाहावयास जाण्याचा पोशाक एक आणि दरबारांत जावयाचा दुसरा. याप्रमाणें भिन्नभिन्न स्थळीं आणि भिन्नभिन्न प्रसंगीं करावयास त्यांस अनेक भिन्नभिन्न पोशाक लागतात.

मोठ्या श्रीमंतांच्या स्त्रियांस फारच उंचा पोशाक करावा लागतो. त्यांचा सर्व पोशाक रेशमी, आणि थंडीच्या दिवसांत अर्धा लोंकर व अर्धें रेशीम अशा कापडाचा किंवा मखमालीचा असला पाहिजे. हिं-

वाळ्यांत गार्डीत बसून फिरावयास किंवा कोणास भेटावयास जावयाचें असलें, तर त्या उंच्या शाली आंगावर घेतात. भोजनसमारंभास जातांना घालावयाचा त्यांचा पोशाक फारच मोलवान असतो. अशा प्रसंगींचा पोशाक पांढरा अथवा मोहरी किंवा लवेण्डर रंगाचा किंवा हिरवा असतो. गुलाबी रंगाचा पोशाक बॉलांत ह्मणजे स्त्रीपुरुषांच्या नाचांत मात्र करून जातात. मेजवानींत पोशाक नव्या तऱ्हेचा असेल त्याप्रमाणें स्त्रीची शोभा अधिक. नव्या तऱ्हेला विलायतेंतील स्त्रिया मोहित होतात. दुकानदार लोक आपली गिऱ्हायकी वाढावी ह्मणून नित्य नव्यानव्या तऱ्हांचे पोशाक करून बसतात. याशिवाय प्रत्येक ऋतूंत पोशाकाची तऱ्हा निराळीच असते. कोणा गृस्थाच्या स्त्रीनें एकाद्या जुन्या तऱ्हेचा पोशाक केला असतां तिजविषयीं दुसऱ्या स्त्रिया एकमेकींच्या कानांत फुसफुसतात. थोड्या वर्षांपूर्वीं जो पोशाक चालू होता तो आतां जुना झाला आहे. याप्रमाणें विलायतेंतील गृहस्थ लोक तऱ्हांच्या पाशांत सांपडले आहेत.

गृहस्थांच्या स्त्रिया संध्याकाळीं मंडळींत, सभेस, मेजवानीस, नाचास किंवा नाटकास जातात तेव्हां (स्तन झांकून) छातीचा वरला भाग उघडा ठेवितात. त्यांच्या पोशाकाविषयीं दुसरी एक गोष्ट सांगावयास मला विसरतां कामा नये. ती ही कीं पोशाक कित्येक वेळां घालून चुरला ह्मणजे तो बाहेर घालून जाण्याच्या कामाचा नाहीं. पायांतले मोजे बाहेर दिसतां कामा नयेत, आणि दिसले तर ते मोठे मोलवान रेशमी असले पाहिजेत. हातांत पंखा असला तर तोही चांगला उंचा असला पाहिजे.

अलीकडे थोड्या वर्षांत विलायतेंतील स्त्रिया झग्यामध्यें "क्रिनोलिन" (Crinolines) घालितात. येणेंकरून त्यांच्या शरीराचा कंबरेखालील भाग मोठा फुगलेला दिसतो. तो बारीक कंबरेपासून



क्रिनोलिनानें फुगलेला पोशाक.

वाढतां वाढतां इतका बाहेर फुगतो कीं त्याच्या योगानें त्यांच्या शरीरास अधिक शोभा येते असें मला वाटत नाहीं. आणखी कित्येक स्त्रिया इतका लांब झगा घालितात कीं तो जमिनीवर लोळत जातो. हा पोशाक राजकीय समजतात. आपल्या देशांतही दक्षिणेंत पेशवाईमध्यें श्रीमंतांच्या स्त्रियांचा पोशाक जमिनीवर लोळत जाई असा असे ह्मणून सांगतात.

असला पोशाक कदाचित् दरबारांत चालेल, परंतु रस्त्यानें चालत जाणाऱ्या स्त्रियांनीं तो विलायतेंत केलेला पाहून माझ्या मनांत वारंवार असें येई कीं हा "फ्याशन"चा पोशाक नाहींसा होईल तर चांगलें. कारण चालतांना रस्त्यांतली धूळ, रेलवे ष्टेशनांवरला केर,

जिने चढतांउतरतांना त्यांवरचा केर ह्या झग्यांनीं झाडून निघतो. यामुळें त्यांचा खालचा भाग आंतल्या आंगानें त्वरित मळून जातो.

आपल्या स्त्रिया रेशमी लुगडीं नेसतात हें माझ्या मतें चांगलें आहे. यांत एवढीच सुधारणा झाली पाहिजे कीं हिंदु स्त्रियांनीं अनवाणी न चालतां पांयांत जोडे किंवा सपातें आणि सावल्यास मोजे आणि बूट घालावे. पायांत तोडे किंवा वाळे घालण्याची चाल काढून टाकली पाहिजे. अहो, कोणी श्रीमंताच्या स्त्रीनें आंगावर दहावीस हजारांचे अलंकार घालून व उंचीं वस्त्रें लेऊन, रस्त्यांतून पायांत मोत्या रुप्याच्या वेड्या घालून अनवाणी चालावें, यास श्रीमंतीचें किंवा गृहस्थाच्या स्त्रीचें लक्षण असें कोण ह्मणेल?

आमच्या श्रीमानांच्या स्त्रिया रस्त्यांतून अनवाणी चालतात असें विलायतेंत कोणास सांगितलें असतां तें त्यास सहसा खरें वाटणार नाहीं. तेथें अगदीं भिकाऱ्याच्या देखील बायकोस किंवा मुलीस अनवाणी चालण्यास लाज वाटेल. जशी मोरास आपल्या पायांकडे बघून लाज वाटते तशी आपल्या स्त्रियांस मोठा उंचा शृंगार करून, आपल्या धुळीनें भरलेल्या घाणेरड्या पायांची लज्जा केव्हां वाटूं लागेल? आणि त्याविषयीं आपल्या एथील हिंदु गृहस्थ आणि श्रीमंतलोक विचार केव्हां करूं लागतील?

दागिने ह्मटले ह्मणजे बोटांत एकादी आंगठी, हातांत पोंची आणि कानांत "ईअरड्रॉप" ह्मणजे लोलक इतकें असलें ह्मणजे झालें. पोशाक गळ्यापर्यंत केला असेल तर गळ्यांत एकादें पदक आणि ऊर उघडा असला तर हिऱ्यांचा अथवा हिऱ्याच्या पानांचा किंवा मोत्यांचा हार घालावा. असें झालें ह्मणजे अधिक दागिने घालणाऱ्या गृहस्थांच्या स्त्रिया आपणास आढळणार नाहींत अशा होतील. आपल्या एथील स्त्रिया अधिक दागिने घातले ह्मणजे अधिक शोभा अ-



सें समजतात. परंतु चांगले डौलदार असे दागिने थोडेच घातले असतां शरीरास भार कमी होतो इतकेंच नाहीं, तर शोभा देखील अधिक येते. श्रीमंती दाखवावयाची असल्यास पुष्कळ दागिने घालण्याची गरज नाहीं. कोणा स्त्रीस लाख रुपयांचे दागिने घालावयाचे असले तरी ते थोडक्यांत घालतां येतील.

गृहस्थांच्या मुलांचा पोशाक अनेक प्रकारचा असतो. निरनिराळ्या प्रसंगीं आणि निरनिराळ्या स्थळीं करावयाचे निरनिराळे पोशाक असतात. मुलें लहान असतां नग्न ठेवण्याची व फिरवण्याची चाल त्या लोकांत मुळींच नाहीं. यामुळें मुलांचें आंग स्वच्छ असतें आणि लहानपणापासून मळीण व घाणेरडीं राहण्याची सवय त्यांस लागत नाहीं. मुलांस नव्या तऱ्हेचे नवे पोशाक करण्याची हौस त्या लोकांस फार असते.

पुरुषांच्या पोशाकाविषयीं अधिक सांगण्याजोगें कांहीं नाहीं. पुरुषांचा पोशाक अत्यंत साधा असतो आणि पुरुष बोटांतल्या आंगठ्यांशिवाय दुसरा कोणताही दागिना घालीत नाहींत. त्यांचा पोशाक निर्मळ व दिसण्यांत साधा असला पाहिजे. पुरुष रंगाचीं वस्त्रें मुळींच घालीत नाहींत. रंगीत पोशाक रंगेल्यालाच साजे. विला-

यतेमध्यें जो पुरुष रंगेलेपणानें अथवा फांकडेपणानें फिरेल तो गृहस्थांत मोडणारच नाहीं. कितीही मोठा श्रीमंत आगगाडींत आपल्याजवळ बसला असला किंवा आपणांस कोठें भेटला तरी त्याची श्रीमंती त्याच्या पोशाकावरून बहुधा आपल्या ध्यानांत अगदीं येणार नाहीं.

आपल्या देशांतील श्रीमंत ह्मटले ह्मणजे त्यांच्या पागोट्यांत सोनेरी तुरे खोंवलेले, आणि बोटांत पुष्कळ आंगठ्या असल्या पाहिजेत, कानांत मोठीं मोत्यें लटकावलीं पाहिजेत, आंगावर शेले दुशेले, व जातील तेथें बरोबर माणसें असलीं पाहिजेत. परंतु विलायतेंतील गृहस्थांचा प्रकार असा नाहीं. पाहिजे तितका चांगला व उंचा पोशाक करावा परंतु छानछुकीचीं वस्त्रें व दागिने घालणें हें कोणा फकड किंवा इश्कीबाज पुरुषाला किंवा मुंबईंतील दयारामासारख्या भाटाला शोभे, परंतु गृहस्थाला अगदीं शोभत नाहीं.

आपल्या देशांतल्याप्रमाणेंच विलायतेंतही पोशाकाविषयीं निरनिराळे विचार आहेत. काळांतराप्रमाणें पोशाक बदलतो. जुन्याविचाराचे लोक कांहीं वेळ बडबड करून मग उगे बसतात, आणि सर्व लोकांचा पोशाक न समजतां बदलूं लागतो. विलायतेंतील लोकांच्या हल्लींच्या पोशाकांत आणि अगोदरच्या पोशाकांत बहुत अंतर पडलें आहे. आपल्या लोकांच्या पोशाकांत तरी याहून कमी फेरफार झाला आहे असें नाहीं. पोशाक कोणता करावा आणि कोणता करूं नये याविषयीं वादविवाद करणें व्यर्थ आहे. ज्याला जो पोशाक पसंत पडला त्याला तो खरा, आणि ज्या काळीं जी नवी तऱ्हा चालू असेल त्या काळीं ती खरी.

आमच्या कित्येक स्वदेशीय लोकांस इंग्रजी पोशाक करावयाची इच्छा झाली आहे. ज्याप्रमाणें मोंगलाईंत मोंगली आणि पेशवाईंत मराठी पोशाक करण्याची लोकांस हौस असे, त्याप्रमाणें इंग्रजींत इंग्र-

जी पोशाक करण्याची कित्येकांस हौस वाटत असेल. परंतु मला असें वाटतें कीं आपला स्वदेशीय पोशाक सर्व टाकून इंग्रजी पोशाक करण्याची गरज नाहीं. पागोटें टाकून टोपी घालण्यांत कांहीं फायदा नाहीं. आपणांस आपलें पागोटें पसंत पडत नाहीं, तर सर्व इंग्रजांस तरी त्यांची टोपी पसंत पडते असें कोणी समजूं नये. मी पुष्कळ इंग्रजांस असें ह्मणतांना ऐकिलें आहे कीं आमची टोपी ह्मणजे "चिम्नी पॉट" आहे, आह्मांला ही बिलकूल आवडत नाहीं.

असें आहे तथापि आपल्या पोशाकांत कांहीं सुधारणा केलीच पाहिजे. ज्या पोशाकानें शरीराचे भाग उघडे दिसतात तो पोशाक करण्याची लाज वाटावी. धोत्रानें पाय उघडे दिसतात इतकेंच नाहीं, तर केव्हां केव्हां पाय खालीं वर करून बसतांना गुह्य भागही उघडे पडून लज्जेस कारण होतें.

चार गृहस्थांच्या मंडळींत कोणाचें धोत्र गुह्य भागावरून सरकून गेलें असलें तर त्याला तें सुचवणें फार कठीण पडतें. याशिवाय रस्त्यांतून चालतांना धोत्र वाऱ्यानें उडतें. अशा बाबतींत पोशाक सुधारणें जरूर आहे. बाकी तर, कोणास एक पक्वान्न आवडतें, कोणास दुसरें आवडतें, त्याप्रमाणेंच माझ्या नजरेस हा पोशाक चांगला दिसतो,आणि दुसऱ्याच्या नजरेस तो दिसतो. याजकरितां याविषयीं वाद घालणें व्यर्थ आहे. पोशाकांत थोडा बहुत फेरफार आपोआपच होत आहे. अलीकडेस थोड्या वर्षांतच किती फेरफार झाला आहे तो पाहा.

### ९. भोजन.

DINNER.

गृहस्थाच्या घरांत जेवणाची रीतभात वाखाणण्यासारखी असते. घरांतील सर्व माणसें एका टेबलावर बरोबर जेवावयास बसतात. जे-

वणाचें टेबल मोठें लांब असतें. त्यावर एक धुतलेलें शुभ्र वस्त्र घालितात. नंतर टेबलासभोंवार ठेवलेल्या खुर्च्यांवर जेवावयास बसतात. यजमान किंवा घरांतील मुख्य पुरुष असतो, तो मध्यें ह्मणजे लांब टेबलाच्या दोन लहान बाजू असतात त्यांतून एका बाजूस मधल्या खुर्चीवर बसतो.

नंतर वाढपी एकएकाच्या पुढ्यांत एकएक रिकामी बशी आणून ठेवितो. प्रत्येक बशीवर धुवट "न्याप्किन" (रुमाल) व सुरी, कांटा आणि चमचा असतो. न्याप्किनाचा उपयोग हा कीं जेवतांना तोंडास पाणी वगैरे कांहीं लागलें असतां तें त्याणें पुसून टाकावें, ह्मणून जेवणारानें तो आपल्या मांडीवर ठेवावा. सुरी, कांटा आणि चमचा यांचा उपयोग हा कीं पदार्थांस हात न लावितां व तोंडांत बोट न घालितां ते खातां यावे. जें काम हातानें करावें लागतें तें सुरी, कांटा आणि चमचा यांच्या योगानें हात उष्टे केल्यावांचून होतें. कांटा व चमचा हे रुप्याचे किंवा रुपेरी मुलाम्याचे असतात. सुरी साफ व चकचकीत असते. जेवणाच्या पूर्वी सर्व सुऱ्या, कांटे व चमचे घांसून स्वच्छ करून ठेवावे, हें सर्वांच्या एथें घरांतल्या कामकरणीचें अथवा चाकराचें पहिलें काम आहे.

नंतर वाढपी एका मोठ्या भांड्यांत घालून झांकून पदार्थ आणून मुख्य यजमानाच्या पुढें ठेवितो. या मुख्यास फार श्रम पडतात. कारण तो त्या मोठ्या भांड्यांतून एकएका बशींत थोडथोडें अन्न घालून ती वाढप्याजवळ देतो, आणि वाढपी ती प्रत्येकाच्या पुढें ठेवून रिकामी बशी उंचलून नेतो. याप्रमाणें सर्वांस वाढून झाल्यावर मुख्य आपण खाऊं लागतो. हा पहिला पदार्थ खाऊन झाल्यावर, वाढपी सर्वांच्या पुढच्या जुन्या बशा घेऊन जातो आणि नव्या आणून ठेवितो. नंतर वाढपी दुसऱ्या पदार्थानें भरलेलें भांडें मुख्याच्या पुढ्यांत

आणून ठेवितो, आणि मुख्य पहिल्याप्रमाणेंच त्यांतून थोडथोडा पदार्थ काढून एकएका बशींत घालून वाढप्याजवळ देतो, आणि वाढपी ती एकएकाच्या पुढें नेऊन ठेवितो.

याप्रमाणें एकामागून एक सर्व पक्वान्नें येतात. दर वेळेस नव्या बशा आणून ठेवितात. येणेंकरून घरांतील मुख्यास व वाढप्यांस फार मेहनत पडते. आपण सर्व निरनिराळीं पक्वान्नें एकदम घेऊन बरोबरच खातों त्याप्रमाणें हे लोक करीत नाहींत. त्यांमध्यें एक पदार्थ खाऊन झाल्यावर दुसरा येतो. याप्रमाणें भोजनाचे पदार्थ एकामागून एक येतात.

ते लोक सुरी, चमचा आणि कांटा यांणीं खावयास बाळपणापासूनच शिकतात. भोजनांत जें कांहीं कापण्यासारिखें येईल तें सुरीनें कापावयाचें, ह्मणून एका हातीं सुरी आणि दुसऱ्या हातीं कांटा धरून जेवलें पाहिजे. एक पांव खेरीज करून, बाकी कोणत्याही पदार्थास हात लावावयाचा नाहीं. सर्व सुरी, कांटा आणि चमचा यांणींच खावयाचें. सुरी तोंडांत घालावयाची नाहीं; कांट्यानें धरून जो पदार्थ खाणें असेल तो खाल्ला पाहिजे, आणि भात व पातळ पदार्थ असतील ते चमच्यानें खावयाचे. ज्याला अभ्यास नाहीं त्याला हें काम कठीणसें वाटेल, परंतु तेथील गृहस्थांचीं मुलें लहानपणापासूनच ह्या वस्तूंचा उपयोग करावयास शिकतात.

खाण्यापिण्याच्या रीतीविषयीं देखील बारिक नियम ह्या लोकांत आहेत. खातांना तोंड मचमचां वाजतां कामा नये, आणि पितांना गटगट असा गळा वाजतां कामा नये. कित्येक जातींचीं फळें खातांना देखील चातुर्यानें खालीं पाहिजेत. ज्याला खावयाची रीति माहीत नाहीं तो गृहस्थाच्या घरीं वाढला नसावा असें सर्वांस वाटतें. तेथील लोकांस भोजनास फार वेळ लागतो. कारण भोजन होत असतांना त्यांच्या अनेक प्रकारच्या गोष्टी चालतात. जेवणाविषयीं आणखी ए-

गोष्ट आहे ती सांगावयास विसरतां कामा नये. ती ही कीं बहुतेक घरीं जनाच्या पूर्वी व तें झाल्यावर त्याविषयीं ईश्वराचे उपकार मानतात.

आपल्या देशांत जेवणाची रीति अगदीं निराळी आहे, ती अगदीं लटून युरोपियन लोकांच्या सारखी करावी असें माझें ह्मणणें नाहीं. तु भुंईवर पाय दुणून मांडी घालून बसावें आणि तोंडांत बोटें घालू- व बोटें चाटीत जेवावें हें ह्या सुधरलेल्या काळास अगदीं शोभत ना-. तसेंच, बायकांस व मुलींस मागाहून वेगळें जेवावयास बसवावें हें- मला ठीक वाटत नाहीं. कोणी कदाचित् असें विचारतील कीं पले वाडवडील टेबलावर कधीं जेवले होते? तर मी असें विचारतों ीं आपले वडील खुर्च्या टेबलांवर कधीं बसले होते आणि त्यांवर चहा क- ीं प्याले होते? तर काळ सुधरत चालला आहे त्याप्रमाणें आपणासही ालले पाहिजे. काळमानाप्रमाणें आपली स्थितिही बदलली पाहिजे.

## ६ बोलणेंचालणें.

### CONVERSATION.

ज्यांला इंग्लिश गृहस्थांचा संबंध थोडा बहुत असेल त्यांला ठा- नक असेलच कीं त्या लोकांमध्यें बोलण्याचालण्याचा सभ्यपणा ापल्यापेक्षां अधिक आहे. बोलण्याचालण्यांत त्या लोकांची सभ्य- ा वाखाणण्याजोगी व कित्ता घेण्यासारखी आहे. त्यांच्या भाषणां- र बहुत करून कठोरपणा दिसून येणार नाहीं. केवळ शाळेंत किं- ा पाठशाळेंत शिकल्यानें बोलण्याचालण्याची रीत समजणें कठीण ाहे. ती रीत शिकावयाची असली तर इंग्रज लोकांच्या कुटुंबाचें ंघटण अधिक झालें पाहिजे. अहो, इंग्लिश गृहस्थाच्या स्त्रीचें भा- ण करण्याची मृदु व गोड रीति कोणास यावयाची आहे? भाषण करतांना नरम व गोड शब्द बोलून हास्यमुख ठेवावयास अगोदरच शिकलें पाहिजे.

आणून ठेवितो, आणि मुख्य पहिल्याप्रमाणेंच त्यांतून थोडथोडा पदार्थ काढून एकएका बशींत घालून वाढप्याजवळ देतो, आणि वाढपी ती एकएकाच्या पुढें नेऊन ठेवितो.

याप्रमाणें एकामागून एक सर्व पक्वान्नें येतात. दर वेळेस नव्या बशा आणून ठेवितात. येणेंकरून घरांतील मुख्यास व वाढप्यांस फार मेहनत पडते. आपण सर्व निरनिराळीं पक्वान्नें एकदम घेऊन बरोबरच खातों त्याप्रमाणें हे लोक करीत नाहींत. त्यांमध्यें एक पदार्थ खाऊन झाल्यावर दुसरा येतो. याप्रमाणें भोजनाचे पदार्थ एकामागून एक येतात.

ते लोक सुरी, चमचा आणि कांटा यांणीं खावयास बाळपणापासूनच शिकतात. भोजनांत जें कांहीं कापण्यासारिखें येईल तें सुरीनें कापावयाचें, ह्मणून एका हातीं सुरी आणि दुसऱ्या हातीं कांटा धरून जेवलें पाहिजे. एक पांव खेरीज करून, बाकी कोणत्याही पदार्थास हात लावावयाचा नाहीं. सर्व सुरी, कांटा आणि चमचा यांणींच खावयाचें. सुरी तोंडांत घालावयाची नाहीं; कांट्यानें धरून जो पदार्थ खाणें असेल तो खाल्ला पाहिजे, आणि भात व पातळ पदार्थ असतील ते चमच्यानें खावयाचे. ज्याला अभ्यास नाहीं त्याला हें काम कठीणसें वाटेल, परंतु तेथील गृहस्थांचीं मुलें लहानपणापासूनच ह्या वस्तूंचा उपयोग करावयास शिकतात.

खाण्यापिण्याच्या रीतीविषयीं देखील बारीक नियम ह्या लोकांत आहेत. खातांना तोंड मचमचां वाजतां कामा नये, आणि पितांना गटगट असा गळा वाजतां कामा नये. कित्येक जातींचीं फळें खातांना देखील चातुर्यानें खाल्लीं पाहिजेत. ज्याला खावयाची रीति माहीत नाहीं तो गृहस्थाच्या घरीं वाढला नसावा असें सर्वांस वाटतें. तेथील लोकांस भोजनास फार वेळ लागतो. कारण भोजन होत असतांना त्यांच्या अनेक प्रकारच्या गोष्टी चालतात. जेवणाविषयीं आणखी ए-

क गोष्ट आहे ती सांगावयास विसरतां कामा नये. ती ही कीं बहुतेक घरीं भोजनाच्या पूर्वीं व तें झाल्यावर त्याविषयीं ईश्वराचे उपकार मानतात.

आपल्या देशांत जेवणाची रीति अगदीं निराळी आहे, ती अगदीं पालटून युरोपियन लोकांच्या सारखी करावी असें माझें ह्मणणें नाहीं. परंतु भुंईवर पाय दुणून मांडी घालून बसावें आणि तोंडांत बोटें घालून व बोटें चाटीत जेवावें हें ह्या सुधरलेल्या काळास अगदीं शोभत नाहीं. तसेंच, बायकांस व मुलींस मागाहून वेगळें जेवावयास बसवावें हेंही मला ठीक वाटत नाहीं. कोणी कदाचित् असें विचारतील कीं आपले वाडवडील टेबलावर कधीं जेवले होते? तर मी असें विचारतों कीं आपले वडील खुर्च्या टेबलांवर कधीं बसले होते आणि त्यांवर चहा कधीं प्याले होते? तर काळ सुधरत चालला आहे त्याप्रमाणें आपणासही चाललें पाहिजे. काळमानाप्रमाणें आपली स्थितिही बदलली पाहिजे.

## ६ बोलणेंचालणें.

CONVERSATION.

ज्यांला इंग्लिश गृहस्थांचा संबंध थोडा बहुत असेल त्यांला ठाऊक असेलच कीं त्या लोकांमध्यें बोलण्याचालण्याचा सभ्यपणा आपल्यापेक्षां अधिक आहे. बोलण्याचालण्यांत त्या लोकांची सभ्यता वाखाणण्याजोगी व कित्ता घेण्यासारखी आहे. त्यांच्या भाषणांत बहुत करून कठोरपणा दिसून येणार नाहीं. केवळ शाळेंत किंवा पाठशाळेंत शिकल्यानें बोलण्याचालण्याची रीत समजणें कठीण आहे. ती रीत शिकावयाची असली तर इंग्रज लोकांच्या कुटुंबाचें संघटण अधिक झालें पाहिजें. अहो, इंग्लिश गृहस्थाच्या स्त्रीचें भाषण करण्याची मृदु व गोड रीति कोणास यावयाची आहे? भाषण करतांना नरम व गोड शब्द बोलून हास्यमुख ठेवावयास अगोदरच शिकलें पाहिजे.

ते लोक भाषण करतांना बहुधा मोठ्यानें बोलत नाहींत. कितीएकजण मंडळींत इतके हळू बोलतात कीं ते बोलताहेत असें एकाएकीं कोणाच्या ध्यानांत येणार नाहीं. ज्या स्थळीं व ज्या प्रसंगीं भाषण करावयाचें त्याकडे त्यांचें लक्ष फार असतें. त्यांचें भाषण फारकरून राज्यप्रकरणी किंवा विद्याकलाकौशल्यसंबंधी किंवा एकाद्या त्या वेळीं चाललेल्या किंवा घडलेल्या गोष्टीविषयीं असतें. ह्मणून वर्तमानपत्रें व नियमित काळीं निघणारीं पुस्तकें वाचण्याचा अभ्यास त्यांस अवश्य ठेवावा लागतो, कारण यांविषयीं चौघांमध्यें हरएक प्रसंगीं व ठिकाणीं वारंवार गोष्टी निघतात.

नव्या नव्या तऱ्हांविषयीं, पारधींविषयीं किंवा "क्रिकेट" खेळण्याविषयीं गोष्टी त्या लोकांमध्यें काहीं थोड्या थोडक्या नाहींत. इतिहासांतून किंवा कोणा पुरुषाच्या चरित्रांतून लहान लहान गोष्टी (Anecdotes.) सांगण्याची चाल फार आहे. उदाहरणार्थ, आळशी मनुष्यास जगांत सुख होणें नाहीं याविषयीं एक बिशपाची गोष्ट आहे. ती अशी कीं "लिंकनचा बिशप फार मोठा आणि वजनदार होता. एका दिवशीं त्याचा मूर्ख आळशी भाऊ त्यास ह्मणाला, मला तुह्मी जगांत उदयास आणून मोठा करा. बिशपानें उत्तर केलें, बाबा, तूं सांगशील तर मी तुझा मोडका नागर नीट करून देईन, किंवा तुझा बैल मेला तर दुसरा घेऊन देईन, पण मी तुला मोठा कसा करूं? तूं नागर धरणारा आहेस, आणि पुढेंही तसाच राहणार असें मला भय वाटतें."*

लॉर्ड ब्रूहम हा मोठा उद्योगी पुरुष होता. त्याच्या उद्योगाविषयीं एक लहानशी गोष्ट आहे, तीही मी सांगतों. "एक वेळ साम्युएल रॉमिली यास कोणीएकानें असें ह्मटलें कीं माझें इतकें काम करून द्या.

* Self Help; P. 15; 18.

त्यांणें उत्तर केलें मला वेळ नाहीं, त्या ब्रूहमाकडे जा, कारण त्याला सर्व कामें करावयास वेळ सांपडतो असें वाटतें."* अशा लहान लहान गोष्टी सांगण्याची व ऐकण्याची त्या लोकांस मोठी आवड व गोडी आहे.

कोणाच्या कानांत कांहीं सांगावें हें शिष्टाचाररीतीच्या विरुद्ध अहे असें समजतात. तीन किंवा अधिक जण एका ठिकाणीं गोष्टी सांगत बसले असतां, त्यांतून कित्येकांस समजणार नाहीं अशा दुसऱ्याच एकाद्या भाषेंत मध्येंच बोलणें हेंही सभ्यपणाचें लक्षण नव्हे. कांहीं गोष्ट चालली आहे आणि इतक्यांत कोणी ओळखीचा गृहस्थ किंवा मित्र आला तर त्यास आपल्या गोष्टींचा सारांश न सांगतां ती तशीच पुढें चालविणें हाही असभ्यपणा समजतात. स्त्रिया आणि पुरुष एकत्र गोष्टी बोलत बसलीं असतां, कांहीं प्रश्न विचारणें किंवा "अमक्या गोष्टीचें काय झालें" ह्मणून, भ्रमांत असल्याप्रमाणें, पुसणें हेंही शिष्टाचाररीतीच्या विपरीत व अयोग्य असें समजतात.

## ७. भेटीकरितां जाणेंयेणें.

VISITS.

विलायतेंत रस्त्यानें जातांना कोणा मित्राची किंवा ओळखीच्या गृहस्थाची गांठ पडली असतां ते लोक आपल्याप्रमाणें हात उंचलून सलाम करीत नाहींत, परंतु एकमेकाकडे पाहून डोकी हालवितात; आणि अगदीं जवळ जवळ आले तर "शेकहांड" करितात ह्मणजे परस्परांशीं हात हालवितात. परंतु कोणा ओळखीच्या स्त्रीची गांठ पडली असतां, टोपी काढून तिला सलाम करावा आणि पुन: टोपी घालावी. कोणीही स्त्रीस आपलें तिचें चांगलें संघटण असल्यावांचून, बहुधा आपणाबरोबर हात हालविणें किंवा सलाम करणें आवडणार नाहीं.

* Self Help; P. 15; 18.

ते लोक एकमेकांच्या घरीं भेटीकरीतां जातात तेव्हां “कार्डां”चा ह्मणजे नांवांच्या चिठ्यांचा उपयोग करितात. यासाठीं प्रत्येक गृहस्थ आणि सभ्य स्त्री आपल्या नांवाच्या छापलेल्या कार्डी आपल्या खिशांत बाळगतात. भलावणपत्र घेऊन कोणास भेटावयास जावयाचें असलें, तर त्याच्या घरीं जाऊन तें पत्र व आपली कार्ड हीं बरोबर त्याजवळ पाठवून द्यावीं. कोणाही गृहस्थाबरोबर याप्रमाणें एकदां आपली ओळख झाल्यावर तो आपणास घरीं बोलावून आपल्या बायकोची व मुलांची आणि आपली गांठ घालून ओळख करून न देईल, तर आपण असें समजावें कीं हा गृहस्थ आपला परिचय करण्यास आणि भलावण करणाऱ्याचा मान राखण्यास इच्छीत नाहीं.

कोणा गृहस्थाच्या घरीं आपण भेटावयास गेलों आणि त्याची गांठ न पडली तरी आपण आपल्या नांवाची कार्ड देऊन आलें, ह्मणजे त्याची भेट घेतली असेंच होतें. तो आपणाबरोबर स्नेह ठेवणार असला तर ती भेट परत करून जाईल. आपण कोणाच्या घरून जेवून किंवा बॉलास जाऊन आलों ह्मणजे नंतर तीनचार दिवसांनीं त्याच्या एथें पुनः भेटावयास गेलें पाहिजे. आपल्या कोणा ओळख्याच्या किंवा स्नेह्याच्या घरांत कोणी मरण पावलें असतां आपण आपलें दुःख दाखविण्या करितां त्याच्या घरीं जाऊन त्याच्या चाकरास आपली कार्ड देऊन ती शोकप्रद गोष्ट कशी घडली तें त्यालाच विचारून परत यावें. लग्नाविषयीं वगैरे अभिनंदन करण्यासाठीं त्यालाच भेटलें पाहिजे.

लंडनांत भेटण्याची वेळ ह्मटली ह्मणजे बहुधा दोनप्रहरांनंतर तीन वाजल्यापासून सहा वाजत तोंपर्यंत होय. ज्यांची भेटण्याची मर्जी नसेल ते कोणी भेटावयास आले असतां “Not at home.” ह्मणजे “घरांत नाहीं” ह्मणून सांगावयास चाकरास सांगून ठेवितात.

त्याप्रमाणें चाकर करतो, परंतु भेटावयास येणाऱ्याची कार्ड घेऊन ठेवितो. त्यांची भेटावयाची मर्जी असून आपणास आंत प्रविष्ट केलें तर वीस किंवा तीस मिनिटांहून अधिक वेळ वसूं नये. अधिक बसलें किंवा दुसरा कोणी भेटावयास आल्यानंतर अधिक वसलें तर आपण Bore ह्मणजे व्याधि किंवा पीडा ठरतों.

## ८. सकाळसंध्याकाळच्या मंडळ्या.

EVENING AND MORNING PARTIES.

मंडळी बोलावण्याची किंवा बैठक करण्याची चाल आपल्या देशांत आहे त्याप्रमाणें विलायतेंतही आहे. परंतु आपले लोक मंडळींत किंवा बैठकींत वेश्यांस नाचावयास आणतात तसें विलायतेंत कोणी करीत नाहीं. वेश्या आणणें—आणि त्यांत आपल्या घरीं आणणें—यासारखें लज्जेचें काम दुसरें कोणतें? विलायतेंत कोणी गृहस्थानें वेश्या आपल्या घरीं आणली तर त्याला कोणी गृहस्थ ह्मणणारच नाहीं, आणि गृहस्थमंडळीच्या समागमास योग्य गणणार नाहीं.

विलायतेंत मंडळी ह्मटली ह्मणजे चारपांच प्रकारची होते. एक होते तींत परस्परांबरोबर बोलणेंचालणें मात्र होतें. मंडळी बोलावण्याचा मुख्य उद्देश हाच आहे कीं परस्पर स्नेहभाव वाढून मनोरंजन व्हावें. हा हेतु सिद्धीस जाण्यास बोलण्याचालण्याच्या मंडळीसारखी चांगली दुसरी कोणती आहे? अशा मंडळीस ते लोक Conversazione कान्वर्सेशनी ह्मणतात. दोनचार खोल्यांत नवे नवे आणि मनोरंजक असे पदार्थ, सूर्याच्या किरणांनीं काढलेलीं चित्रें व तसविरी, सुंदर सुंदर पुस्तकें, "स्तीर्योस्कोप" वगैरे टेबलावर असतात. मंडळी जमली ह्मणजे प्रथम एकमेकाला भेटतात, ठेवलेले पदार्थ पाहतात आणि नंतर अनेक प्रकारच्या गोष्टी सांगतात.

कांहीं वेळानें ती मंडळी चहा प्यावयास दुसऱ्या खोलींत जाते.



चार मंडळी बसली आहे.

नंतर अंमळशानें "ऐसक्रीम" ह्मणजे बर्फानें सांकळलेलें दूध याचे भरलेले प्याले मंडळीसाठीं आणतात. तें घेत असतां अनेक प्रकारच्या गोष्टी होतात. इतक्यांत घरची यजमानीण आलेल्या बायांपैकीं एकीस गाण्याविषयीं विनंती करते. मग ती उठून वाद्याच्या पेटी (पियानो) जवळ जाते आणि गाऊं व वाजवूं लागते. अशा प्रकारें कांहीं वेळ गायन चालतें आणि तें बंद झालें ह्मणजे फिरून संभाषण चालू होतें. अशा मंडळीपासून केवढा लाभ आहे हें मी सांगण्याची गरज नाहीं. सुखानें व संतोषानें एकमेकांबरोबर बोलण्याचालण्याचें आणि स्नेहभाव वाढविण्याचें याहून चांगलें साधन दुसरें कोठें सांपडणार!

नामदार मिस्तर आर्थर किनार्ड, इंदिया कौन्सिलाचा सभासद कप्तान ईस्त्विक वगैरे गृहस्थांच्या एथें अशा मंडळींत मी पांच सहा वेळां गेलों होतों. पहिली मंडळी नामदार किनार्ड यांच्या एथें झाली होती तेव्हां आपल्या हिंदुस्थान देशाविषयीं माहीतगार असे कित्येक गृहस्थ आले होते. ते मला आणि माझे मित्र राव बहादुर रामचंद्र

बाळकृष्ण यांस पाहून फार संतोष पावले. किनार्ड साहेबांची पत्नी व कन्या आणि तशाच दुसऱ्याही कित्येक सभ्य स्त्रिया आल्या होत्या. या प्रसंगीं आपल्या देशाविषयीं पुष्कळ गोष्टी निघाल्या होत्या, त्या सर्व एथें सांगण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं.

तथापि, "तुमच्या देशचे लोक आमच्या देशांत अधिक येतील, आणि तुह्मी आपल्या स्थितीची आह्मांस अधिक माहीतगारी करीत जाल तसे तुमच्या देशास अधिक लाभ होतील," असें त्यांणीं ह्मट-लें तें माझ्या मनांत बळकट ठसलें, तें एथें कळविणें जरूर आहे असें मला वाटतें. हींत आणि दुसऱ्या एका मंडळींत आपले हल्लींचे ग-वर्नर जनरल सर जॉन लॉरेन्स हेही आले होते.

अशा प्रकारची दुसरी एक मंडळी झाली तींत कांहीं वेळ बोलणें-चालणें झाल्यावर दोन बिशप ह्मणजे आचार्य यांणीं ज्या देशांत ख्रि-स्ती धर्माचा प्रसार करण्याविषयीं आपण मेहनत केली होती त्यांच्या धर्मसंबंधी स्थितीविषयीं कांहीं सांगितलें. मेजर स्मिथ नांवाच्या ए-का भल्या गृहस्थाच्या एथें तारीख २७ वी माहे एप्रिल सोमवार रोजीं रात्रीस एक मंडळी झाली, त्यावेळीं सिड्नी व गोलबर्न एथील बिशपां-नीं भाषणें केलीं त्यांतल्या कित्येक गोष्टी ऐकून मला फार संतोष झा-ला. शेवटीं मोठी रात्र झाली असतां सर्व ईश्वराची प्रार्थना करून आपापल्या घरीं निघून गेले.

विलायतेंत याशिवाय दुसऱ्याही प्रकारच्या मंडळ्या होतात. त्यांत कोणा गाणारास बोलावितात. गाणारा पुरुष असतो किंवा स्त्री असते. गाणाऱ्या स्त्रीची आंतील वर्तणूक कशीही असो, परंतु ती वेश्येचा धंदा करणारी नसली ह्मणजे चालतें, आपणामध्यें कोणा गवयाची एऱ्हवीं-ची वर्तणूक कशीही असली तरी तिकडे न पाहतां, त्याला आपल्या घ-रीं बोलावून त्याचें गायन ऐकण्यास कांहीं दोष मानीत, नाहींत त्या-

प्रमाणेंच त्या लोकांत कोणीही स्त्री वेश्येचा धंदा करीत नसली ह्मणजे सर्वजण तिचें गाणें मोठ्या भक्तीनें आणि आनंदानें ऐकतात. गायनाच्या भोक्त्यास अशा बैठकी फार आवडतात. यांस ते लोक कॉन्सर्ट (Concert) ह्मणतात.

एका तिसऱ्या प्रकारची मंडळी होते तींत नाटकाचा खेळ होतो. हे खेळ करणारे वहुधा शुद्ध मौजेकरितांच खेळ करतात. त्यांस "आमेचुर्स" ह्मणतात. त्यांचा खेळ सर्व लोक मोठ्या खुशीनें पाहतात. चौथ्या प्रकारची मंडळी होते ती कोणी श्रीमान लोक उघड्या जागीं करवितात. तिला *Matinée* मातिनी अशी संज्ञा आहे. पांचव्या प्रकारच्या मंडळीस Tea party ह्मणजे चहा प्यावयास बोलाविलेली मंडळी असें ह्मणतात. या सर्वांमध्यें पहिल्या प्रकारची ह्मणजे बोलण्याचालण्याची आणि शेवटली ह्मणजे चहा प्यावयाची ह्या मंडळ्या तेथें फार होत चालल्या आहेत.

## ९. मेजवानी.

PUBLIC DINNERS.

विलातेंतील लोक मेजवान्या करतात त्यांत बारा, सोळा किंवा अठरा याहून अधिक मंडळी बहुतकरून बोलावीत नाहींत. आपल्या लोकांत लग्नाचें, गर्भाधानाचें किंवा कोणी मेल्यानंतर मोठें जेवण करण्याची चाल आहे तशी विलायतेंत नाहीं. तथापि कोणा एकाद्या मोठ्या प्रसंगीं मोठा भोजनसमारंभही होतो. अशा मोठ्या जेवणास "पब्लिक डिनर" ह्मणतात. या मोठ्या जेवणास जातात ते प्रत्येक ठरविलेली वर्गणी देतात. असलें जेवण होतें ती मौज पाहण्यासारखी असते.

आपणास एकादा मित्र जेवावयास बोलावावयाचा असला आणि आपल्या घरांत तसें करण्याची सोय नसली तर त्याला आपण हॉटेलांत

नेऊन तेथें उभयतां जेवलों तरी चालतें. कोणी गृहस्थानें बारापंधरा असामी आपल्या घरीं जेवावयास बोलाविले आणि त्यांत कित्येक त्याचे मित्र चुकून राहिले ह्मणून कांहीं चिंता नाहीं. कारण पुनः कधीं तो जेवावयास मंडळी बोलावील तेव्हां त्या राहिल्या मित्रांस आमंत्रण करील. याजकरितां एका प्रसंगीं एक मित्र बोलाविला, आणि दुसऱ्या प्रसंगीं त्याला आमंत्रण न गेलें ह्मणून त्याला मनांत वाईट वाटण्याचें कांहीं कारण नाहीं.

जेवायाला बोलावण्याचा मुख्य हेतु हाच कीं परस्पर स्नेहभाव व प्रेम वाढावें. हा हेतु थोडीं मनुष्यें जेवावयास बोलावल्यानें जसा साधतो तसा दुसऱ्या रीतीनें साधत नाहीं. थोडींच मनुष्यें असलीं तर त्यांजबरोबर नीट बोलायाचालायास सांपडतें आणि त्यांची यथायोग्य बरदास्त ठेवितां येते. तेणेंकरून त्यांचें मन चांगलें प्रसन्न होतें आणि आपणाविषयीं त्यांचा स्नेह वाढतो. अशा रीतीनें जेवायास बोलावणाऱ्याचा आणि जेवायास जाणाऱ्याचा दोघांचा ही हेतु पूर्ण होतो.

असें आहे तथापि कित्येक श्रीमान् लोक मोठमोठ्या मेजवान्या करण्यांत मोठेपणा आहे असें समजून त्यांत बहुत पैसा खर्च करितात. मी पूर्वीं सांगिलेंच आहे कीं मनुष्यस्वभाव सर्व देशांत सारखाच आहे. आपल्या एथील श्रीमान् लोक आपली श्रीमंती दाखविण्याविषयीं उत्सुक असतात तसेच विलायतेंत ही कित्येक श्रीमान् आढळतात. ते मोठीं जेवणें करितात त्यांला मोठा खर्च होतो. अशा जेवणास किती खर्च होतो याचें कांहीं अनुमान वाचणारांस करतां यावें एवढ्यासाठीं एथें एक उदाहरण देतों. इंग्लंडचा लॉर्डमेअर हा वर्षांतून एकदां मोठें जेवण करितो त्यास वीस हजार रुपयांहून कमी खर्च होत नाहीं! इतका खर्च होऊन सगळीं हजार बाराशें माणसें जेवतात.

विलायतेंत अशी मोठी मेजवानी होते तो प्रकार पाहण्यासारखा असतो. कितीही मोठें जेवण असलें तरी त्यांच्या जेवणाखाणाच्या रीतिभातींत किंवा बेतबातांत कांहीं न्यून पडत नाहीं. आपल्या लोकांत भोजनाची मंडळी अधिक असेल तसा जेवणाखाणाचा बेतबात बिघडतो. विलायतेंत याच्या उलट प्रकार आहे. तेथें जेवण मोठें असेल त्याप्रमाणें बेतबात चांगला असतो. टेबलांच्या रांगाचा रांगा लागल्या असतात. त्यांजवर पांढरें सफेत कापड घातलें असतें आणि दिव्यांचा झळझळाट केला असतो. रुप्याच्या अथवा रुपेरी मुलाम्याच्या भांड्यांची आणि बशांची किंवा तबकड्यांची एकच गर्दी झाली असते.

बहुतेक जेवण होत आल्यावर ते एकमेकाच्या शरीरीं सुख चिंतून मद्य पिऊं लागतात आणि त्या समयीं भाषणें करितात, तो प्रकार पाहण्यासारखा असतो. कितीएक प्रमुख गृहस्थ हातीं दारूचीं गलासें घेऊन उभे राहतात, ह्मणजे मग जेवायाला बसलेले इतर पुरुषही हातीं दारूचीं गलासें घेऊन त्यांजबरोबर उठून उभे राहतात. प्रथम एकजण उठून श्रीमन्महाराणीस आरोग्य ह्मणजे शरीरीं सुख चिंतून तें मोठ्यानें बोलून सर्वांस प्रदर्शित करितो, आणि कदाचित् तत्संबंधीं कांहीं भाषणही करतो. नंतर "हुर्रे" असा हर्षघोष करून दारू पितात. नंतर दुसरा कोणी तरी उठून महाराणीच्या कुटुंबाच्या मनुष्यांस आरोग्य चिंतितो, त्याजबरोबर प्रथमप्रमाणेंच इतरही उठतात, आणि भाषण झाल्यावर "हुर्रे" हा आनंदध्वनि करीत करीत दारूचीं गलासें पितात.

मग तिसरा पुरुष उठून इंग्लंडच्या लश्कराचें आणि त्यानंतर अमीराचें आरोग्य चिंतितो. पांचवा उठून, ज्या पुरुषाला ती मेजवानी केली असेल त्याच्या शरीरीं सुख इच्छितो; आणि सहावा यजमा-

नाच्या ह्मणजे मेजवानी करणाऱ्याच्या शरीरीं सुख इच्छितो. याप्रमाणें एकामागून एक पुरुष उठतो तेव्हां पहिल्याप्रमाणेंच सर्व लोक हातांत गलासें घेऊन उठतात, आणि भाषणें होतात तीं मोठ्या खुशीनें व प्रेमानें ऐकतात, आणि दर वेळेस भाषण झाल्यावर आरोग्याचें (किंवा शरीरसुखाचें) गलास पितात. भाषणें होतात त्यांत कित्येक अगत्याच्या गोष्टींविषयीं मोठमोठ्या प्रख्यात आणि विद्वान् पुरुषांचे निरनिराळे अभिप्राय प्रदर्शित केले असतात. ते मागाहून वर्तमानपत्रद्वारें प्रसिद्ध होऊन सर्व लोकांस विदित होतात.

अशा भोजनसमयीं दारू मुळींच घेतली नाहीं, तर ही जेवणाची रीति चांगली वाखाणण्यासारखी आहे खरी. अशा प्रसंगीं जी दारू आणली असते ती फार उंची असते आणि ती आपला दुर्गुण करी इतकी ते बहुधा पीत नाहींत. कित्येक तर फारच थोडी पितात हें खरें आहे, तथापि मला असें वाटतें कीं ह्या अमली पदार्थाचा उपयोग होईल तितका कमी करावा हें चांगलें. पृथ्वीवर सुधारणुकीबरोबर मद्यपानाचा प्रसार होत आहे ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. आमचे कित्येक स्वदेशीय लोक दारू पिणें हीच सुधारणा असें समजतात, परंतु माझ्या मतें, ही त्यांची फारच मोठी चूक आहे.*

आपणांमध्यें श्रीमान् लोक जातिभोजनें करतात त्यांत अशा शेंकडो लोकांस बोलावितात कीं त्यांची ह्यांची मुळींच ओळ-

*आमचे कित्येक लोक असें समजतात कीं विलायतेसारख्या थंड देशांत मद्य प्याल्यावांचून चालतच नाहीं, परंतु ही चूक आहे. विलायतेंत कितीएक लोक "टीटोटलर्स" ह्मणविणारे आहेत ते दारू मुळींच पीत नाहींत इतकेंच नाहीं, तर औषधासाठीं मात्र घ्यावी लागली तर घ्यावयाची त्याशिवाय कधीं घ्यावयाची नाहीं, अशी प्रतिज्ञा करितात.

ख नसते. विलायतेंत श्रीमान् लोक मोठीं जेवणें करितात त्यांत आपल्या स्नेह्यांस व ओळखीच्यांस मात्र आमंत्रण करितात. दुसरें, आपणांमध्यें श्रीमान लोकांचें पाहून मध्यम प्रतीचे लोक जातिभोजनें करूं लागले आहेत इतकेंच नाहीं, तर गरीब लोकही करूं लागले आहेत. यामुळें लग्न किंवा गर्भाधान किंवा मेलेल्याचें उत्तरकार्य करावयाचें असलें ह्मणजे, दमडी दमडीची कसर करून सांठवलेलें सर्व द्रव्य एकदम उधळून टाकतात इतकेंच नाहीं, तर जवळचा पैसा पुरला नाहीं तर कर्ज काढून कार्य उरकून घेतात.

अशा रीतीनें कर्ज काढून अथवा शक्तीच्या बाहेर तारंबळ करून मोठीं जेवणें करण्याची चाल विलायतेंतील गरीब लोकांत किंवा मध्यम प्रतीच्या गृहस्थ लोकांत मुळींच नाहीं. आपल्या हिंदुलोकांत सर्वांस सगळ्यांत मोठी काळजी ती ही असते कीं कांहीं लग्नकार्य झालें किंवा कोणी मेलें तर मोठा खर्च करून जातिभोजन घालावें आणि कीर्ति मिळवावी. असा पोकळ डौल विलायतेंतील लोकांमध्यें फार करून दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. मी पूर्वींच सांगितलें आहे कीं ते लोक मोठमोठीं जेवणें करण्याची काळजी न बाळगतां, आपल्या मुलांकडून चांगला विद्याभ्यास करविण्याविषयीं काळजी अधिक बाळगतात. आपले लोक अशी काळजी बाळगतील तर किती चांगलें होईल, बरें. !

मी अमदाबादेस गेलों होतों† तेव्हां माझे मित्र रावसाहेब महीपतराम रूपराम, तेथील "ट्रेनिंग कॉलेजा" चे प्रिन्सिपाल (मुख्य) यांणीं कालेजांतील विद्यार्थ्यांचीं आंथरूणें मला दाखविलीं. त्यांत रूतर मुळींच नव्हता, सर्व फाटक्या तुटक्या मळकट चिंध्या होत्या. परंतु ह्या विद्यार्थ्यांनीं आपल्याच तोंडानें आह्मांस असें सांगितलें कीं

† December, 1865.

आमच्या एथें कोणाचें उत्तरकार्य झालें तर जातिभोजनास दीड दोन हजार रुपये खर्च केल्यावांचून आह्मांस सुटका नाहीं. हाय हाय! ज्या गरीब व मध्यम स्थितींतल्या लोकांवर हा जबरदस्त कर आहे त्यांची स्थिति कशी सुधरेल!

## १०. आदरआतिथ्य.

HOSPITALITY.

इंग्लिश गृहस्थाच्या आदरआतिथ्यानें आपणास संतोष झाल्या-वांचून राहणार नाहीं. आपण आपल्या कोणा स्नेह्याच्या एथें त्यास भेटावयास गेलों असतां, आपण त्याच्या दिवाणखान्यांत जातांच तो आणि त्याची बायको उभयत उठून उभीं राहतील, आणि मोठ्या प्रेमानें आपणाबरोबर "शेकहांड" करून ह्मणजे हात हालवून आपणास खुर्चीवर बसवतील. सुमारें पंचवीस वर्षांपूर्वीं विलायतेस जाऊन आलेल्या दोन पारशी गृहस्थांनीं आपल्या अनुभवावरून याविषयीं मजकूर लिहून ठेविला आहे तो सत्य आहे, अशी अनुभवावरून माझी खात्री झाली आहे. याजकरितां त्यांचेच शब्द एथें उतरून घेतों:—

"We would prepare such of our countrymen as may visit England, to expect a hearty welcome, and a friendly shaking of the hands, much courtsey and great kindness from all with whom they become intimate. Males and females, old and young, all strive in their respective ways to do some thing to make you pleased and happy or, to use their own strictly English word, *comfortable*. You have only to express that you like this thing or dislike that, and if it is in their power your wishes and views will be met.*"

"आमचे जे देशबंधु विलायतेस जाणार असतील त्यांस आमचें असें सांगणें आहे कीं, विलायतेंत ज्यांशीं तुमचा परिचय होईल ते सर्व तुमचें चांगलें आगतस्वागत करतील, तुह्माबरोबर मोठ्या प्री-

* Journal of a Residence in Great Britain; p. 455-56

तीनें हात हालवितील आणि बहुत आदरोपचार व ममता करतील. पुरुष आणि स्त्रिया, तरुण आणि वृद्ध, सर्व तुह्मास संतुष्ट व सुखी करण्याविषयीं आपणाकडून होईल तितकें करतील. आह्मास अमकी वस्तु पाहिजे किंवा अमकी नको, इतकें तुह्मी ह्मटलें ह्मणजे पुरे; त्यांच्या हातीं असल्यास ते तुमच्या इच्छा पुरविल्यावांचून राहणार नाहींत."

इंग्रज लोकांचें आदरआतिथ्य याप्रमाणें चांगलें आहे. हे आपले प्रथम गेलेले देशबंधु यांच्या अनुभवास तें आलें तसेंच माझ्याही आलें, आणि मला असें वाटतें कीं माझे इतर मित्र विलायतेस जाऊन आले आहेत त्यांच्या तसेंच आलें असेल.

आदरआतिथ्यांत आमचे लोक मागें आहेत असें नाहीं, परंतु इतकेंच कीं विलायतेंतील लोकांस तें दाखवितां येतें तसें यांस येत नाहीं. इंग्लिश गृहस्थ आणि स्त्रिया जशा सभ्यपणानें आणि गोडभाषणानें अतिथीचें मन सुप्रसन्न करूं जाणतात, तसें आपल्या एथील लोकांस बहुधा करतां येत नाहीं. आपल्या देशांत मोठ्या शहरांपेक्षां लहान गावीं पाहुणचार अधिक दृष्टोत्पत्तीस येतो, तसाच प्रकार विलायतेंतही आहे.

## ११. बॉल—बायकांचा आणि पुरुषांचा नाच.

BALLS—DANCING.

इंग्लंडांत आणि युरोपखंडांतल्या सर्व सुधारलेल्या देशांत, मोठ्या सणवारीं किंवा कांहीं मोठ्या प्रसंगीं पुरुषांनीं आणि बायकांनीं बरोबर नाचण्याचा प्रघात आहे. ह्या नाचांत स्त्रिया आपापल्या भ्रतारांबरोबर क्वचितच नाचतात; त्या बहुतकरून परक्या पुरुषांबरोबर नाचतात. आपल्या देशांतही पूर्वीं स्त्रियांनीं व पुरुषांनीं एकत्र नाचावयाची चाल होती असें मला वाटतें. श्रीमद् भागवतांत, कृष्ण व बळराम आणि गोपी यांच्या रासक्रीडेचें जें वर्णन लिहिलें आहे तें



"बॉल" म्हणजे स्त्रीपुरुषांचा नाच.



नाटकगृहांतील "ब्यालेट" नामक नाच.



Specially prepared for "Karsandas Travels in England."

Maclure, MacDonald & Macgregor Lith$^{rs}$ London

त्या वेळच्या चालीवरूनच त्यास सुचलें असावें. मी ह्या चालीचा धिःकार करतों असें नाहीं. परंतु स्त्रियांनीं आणि पुरुषांनीं परस्पर अंगास अंग लागे अशा रीतीनें नाचणें हें माझ्या मनाला अगदीं ठीक वाटत नाहीं.

बॉलामध्यें नाचण्याचे प्रकार पुष्कळ आहेत. तीनशें निरनिराळ्या प्रकारांनीं नाचतां येतें ह्मणून सांगतात. इंग्लंडांत नाचण्याच्या दहा बारा चाली आल्या ह्मणजे अधिक चाली शिकण्याविषयीं तेथील लोक श्रम घेत नाहींत. फ्रेंच, जर्मन आणि त्याप्रमाणेंच रूस लोक यांची ह्या प्रकारच्या नाचांविषयीं आख्या आहे. नाचण्याच्या निरनिराळ्या प्रकारांस निरनिराळीं नांवें आहेत. त्यांमध्ये क्वाड्रिल आणि वाल्ट्झ या नाचांत पुरुष बायकोची कंबर धरून दोघें एकमेकांस बिलगून नाचतात. ह्या नाचांत पाहिजे तशी खुबी असो, परंतु मी पुनरपि असें ह्मणतों कीं येणेंकरून नीतीचा भंग होण्यास खचित प्रारंभ होतो. जेव्हां स्त्री पुरुषांचीं अंगें एकमेकांस लागतात तेव्हां, मनुष्यजातीस स्वाभावें करून जी चेतना होणार तिला प्रतिबंध करणें फार कठीण आहे, असें मला वाटतें.

माझी ही समजूत खोटी आहे असें एका इंग्लिश गृहस्थानें, ह्या पुस्तकाची पहिली आवृत्ति छापल्यानंतर, मला सुचविलें. त्याचें माझें मत जमत नाहीं ह्मणून मला फार वाईट वाटतें; परंतु माझ्या ह्या विचारास दृढीकरण आणणारें एका इंग्लिश ग्रंथकाराचें मत* पाहण्यांत आलें आहे, त्याचा एथें उतारा घेऊन हा विषय पुरा करतों.

"Gentlemen themselves have frequently been heard to say, 'Though I waltz myself, I should not wish to see my daughter or sister waltz, or the woman I might think of for a wife.'"

"मी कित्येक (इंग्लिश) गृहस्थांस पुष्कळ वेळां असें ह्मणतांना ऐ-

* English Life, Social and Domestic; p. 92, 95.

किलें आहे कीं मी जरी वाल्ट्झ नाच नाचतों तरी माझ्या मुलीनें किंवा माझ्या बहिणीनें किंवा ज्या स्त्रीबरोबर लग्न लावण्याचा माझा बेत असेल तिणें हा नाच नाचणें हें मला आवडणार नाहीं. आणि तोच ग्रंथकार आणखी असें ह्मणतो कीः—

"Foreigners justly reproach us with the fact that while we sneer at their *mariages de convenances,* we adopt (too many of us at least) a means towards the same end, by which we essentially compromise both the dignity and delicacy of our daughters and ourselves."

"परदेशस्थ लोक आपणाला दूषण लावितात तें कांहीं खोटें नाहीं; कारण आपण त्यांच्या लग्नाच्या रीतीस हंसतो आणि पुनः आपणच लग्न करतांना बॉल वगैरे उपायांची योजना करितों, आणि तेणेंकरून आपली व आपल्या मुलींची प्रतिष्ठा आणि मर्यादा यांला खरोखर धोका आणितों." आणि हें वास्तविक आहे कीं कित्येक बालनाचण्याच्या चालींत स्त्रीजातीचा मान आणि प्रतिष्ठा राहतच नाहींत.

## १२. लग्न.

COURTSHIP AND MATRIMONY.

विलायतेंत फार करून लहान बयाच्या मुलांचीं लग्नें होत नाहींत. तेथें बहुतेक लोक असें समजतात कीं लग्न करण्याची शक्ति आणि तशीच अनुकूलता असली आणि जोडा बरोबर जमत असला तरच लग्न करावें. शक्ति नसतां लग्नाचा बोजा उंचलून संसारखटल्यांत पडावें, आणि जोडा जमत नसला तरी "आंधळ्याला बहिरी" आणि, "वेड्याला लंगडी", कसें तरी एकदां लग्न करावें अशी विलायतच्या लोकांची समजूत नाहीं. आपल्या पदरीं गरिबी असतां संसाराचा बोजा उंचलून दुःख पावावें किंवा वाईट जोडा जोडून संसारसुखांत जहर घालावें, त्यापेक्षां लग्न न करतां तसेंच राहावें हें फार चांगलें, असें ते लोक समजतात.

आपल्या देशांत तसें नाहीं. ह्या देशांत आईबापांला मुख्य काळ-जी इतकीच असते कीं, एकदां आपल्या मुलांबाळांचीं लग्नें झालीं आणि तीं आपापला संसार करूं लागलीं ह्मणजे झालें. ह्या समजु-तीमुळें तीं सामर्थ्य नसलें तरी, व जोडा नीट जमत नसला तरी, ल-हानपणींच आपल्या मुलांचीं लग्नें करून सोडतात. मुलगा मोठा होऊन, कांहीं कामधंद्यास लागण्याच्या अगोदरच त्यास मुलें हो-तात, आणि तितक्यांत त्याच्या आंगावर संसाराचें ओझें येऊन पडतें; आणि त्या बापड्याला दरिद्रावस्थेंत दुःखानें दिवस काढावे लाग-तात. जोडा नीट नसला ह्मणजे दादलाबायकोस एकमेकांचें तोंड पाहणें आवडत नाहीं, आणि तेणेंकरून कुटुंबांत कलह आणि क्लेश उत्पन्न होतात.

आपल्या एथें तरुण पुरुषाचा विद्याभ्यास पूर्ण होण्यापूर्वींच प्रपं-चाचें जुकड त्याच्या मानेवर येऊन बसतें. तो घरीं गेला ह्मणजे त्या-चें मन आपल्या बायकोकडे धांवेल किंवा हातांत वाचावयासाठीं ह्मणू-न घेतलेल्या पुस्तकाकडे लागेल? अहो, हा एवढ्या मोठ्या बायकोचा दादला असतां आणि एकदोन मुलांचा बाप झाला असतां, ह्याचें चि-त्त शिकण्याकडे कसें बरें लागेल? त्या बापड्याला आतां पाटी व पुस्तक काखेंत मारून शाळेंत जाणें ह्मणजे मोठी लाज, ह्मणून कांहीं तरी कामधंदा शिकून मोठे माणसांत खपणें भाग पडतें. हाय हाय! ज्या देशच्या पुरुषांचें तरुणपणचें वीर्य पक्व दशेस येण्यापूर्वींच खर्च होतें त्या देशच्या लोकांच्या ठायीं वीर्य कोठचें असणार! अरेरे! ज्या देशांतल्या लोकांच्या गळ्यांत लहानपणींच संसाराचें जुकड प-डतें, त्यांतील लोकांकडून बहुत अध्ययन आणि दूरचें देशाटन को-ठून घडणार?

विलायतेंत मुलगा बावीस आणि मुलगी वीस वर्षांची झाली ह्म-

णजे तीं लग्नास योग्य झालीं असें समजतात. आपल्या देशांत मुलगा बारातेरा वर्षांचा झाला आणि मुलगी नऊदहा वर्षांची झाली ह्मणजे तीं लग्न करण्याजोगीं झालीं. कित्येक आईबापें याजपेक्षांही लहानपणीं आपल्या मुलांचीं लग्नें करून देतात. आपल्या देशांत बाराव्या तेराव्या वर्षीं मुलीस ऋतु प्राप्त होतो, आणि ती बायकोशी दिसूं लागते. विलायतेंत तसें नाहीं. याचीं दोन मुख्य कारणें आहेत. एक हवा आणि दुसरें, वागवणूक. उष्ण हवेमुळें आणि तसेंच वाईट वागवणुकीमुळें रजोदर्शन लौकर होतें. मुलगी नुकती बोलायाला चालायाला शिकते इतक्यांतच तिच्या समक्ष तिच्या लग्नाच्या आणि संताराच्या गोष्टी बोलण्यास आईबापांस कांहीं वाटत नाहीं.

आपलीं मुलें लहान असतांच नवरानवरीचा खेळ खेळतात. "चल मी होतों तुझा नवरा आणि तूं हो माझी नवरी" असें ह्मणून तीं खेळावयास लागतात. विटाळशी ह्मणजे काय इत्यादि ज्या गृहसंबंधी गोष्टी विलायतेंत गृहस्थांच्या मुली मोठ्या होत तोंपर्यंत त्यांच्या कानीं देखील पडत नाहींत, ज्या गोष्टी ऐकणें लांब राहून, त्यांचें मन विद्याभ्यासांत गुंतलें असतें त्या, आपल्या मुलींच्या कानीं बाळपणापासूनच पडूं लागतात, आणि त्या समजूं लागल्या ह्मणजे त्यांचें ध्यानमन सर्व त्यांतच निमग्न होतें. ज्या देशांतल्या मुलींस लहानपणापासूनच अशी शिक्षा मिळते त्या देशच्या मुली लौकर वयांत येतात आणि बायका होतात यांत नवल तें कोणतें?

विलायतेंत स्त्री आणि पुरुष एकमेकांला पाहून सवरून व पसंत करून लग्न करितात; आणि आपल्या देशांत मुलांचा लग्न करण्याचा अधिकार सर्व त्यांच्या आईबापांच्या हातीं आहे. आईबाप मनास वाटलें तर आपली नऊ किंवा दहा वर्षांची कन्या साठ वर्षांच्या थेरड्याला देऊं शकतात; तसेंच आपल्या सुंदर मुलाच्या गळीं एकादी काणी कोंजी

मुलगी बांधू शकतात. विलायतेंत तसें नाहीं. आपल्या देशांत पहिल्याने स्वयंवराची चाल होती. याजविषयीं पुराणांतरीं पुष्कळ प्रमाणें आढळतात. स्वयंवरांत स्त्री आपल्या मर्जीस येईल त्या पुरुषास माळ घालीत असे. ज्या घोवबायलांस एकमेकांचें तोंड पाहणें आवडत नाहीं, तो जोडा काय कामाचा? अशा प्रकारचीं लग्नें नकरता, मुलें तशींच ठेवलीं तर बरें. स्वयंवर करण्याची चाल पुनः आपल्या देशांत चालू झाली पाहिजे, आणि वधुवरें वयांत येऊन एकमेकांचा स्वभाव वगैरे जाणून व एकमेकांस पसंत करून लग्न करतील असें झालें पाहिजे. यासाठीं प्रथम स्त्रियांस पुरुषमंडळींत जाण्यायेण्याची आणि बोलण्या चालण्याची मोकळीक असली पाहिजे. जोंपर्यंत आपल्या स्त्रियांस आणि जाणत्या मुलींस चौघांत प्रसिद्ध ठिकाणीं हिंडण्या फिरण्याविषयीं प्रतिबंध आहे, तोंपर्यंत नवरानवरीनें एकमेकांचा स्वभाव जाणून स्वसंतोषानें व प्रीतीनें परस्परांस वरण्याचा प्रकार चालू होणें नाहीं.

विलायतेंत स्त्रीपुरुष एकमेकांस पाहून सवरून आपल्या मर्जीप्रमाणें कसें लग्न करितात आणि लग्न समारंभ व तत्संबंधी रीति तेथें कशा आहेत याजविषयीं संक्षिप्त रीतीनें सांगण्याची मी आज्ञा घेतों.* कोठें तरी सभेंत किंवा मेजवानींत किंवा नाचांत स्त्रीपुरुषांची ओळख एकदां झाली ह्मणजे, एकमेकांचे घरीं भेटीकरितां जाण्यायेण्याची सुरवात होते; आणि मग हळूहळू त्यांच्या ठायीं परस्परांविषयीं प्रीति उत्पन्न होऊं लागते. याप्रमाणें प्रीति जडल्यावर एकमेकांचें मनोगत समजणें कठीण खरें, तथापि पुष्कळदां येण्याजाण्याचा परिपाठ असल्यानें, गोष्टीमाता करतांना, किंवा हात हालवितांना, एकमेकांकडेस निरखून पाहतांना, एकमेकाचें हृद्गत परस्परांस समजतें. आपणावर हिची प्रीति आहे अशी याप्रमाणें एकदां इशारत झाली ह्मणजे

* "Courtship and Matrimony."

तो पुरुष त्या स्त्रीस एकांतीं भेटून तोंडोंतोंड आपलें मनोगत कळवितो, नाहीं तर त्याच अभिप्रायाचें पत्र तिला लिहितो; ह्मणजे मग तिची मर्जी असली तर ती आपल्या आईबापांचें संमत घेऊन त्याच्या ह्मणण्यास आपला रुकार देते.

दोघांचें मन एकमेकांवर जडलें ह्मणजे मग, तो पुरुष चांगल्या कुळांतला आहे किंवा नाहीं, आणि आपल्या मुलीचें चांगल्या रीतीनें पालनपोषण करण्यासारखा आहे किंवा नाहीं, इतकीच चौकशी आईबाप करितात. कित्येक लग्नें आईबापांचे इच्छेविरुद्ध गुप्त होतात; परंतु अशा गुप्त रीतीनें लग्न करण्यांत स्त्रीस आणि पुरुषास दोघांसही लांछन आहे; ह्मणून बहुतकरून आईबापांच्या संमतानेंच लग्न होतें. कधीं कधीं मुलीच्या आईबापांच्या मनांत एकादा देखणा तरुण पुरुष भरला तर तीं त्याची आणि आपल्या मुलीची गांठ पडे असें करतात, आणि नंतर जर ती त्या उभयतांची प्रीति एकमेकांवर जडली, आणि त्यांची मर्जी असली, तर लग्न सजण्यास विलंब लागत नाहीं.

लग्नाचा निश्चय झाल्यानंतर लग्न होण्यास कांहीं दिवस लागतात. तितक्या काळांत पुरुष योजिलेल्या स्त्रीची चालचर्या पाहून तींत कांहीं कमीजास्ती वाटलें तर तिला त्याविषयीं सूचना करतो. ती तर आपल्या प्रियाचे शब्द झेलावयास अगदीं तयारच असते, ह्मणून त्याजकडून सूचना होतांच तिकडे आपलें लक्ष पोंचवितें, आणि त्याप्रमाणें चालूं लागते. परंतु जर कदाचित् ह्या मुदतींत दोहोंपैकीं एकाच्या आंगीं कांहीं मोठा दुर्गुण किंवा दोष आहे असें जाणण्यांत आलें तर हा संबंध तोडतां येतो. परंतु तो सबळ कारणावांचून बहुतकरून तोडीत नाहींत.

लग्नाचा दिवस ठरविण्याविषयीं नवऱ्याकडून कित्येक वेळां विनंति झाल्यावर नवरीकडून दिवस ठरविण्यांत येतो. बहुतकरून लग्न देव-

ळांत सकाळचे आठ वाजल्यापासून बारा वाजत तोंपर्यंत होतें. साधारण लोक साधारण "लैसेन्स" ह्मणजे परवाना काढून लग्न करतात. श्रीमान लोक "स्पेशल लैसेन्स" काढितात. "स्पेशल लैसेन्स" देण्याचें काम सर्वांत मोठा आचार्य "आर्चबिशप-ऑव-कांतर्बरी" याजकडे आहे. तो काढायाला दोनशें रुपये लागतात.

लग्नाचा दिवस निश्चित झाल्यावर मुलीचा बाप आपल्या शक्तीप्रमाणें आणि योग्यतेप्रमाणें पोशाकाबद्दल कांहीं ऐवज तिला देतो, आणि त्याप्रमाणेंच सोयरेधायरे इष्टमित्र ही आपलें नातें किंवा संबंध असेल त्याप्रमाणें कांहीं उपयोगी पडण्यासारख्या वस्तु तिला देतात. इकडे वर लग्नाच्या आंगठ्या करवून लग्नाचे दिवशीं त्या खिशांत घालून देवळांत जातो, आणि तेथें पाद्री ज्या वेळेस त्या वधूवरांचे हात एकत्र धरून तोंडानें आशीर्वचन ह्मणतो, त्या वेळेस एक तिच्या हातांत घालतो आणि एक आपल्या हातांत घालतो. लग्नाच्या दिवशीं कन्येच्या नातलगांशिवाय बहुतकरून इतर फारसे बोलावले नसतात.

लग्नांत मदत करण्यासाठीं ह्मणून वर आपल्या कित्येक अविवाहित मित्रांस वरसखे (Bridegroomsmen) करतो आणि त्याप्रमाणेंच नवरी आपल्या कित्येक मैत्रिणींस वधूसख्या (Bridesmaids) करते. लग्नाच्या आदले दिवशीं नवरानवरी आपापल्या साहाय्यकारी सख्यांस एकेक पांढरा हातमोजा पांढऱ्या कागदांत गुंडाळून पांढऱ्या दोरीनें बांधून पाठवितात.

लग्नाच्या दिवशीं ठरविलेल्या वेळीं नवरा देवळांत जाऊन नवरीची वाट पाहात बसतो. इतक्यांत ती आपल्या बापाबरोबर गाडींत बसून घरून निघते. तिचे सोयरेधायरे आणि नवऱ्याचे मित्रही सर्व नवरीच्याच घरून निघून देवळांत येतात. त्या दिवशीं नवरी पांढरा शुभ्र पोशाक करून तोंडावर पांढराच जाळीचा बुर्खा टाकिते. नव-

ऱ्याचा डगला किंवा अंगरखा अस्मानी रंगाचा असून आंतली बंडी पांढऱ्या साटनीची असते. नवरी देवळांत आली ह्मणजे नवरा पुढें जाऊन आपल्या डाव्या हातांत तिचा उजवा हात घालून पाद्री जेथें लग्नविधि करणार असेल तेथें तिला घेऊन जातो. त्यांच्या बरोबरच मुलीचा बाप चालतो, आणि नवऱ्याचा बाप असला तर तो नवरीच्या आईच्या हातांत हात घालून चालतो.

लग्न लागते वेळीं नवरा उजवीकडे आणि नवरी डावीकडे अशीं उभीं राहतात. मुलीचा बाप पाठीमागें जवळच उभा राहतो, आणि त्यांचे हात मिळवावयाची वेळ आली ह्मणजे मुलीचा हात नवऱ्याच्या हातांत देतो. विधि होतो तेव्हां नवरी ह्मणते मी आपल्या पतीचा मान ठेवीन आणि त्याच्या आज्ञेंत वागेन. तसेंच मी आपल्या पत्नीचें योग्य रीतीनें पाळणपोषण करीन, वगैरे नवरा ह्मणतो. विधि उरकला ह्मणजे देवळाची घांट वाजते आणि लग्न लावणारा पाद्री नवरानवरी इत्यादिकांशीं हात हालवितो. नवरी एका पंथाची आणि नवरा दुसऱ्या पंथाचा असला, तर दोहों पंथांच्या देवळांत एकाच दिवशीं लग्नाचा सर्व प्रकार त्या त्या पंथाप्रमाणें होतो.

देवळांतून निघून नवरानवरी एकत्र एका गाडींत बसतात आणि त्यांच्या मागें त्यांच्या आप्तविषयांच्या गाड्या चालतात. तीं सर्व नवरीच्या घरीं जाऊन उतरतात. तेथें मोठी जेवणाची तयारीच असते. टेबलावर लग्नाचें पक्वान्न (Wedding cake.) उत्कृष्ट करून ठेवलेलें असतें. हें पक्वान्न खाण्याच्या पूर्वीं नवऱ्याच्यातर्फेचा कोणी पोक्त वयाचा पुरुष उभा राहून असें ह्मणतो कीं "नवरीला आरोग्य असो" याप्रमाणें टेबलावर जेवतां जेवतां दोन तास आनंदानें काढतात. नंतर नवरी उठून दुसऱ्या खोलींत जाते.

नंतर नवरा जरा खिन्न होऊन आपल्या अविवाहित मित्रांला शेव-



लग्नविधि.



मेजवानी.



Specially prepared for "Karsandas Travels in England"

Maclure Macdonald & Macgregor Lith.rs London

टचा सलाम करितो. कारण त्या दिवसापासून अविवाहित मित्रांस आपल्या घरीं बोलावणें करणें त्यास सोडून दिलें पाहिजे. मग त्या मित्रांपैकीं एक जण उठून नवऱ्यास अभिनंदन करितो. नंतर नवरा उठून जातो आणि आपला पोशाक ठेवून वाटेच्या कामास योग्य असा नवा पोशाक करून येतो. नवरीही आपला पोशाक बदलून नवऱ्याबरोबर बाहेरगांवीं जाण्यास तयार होते. माहेर सोडून जातांना तिच्या डोळ्यांतून पाणी येतें. ती कांहीं वेळ आईच्या मांडीवर डोकी ठेवून रडते, नंतर बाप तिचा हात धरून मुका घेतो आणि तिला नवऱ्याच्या स्वाधीन करतो. नवरा तिचा हात धरून तिला गाडींत बसवितो, आणि आपण हात उंचलून सर्वांस सलाम करीत करीत गाडींत बसून निघून जातो. ह्या वेळीं वधूवरांच्या गाडीवर मागून जुने जोडे उडविणें हा मोठा शुभ शकून समजतात; आणि त्याप्रमाणें ही पुरातन आणि जंगली चाल विलायतेंत उंच प्रतीच्या लोकांत देखील अजून चालत आहे, हें पाहून आपणास खचित मोठें आश्चर्य वाटतें.

नंतर लागलींच तीं उभयतां महिना सवा महिना "हनीमून" ( Honeymoon ह्मणजे प्रथम यौवनसुख) भोगण्यासाठीं कोठें बाहेरगांवीं जातात. तीं कोणत्या एकाद्या हॉटेलामध्यें उतरून तेथेंच प्रपंचसुखाचा प्रथम स्वाद घेतात. महिना सवा महिना "हनीमून" भोगल्यावर तीं आपल्या गांवीं परत येतात आणि संसार करूं लागतात.



# प्रकरण ९.

## इंग्रज लोकांचे सामान्य गुण.

### IX.—GENERAL CHARACTER OF THE NATION.

इंग्रज लोकांचे कित्येक गुण माहीत करून घेऊन विचार करण्याजोगे आहेत. याच गुणांच्या योगें इंग्लंडांतील लोक पृथ्वीवर मोठेपणा भोगीत आहेत. आणि त्या देशांत संपत्ति, विद्या व कलाकौशल्य यांचा प्रसार झाला आहे, आणि फलद्रूप अशा हिंदुस्थानावर व एथील असंख्यात लोकांवर तो देश सत्ता व आधिपत्य भोगीत आहे हें सर्व या गुणांमुळेंच होय. यासाठीं इंग्रज लोकांचे जे कित्येक सामान्य गुण आहेत त्यांविषयीं आपण माहिती करून घेऊन विचार केला पाहिजे आणि या विचाराकडेस आपल्या लोकांचें विशेष लक्ष लागलें पाहिजे.

#### १. उद्योग.

INDUSTRY.

इंग्रज लोकांच्या सर्व गुणांत मोठा गुण ह्मटला ह्मणजे त्यांचा उद्योग. ज्या देशांत उद्योग फार तेथील लोकांची संपत्ति आणि बळ अधिकाधिक वृद्धि पावतात; परंतु ज्यांचा उद्योग कमी ते दिवसानुदिवस द्रव्यहीन व बळहीन होत जातात. आपल्या देशांत उद्योग अगदीं नाहीं असें मी ह्मणत नाहीं; परंतु इंग्लंडापेक्षां आपल्या इकडेस उद्योग फारच कमी असें मी खात्रीनिशीं ह्मणतों. आपल्या देशांत शरीराचा कांटा करून मेहनत करणारे असे पुरुष थोडेच मिळतील; परंतु इंग्लंडांत असे माणूस जिकडे तिकडे आढळतात.

इंग्लंडांतील लोकांचा उद्योग पाहून मला मोठा अचंबा वाटला. त्या लोकांत गरीब व लहान यांपासून श्रीमान् व थोर या सर्वांस उद्योग जडला आहे. आपण कोठें गेलों व कोठेंही पाहिलें तरी उद्योग चा-

ललाच आहे असें आपल्या नजरेस येतें. विलायतेंतील लोक जसे पैसा उत्पन्न करण्याची कळा जाणतात तशी आपणास मुळींच माहीत नाहीं असें जें आपल्या लोकांचें ह्मणणें आहे तें खोटें नाहीं. ही गोष्ट खरी, परंतु त्यांची कळा काय ती सर्व उद्योगांतच आहे. आपल्या देशांतील मोठा कसबी ह्मटला ह्मणजे त्यामध्यें निरूद्योगीपणा हा दुर्गुण असायाचाच. आपले कारागीर हरएक काम घेतात आणि त्याबाबद वायद्यावर वायदे करतात. तेणेंकरून काम देणारास कंटाळा येतो. याचें कारण हेंच कीं या लोकांत जितका उद्योगीपणा असावा तितका नाहीं.

मी आपल्या देशांतील कित्येक कारागिरांस चांगलें ओळखतों. त्यांच्या आंगीं जर उद्योगीपणा असेल तर ते आज मोठे असामी होउन बसतील. या पुस्तकावरूनच मला एक दाखला आठवतो. हें पुस्तक छापण्याचे ठसे करणारा एक कसबी लोहार आहे. तो जर उद्योगी मनुष्य असता तर आज मोठाच बनून गेला असता. कारण त्याच्या बरोबरीचें काम करणारा आज मुंबईंत दुसरा कोणी नाहीं. विलायतेमध्यें असे लोक पुष्कळ सांपडतील कीं जे मुळचे गरीब स्थितींत असून केवळ आपला उद्योग व कसब यांच्या योगानें मोठे असामी होऊन बसले आहेत; आणि त्याप्रमाणेंच असेही पुष्कळ आहेत कीं जे मुळचे गरीब अवस्थेंत असतां मोठ्या पदवीस चढले आहेत.

इंग्लंडांतील गरीब व मध्यम स्थितींतील मात्र लोक उद्योगी आहेत असें नाहीं. तेथील श्रीमान्ही मोठे उद्योगी असतात. हे लोक पक्कें जाणतात कीं आपली दौलत व पदवी यावरूनच आपणास वास्तविक मान मिळणार नाहीं, तर तो मिळविण्यास पुष्कळ उद्योग केला पाहिजे. कारण द्रव्य आणि पदवी यांचा वारसा मिळूं शकतो, परंतु ज्ञान आणि शहाणपण यांचा मिळत नाहीं. कित्येक श्रीमंत

लोकांचा उद्योग पाहून आपणास अचंबा वाटल्याशिवाय राहणार नाहीं. हें ह्मणणें अगदीं वाजवी आहे याविषयीं मी एका प्रख्यात ग्रंथकाराचें मत एथें दाखल करितों :—

"It is principally in the department of politics and literature that we find the most energetic labourers among our higher classes. Success in this line of action, as in all others, can only be achieved through industry, practice and study; and the great minister or parliamentary leader, must necessarily be amongst the very hardest of workers. Such are Palmerston and Derby, Russell and Disraeli, Gladstone and Bulwer. These men have had the benefit of no Ten Hours Bill, but have often, during the busy season of Parliament, worked 'double shift,' almost day and night."

*Samuel Smiles.*

"विलायतेंतील श्रीमान् लोकांमध्यें मोठे मेहनती पुरुष ह्मटले ह्मणजे राज्यप्रकरणांत व विद्याप्रकरणांत आढळतात. इतर कामाप्रमाणेंच या कामांत गति करून घेऊन यश मिळविणें तर तें केवळ उद्योग, अनुभव व अभ्यास यांच्या योगानें होतें. प्रधान किंवा पार्लमेन्ट सभेंतील कोणतेही मोठे प्रमुख पुरुष यांविषयीं आपण चौकशी करूं लागलों तर, ते सर्वांपेक्षां अधिक मेहनत करणारे आहेत असें आपल्या नजरेस येईल. यास उदाहरणें, लॉर्ड पामर्स्तन, लॉर्ड डर्बी, लॉर्ड रसेल, डिझ्रायली, ग्लाड्स्तन, बुल्वर यांचीं होत. या पुरुषांस दिवसास दहा तास काम करून बाकी विश्रांति घ्यावी असें कधीं होत नाहीं; परंतु उलटें पार्लमेन्ट सभेचें काम चालत असलें ह्मणजे अहोरात्र एकसारखें काम करावें लागतें."

इंग्लंडांतील उदमी, व्यापारी आणि विद्याभ्यासी लोक यांमध्यें जो उद्योग दिसून येतो तो वाखाणण्या सारखा आहे. एका विद्याभ्याशाचा उद्योग माझ्या पाहण्यांत आला तो एथें सांगावा असें मला वाटतें. लंडन यूनिवर्सिटींत डाक्तर गोल्डस्तकर नामक जर्मन गृहस्थ संस्कृताचा

शिक्षागुरु आहे. तो मजवर आणि मजबरोबरच्या मित्रांवर बहुत लोभ करीत असे. आह्मी महिन्यांतून तीन चार वेळां त्याच्या घरीं त्यास भेटावयास जात असूं. आह्मांस पाहून त्याला फार संतोष होत असे. तो वयानें मोठा असून विद्यासंपादनार्थ इतका उद्योग करीत असे कीं तो पाहून आह्मांस आश्चर्य झालें व लज्जा वाटली.

त्याच्या घरांत जातांच आपणांस असें भासतें कीं आपण कोणा मोठ्या ऋषीच्याच घरांत आलों आहों. त्याच्या अभ्यासाच्या खोलींत संस्कृत ग्रंथ भरले आहेत. जेव्हां पाहावें तेव्हां त्याच्या टेबलावर संस्कृत पुस्तकें आहेतच. वेदआदि करून आमच्या धर्मसंबंधी ग्रंथांविषयीं त्याची माहीतगारी, शोध व अध्ययन पाहून आह्मांस फारच लज्जा झाली; लज्जा एवढ्यासाठीं कीं जें काम आह्मी करावें तें हा वृद्ध युरोपियन करीत आहे. वेद, स्मृति इत्यादिकांतलीं वचनें त्याच्या तोंडावर होतीं. त्यांचा अर्थ त्यास समजत असे, आणि आपल्या देशांतील विद्वानांनीं त्यांवर केलेल्या टीकांचेंही ज्ञान होतें. त्याणें पाणिनीच्या उत्कृष्ट व्याकरणावर एक ग्रंथ लिहिला आहे त्याची बहुत प्रशंसा झाली आहे. तो पाहून आह्मांस फार आनंद झाला.

त्याचा उद्योग एथेंच थांबला असें नाहीं. त्याणें आपल्या फुरसतीच्या वेळीं एक मोठा संस्कृत आणि इंग्रजी कोश करण्याचें काम हातीं धरिलें आहे. याशिवाय त्याणें महाभारताचें इंग्रजी भाषांतरही आरंभलें होतें, आणि त्याविषयीं त्याचा उद्योग पाहून आह्मी बहुत आश्चर्य पावलों. आपल्या एथें कित्येक जुने संस्कृत ग्रंथ छापतात ते एकाद्या हातानें लिहिलेल्या पोथीवरून छापतात, परंतु त्यांत लिहिणाऱ्याच्या अज्ञानपणामुळें व हस्तदोषामुळें कोठें कांहीं चूक पडलेली असली, तर दुसऱ्या जुन्या प्रतीबरोबर ताडून पाहून ती चूक शुद्ध केल्यावांचून छापतात.

यावरून ह्या डाक्तरानें आह्मास असें सुचविलें कीं तुमचे मोठमोठे अगत्याचे प्राचीन ग्रंथ छापणारांनीं, ज्या लिहिलेल्या प्रतीवरून ग्रंथ छापावयाचा, तींतील एकेक शब्द दुसऱ्या कित्येक जुन्या प्रतींबरोबर ताडून पाहिला पाहिजे, आणि ज्या ज्या ठिकाणीं पाठांत अंतर पडेल त्या त्या ठिकाणीं त्याविषयीं ग्रंथांत खालीं टीप घातली पाहिजे. त्याणें भारताचें भाषांतर करावयास लागण्याच्या अगोदर आपणाजवळची भारताची छापील प्रत ब्रिटिश म्यूझियमांतील प्रतीबरोबर शब्दशः ताडून पाहिली, आणि जेथें जेथें भेद आढळला तेथें तेथें खालीं टीप घातली. हें काम त्याणें मोठ्या मेहनतीनें व दम धरून केलें.

इतकें केल्यावर तो पारिस एथील पुस्तकालयांतील जुनी प्रत पाहण्यासाठीं त्या शहरीं गेला; आणि तेथेंही संपूर्ण महाभारताच्या दोन प्रती शब्दशः तपासून पाहून जो भेद दिसून आला तो टिपून घेतला. तेथें हें इतकें काम करून तो जर्मन देशांत गेला आणि तेथेंही हाच उद्योग चालविला. त्याणें अशा मोठ्या उद्योगानें आणि सतत श्रमानें हातानें लिहिलेलें टिपेचें पुस्तक दाखविलें तें पाहून आह्मास फार आश्चर्य वाटलें. ज्या ग्रंथाचें भाषांतर छापण्यास इतके श्रम आवश्यक आहेत त्याची आवृत्ति मूल भाषेंत छापावयास किती उद्योग केला पाहिजे बरें!

## २. चपळाई.

ACTIVITY.

इंग्लिश लोकांमध्यें दुसरा मोठा गुण चपळाई हा आहे. उद्योग असून चापल्य नसलें तर काम फार होणार नाहीं. कोणी स्थिमित मनुष्य कितीही उद्योगी असला तरी त्याच्या हातून बहुत काम व्हावयाचें नाहीं. आणि कित्येक कामें तर अशीं आहेत कीं तीं चापल्यावांचून केवळ उद्योगानें होतच नाहींत. विलायतेंतील लोकांची चपळाई आ-

णि झपाटा पाहून कोणासही अचंबा वाटल्याशिवाय राहणार नाहीं. त्यांणीं कोणतेंही काम हातीं धरिलें तरी त्यांत त्यांचें चापल्य लागलेंच दिसून येतें. हरएक काम कसें करावें आणि त्यांत चपळाई कशी चालवावी हें ते लोक बाळपणापासूनच शिकतात.

आपल्या लोकांमध्यें उद्योग कमी आहे त्याप्रमाणेंच चपळाईही कमी आहे. चपळाई कमी असल्यामुळें हरएक काम करण्यांत सुस्ती दृष्टीस पडते. एतद्देशीय लोकांच्या कामांत चापल्य नसण्याचीं चार कारणें आहेत. पहिलें कारण हें कीं त्यांस काम करण्याची हौस नाहीं. दुसरें, त्यांच्या आंगीं सुस्ती फार. तिसरें, त्यांजमध्यें कुवत किंवा शक्ति कमी; आणि चौथें, या देशाच्या उष्ण हवेमुळें मनुष्य लौकर थकतें. यांपैकीं पहिल्या दोन तीन कारणांस उपाय चालेल अशीं तीं आहेत.

प्रथम, आमच्या लोकांनीं आपल्या आंगीं चपळाई येण्यासाठीं, जें काम करावयाचें त्याजविषयीं मनांत उत्साह ह्मणजे हौस वाळगली पाहिजे; कारण उत्साह नसला तर कोणतेंही काम चांगल्या रीतीनें होत नाहीं इतकेंच नाहीं, तर तें करण्यांत चपळाई व त्वरा येत नाहीं. आळसा मुळेंही चापल्यास मोठा अटकाव होतो, ह्मणून आळसही सोडून दिला पाहिजे. लहानपणीं लग्नें होतात व कसरत किंवा शरीरशिक्षण मुळींच नाहीं यामुळें दर पिढीस आमच्या लोकांची शक्ति क्षीण होत चालली आहे आणि त्यामुळेंही त्यांच्या चापल्यास बाध येतो; याजकरितां बाळपणीं मुलांचीं लग्नें करण्याची चाल अगदीं बंद केली पाहिजे, आणि शरीरास कसरत केली पाहिजे.

## ३. ईर्ष्या.

EMULATION.

एकमेकांपेक्षां चांगलें होण्याची इच्छा इंग्लिश लोकांमध्यें अतिशय दिसून येते. मी आपल्या शेजाऱ्यास उद्योगांत आणि कामकाजांत

मागें टाकलें नाहीं, तर मीच मागें पडेन अशी चिंता विलायतेंतील लोकांमध्यें विशेष दृष्टीस पडते. अशा काळजीमुळें नेहमी सुधारणा होत चालली आहे, आणि नव्या युक्ति व शोध होत आहेत. प्रत्येक कारखानदार व कारागीर यास अशी काळजी असते कीं "मी कांहीं नवी युक्ति अथवा कळा न काढली तर माझा शेजारी माझी वाट पाहत बसणार नाहीं. त्याणें कांहीं नवी तऱ्हा काढली असतां माझा माल खपणार नाहीं, आणि मला नुकसान होईल." ह्मणून कांहीं नवी युक्ति किंवा कळा काढण्याकडे त्याचें मन सर्वदा लागलेलें असतें.

आपल्या देशांत असें नाहीं. "माझ्या शेजाऱ्यानें कांहीं नवी युक्ति शोधून काढून मला पाठीं पाडलें तर मला रखडावें लागेल" अशी काळजी आपल्या लोकांत फार करून नाहींच. जें काम आपल्या वाडवडिलांपासून चालत आलें त्यांत नेहमी सुधारणा करावी, व नव्यानव्या युक्ति शोधून काढाव्या, ही कल्पना आपल्या लोकांच्या मनांत येतच नाहीं. आपल्या एथें कोणतीही एक वस्तु पूर्वीं होत असे आणि आतां होत आहे त्यांत तिळमात्र सुधारणा दिसून येत नाहीं. याचें मुख्य कारण हेंच कीं ईर्ष्या ह्मणजे एकामेकांवर चढ करण्याची इच्छा आपल्या लोकांत तादृश नाहीं. ही ईर्ष्या आपल्या लोकांत येणार नाहीं तोंपर्यंत आपला देश सुधारणा आणि समृद्धि यांत असाच पाठीं पडत जाईल. अहो, आपण याप्रमाणें कोठवर पाठीं पडत जाणार?

### ४. श्रमविभाग.

DIVISION OF LABOUR.

श्रमविभागाचें वास्तविक रूप पाहावयाचें असलें तर तें विलायतेंतील लोकांमध्यें दृष्टीस पडेल. श्रमविभाग ह्मणजे काय हें कित्येक वाचणारांस कदाचित् ठाऊक नसेल. एकाच मनुष्यानें पुष्कळ कामांत हात न घालितां निरनिराळ्या मनुष्यांनीं निरनिराळीं कामें करावीं

याचें नांव श्रमविभाग. याचें मोल आपल्या लोकांस बहुतकरून समजत नाहीं. एका मनुष्याकडून होतील तितकीं कामें करवावीं आणि अधिक माणसें न लावितां "कसर" करावी याकडे आपल्या लोकांचें धोरण बहुतकरून असतें.

विलायतेंत तसें नाहीं. आपण जी "कसर" समजतों ती अंतीं नुकसान करिते. ज्यांस "पॉलिटिकल-इकॉनमी" ह्मणजे संपत्तिशास्त्र अवगत असेल त्यांस हें सांगण्याची गरज नाहीं. एका मनुष्याकडे एकच काम सोंपलें असतां तें त्याच्या हातून जशा चांगल्या आणि सोप्या रीतीनें होतें तशीं बहुत कामें त्याजवर टाकलीं असतां तीं होत नाहींत. विलायतेमध्यें कोणत्याही मोठ्या कारभारांत श्रमविभाग दृष्टीस पडतो. इंग्रज लोक मोठमोठीं कामें हातीं धरितात आणि पार पाडतात, आणि त्यांचा कारभार सर्व नीट चालतो याचें मुख्य कारण श्रमविभाग हेंच आहे.

विलायतेंत व्यापाऱ्यांच्या हपिसापासून कोणत्याही मोठ्या कारखान्यापर्यंत सर्वत्र ह्या श्रमविभागाचें खरें स्वरूप दिसण्यांत येतें. ज्यांकडे जें काम सोंपलें असतें ते त्या कामांत दक्ष आणि निपुण झालेले असतात. त्यांस नेमून दिलेल्या कामाची झडती घ्यावयास जावें तों तें तयार चोख असतें. आपल्या एथील मोठमोठे व्यापारी आणि सराफ लोक यांच्या एथें बहुतकरून कित्येक वर्षांचे ताळेबंद करावयाचे राहिले असतात, आणि व्यापारांत नफा नुकसान किती काय हें बहुत काळपर्यंत त्यांला कळत नाहीं. परंतु मुंबईंतील ब्यांकी, रेलवे कंपनी वगैरे यांचा हिशेब पाहिजे तेव्हां तयार, याचें कारण काय? आपल्या एका कारागिराचें उदाहरण घेऊं. तो आपल्या कामासंबंधीं सर्व वस्तु आपल्या हातानें करितो. जें आपलें मुख्य कसब तेवढें तें आपण करून, बाकीचीं कामें दुसऱ्यांजवळून करविलीं तर

किती फायदा होईल? परंतु आपल्या देशचे कारागीर लोक असें करणार नाहींत. जें कांहीं आपल्या हातून होईल असें आहे तें, पैसा खर्चून, दुसऱ्याजवळून करून घ्यावें, अशी कल्पना त्यांच्या मनांत मुळींच यावयाची नाहीं. परंतु त्यांणीं हिशेब करून पाहिला असतां, यांत खरोखर नुकसान आहे असें त्यांच्या लक्षांत येईल. ते चार आण्याची कसर करितात, परंतु ते चार आणे वांचविण्यांत त्यांचा जो वेळ जातो तो त्यांणीं आपल्या मुख्य कामांत घालविला असतां फायदा अधिक होईल; परंतु आपल्या कारागिरांस हें समजत नाहीं, तें त्यांस केव्हां समजूं लागेल?

## ९. दीर्घप्रयत्न.

PERSEVERANCE.

इंग्लिश लोकांमध्यें दीर्घप्रयत्न हा एक मोठा मूल्यवान गुण आहे. कोणत्याही कामास एकदां हात घातल्यावर मग कंटाळून तें काम सोडून देऊं नये, पण लागेवेल तोंपर्यंत त्याच्या पिच्छेस लागावें याचें नाव दीर्घ प्रयत्न. या गुणें करून इंग्लंड देशाचें मोठें हित झालें आहे. ज्या कामाचें फळ लागलेंच प्राप्त होण्यासारखें असेल अशास आपले लोक हात घालतील. परंतु ज्या कामाचें फळ लागलेंच यावयाचें नाहीं त्याविषयीं मेहनत कशासाठीं करावी? अशी समजूत आपणांमध्यें पुष्कळ लोकांची आहे. यामुळें कित्येक मोठीं अगत्याचीं कामें ते जाऊं देतात. तूर्त लाभ होण्याचा संभव दिसला तर ठीक, परंतु तसें नसलें तर तें काम ते सोडून देतील.

विलायतेंत असा प्रकार नाहीं. तेथें कितीएक कामांत वर्षांचा वर्षें कांहीं उत्पन्न होत नाहीं, परंतु तशांसही ते लोक पदरचें खाऊन लागले असतात. कित्येक कामांत तर फारच धीर धरावा लागतो. कित्येक कामांत वर्षांचा वर्षें घालवावीं तेव्हां मेहनतीचें व धरलेल्या धिराचें

फळ लाभतें. कोणी एका मनुष्यानें एका चितान्यास असें विचारिलें कीं तुला हें चित्र काढावयास दोन दिवसही पुरते लागले नाहींत आणि तूं याचे पांचशें रुपये मागतोस हें कसें? चितान्यानें उत्तर केलें, बाबा, तुला ठाऊक नाहीं कीं दोन दिवसांत चित्र काढून तयार करण्याची विद्या शिकण्यास मला पंधरा वर्षें लागलीं. तोंपर्यंत मी पदरचें खाऊन मेहनत केली आणि त्रास काढला, त्याचें फळ मला आतां मिळूं नये, तर केव्हां मिळावें?

धंदेरोजगारांचा प्रकार आहे त्याप्रमाणेंच सुधारणुकीचा आहे. सुधारणुकीच्या कामांत लागलेंच यश प्राप्त होतें असें नाहीं. त्या कामांत जी कांहीं मेहनत पडते किंवा पैसा खर्च होतो त्याचें फळ लागलेंच आलें नाहीं ह्मणून आपण नाउमेद होऊन तें सोडून देतां कामा नये. अशा कामांत फळ लागलेंच येत नसतें. लागलेंच फळ मिळत नाहीं ह्मणून असें समजूं नये कीं वेळ अजून आली नाहीं. बीं पेरल्यावांचून फळ कोठून येणार? प्रत्येक सुधारणुकीचें बीं आपणच आतां पेरूं, आणि जरी त्याचें फळ आपणास चाखावयास मिळालें नाहीं तरी आपल्या मुलांबाळांस खचित मिळेल; ह्मणून सुधारणुकीच्या कामांत आपण थकून पाय मागें काढूं नये.

"Labourers for the public-good especially, have to work long and patiently, often uncheered by the prospect of immediate recompense or result. The seeds they sow sometimes lie hidden under the winter's snow, and before the spring comes the husbandman may have gone to his rest...Adam Smith sowed the seeds of a great social amelioration in that dingy old University of Glasgow, where he so long laboured, there laying the foundations of his 'Wealth of Nations'; and seventy years passed before his work bore substantial fruits, nor indeed are they all gathered in yet."

Self Help; p. 53.

याप्रमाणें एक प्रख्यात ग्रंथकार लिहितो. याचा अर्थ असा कीं:—"लोकहितार्थ जे मोठी मेहनत करणारे असतात त्यांस अवश्यच बहुत काळ धीर धरून श्रम करावे लागतात; आणि त्यांस तूर्त फळ प्राप्त होण्याची आशा देखील नसते. ते जें बीज पेरतात तें हिम ऋतूच्या हिंवाखालीं अगदीं दडपून जातें, आणि वसंत येण्याच्या पूर्वींच तो पेरणारा कदाचित् निजधामास जातो .... पाहा, आदम स्मिथ हा विद्वान पुरुष ग्ल्यास्गो एथील जुनाट यूनिवर्सिटींत विद्येचा उत्कर्ष व्हावा ह्मणून श्रम करीत असे, तेथें त्याणें संपत्तिशास्त्र रूपानें मोठ्या सुधारणुकीचें वीं पेरिलें, आणि 'वेल्थ आव नेशन्स' ह्मणजे राष्ट्रांची संपत्ति हा प्रसिद्ध ग्रंथ लिहिला; परंतु त्याच्या श्रमाचें फळ येण्यास सत्तर वर्षें लागलीं, आणि अजूनही तें पुरतें आलें नाहीं."

यास्तव जे लोक देशसुधारण्याच्या कामांत गुंतलेले आहेत किंवा सुधारणूक व्हावी आणि ती आपण डोळ्यांनीं पाहावी अशी ज्यांला आवड आहे, त्यांणीं धीर धरून आपल्या कामांत निमग्न राहिलें पाहिजे. त्यांच्या उद्योगाचें फळ या पिढीस प्राप्त झालें नाहीं, तरी पुढलीस किंवा तिच्या पुढलीस अवश्य प्राप्त होईल. अशी ह्मण आहे कीं "हरकत तेथें बरकत;" यास्तव हातीं धरलेलें काम, किंवा मनांत योजलेली गोष्ट सिद्धीस न्यावी, मध्येंच सोडून देणें यांत शहाणपण नाहीं.

## ६. आस्था आणि स्फुरण.

ZEAL AND EXCITEMENT.

इंग्रज लोकांच्या अंगीं जी आस्था आणि जें स्फुरण असतें त्याची बरोबरी कोण करील? ज्या कामांत व ज्या गोष्टींत हे लोक मन घालतात त्या कामांत व त्या गोष्टींत त्यांची आस्था आणि स्फुरण हीं दिसून येतात, ज्या लोकांत कोणत्याही कामाविषयीं फारशी आस्था नाहीं व स्फुर-

ण नाहीं, त्यांमध्यें फारसा दम किंवा जीव दिसावयाचाच नाहीं. विला-यतेंतील लोकांची आस्था आणि स्फुरण, हीं साधारण गोष्टींतच न-व्हत, परंतु प्रत्येक मोठ्या आणि अगत्याच्या गोष्टींत दिसून येतात. आ-मच्या लोकांच्या आंगीं हे गुण पाहण्यांत येत नाहींत. ह्या गुणांची तर फार आवश्यकता आहे. ह्या गुणावांचून कोणतेंही मोठें कार्य सि-द्धीस जावयाचें नाहीं.

मी पूर्वींच सांगितलें आहे कीं ईर्ष्या ह्मणजे एकमेकापेक्षां चांगलें होण्याची इच्छा ह्या लोकांत फार आढळते; परंतु दुसरें असें कीं या लोकांत ईर्ष्या असून साधारण कामांत देखील त्यांला आस्था मोठी अ-सते. ज्या लोकांत हा गुण नाहीं त्यांस पाऊल पुढें टाकतां यावयाचें नाहीं. आपला देश सुधारणुकींत आणि समृद्धींत इतका मागें पड-ला आहे याचें एक कारण हें कीं आपल्या लोकांत कोणत्या ही गोष्टीवि-षयीं आस्था वाढण्याची एकीकडेस राहून, उलटी दिवसानुदिवस कमी होत चालली आहे.

विलायतेंत मोठ्या सणवारीं किंवा महाराणीच्या किंवा राजपुत्रा-च्या दर्शनाविषयीं किंवा कोणा पराक्रमी पुरुषास मान देण्याविषयीं किंवा फक्त मोठा तमासा किंवा खेळ पाहण्याविषयीं स्फुरण येतें तें कांहीं पांच पंचवीस किंवा शंभर दोनशें लोकांस येतें असें नाहीं, तर सर्व लोकांस येऊन ते पाहावयास लोटतात. इताली देशांतील प-राक्रमी वीर गारिबॉल्डी चार वर्षांपूर्वीं इंग्लंडांत गेला होता, त्या समयीं त्याला पाहण्याविषयीं आणि मान देण्याविषयीं लोकांस इतकें स्फुरण आलें होतें कीं त्यास पारच नाहीं.

कित्येक प्रसंगीं या लोकांचें स्फुरण मर्यादेच्या बाहेर जातें. एक मोठी प्रख्यात नाटक करणारी स्त्री (Mademoiselle Piccolo-mini) हिजविषयीं असें समजण्यांत आलें आहे कीं, पहिल्याच खेपेस

नाटकगृहांत तिचें गायन झालें तेव्हां त्या विद्येंत तिचें कसब आणि नाचण्याची शैली पाहून लोक इतके मोहित झाले कीं, ती नाटकशाळेंतून आपल्या घरीं जावयास निघाली असतां लोक तिच्या गाडीचे घोडे सोडून टाकून आपण गाडी ओढून नेण्यास सिद्ध झाले! अशा प्रकारचें स्फुरण हें कित्ता घेण्यासारखें नव्हे, परंतु त्यावरून या लोकांत स्फुरणाचा कढ येऊं लागला ह्मणजे केवढा येतो तें दिसतें.

## ७. साहस.

ENTERPRISE.

मोठें आणि जोखमाचें काम योजून त्यांत हात घालणें याचें नांव साहस. हा गुण इंग्लंडांतील लोकांत विशेष पाहण्यांत येतो. आपल्या लोकांत हा गुण फारच कमी आढळतो, आणि मुळींच नाहीं ह्मटला असतां देखील चालेल. विलायतेच्या लोकांत हा गुण असल्यामुळें ते मोठमोठीं कृत्यें करतात आणि त्यांच्या देशास मोठा लाभ होतो. आपल्या देशांत मोठमोठीं कामें बहुतकरून कोणी उचलीतच नाहीं, आणि कधीं कधीं त्वरित लाभ होण्याच्या आशेनें एकादें उचललेंच तर तें पुढें चालत नाहीं, आणि थोडेंसें चाललें तरी पार पडत नाहीं.

विलायतच्या लोकांत साहस असल्यामुळें ते मोठमोठाले कारखाने चालवितात; आणि एकेका कारखान्यांत लाखो रुपये गुंतवून ठेवितात. या लोकांत साहस आहे ह्मणूनच ते लोखंडी सडका वगैरे जोखमाचीं कामें कोट्यावधि रुपये खर्च करून करतात. त्यांच्या अंगीं साहस असल्यामुळें ते दूरदेश पाहावयास जातात, आणि पृथ्वीवरील सर्व लोकांशीं व्यापार करितात. साहसामुळेंच सुधारणुकींत आणि संपत्तींत त्यांची वढती होत आहे. विलायतेच्या लोकांच्या साहसानें केवळ त्याच लोकांला लाभ होतात असें नाहीं, तर या गुणामुळें ते लो-

क मनुष्यमात्राच्या कल्याणासाठीं परोपकारबुद्धीनें मोठमोठीं जोखमाचीं कामें आरंभतात, आणि सुहृत्संबंधी किंवा आपला अमोलिक प्राण यांची खातर न बाळगितां, ओसाड प्रदेशांचा आणि समुद्रांचा शोध लावण्यासाठीं स्वदेश सोडून बाहेर पडतात.

"Is there not Livingstone, with a heroism greater than that of Xavier, penetrating the wilds of South Africa on his mission of Christian civilization; Layard, labouring for years to disinter the remains of the buried city of Babylon; Rawlinson, the decipherer of the cuneiform inscriptions; Brooke, establishing a nucleus of European enterprise and colonization amongst the piratical tribes of the Indian Ocean; Franklin, Maclure Collinson, M'Clintock, and others cleaving their way through storms, and ice and darkness to solve the problem of the north-west passage;—enterprises which, for individual daring, self denial, energy, and heroism, are unsurpassed by those of any age or country."

Self Help; p. 22.

यांतील सारांश:— लिविंग्स्तनासारखा पुरुष आफ्रिका खंडांतील ओसाड प्रदेशांत जंगली लोक सुधारावे ह्मणून जिवावर उदार होऊन जात आहे; लेअर्डासारखा पुरुष जमीनगर्क झालेलें बाबिलोन शहर खणून मोकळें करून त्यांतील जुन्या पदार्थांचा संग्रह करीत आहे; रॉलिन्सनासारखा पाचराच्या आकृतीच्या अक्षरांचे लेख लावीत आहे; ब्रूकासारखा हिंदी महासागरांतील चांचेपण करणाऱ्या लोकांमध्यें सुधारणा करण्याकरितां युरोपियन लोकांची वसाहत करीत आहे; फ्रांक्लिन, कॉलिन्सन, मक्लिंटाक वगैरे पुरुष समुद्रांतला मार्ग शोधून काढण्यासाठीं तुफानांतून, बर्फांतून आणि अंधारांतून अट्टहास करीत आहेत; ही गोष्ट लहान सहान काय? आणि ही हिंमत थोडी थोडकी काय? अहो, आपल्या देशांत असे वीर पुरुष कधीं होतील?

## ८. जोम.

ENERGY.

ज्याला इंग्रज लोक 'एनर्जी' ह्मणतात तो गुण देखील त्या लोकांत बहुत आहे. मोठें जड काम अंगावर घेणें, आणि तें सिद्धीस जावें ह्मणून मेहनत करणें यास या गुणाची फार आवश्यकता आहे. ज्या माणसांत जोम नाहीं त्याच्या आंगीं मनुष्यपणा किंवा पुरुषार्थच नाहीं असें समजावें.

काय, एतद्देशीय लोकांत जोम नाहीं? असला तर तो कोठें दडून राहिला आहे? ते विलायतेस जाण्याच्या आणि इतर सुधारणुकीच्या गोष्टी तोंडानें पसंत करितात, परंतु त्यांच्या आंगीं दम असता तर ते स्वस्थ बसले नसते. परंतु ज्या लोकांत मुळचाच दम कमी ते तो आणणार कोठून? मी पूर्वींच सांगितलें आहे कीं तारूण्याचें वीर्य बाळपणांतच खरचून जातें, मग वीर्य नाहीं तेंव्हां शक्ति कोठून असणार? हाय हाय! आपली काय दशा झाली आहे ही!

"The longer I live, the more I am certain that the great difference between men, between the feeble and the powerful, the great and insignificant, is *energy—invincible determination*—a purpose once fixed, and then death or victory! That quality will do anything that can be done in this world; and no talents, no circumstances, no opportunities, will make a two legged creature—a man without it."

*F. Buxton.*

पार्लमेन्ट सभेचा एक प्रख्यात सभासद, ज्याणें गुलामाचा व्यापार मोडून टाकण्यासाठीं पुष्कळ श्रम केले, तो काय ह्मणतो तें पाहाः—"माझें वय जसजसें अधिक होत जातें तसतशी माझी अधिकाधिक खात्री होत आहे कीं सबळ आणि निर्बळ, उंच आणि नीच यांमध्यें मोठा भेद ह्मटला ह्मणजे दम किंवा अढळ निग्रह हाच

आहे; ह्मणजे एकदां पक्का निश्चय झाला, ह्मणजे मग जीव जाऊ अथवा राहू, तो निश्चय ढळावयाचा नाहीं! ह्या गुणेंकरून या जगांत पाहिजे तें करतां येईल; परंतु इतकाच गुण नसला तर, पाहिजे तितकी बुद्धि असो, पाहिजे तसा योगायोग असो, तरी ह्या दोन पायांच्या प्राण्यास मनुष्याची योग्यता येणार नाहीं."

## ९. धैर्य.

COURAGE.

जोमाबरोबर धैर्य असायाचेंच, ह्मणून ज्या लोकांत जोम आहे त्यांस धैर्य असलेंच पाहिजे. इंग्लिश लोकांत धैर्य ह्मा गुण बहुत असून मोठ्या अगत्याचा आहे. यावांचून मोठीं कृत्यें व्हावयाचीं नाहींत, यावांचून राज्यें मिळावयाचीं नाहींत, आणि मिळालेलीं चालावयाचीं नाहींत. या गुणाच्या योगानें इंग्रज लोकांस काय काय करतां आलें आणि येत आहे हें आपण प्रत्यक्ष पाहतच आहों.

योग्य प्रसंगीं योग्य धैर्य प्रगट करावयास इंग्लंडचे लोक चुकत नाहींत. प्रसंग गुजरला ह्मणजे एका हातीं धोत्र आणि दुसरे हातीं पागोटें घेऊन कूच करणें याला धैर्य ह्मणत नाहींत. धैर्य ह्मणजे गोष्ट बितली असतां अस्तन्या वर चढवून बाहेर पडणें. "अमुक गृहस्थ येत असला तर मी विलायतेस जाईन किंवा अमुक गृहस्थ अमुक सुधारणा करील तर मी करीन" अशानें या देशास सुदिन येणें नाहीं. प्रत्येक मनुष्याच्या मनांत असें ठसलें पाहिजे कीं अमुक एक गोष्ट मला अवश्य केलीच पाहिजे; आणि कोणी आड येऊन प्रतिबंध करूं लागला, तर त्याचें ऐकून ह्या दास्यावस्थेंत राहण्यापेक्षां मरणें बरें असें प्रत्येकास वाटलें पाहिजे. अहो, जें सत्कृत्य असून आपलें कर्तव्य असें वाटतें तें करितांना कोणाची भीति काय ह्मणून बाळगावी? भीति बाळगावी तर एका परमेश्वराची

वाळगावी. परंतु नरांची भीति बाळगून देशाटन किंवा एकादें म-हत्कृत्य करण्याचें एकीकडेस ठेवून, घरकोंबडा होऊन राहणें यांत जीवित्व कसचें?

"The battle of life, in by far the greater number of cases, must necessarily be fought up-hill; and to win it without a struggle were perhaps to win it without honour. If there were no difficulties there would be no success; if there were nothing to struggle for, there would be nothing to be achieved. Difficulties may intimidate the weak, but they act only as a wholesome stimulus to men of pluck and resolution. All experience of life indeed serves to prove that the impediments thrown in the way of human advancement, may for the most part be overcome by steady good conduct, honest zeal, activity, perseverance, and above all by a *determined resolution* to surmount difficulties, and stand up manfully against misfortune."

*Samual Smiles.*

एक विद्वान ग्रंथकार असें ह्मणतो कीं, प्रपंचरूप लढाई मारणें ती बहुतकरून दुर्गशिखरावर चढून मारावी लागते; आणि ती नि-र्विघ्नपणें जिकतां आली तर त्यांत पुरुषार्थ कोणता? ज्या कामांत अडचणीच नाहींत त्यांत यश कशाचें! जिथे हरकत नाहीं तिथे बर-कत कसची? भितरा असेल तो कदाचित् अडचणीस भिऊन जाई-ल, परंतु ज्यांच्या अंगीं हिंमत, आणि निग्रह आहे त्यांला अडचणींनीं उलटा अधिक जोर येतो. प्रापंचिक अनुभवावरून असें सिद्ध होतें कीं मानवी प्राण्यांच्या उत्कर्षांत जे अडथळे येतात त्यांतील बहुतेक, एकसारखी चांगली वर्तणूक, खरी आस्था, उद्योग, दीर्घ प्रयत्न, यां-च्या योगानें, आणि या सर्वांहीपेक्षां, अडचणी बरोबर झुजून त्यांतून पार पडण्याविषयीं दृढ निश्चय केल्यानें, दूर होतात.

## १०. स्वमान.

SELF—RESPECT.

विलायतेच्या लोकांस आपला मान कसा राखावा हें जसें समजतें तसें आपल्या लोकांस समजत नाहीं. ज्याणें स्वमान सोडिला त्याला आपल्या आबरूची फारशी परवा असेल असें कोणी ह्मणणार नाहीं. यास्तव स्वमान सोडून देणें यापेक्षां अधिक लाजिरवाणी दुसरी कोणतीच गोष्ट त्या लोकांला वाटत नाहीं. मनुष्यानें स्वमान राखावा ह्मणजे गर्व बाळगावा आणि वृथा दुराग्रह धरावा असें नाहीं. कोणत्याही रीतीनें आपण आपल्या बरोबरीच्या लोकांच्या मतें हलकें असें काम करूं नयें याचें नांव स्वमान. प्रत्येक मनुष्यास स्वतांची प्रतिष्ठा किंवा आबरू प्रिय असलीच पाहिजे.

स्वमान ठेवणें ह्मणजे काय याविषयीं आपल्या लोकांस फारच थोडा समज आहे. कांहीं स्वताचा मतलब साधत असल्यास "वाण्याची मिशी खालीं तर खालीं" असें ह्मणून हलकट काम करण्यास आणि आपल्या मूल्यवान् प्रतिष्ठेस कलंक लावण्यास आपले लोक आशंकत नाहींत. आपलें नुकसान होत नसेल त्या गोष्टींत आपले लोक आग्रह व अभिमान बहुत दाखवितील. या दुर्गुणामुळें या देशास इतकें सोसावें लागलें आणि पुढेंही आणखी सोसावें लागेल. लटका डौल व आग्रह सोडून द्यावा, परंतु आत्ममान सर्वदा संभाळला पाहिजे. ज्याणें आत्ममान सोडिला त्याचें जीवित्व व्यर्थ.

## ११. स्वतंत्रता.

LIBERTY.

इंग्लंडांतील लोकांची स्वतंत्रपणाविषयीं सर्व पृथ्वीभर आख्या आहे. हे लोक गुलामगिरीचा जितका धिःकार करितात तितका धिःकार करणारे दुसरे थोडेच लोक आढळतात. हे लोक आपलें स्वातंत्र्य रा-

खण्यासाठीं आप्तविषयी सर्व टाकून हातांत तरवार किंवा बंदूक घे-
ऊन आपण मरूं किंवा जिंकूं असा निश्चय करून बाहेर पडतील.
आपल्या जिवाचें काय होईल, आपल्या मुलांबाळांची, आपल्या कुटुंबा-
ची काय अवस्था होईल, याचा विचार आणि चिंता प्रसंगीं ते सोडून
देतील. पाहा, जर त्यांला असें समजलें कीं आपलें स्वातंत्र्य हिरून
घेण्यास कोणी चाल करून येत आहे, तर ते लागलेच्च इतर सर्व वि-
चार एकीकडेस ठेवून, लढाई मारण्यास कमर बांधून सज्ज होतील.

ह्या स्वतंत्रपणाचा जोर इतका आहे कीं मोठा राजा, राजपुत्र,
प्रधान किंवा गवर्नर, याचें पाऊल वांकडें पडलें तर, वर्तमानपत्र-
द्वारें, आणि प्रसिद्ध ठिकाणीं चौघांमध्यें, त्याला ठपका देण्यास ते
काडीमात्र भीत नाहींत. अमक्या गृहस्थाला माझे विचार रुचणार
नाहींत ह्मणून 'मौन्यं सर्वसाधनं' असा विचार करून विलायतचे लो-
क मुकाट्यानें राहणें बरें असें ह्मणत नाहींत. ते निर्भीडपणानें प्रत्येक
गोष्टींत आपापले विचार कळवितात; आणि तसें करतांना वडील
मनुष्याची किंवा वरिष्ठ कामदाराची किंचित्‌ही भीड धरीत नाहींत.

ते लोक स्वतंत्रपणें विचार दर्शित करितात इतकेंच्च नाहीं, तर
स्वतंत्रपणें चालतात. मी असा चाललों अथवा असें केलें तर लोक
माझी निंदा करतील असें भय धरून ते लोक बसून राहत नाहींत.
त्यांच्या मनांत कोणतीही गोष्ट एकदां भरली व ती केली पाहिजे
असें त्यांस वाटलें, ह्मणजे मग त्यांच्या निश्चयास कोणाच्यानें अटका-
व करवेल! या लोकांत ज्या चाली किंवा रिवाज पडले असतील ते
मोडण्यास ते दचकोत, परंतु ज्या गोष्टींपासून त्यांच्या देशाचें क-
ल्याण होतें ती करण्यास ते भीत नाहींत.

आमच्या लोकांमध्यें स्वतंत्रपणाचें असें स्फुरण येणें कठीण आ-
हे. मुसलमानांच्या जुलमी अंमलांत त्यांणीं परतंत्रपणाचें इतकें से

त्रन केलें आहे कीं त्यांचें स्वतंत्रतारूप इंद्रिय अगदीं निद्रिस्थ किंवा बहिरें होऊन गेलें आहे. परंतु आतां इंग्रजी अंमलांत राहून व सभ्य इंग्रज लोकांशीं संबंध झाल्यानंतरही जर आपण आपलें स्वातंत्र मिळविण्याची तजवीज केली नाहीं, तर आपण स्वातंत्र्य भोगण्यास योग्यच नाहीं असें अर्थात् होईल. निरनिराळ्या लहान सहान जातींच्या प्रतिबंधांत राहून सुधारणुकीच्या कामांत अटकून राहणें किंवा देशाटन करण्यास भिणें हें स्वतंत्र मनुष्याचें लक्षण नव्हे. यावरून इंग्रज लोकांनीं अनुमान केलें कीं स्वतंत्र होण्याची योग्यता अजून आपणांस आली नाहीं, तर तें केवळ खोटें होणार नाहीं.

स्वतंत्रतेचें पाणी विलायतेंतील श्रीमान् लोकांतच आहे असें केवळ समजूं नये. हा गुण मध्यम व कनिष्ठ प्रतीच्या लोकांतही पाहण्यांत येतो. याविषयीं एक उदारण माझ्या पाहण्यांत आलें होतें तें मी ता० १४ वी माहे आक्तोबर सन १८६६ चें रास्तगोफ्तार आणि सत्यप्रकाश या पत्रांत वर्णिलें आहे. त्याचा थोडासा उतारा या ठिकाणीं घेतों:—

"इंग्लंड देशचें प्रधानमंडळ बदललें त्यांतील कित्येक लोकांच्या मनांत पार्लमेन्ट सभेसंबंधी कित्येक बाबतींत सुधारणा करायाचें फार होतें. या बाबतींतून एक ही कीं "हौस आव् कॉमन्स" ह्मणून जी लोकांच्या प्रतिनिधींची सभा तींत प्रजेच्या तर्फेचे जे प्रतिनिधि पाठवायाचे ते निवडण्याचा, देशांतील कारागीर व मजूर लोकांसही, हक्क असावा. याच्या विरुद्ध असें ह्मणण्यांत आलें कीं सदरहू कारागीर व मजूर लोक हे या हकाची परवा करीत नाहींत व त्यांस आपले हक्क ह्मणजे काय हें समजतही नाहीं.

"यावरून इंग्लंडच्या कारागिरांस व मजुरांस स्वतंत्रतेचें स्फुरण आलें, आणि त्यांणीं ठिकठिकाणीं सभा करून असें जाहीर केलें कीं

आह्मी आमच्या हक्कांची परवा करीत नाहीं हें ह्मणणें अगदीं खोटें आहे. पार्लमेन्ट सभेस प्रतिनिधि निवडून पाठविण्याचा हक्क इतरांस आहे त्याप्रमाणें आह्मांसही असून तो हक्क आमचा आह्मांस मिळाला पाहिजे. लंडन शहरांतील दहा हजारांहून अधिक मजूर व कारागीर लोकांनीं आपले विचार प्रगट करण्याचा ठराव केला. ते सर्व एकत्र जमले तेव्हां हारीनें रस्त्यांतून चालूं लागले. सर्वांच्या पुढें चालणाऱ्या दोघां तिघांच्या हातीं ध्वज किंवा निशाणें होतीं.

"त्यांच्या मागून शंभर जण एकमेकांच्या हातांत हात घालून चालूं लागले; त्यानंतर निशाणें धरणारे वगैरे चालले. दोन ध्वजांवर "स्वतंत्रपणा" असें मोठ्या अक्षरांनीं लिहिलें होतें. ह्या ध्वजधाऱ्यांच्या मागून वाद्यें वाजत होतीं, आणि त्यांच्या मागून सहस्रावधि लोक चांगले चांगले पोशाक करून चालले होते. कोणी आपल्या ध्वजावर मिस्तर ग्लाड्स्तन याचें चित्र काढलें होतें, कोणी त्याचें नांव लिहिलें होतें, आणि कोणी मिस्तर ब्रैट याचेंही नांव लिहिलें होतें.

"ही मोठी स्वारी पुढें चालली तसे लोक अधिकाधिक जमत चालले. लोक खिडक्यांतून डोकावून पाहूं लागले. खिडक्यांत उभ्या राहिलेल्या स्त्रियांनीं हातांतील रुमाल वर करून आपला आनंद दर्शित केला. जनरथांतून जाणाऱ्यांनीं आनंदाचा एकच गजर करून दिला. पोलीसच्या लोकांनीं त्यांस पार्कांत ह्मणजे उपवनांत जाण्यास प्रतिबंध केला तेव्हां त्यांतील एका प्रमुखानें खालीं लिहिल्याप्रमाणें भाषण करून स्वतंत्रतेविषयीं मनांतील उद्गार बाहेर काढिला. तो ह्मणालाः—

"मित्रहो! आपणांस उपवनांत जाण्यास प्रतिबंध केला यांत असें सुचविलें कीं हें उपवन सरकारी असून त्यावर सरकारची मालकी आहे. (सर्व दांत चावून ह्मणाले, पैसा तर आपण दिला आहे.) आतां, जें

उपवन आज दोनशें वर्षें झालीं सरकारानें लोकांस उपभोग घ्यावयास दिलें आहे, आणि ज्यासाठीं लोकांनीं पुष्कळ पैसा दिला आहे, त्यावर सरकारची मालकी पोंचते किंवा लोकांची पोंचते याविषयीं मी कांहीं ह्मणत नाहीं; पण मी इतकेंच ह्मणतों कीं सरकार विश्वासू आणि कायदे मानून चालणाऱ्या प्रजेच्या भक्तीवर भरंवसा ठेवून चालेल तर सरकार आणि त्याची माल मिळकत सुरक्षित राहील; परंतु प्रजेची प्रीति तोडणारे किंवा तींत अंतर पाडणारे जे ते ह्या देशाचे आणि एथील सरकारचे शत्रु होत.

"मी अशी आशा बाळगतों कीं आपणांस आपला हक मिळे तोंपर्यंत आपण आपलें हें स्फुरण टाकणार नाहीं. आपलें जें नुकसान झालें आहे आणि आपण जो अपमान सोसला आहे तो पुरा भरून येई, तोंपर्यंत आपण आपली मेहनत अशीच चालवावी. आपणास जे हक मिळाले पाहिजे ते मिळत, आणि आपलें अनिष्ट चिंतणाऱ्या लोकांचे विचार फिरत, आणि 'हौस-आव-कामन्स' सभेंत सुधारणा होई, तोंपर्यंत आपण आपला यत्न सोडून देऊं नये. शेवटीं आपली दाद नच लागली तर, जें सरकार आपल्या वाजवी हकांकडेस लक्ष न देतां त्यांच्या विपरीत वर्तणूक करतें, त्यास कर द्यावा आणि "वालंटीयर" ह्मणजे विनपगारी शिपाई ह्मणून त्याची चाकरी करावी किंवा नाहीं याचा विचार करणें जरूर पडेल. याविषयीं आपण चांगला विचार करूं अशी मी आशा बाळगतों."

नंतर त्यांणीं सर्व संमतानें असा ठराव केला कीं आपले हक आपणांस देण्याविषयीं मागील प्रधानांनीं श्रम केले ते व्यर्थ गेले, आणि हल्लींचे प्रधान या गोष्टीकडेस दुर्लक्ष करितात, तर ते हक मिळविण्यासाठीं सर्व वाजवी उपाय करावे, आणि जरूर वाटल्यास आपले हक मिळत तोंपर्यंत कर देत नाहीं ह्मणून साफ सांगावें.

दुसरे दिवशीं सरकारानें त्यांस उपवनांत सभा भरण्यास परवानगी दिली, त्या वेळींही ते उघड रीतीनें असें ह्मणाले कीं लोकांच्या संमताशिवाय राज्य चालणार किंवा निभावणार नाहीं हें सरकारानें पकें समजावें. ते घरीं जातांना "रूल ब्रिटानिया" हें गीत गात आणि "ब्रिटन देशांतील लोक कधीं कोणाचे गुलाम होणार नाहींत" हे शब्द जोरानें उच्चारीत गेले.

स्वतंत्रपणाचें असें स्फुरण एतद्देशीय लोकांत येणें कठीण आहे. या स्फुरणाचा चतुर्थांश जरी आपल्या लोकांत असता तरी ते हल्लीं ज्या अवस्थेंत आहेत तींत कधीं राहिले नसते. "आपल्या एथील व्यापारी किंवा इतर मध्यम प्रतीच्या लोकांनीं इंग्लंडांतील मजूर लोकांच्या इतकी हिंमत कधींही दाखविलेली नाहीं. त्यांच्या देशाच्या किंवा त्यांच्या स्वताच्या हक्कांवर पाणी ओतलें तरीही तशा प्रसंगीं जसे श्रम करावे तसे त्यांणीं केलेले नाहींत, किंवा अभिमान धरून जसा दीर्घ प्रयत्न करावा तसा केलेला नाहीं. आपण आपल्या हक्कांविषयीं बेपरवा राहूं नये हें आपणास इंग्लंडांतील मजूर लोकांपासून शिकलें पाहिजे. आपले जे हक्क बुडाले असतील अथवा जे मिळाले पाहिजेत असें असून मिळत नाहींत, त्यांविषयीं आपलें तोंड झांकून किंवा दुसऱ्यांचीं तोंडें बघीत बसून, या देशाचा उदयकाळ कधीं येणार नाहीं."

### १२. परोपकारबुद्धि.

BENEVOLENCE.

परोपकारबुद्धि हाही इंग्लिश लोकांमध्यें एक मोठा स्तुत्य गुण आहे. खरा परोपकार ह्मणजे कशास ह्मणावें हें आणि विलायतेंतील लोक तो जसा समजतात तसा आपले लोक बहुत करून समजत नाहींत. मनुष्यासारख्या प्राण्यास ठकवून लुटावें आणि जनावरांसाठीं

पांजरपोळें बांधावीं किंवा ब्राह्मणांस छानदार तूपसाखरेचे लाडू घालावे, हा कांहीं वास्तविक परोपकार नव्हे.

परोपकार ह्मणजे एका मनुष्यानें दुसऱ्यावर उपकार करणें. कोणी मनुष्य संकटांत पडलें असतां त्यास मदत करावी, पोऱ्यापोरक्या मुलांचें आणि अनाथ विधवांचें पोषण करावें, निराश्रित लोकांसाठीं धर्मशाळा आणि दुःखित व रोगी लोकांसाठीं इस्पितालें स्थापावीं, लोकांत विद्येचा व नीतीचा प्रसार व वृद्धि करण्यासाठीं पैसा खर्चावा, हा खरा परोपकार होय. असा परोपकार विलायतेच्या लोकांमध्यें दृष्टीस पडतो.

आपल्या लोकांत परोपकार नाहीं असें मी ह्मणत नाहीं. मुंबईंतील कित्येक गृहस्थ उदारपणें पुष्कळ पैसा चांगल्या परोपकाराच्या कृत्यांत खर्च करितात, परंतु अशा लोकांची संख्या फारच लहान आहे. आपले बहुतेक लोक धर्म करितात तो आळशी ब्राह्मण व बैरागी यांस भोजनें घालणें, यात्रा करणें, देवळें बांधणें वगैरे कृत्यांकडे खर्च करितात. विलायतेंत परोपकारी लोक कोणत्या एका कामास मोठी रकम फारशी देत नाहींत, परंतु वास्तविक परोपकाराच्या कृत्यांस थोडथोडा पैसा देणारे लोक इतके आहेत कीं सहज मोटी रकम होते. थोडथोडे करितां एकेका कृत्याच्या पुंजींत लक्षावधि रुपये जमतात. एका लंडन शहरांतच अशीं ६४० धर्मखातीं आहेत, आणि त्यांचें काम चालविणाऱ्या तितक्याच (६४०) धर्माच्या मंडळ्या उपस्थित झाल्या आहेत.

रोगी व दुखणेकरी लोकांस औषध देण्यास आणि त्यांची जोपसना करण्यास जागोजाग इस्पितालें आहेत. पोरक्या मुलांचा सांभाळ करण्यास आणि त्यांस शिक्षण देण्यास ठिकाणोठिकाणीं शाळा आहेत. अनाथ विधवा स्त्रियांचा परामर्श घेण्यास आणि त्यांस कुसंगति लागूं नये ह्मणून जपण्यास अनेक धर्मशाळा स्थापिल्या आहेत.

लोकांच्या आरोग्याचें आणि नीतीचें रक्षण करावें ह्मणून स्थळोस्थळीं मंडळ्या आहेत. अकस्मात् अपाय घडून दुर्दशेस मिळालेल्या लोकांस मदत करण्यास जागोजाग सभा आहेत. आंधळे, बहिरे, मुके यांस पोसण्यास आणि मोठ्या प्रयासानें त्यांस लिहिणें वाचणें शिकविण्यास शाळा आहेत.

याशिवाय, आणखी समुद्रांत बुडत असतील त्यांस तारण्याच्या उद्देशानें अनेक मंडळ्या स्थापिलेल्या आहेत. ज्यांस आपलीं मुलें वाढवून मोठीं करण्याची शक्ति नाहीं त्यांजवळून तीं मुलें उपजत घेऊन त्यांची जोपसना करण्यास धर्मशाळा आहेत. जे उद्योग करण्यास उत्सुक असून ज्यांस उद्योग मिळत नाहीं त्यांस उद्योग लावून देणाऱ्या मंडळ्या आहेत. जे बंदीशाळेंत पडले आहेत त्यांस सुधारण्याच्या उद्देशानें अनेक मंडळ्या उपस्थित झालेल्या आहेत. मजूर लोकांच्या मुलांस शिक्षण देण्यासाठीं पुष्कळ मंडळ्या आहेत. परदेशस्थांसाठीं अनेक धर्मशाळा बांधिल्या आहेत. याशिवाय आणखी मजुरांची स्थिति सुधारण्यासाठीं आणि अनेक प्रकारच्या अनीतीचा प्रतिबंध करण्यासाठीं अनेक मंडळ्या आहेत.

एका लंडनांतच जीं धर्मखातीं आहेत त्यांचा विचार करून पाहिला तर इंग्लिश लोकांची परोपकारबुद्धि मोठी प्रशंसा करण्यासारखी आहे असें लक्षांत येईल. कित्येक धर्मखात्यांची नांवनिशी मात्र सांगतों, परंतु त्यांतून एक आपल्या स्वदेशीय आणि इकडील दुसऱ्या लोकांकरितां स्थापिलेलें आहे त्याची कांहीं हकीकत समजण्यांत आली आहे ती एथें कळवावी असें माझ्या मनांत आहे. "एशियाटिक होम" नांवाची धर्मशाळा ही एशिया खंडांतील प्रवासी आणि गैरमाहीत लोकांसाठीं बांधिली, त्याला सुमारें नऊ वर्षें झालीं. हिची वार्षिक सभा तारीख १ ली माहे ज्यून रोजीं भरली होती तीस मी

गेलों होतों. याशिवाय एकदां मी ही धर्मशाळा पाहावयासही गेलों होतों. सभेंत रिपोर्ट वाचला त्यावरून आणि मी धर्मशाळेंत जाऊन चौकशी केली तिजवरून तारीख १८ वी ज्यून रोजीं लंडनाहून एक पत्र लिहिलें होतें. त्यांतील कांहीं मजकूर अगत्याचा समजून एथें उतरून घेण्याची मी आज्ञा घेतें:—

"ही धर्मशाळा ईस्त इंदिया गोदीजवळ बांधिली आहे. आपल्या इकडील कोणाही गरीब प्रवाशास एथें उतरावयास सांपडतें. ह्या ठिकाणीं गरीब प्रवाशांस राहावयाच्या सर्व सोई आहेत. हींत निजावयाच्या व बसावयाच्या लहान लहान खोल्या आहेत, आणि एक मोठी सदर आहे, आणि नाहण्याधुण्याची व खाण्यापिण्याची ही सर्व सोय आहे. त्यांस निजावयास गाद्या, पलंगपोस आणि ऊबदार बुर्णूस तयार असतात. निजावयाच्या खोल्यांतून नळ्या घातल्या आहेत त्या अशासाठीं कीं अतिशय थंडी पडेल तेव्हां उष्ण कढत पाण्याची वाफ त्यांत सोडून आंत बसणाऱ्यांस आणि निजणाऱ्यांस ऊब यावी.

तेथें धुराचे दिवेही आहेत. तेथील लोकांस सुतार व धोबी लागल्यास ते तेथेंच आहेत. तेथील स्नानाच्या जागा अशा आहेत कीं मुंबईतील मध्यम प्रतीच्या लोकांच्या देखील तशा सोईवार नसतील. त्यांला बाजारांत वस्त्रें विकत घेतांना कोणी फसवील ह्मणून आवश्यक तेवढीं वस्त्रें त्यांस तेथेंच मिळावीं अशी तजवीज केली आहे. त्यांस कसरत किंवा तालीम करावयाची असली तर तिची सोय आहे, आणि औषध पाहिजे असलें तर डाक्तरही तयार असतो. याप्रमाणें ह्या धर्मशाळेस पूर्वेकडील प्रवाशांचें घर ह्मटले असतां अगदीं शोभेल.

ह्या ठिकाणीं उतरणारांस खाणेंपिणें, बसणें उठणें आणि निजणें यांबद्दल रोजचा सगळा एक शिलिंग ह्मणजे अर्ध रुपया द्यावा लागतो, आणि ज्यांस इतकेंही देण्याचें सामर्थ्य नसेल त्यांला एथें फु-

कट राहूं देतात व पोसतात. त्याबद्दल त्यांजवळून धर्मशाळेसंबंधीच कांहीं काम घेतात. सन १८६२ त ह्या धर्मशाळेमध्यें एकंदर ३९० प्रवासी उतरले. हींत २५० प्रवासी लोकांस बरोबर राहतां येईल अशी तजवीज केली आहे. जातिभेद बाळगणाऱ्या हिंदूस स्वयंपाकास निराळी खोली मिळते."

लंडनांतील मुख्य मुख्य धर्मखात्यांची नांवनिशी :—*

| | | | वार्षिक खर्च रुपये. |
|---|---|---|---|
| १४० | रोगी व दुखणेकरी लोकांसाठीं :— | | |
| | १४ इस्पितालें—सर्व प्रकारच्या रोगांचीं ........ | लक्ष | १८॥ |
| | ६६ इस्पितालें—निरनिराळ्या रोगांचीं निरनिराळीं. | ,, | १५॥ |
| | २२ इस्पितालें—स्त्रियांसाठीं<br>१ इस्पिताल—उपजत बाळकांसाठीं } ........ | ,, | ९॥ |
| | ३७ डिस्पेन्सरीज ह्मणजे दवाखाने ............... | ,, | २॥ |
| १२ | प्राणांचें, आरोग्याचें व नीतीचें रक्षण करणाऱ्या मंडळ्या ................................ | ,, | ४॥ |
| १६ | बंदीवानांस सुधारणाऱ्या मंडळ्या ............... | | |
| २९ | रस्त्यानें फिरणाऱ्या निराश्रित लोकांस आश्रय देणाऱ्या मंडळ्या ............................ | ,, | ६॥ |
| २१ | उद्योग मिळत नाहीं त्यांस उद्योग लावून देणाऱ्या मंडळ्या ................................ | ,, | १ |
| १२४ | ह्मातार्‍या भिकाऱ्यांसाठीं धर्मशाळा........... .... | ,, | ९॥ |
| १६ | आंधळे, बहिरे, मुके, व लंगडे यांसाठीं धर्मशाळा. | ,, | ४॥ |
| ६९ | निराश्रित मुलांस शिक्षण देणाऱ्या मंडळ्या .... | ,, | २६॥ |
| ७२ | गरीब उदमी लोकांस मदत करणाऱ्या मंडळ्या. | ,, | १०॥ |
| २० | गरीब पाद्री लोकांस मदत करणाऱ्या मंडळ्या. | ,, | ५ |

* Charities of London.

८० ख्रिस्ती धर्मप्रसारक मंडळ्या.

९९ विलायतेंत ख्रिस्ती धर्माचा उपदेश करण्यासाठीं ........................ „ ३६

२९ अन्य देशांत ख्रिस्ती धर्माचा उपदेश करण्यासाठीं ........................ „ ६४

४९ किरकोळ धर्मखातीं........................ „ ३०

विलायतेंतील लोकांच्या परोपकारबुद्धीची मोठी खुबी ह्यावरून दिसून येते कीं ते आपला उपाय चालेल तोंपर्यंत कोणा मनुष्यास कांहीं दुःखामुळें किंवा भुकेनें मरूं देणार नाहींत, परंतु आपल्या हातून होईल तितकी मदत त्यास करतील. तेथें कित्येक परोपकारी स्त्रिया गरीब रोगग्रस्तांची संतोषानें चाकरी करितात. त्यांतील कित्येक स्त्रिया मोठ्या कुलीन व श्रीमान असतात. मिस नैटिंगेल ही बाई स्वदेश सोडून, रूस लोकांबरोबर लढाई झाली तींत घायाळ झालेल्या शिपायांचा समाचार घ्यावयास व चाकरी करावयास गेली होती, हें वाचणाऱ्यांच्या ऐकण्यांत आलेंच असेल. अशा परोपकाराची आपल्या एथें फारच गरज आहे.



# प्रकरण १०.

## इंग्लंडाच्या महत्वाचीं कारणें.

## X.—CAUSES OF ENGLAND'S GREATNESS.

इंग्लंडाच्या मोठेपणाचें मुख्य कारण काय याचा विचार व चौकशी करणें मोठें अगत्याचें आहे. मागील प्रकरणांत इंग्लिश लोकांचे जे सामान्य गुण सांगितले ते इंग्लंड देशाच्या मोठेपणाचें एक मुख्य कारण होत. परंतु त्या देशांत आणखी अशा कित्येक साधनांचा योग झाला आहे कीं तेणेंकरून तो देश आज सकळ भूमंडळावर महत्व पावला आहे. यास्तव त्यांतील मुख्य मुख्य साधनांचें या प्रकरणांत विवरण करण्याची मी आज्ञा घेतों.

### १. विद्या.

KNOWLEDGE.

सर्वांत मोठें साधन ह्मटलें ह्मणजे विद्या. विद्या ह्मणजे ज्ञान. या देशांतील लोकांमध्यें ज्ञान फार आहे. या देशीं जे लोक श्रेष्ठ शिक्षण पावतात त्यांस अनेक विषयांचें फार चांगलें ज्ञान असतें. वाफयंत्राची रचना कशी आहे, वाफेनें आगबोट व आगगाडी कशी चालते, विद्युल्लतेच्या योगानें तारेंतून वर्तमान कसें जातें येतें, आकाशांतील ग्रहणें वगैरे कशीं वर्तवितात, निरनिराळ्या यंत्रांत पाण्याचा व वायूचा किती आणि कोणत्या रीतींनीं उपयोग करितां येतो, पदार्थ कोणकोणत्या पदार्थांच्या कसकशा संयोजनानें होतात, वगैरे अनेक विषयांचें गहन ज्ञान श्रेष्ठ विद्या पावलेल्या हजारो लोकांस चांगलें असतें.

साधारण शिक्षण पावलेले असतात त्यांला सुद्धां यांतील बहुतेक विषयांचें साधारण ज्ञान असतें. परंतु जे मुळींच विद्या शिकत नाहींत

अशांस डोळ्यांनीं फक्त पाहून जें ज्ञान या देशांत प्राप्त होतें तें आपल्या देशांत होत नाहीं. रस्त्यानें जातांना, एकाद्या कारखान्यांत काम करतांना, किंवा एकादें मोठें पदार्थसंग्रहालय किंवा विलोरी महाल जाऊन पाहिला असतां, तेथील लोकांस जो ज्ञानलाभ होतो तो कांहीं सामान्य नाहीं.* ह्या ज्ञानप्राप्तीच्या योगेंकरून विलायतेंत कलाकौशल्य वृद्धि पावत आहे, नवेनवे शोध होत आहेत, आणि कारखाने निघत आहेत.

विद्यावृद्धीसाठीं विलायतेंतील लोक श्रम करितात तसे आपले लोक करीत नाहींत. विद्येची वृद्धि करण्यासाठीं विलायतेंत जितक्या शाळा स्थापिलेल्या आहेत तितक्या, आपल्या देशाच्या विस्ताराच्या व वस्तीच्या मानानें पाहतां, ह्यांत नाहींत. विलायतेंत विद्येच्या वृद्ध्यर्थ जितकीं वर्तमानपत्रें व पुस्तकें छापून प्रसिद्ध होतात त्यांचा दशमांश सुद्धां आपल्या देशांत नाहीं. तेथें विद्यावृद्धि होण्यास सभा आहेत त्यांचा अष्टमांश देखील आपल्या एथें नाहीं. अशा दोन सभांस मी विलायतेंत गेलों होतों त्यांविषयीं थोडक्यांत सांगून हा विषय पुरा करितों.

एक "प्यूर-लिटरेचर-सोसायटी"—हिची वार्षिक सभा तारीख १९ वी माहे मे रोजीं भरली होती, तीस मी आणि माझे मित्र राव बहादुर रामचंद्र बाळकृष्ण गेलों होतों. या सभेचा अध्यक्ष अर्ल-ऑव-शाफ्ट्स्बरी हा आहे, आणि उपाध्यक्ष नऊ मोठमोठे प्रख्यात पुरुष आहेत. पुष्कळ मानकरी आणि इतर थोरथोर पुरुष ह्या सभेचे सभासद आहेत. त्यांपैकीं बहुतेक सदरहू प्रसंगीं सभेस आले होते. सभेचे अध्यक्ष अर्ल-ऑव-शाफ्ट्स्बरी यांजसाठीं एक उंच जागा तयार

* "The natives of India we class far below the natives of England, not in intelligence, but in the kind of knowledge possessed, and in the opportunities for obtaining valuable instruction. An English charity-school boy, we hold is acquainted with things which it better behoves a man to know than all the learning of the greatest Hindu sage."

*Times of India*, 11, *January*, 1866.

केली होती, तीवर तीन खुरच्या मांडिल्या होत्या. त्या उंच स्थानीं लॉर्ड शाफ्ट्स्बरी यांणीं आह्मा दोघांस बसविलें. अशा मोठ्या मानास आह्मी योग्य नसतां याप्रमाणें आमचा सत्कार केला यावरून विलायतेंतील लोकांस एतद्देशीय सद्गृहस्थ आवडतात, आणि ते परदेशी ह्मणून ते त्यांस आपल्या देशांत अधिक मान देतात, असें वाचणाऱ्यांच्या लक्षांत येईल. त्या मंडळीचा उद्देश तिच्या रिपोर्टांत लिहिला होता तो येणेंप्रमाणें :—

"The Pure Literature Society does not publish books or periodicals. It neither issues any new works of its own, nor derives any profit from commercial transactions. Its efforts are directed to promote the circulation of pure and healthy literature."

ही मंडळी ग्रंथ किंवा नियमित काळीं निघणारीं पुस्तकें छापून प्रसिद्ध करीत नाहीं. ती आपण कांहीं नवीं पुस्तकें काढीत नाहीं व आपल्या कामांत नफाही मिळवीत नाहीं. शुद्ध (मन भ्रष्ट न करणारी) आणि हितकर अशा विद्येचा (किंवा ग्रंथांचा) प्रसार करावा एवढाच हिचा हेतु आहे. ह्या उद्देशानें जीं पुस्तकें चांगलीं असें मंडळीच्या नजरेस येईल त्यांची यादी करून छापतात, आणि असलीं उपयोगी पुस्तकें मंडळीकडून कितीएक पुस्तकालयांस अर्ध्या किंमतीनें मिळतात, आणि जे कोणी वर्षास एक गिनी ह्मणजे साडेदहा रुपये देतील त्यांस घरीं बसून महिन्याच्या महिन्यास निरनिराळीं उपयोगी पुस्तकें वाचावयास पाठवून देण्यांत येतात. अशा रीतीनें ही मंडळी मोठें उपयोगी काम करीत आहे.

दुसरी सभा "रॉयल ज्योग्राफिकल सोसायटी" हिची तारीख २२वी माहे ज्यून या दिवशीं रात्रीस भरली होती. तीस मी आणि माझे मित्र रावबाहदूर रामचंद्र बाळकृष्ण व शेट डोसाभाई फ्रामजी कडाका गेलों होतों. नील नदीच्या उगमाचा शोध लावणारे कप्तान

स्पीक व कप्तान ग्रांट यांस भेटून त्यांची हकीकत ऐकण्यासाठीं ही सभा भरली होती. तेथें आलेल्या स्त्रिया त्या साहसिक पुरुषांस पाहून वारंवार आनंदाची टाळी वाजवून मान देत. तेथला तो प्रकार मोठा पाहण्याजोगा व मनांत ठसण्यासारखा होता. सर रोडरिक मर्किसन हे अध्यक्षस्थानीं बसले होते. दोन शिद्यांच्या मुलांनीं या धैर्यवान आणि साहसिक पुरुषांची चांगल्या प्रकारें चाकरी केली होती त्यांस एका टेबलावर उभें केलें होतें. पाहिल्यानें कप्तान स्पीक याणें आणि नंतर कप्तान ग्रांट याणें आपलें वृत्त वाचून दाखविलें, आणि त्यानंतर इतालीच्या राजाकडून आलेले चांद त्या शूर पुरुषांस बहुमानानें देण्यांत आले.

## २. कलाकौशल्य.

ART.

ह्या देशांत अनेक प्रकारच्या अनेक कला आहेत हेंही याच्या मोठेपणाचें एक कारण होय. एथील लोकांस किती आणि कोणत्या कळा माहीत आहेत हें कांहीं सांगतां येणार नाहीं. ते लोक "ही वस्तु आह्मांला कशी करतां येणार नाहीं तें पाहूं" असा अभिमान धरून, तिजवर अगदीं तुटून पडतात. तेथें आपण अमुक वस्तु आह्मांस पाहिजे म्हटलें म्हणजे ती तयार मिळते. विलायतेंत कलाकौशल्य किती वाढलें आहे हें आगबोटीवरून, आगगाडीवरून किंवा विद्युत्तारेवरूनच लक्षांत येईल.

याशिवाय, विलायतेहून दुसऱ्या हजारो तर काय, पण लाखो तऱ्हांच्या जिन्नसा या देशीं येतात त्यांवरूनही आमच्या लोकांस तेथील कलाकौशल्याचें अनुमान करतां येईल. आपल्या देशांत नकशीकाम, शाली करणें वगैरे थोडींशीं उंचीं कसबें राहिलीं आहेत, याचें कारण हें कीं यांत विलायतेंतील लोक अजून आमची बरोबरी करूंला-



नकशीदार खुजे.

गले नाहींत. इतर सर्व कलाकौशल्य या देशांतून नष्ट झालें आणि होत आहे. बारीक सुईपासून तों वस्त्रापर्यंत सर्व वस्तूंविषयीं आपणाला विलायतेचा सर्व आधार आहे. गांवठी माल हलका असून त्यास किंमत अधिक पडते, म्हणून त्याचा खप कमी होत चालला आहे, आणि त्याबरोबर गांवठी कसबही जात चाललें आहे.

चित्रें काढणें, संगमरवरी दगडाचे पुतळे करणें वगैरे यांस उंच्या कळा (Fine arts) म्हणतात. ह्या कळांतही हे लोक फार पुढें गेले आहेत. किंतानावर तेलाच्या किंवा पाण्याच्या रंगानें चित्रें काढण्याची कळा विलायतेंतील लोकांनीं किती उंच स्थितीप्रत आणून पोंचविली आहे तें मी सहाव्या प्रकरणांत चित्रसंग्रहाविषयीं लिहितांना कळविलें आहे. तसेंच "फोटोग्राफी" म्हणजे सूर्याच्या किरणांनीं चित्रें काढण्याची कळा थोड्या काळांत वाढली आहे, आणि तीही उंच स्थितीप्रत आणल्याबद्दल या लोकांची मोठी तारीफ करणें योग्य आहे.

छापण्याकरितां, लांकडावर किंवा लोखंडाच्या पत्र्या (प्लेटीं) वर बारीक शस्त्रांनीं कोरून चित्रें काढण्याविषयीं विलायतेच्या लोकांची



DEFENDING THE PASS.

लांकडावरील कोरींव काम.

“ डिफेंडिंग धि पास.”



संगमरवरी दगडाचे पुतळे.

आख्या आहे. आपल्या एथें सूर्याच्या किरणांनीं चित्रें काढण्याची युक्ति आली आहे, पण अजून ही युक्ति आली नाहीं. अलीकडे कित्येक एतद्देशीय लोक लांकडावर कोरून चित्रें काढावयास शिकले आहेत, परंतु त्याबाबद जितकी माहिती करून घेतली पाहिजे तितकी त्यांस अजून झालेली नाहीं. तांब्याच्या पत्र्यावर कोरून चित्रें काढण्याची कळा अद्यापि आपल्या एथें मुळींच आली नाहीं. ह्या कळेच्या योगानें कशीं सुंदर चित्रें काढतां येतात याविषयीं, "आर्ट-जर्नल" वगैरे चित्रांचीं पुस्तकें जे पाहत असतील त्यांची खात्री झाली असेल. पत्र्यावर जितकें बारीक कोरतां येतें तितकें लांकडावर येत नाहीं; तथापि लांकडावर कोरलेलीं कित्येक चित्रें अशीं नामी असतात कीं हीं पत्र्यावर कोरून काढलेलीं आहेत किंवा लांकडावर आहेत हें एकाएकीं सांगवणार नाहीं.

संगमरवराचे असे उत्कृष्ट पुतळे एथें करितात कीं ते पाहून आपणास करणाऱ्यांच्या बुद्धीविषयीं मोठा अचंबा वाटतो. आपले लोक मातीचे पुतळे चांगले करितात, परंतु दगडाचे पुतळे करणें त्याहून कठीण आहे. ज्यांणीं संगमरवरी दगडांचे पुतळे नीट लक्ष लावून पा-

ठिके असतील ते सांगतील कीं पुतळ्यांस रंग लावण्याच्या पूर्वी त्यांच्या तोंडाची मुद्रा व शरीराचा बांधा इतका हुबेहूब असतो कीं कोणा ओळखीच्या मनुष्याचा पुतळा पाहून हा अमक्याचाच आहे असें सहज सांगतां येईल. आपले लोक संगमरवरी दगडाची जाळी वगैरे काम फार चांगलें करितात, परंतु मनुष्याचे हुबेहूब पुतळे घडून किंवा कोरून करण्याच्या कामांत फार पाठीं आहेत.

आपला देश प्राचीन काळीं विद्याकलांविषयीं फार प्रसिद्ध होता, आणि कितीएक कसबांविषयीं हल्लींही आहे, परंतु याविषयीं वृथा अभिमान बाळगून आणि लटकी फुशारकी मिरवून आपलें कल्याण होणें नाहीं. हें सर्व इंग्रज लोकांनीं आपणापासूनच घेतलेलें अशी जे फुशारकी मिरवितात त्यांला मोठी लाज वाटावी, आणि, पूर्वीं आपण विद्याकलांत इतके प्रवीण असतां आज इतके पाठीं कां पडलों आहों असें त्यांणीं आपणालाच विचारावें. आपल्या लोकांस विद्याकलांविषयीं खरा अभिमान असला तर त्यांणीं ती तन मन व धन लावून शिकावी आणि या देशांतील विद्यांचें व कलांचें पुनरुज्जीवन करण्याविषयीं यत्न करावा.

### ३. नवे शोध आणि युक्ति.

INVENTIONS AND DISCOVERIES.

इंग्लंडांत विद्याकळांची वृद्धि झाल्यामुळें आणि लोकांमध्यें ईर्ष्या असल्यामुळें नेहमी नवे नवे शोध होत व युक्ति निघत आहेत. गेल्या शंभर वर्षांमध्येंच जे नवे नवे शोध लागले आहेत आणि युक्ति निघाल्या आहेत त्यांची गणती ही होणार नाहीं. लोकांचें ध्यानमन हल्लीं नव्या शोधांत व नव्या युक्ति काढण्यांत इतकें निमग्न झालें आहे कीं थोड्या वर्षांत हेच डोळे किती नवीं कौतुकें पाहतील ह्याचा अजमास देखील करवत नाहीं. शंभर वर्षांपूर्वीं कोणाच्या स्वप्नींही आलें



VENUS.

लांकडावरील कोरींव काम.

“ वीनस.”



नव्हतें कीं तारेवें वाऱ्याची दरकार न बाळगतां बल्ह्यांवांचून चालतील; तसेंच घोड्यांशिवाय किंवा बैलांशिवाय गाडी प्रति तासांत ७० मैलांपर्यंत जाईल असें पन्नास वर्षांपूर्वी कोणास वाटलें नव्हतें. वीस वर्षांपूर्वी कोणाच्या ध्यानीं मनींही नव्हतें कीं विलायतेच्या आणि हिंदुस्थानाच्या मध्यें विद्युत्तारेच्या योगानें थोड्याशा तासांत वर्तमान जाईल येईल. सूर्याच्या किरणांनीं चित्रें काढणें वगैरे नव्या युक्ति निघाल्या आहेत यांविषयीं थोड्या वर्षांपूर्वी कोणास सांगितलें असतें तर तें त्याणें खरें मानलें नसतें. आणखी पन्नास किंवा शंभर वर्षांत किती नवे शोध होतील आणि कळा निघतील हें कोणाच्यानें सांगवत नाहीं.

कांहीं तरी सुधारणूक करावी, कांहीं तरी नवी कळा किंवा युक्ति काढावी हीच गोष्ट या लोकांच्या मनांत भरली आहे. ज्या कारागिरानें कांहीं नवी हिकमत शोधून काढली नाहीं तो कारागीर कसला? दुसऱ्याच्या कल्पनेप्रमाणेंच करणें यांत प्रतिष्ठा ती कोणती? कांहीं नवी युक्ति काढून "पेटन्ट" ह्मणजे सनद मिळवावी तरच त्यांत मर्दपणा आणि वाहवा. अशी हौस व ईर्ष्या तेथील लोकांमध्यें फार आहे, तेणेंकरून ते बहुत पुढें गेले आहेत, जात आहेत आणि जातील.

## ४. कारखाने.

MANUFACTORIES.

विलायतेंत कारखान्यांचा कांहीं सुमार नाहीं. अहाहा! जागोजाग कारखान्यांचा झपाटा पाहून नजर चक्क होते! किती आणि केवढे मोठे कारखाने! आपल्या एथें सुताचे व कापडाचे कांहीं कारखाने निघाले आहेत, परंतु ते या कारखान्यांच्या पासंगासही पुरणार नाहींत! ठिकठिकाणीं कारखाने, आणि ठिकठिकाणीं वाफेचीं यंत्रें! अहाहा! ह्यांत या देशाचा किती पैसा घातलेला असावा! ह्या कारखान्यांतून पृथ्वीवर किती देशांस माल पुरविला जात असेल!

इंग्लंडांत एकेका जातीचे अनेक कारखाने आहेत. याविषयीं वाचणाऱ्यांस कांहीं अनुमान करितां यावें ह्मणून मी एवढेंच सांगतों कीं फक्त सुताचे व कापडाचे कारखाने सुमारें २५०० आहेत; आणि त्यांत वर्षास ८० कोटि रूपयांचा माल तयार होतो. लोंकरीच्या कापडाचे कारखाने अजमासें २००० आहेत, त्यांत प्रतिवर्षीं २५ कोटि रूपयांचें कापड तयार होऊन निघतें. रेशमी व तागाच्या वस्त्राचे सुमारें ५०० कारखाने आहेत आणि त्यांत सुमारें १५ कोटि रूपयांचा माल तयार होतो.

विलायतेंत ज्या जातीचे कारखाने आहेत त्यांतून बहुतेकांची यादी* एथें करतों. ती येणेंप्रमाणें:—

| कारखाने:— | कारखाने:— | कारखाने:— |
|---|---|---|
| सुताचे. | दारूचे. | आगबोटींचे. |
| कापडाचे. | चामड्याचे. | ग्यासाचे. |
| धुण्याचे. | मातीकामाचे. | यंत्रांचे. |
| रंगाचे. | चिनी भांड्यांचे. | लोखंडी कामाचे. |
| चिटांचे. | बिलोरकामाचे. | सुयांचे. |
| लोंकरीचे. | दगडकामाचे. | खिळ्यांचे. |

* Dodd's British Manufactures; Vol. I. VI.

| कारखाने :— | कारखाने :— | कारखाने :— |
|---|---|---|
| रेशमी कापडाचे. | कागदाचे. | स्क्रुवांचे. |
| गालिच्यांचे. | साबूचे. | काणसांचे. |
| मोज्यांचे. | तेलाचे. | करवतींचे. |
| टोप्यांचे. | बंदुकांचे. | चाकूकातरींचे. |
| तागाच्या कापडाचे. | पिस्तुलांचे. | तलवारींचे. |
| दोऱ्यांचे. | वाद्यांचे. | स्तीलपेनांचे. |
| साखरेचे. | घड्याळांचे. | टांचण्यांचे. |
| तमाखूचे. | तारवांचे. | बुतावांचे. |

## ९. कोळसे.

COAL.

इंग्लंडाची खरी आणि मोठी दौलत ह्मटली ह्मणजे त्यांतील कोळसे होत. इंग्लंडांत कोळशांच्या एवढ्या मोठ्या खाणी लागल्या आहेत, आणि ह्या व दुसऱ्या पुष्कळ देशांत कोळशांचा इतका पुष्कळ खप होत चालला आहे कीं, आस्ट्रेलियेंतील सोन्याच्या खाणींपेक्षां, ह्या कोळशांच्या खाणी अधिक मोलवान झाल्या आहेत. सुमारें २० कोटि रूपयांचे कोळसे प्रतिवर्षी इंग्लंडाच्या जमिनींतून खणून काढितात.† आणखी आज त्या सर्व जमिनींत इतका कोळसा भरलेला आहे कीं, तो आणखी ३९०० वर्षांपर्यंत संपणार नाहीं असें गणित केलें आहे. एवढ्या मोठ्या खाणी दुसऱ्या कोणत्याही देशांत आजपर्यंत सांपडलेल्या नाहींत.

विलायतेंत इतका पुष्कळ कोळसा आहे ह्मणून यंत्रें, आणि कारखाने, ह्यांत या देशाची इतर देशांपेक्षां अधिक आख्या झाली आहे. ह्या देशांत कोळसा फार सवंग असल्यामुळें कारखानदारांस पुष्कळ नफा होतो. जे कारखाने कोळशांच्या खाणीच्या नजीक आहेत त्यांस कोळसा फारच स्वस्ता मिळतो, तो इतका कीं सात शिलिंग ह्मणजे साडे-

† The British Nation; p. 13-74.

तीन रुपये टन मिळतो. लंडन शहरांत कोळसा इतर गांवांपेक्षां महाग आहे खरा; परंतु तेथें देखील टनास ११ रुपयांपेक्षां जास्ती पडत नाहीं. आपल्या देशांत त्याच्या तिप्पट चौपट पडतें.

मुंबईतला कोणता एकादा कारखाना घेऊं. एका कारखान्यांत ३० हजार सुताचे रहाट, आणि ६०० कापडाचे माग आहेत, आणि सात टन कोळसे दररोज खपतात, असें आपण समजूं. या हिशेबानें प्रतिवर्षी २२०० पासून २५०० टनपर्यंत कोळसे पाहिजेत. विलायतेंत इतक्या कोळशाला आठ दहा हजार रुपये पडतील, परंतु मुंबईत पाऊण लाख किंवा ऐशीं हजार रुपये बसतील. याप्रमाणें विलायतेंत एका कारखान्याचा खर्च पांसष्ट किंवा सत्तर हजार रुपये कमी होतो, ह्मणजे त्या देशास तितका अधिक नफा होतो.

## ६. लोखंड.

IRON.

इंग्लंडांत लोखंडाच्याही खाणी मोठ्या व पुष्कळ असल्यामुळें त्या देशच्या कारखानेवाल्यांस मोठी सोय पडते. यांत्रिक कामास लोखंडाचा खप कांहीं असातसा होत नाहीं. इंग्लंडांत लोखंडाचें उत्पन्न प्रतिवर्षी सुमारें ७ कोटि रुपये होतें. इंग्लंडांत लोखंड, आणि कोळसा विपुळ असल्यामुळें हा देश इतर देशांस यंत्रें पुरवितो. आपल्या देशांत कारखान्यांसाठीं विलायतेहून यंत्रें आणण्यास पुष्कळ खर्च बसतो.

त्याच्याबद्दल आपल्या देशच्या कारखानेवाल्यांस दुसऱ्या रीतीनें फायदा आहे तो हा कीं, आपण इकडून माल त्या देशांत पाठवितों तो तेथें तयार होऊन या देशास परत आल्यावर महाग पडायाचाच. ह्मणून आपल्या एथील कारखान्यांचें काम नीट चाललें तर यंत्रें आणि कोळसे यांत जो तोटा होतो त्याचा वचपा येऊन कारखान्याच्या मालकांस नफा व्हावा.

## ७. हवा.

CLIMATE.

इंग्लंडाची हवा ही त्या देशाच्या मोठेपणास कारणभूत झाली आहे. ती थंड असून घडीघडी पालटते खरी, तरी तींत एक मोठा गुण आहे. एथें मेहेनत करून मनुष्य लौकर थकत नाहीं. आपल्या देशांत काम करवतें याच्या दसपट किंवा वीसपट त्या देशांत केलें तरी थकलेंसें वाटत नाहीं, आणि हें तर उघडच आहे कीं जितकें काम अधिक होईल तितका फायदा अधिक व्हायाचाच.

दुसरें, या देशांत गरीब लोक लंगोटी मारून फिरतात आणि चणे कुरमुरे खाऊन निर्वाह करतात, त्याप्रमाणें विलायतची हवा थंड असल्यामुळें तेथें करतां येत नाहीं. कोणी मनुष्य कितीही गरीब असला तरी त्याला जाड ऊबदार वस्त्रें आंगांत घातलींच पाहिजेत, आणि पुष्टिकारक असें अन्न खाल्लें पाहिजे. मी पूर्वीं सुचविलें आहे कीं विलायतेंत गरीब अवस्थेंतील जे लोक सक्त मेहनत करणारे नाहींत त्यांची अवस्था फारच वाईट आणि दुःखकारक असते. याजकरितां तेथील हवेमुळें गरीब लोकांच्यानें आळसी होवत नाहीं.

## ८. रेलवे ह्मणजे लोखंडी सडक.

RAILWAY.

इंग्लंडांत चहूंकडेस आगगाडीची लोखंडी सडक पसरली आहे, आणि तेणेंकरून प्रत्येक गांव आणि प्रत्येक शहर यांचें एकमेकांशीं दळणवळण वाढलें आहे. यामुळें त्या देशास केवढा लाभ झाला आहे आणि होत आहे याचा अजमासही करवत नाहीं. पूर्वीं निरनिराळ्या गांवचे लोक परस्परांस परके मानीत असत, ते सर्व आतां एक होऊन गेले आहेत. देशांतील लोकांचा एकमेकांबरोबर परिचय आणि दळणवळण पडल्यानें परस्पर स्नेहभाव वाढला आहे, आणि

तेणेंकरून देशास जोर आला आहे. एकएका माणसास कितीही सामर्थ्य असलें तरी जोंवर तीं एकमेकांपासून निरनिराळीं राहून एकमेकांस परके समजतात तोंवर तें सामर्थ्य कांहीं कामाचें नाहीं.

इंग्लंडांत आणि त्याला जोडलेल्या दोन देशांत मिळून एकंदर (१८६४ चे अखेरीस) १२३०० मैल लोखंडी सडक चालू झाली आहे.* ह्या सडकेस चार अब्ज रुपये या देशाचे खर्च झाले आहेत† आपल्या देशांत ३१०० मैल आगगाडीचा रस्ता झाला आहे.‡ परंतु या देशाचा विस्तार सदरहू तीनही देशांच्या बारापट आहे, ह्मणून दीड लक्ष मैल लोखंडी रस्ता होई तोंवर ह्या देशाच्यानें विलायतेची बरोबरी करवणार नाहीं.

## ९. एकभाषा.

### UNIVERSAL LANGUAGE.

विलायतेंत सर्व देशभर एकच भाषा बोलतात आणि समजतात, यामुळें तेथील लोकांस मोठा फायदा आहे. वर्तमानपत्रांत अथवा पुस्तकांत, किंवा ग्रंथांत जें छापावें तें देशांतील सर्व ठिकाणच्या लोकांस वाचून त्यापासून लाभ करून घेतां येतो. आपल्या देशांत असें होत नाहीं. ह्यास याच ग्रंथाचें (गुजराथी प्रतीचें) उदाहरण घेऊं. पाहा, मुंबईतील गुजराथी वाचणाऱ्यांस आणि गुजराथेंतील लोकांस मात्र हा वाचतां येईल, परंतु महाराष्ट्रांतील, मद्रासेंतील, बंगाल्यांतील, पंजाबांतील, किंवा रजपुतस्थानांतील लोकांस, यांत काय लिहिलें आहे, तें समजणार नाहीं.

ह्या देशांत एकेका प्रांताची भाषा निराळी असें झालें आहे, हें ह्या देशाचें मोठें अभाग्यच समजलें पाहिजे. हल्लीं शिकलेल्या त-

* Chambers' Journal ; April, 1865.
† Westminister Review ; January, 1865.
‡ Friend of India ; September, 1865.

ह्रण लोकांत इंग्रजी भाषा साधारण होत चालली आहे, आणि त्या भाषेंत लिहिलेलें सर्व ठिकाणीं सुशिक्षित एतद्देशीय लोकांस वाचतां येतें आणि समजतें. पण इंग्रजी शिकण्याचें ज्यांच्या भाग्यांत नाहीं अशांसाठीं कोणती तरी एक भाषा आणि एक लिपि झाली पाहिजे. हिंदुस्थानी (किंवा हिंदी) भाषा आणि देवनगरी लिपि ही ह्या देशांत चहूंकडेस बरीच समजतात. ती सर्वत्र चालू होईल तर ह्या देशाचें सुदैव खरेंच उघडेल. एक भाषा झाल्याखेरीज, ह्या देशांतील निरनिराळ्या प्रांतांत लोक एकमेकांस बरोबर ओळखूं लागणार नाहींत, आणि त्यांमध्यें परस्पर स्नेहभाव उत्पन्न होणार नाहीं.

## १० व्यापार.

COMMERCE.

इंग्लंडांत जो मोठा व्यापार चालतो, तो देखील त्या देशाच्या महत्वास कारणभूत आहे. इंग्लंडाचा व्यापार कांहीं पांचदहा शहरांबरोबर किंवा गांवांबरोबर चालतो असें नाहीं, तर पृथ्वीवरील सर्व मोठमोठ्या शहरांबरोबर चालतो. असा एकही देश नाहीं कीं ज्याबरोबर इंग्लंडाचा व्यापार चालत नाहीं. इंग्लिश व्यापारी पृथ्वीच्या चारही खंडांत गेले आहेत. ज्या देशामध्यें व्यापारोपयोगी पदार्थ उत्पन्न होतात, आणि ज्याचा इतर देशांशीं व्यापार चालतो असा कोणताही देश पाहिला असतां त्यांत इंग्लिश व्यापारी दृष्टीस पडल्यावांचून राहणार नाहींत. व्यापाराच्या उद्देशानें इंग्रजी व्यापाऱ्यांची जागोजाग वस्ती झाली आहे. ते आपल्या देशांत पहिल्यानें व्यापाराकरितांच आले, आणि नंतर त्यांणीं राज्य संपादन केलें.

इंग्लंडांत कांहीं लाखो रुपयांचा नव्हे, कोट्यावधि रुपयांचा व्यापार चालत आहे. प्रति वर्षीं १॥ पासून २ अब्ज रुपयांचा माल विलायतेंतून बाहेर देशीं जातो, आणि २ पासून २॥ अब्ज रुपयांचा

माल अन्य देशांतून विलायतेस येतो. याप्रमाणें ४। अब्ज ह्मणजे चारशें पंचवीस कोटि रुपयांचा देवघेव दुसऱ्या देशांबरोबर माल आणण्यानेण्याचा होतो*. इंग्लंडाच्या निरनिराळ्या कारखान्यांतच अजमासें १॥। अब्ज (पावणे दोनशें कोटि) रुपयांचा माल तयार होतो. एका वर्षांत पन्नास हजार गलबतें आणि पांच हजार आगबोटी ज्या देशाच्या बंदरांत येतात जातात त्याचा व्यापार केवढा असावा!

आपल्या देशाचा थोडासा ऊर्जित काळ आला आहे हा विलायतच्या व्यापारानेंच आला आहे. विलायतेचा व्यापार नसता तर आपला देश ज्या दरिद्रावस्थेंत होता तींतून त्याची कधीं सुटका झाली नसती. आरंभीं (ह्मणजे इंग्रजांच्या हातीं ह्या देशाचें आधिपत्य गेलें तेव्हां) या देशांतून पुष्कळ द्रव्य गेलें ही गोष्ट खरी आहे; परंतु सांप्रत कांहीं वर्षें विलायतेहून दर खेपेस पुष्कळ पैसा इकडे येऊं लागला आहे, हा देशाच्या व्यापाराचा प्रताप होय. एतद्देशीय लोक आणि,त्यांत विशेषेकरून, पश्चिम हिंदुस्थानांतील वाणी, भाट्ये, पारसी, खोजे वगैरे व्यापाराच्या कामांत मोठे साहसिक गणिले आहेत. ते चीनचा, विलायतचा व्यापार करितात खरे, परंतु आपल्या तर्फेनें स्वदेशीय लोकांच्या हातून विलायतेंत काम चालवून घेणें किंवा स्वतां तेथें जाणें यांत अजून मागें आहेत.

## ११. अरमार.

NAVY.

इंग्लंडांतील लोकांचा साऱ्यांत मोठा प्रताप ह्मटला ह्मणजे आरमार होय, आणि तेणेंकरून या देशाचें महत्व जगप्रसिद्ध झालें आहे. समुद्रांत मोठमोठ्या गलबतांवर आणि मोठमोठाल्या आगबोटींवर लष्कर, दारूगोळा, वगैरे लढाईचें सामान ठेवून वेळ येईल तेव्हां दर्या-

* Home News; April, 1864.

त गलबतांवरून लढाई करावी. सांप्रतकाळीं इंग्रज लोकांची चपळाई जितकी दिसून येते तितकी दुसऱ्या कोणत्याच लोकांची कधीं दिसून आली नसेल. समुद्रांत युद्ध करण्याविषयीं इंग्रजांचें चातुर्य सर्व जगांत प्रसिद्ध आहे. इंग्रज लोकांच्या वर्चस्वाची जी अमोलिक छाप पडली आहे ती कायम राखण्यास त्या देशाच्या सरकारास वर्षोंवर्षीस अरमारांत आवश्यक अशी सुधारणा व वृद्धि करण्याविषयीं फार जपलें पाहिजे.

या समुद्रावरील फौजेसाठीं दरसाल मोठा खर्च होतो तो विलायतेची रयत संतोषानें देते. या अरमाराच्या खर्चाचे प्रतिवर्षीं दहा कोटि रुपये होतात! या रकमेंत ९० हजार माणसांचा, ९९६ लढाऊ गलबतांचा किंवा मनवारांचा, व १६० गनबोटीं (तोफांच्या जाहजां) चा खर्च निभावतो*. एवढें मोठें अरमार फ्रान्सचें किंवा रूस देशाचेंही नाहीं. ज्या कोणीं विलायती मनवार पाहिलें नसेल त्यांणीं तें पाहण्याची संधि पुनः आली असतां दवडूं नये. त्याजवरची रचना आणि कवाईत पाहून कोणास ही आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. इंग्रजी शिपाई आणि खलाशी महासागरांत मोठी लढाई मारूं शकतात ह्मणून त्यांची धन्य आहे.

## १२. सौम्य सरकार.

MILD GOVERNMENT.

ज्या देशाचें सरकार जुलमी तो कधीं मोठेपणास पावणार नाहीं. ज्या देशाचें सरकार सौम्य किंवा दयाळू तो देश लौकरच सुखी झाल्यावांचून राहणार नाहीं. इंग्लंडाचें महत्व इतकें वाढलें आहे याचें यश तेथील सौम्य राज्यपद्धतीस दिलें पाहिजे. इंग्लंडाच्या राज्यरीतीस तेथील लोक केवळ राजी आहेत इतकेंच नाहीं, तर तिजवर त्यांची अतिवळकट भक्ति आहे. आपल्या राज्यरीतीचें किंवा सरकारचें संरक्षण कर-

* Chambers' Information; Vol. II. p. 187.

ण्यास सर्व प्रजा तन, मन आणि धन अर्पण करण्यास, आणि प्रसंग पडल्यास प्राणही देण्यास तयार आहे. ज्या देशच्या सरकारच्या आणि रयतेच्या मध्यें इतकी बळकट प्रीति आहे तो देश मोठेपणा पावला ह्मणून त्यांत नवल तें कोणतें ?

एतद्देशीय राज्यांमध्यें कारभारांत जसा जुलूम आणि अंधार असतो तसा इंग्रजी राज्यांत मुळींच आढळत नाहीं. एतद्देशीय संस्थानांत रयत लोकांस जुलमानें वेठीस धरतात तसें इंग्रजी राज्यांत धरीत नाहींत. एतद्देशीय राज्यांत धारा, कर वगैरे वसूल करण्याची जशी रीति आहे तशी इंग्रजी राज्यांत नाहीं. एतद्देशीय राज्यांत लांच घेण्याचा प्रकार जितका चालतो तितका बहुतकरून इंग्रजी राज्यांत चालत नाहीं.

याशिवाय इंग्रजी राज्यांत प्रजेचें सुख वाढण्यासाठीं अनेक उपायांची योजना होत असते तशी बहुतकरून एतद्देशीय राज्यांत दिसत नाहीं. गरीब आणि श्रीमान दोघांचाही न्याय एकसारखा आणि निःपक्षपातानें जसा इंग्रजींत होतो तसा एतद्देशीय राज्यांत बहुतकरून होत नाहीं. लोकांच्या शरीरसुखासाठीं इंग्रजींत स्वच्छपणाचा वगैरे जितका बंदोबस्त असतो तसा एतद्देशीय संस्थानांत नाहीं. सारांश, लोकांस सुख व्हावें एतदर्थ इंग्रजी राज्यांत सरकार काळजी वाळगतेंसें दिसतें तसें एतद्देशीय राज्यांत दिसत नाहीं. स्वदेशीय राज्यांपासून देशास शोभा आणि भूषण आहे, ह्मणून मी त्यांची निंदा करूं इच्छीत नाहीं. तथापि खरी गोष्ट आहे ती छपून ठेविल्यानें कांहीं एतद्देशीय राज्यांची प्रतिष्ठा वाढणार नाहीं. एतद्देशीय राजेरजवाड्यांच्या मनांत आपलें आणि आपल्या संस्थानांचें कल्याण व्हावें असें असलें तर त्यांणीं आपल्या प्रजेस सुख देण्याविषयीं मेहनत आणि तजवीज केली पाहिजे, आणि ह्यासाठीं आपल्या संस्थानांचा कारभार योग्य पुरुषांला दिला पाहिजे.

आपणांस इंग्रजांसारखें दयाळू सरकार मिळालें आहे ह्मणून आ-पण परमेश्वराचे आभार मानिले पाहिजेत. आपला देश बहुत वर्षें मुसलमान राजांच्या जुलमी अंमलाखालीं आणि बेबंद पाच्छाईखा-लीं राहून, आतां दयाळू आणि स्वतंत्र अशा सरकारच्या सत्तेंत आम्ही आहे. जुलूम, जबरदस्ती, लढाया, बंडें बंद झालीं आहेत. भिल्ल, वाघेर वगैरे लोकांची पुंडाई व लुटालूट नाहींशी झाली आहे. सती जाण्याची मोठी निर्दय आणि दुष्ट चाल बंद झाली आहे. विद्या-कलांचा प्रसार होत चालला आहे; चहूंकडेस रस्ते व पूल होत आ-हेत; आगगाडी व आगबोट चालू झाली आहे; व्यापार व उद्योग वा-ढत आहे, आणि सर्व लोक आनंदानें व सुखानें नांदत आहेत. हा सर्व दयाळू इंग्रज सरकारचा प्रताप होय, ह्मणून भगवंतापाशीं माझी हीच प्रार्थना आहे कीं या सरकारची सर्वदा वढती होऊ.



# प्रकरण ११.

# ब्रिटिश राज्याचें बळ आणि व्यवस्थेचा प्रकार.

XI.—BRITISH POWER AND CONSTITUTION.

आतां इंग्लंड देश केवढा बळाढ्य आहे व तेथील राज्यरीति कशी काय आहे हें कळविण्याविषयीं आज्ञा घेतों; कारण असें करण्याची थोडी बहुत जरूर आहे असें मला वाटतें. तथापि या विषयावर विस्तारानें लिहिण्यास जागा नाहीं, ह्मणून मला कांहीं लिहिणें तें थोडक्यांतच लिहितों.

## १ राज्याचा विस्तार.

BRITISH DOMINIONS.

पृथ्वीवर जीं सहा मोठीं व बलाढ्य अशीं राष्ट्रें गणलीं आहेत त्यांतलें इंग्लंड देशाचें राज्य हें एक आहे. इंग्लंड, फ्रान्स, रूस देश, आस्त्रिया, प्रूसदेश व अमेरिका खंडांतील युनैटेड स्तेत्स ह्मणजे संयुक्त संस्थानें हीं सहा राष्ट्रें काय तीं आजकाळीं मोठीं व जोरावर आहेत. हीं सहा राष्ट्रें इतकीं बरोबरीचीं आहेत कीं त्यांतून एकाद्यानें जर दुसऱ्यास कांहीं उपद्रव केला तर तो सहन केला जाणार नाहीं. आज आठशें वर्षांपर्यंत इंग्लंड देशानें आपल्या भूमीस शत्रूचा पाय लागूं दिला नाहीं ही एकच गोष्ट त्या देशाचें बळ किती आहे तें समजण्यास पुरे आहे. परंतु या देशाचें बळ याहूनही अधिक आहे. फ्रान्स देशाचा नेपोलियन बोनापार्ट याणें जेव्हां युरोपखंड बहुतेक जिंकून घेतलें आणि सर्व युरोपभर धुमाळी व लोकांस त्रास होऊं लागला, तेव्हां इंग्लंड देशानें त्याचा मद उतरला. सर्वांस

अजिंक असा वाटलेला जो बोनापार्ट त्यास इंग्लंडचा शूर सरदार ड्यूक-आव-वेलिंग्टन याणें जिंकिलें.

सुमारें बारा वर्षांपूर्वीं इंग्लंडदेश रूसांबरोबर लढाईत गुंतला होता त्या वेळेस इंग्रजी सैन्यानें जो पराक्रम व शौर्य दाखवून जय मिळविला तो जगप्रसिद्ध असून सर्वांस स्मरतच आहे. आपल्याच देशांत १८५७।५८ सालीं जें भयंकर बंड झालें तें मोडण्यांत इंग्रजी राज्याचें बळ समजून राहिलेंच आहे. हीं उदाहरणें तर हल्लीं झालेल्यांपैकीं होत, परंतु किंचित् दूरच्या काळचा इतिहास आपण पाहूं गेलों, तर अशीं दुसरीं पुष्कळ उदाहरणें सांपडतील.

ज्या देशाला इंग्लंड हें नांव आहे तो तर स्वतः लहानच प्रदेश आहे. त्याची लांबी केवळ ३६० मैल ( १८० कोस) व रुंदी २८० मैल (ह्मणजे १४० कोस) आहे. परंतु त्यास स्कॉटलंड व ऐर्लंड हे देश जोडलेले असून, त्याच्या ताब्यांत दुसरे पुष्कळ देश आहेत. इंग्लंड व त्यास जोडलेले सदरहू दोन देश या तिहींस मिळून "युनैटेड किंग्डम" ह्मणजे संयुक्त राज्य असें ह्मणतात. हे तीनही देश एकाच्या शेजारीं एक असे आहेत व त्यांच्या सभोंवार समुद्र आहे. या तिहींचें क्षेत्रफळ सवालक्ष चौरस मैल व त्यांतील वस्ती तीन कोटींत कांहीं कमीच धरिली आहे. या देशांच्या विस्ताराच्या मानानें पाहिलें तर, एथें वस्ती फारच दाट आहे असें दिसून येईल.

परंतु इंग्रजी राज्याची सीमा इतक्यांत झाली नाहीं. हें राज्य पृथ्वीच्या चारही खंडांत पसरलें आहे. युरोप, एशिया, आफ्रिका, अमेरिका हीं खंडें व आस्त्रेलिया बेट इत्यादि ठिकाणीं याचा बावटा झुलत आहे. इंग्लंडाच्या अंमलाखालीं आज जो प्रदेश आहे त्याची गणती येणे-प्रमाणें:—एशिया खंडांत हिंदुस्थान व सीलोन (ह्मणजे सिंहलद्वीप किंवा लंका) मिळून १४ लक्ष चौरस मैल, आफ्रिकेंत २ लक्ष मैल,

अमेरिकेंत २९ लक्षांहूनही अधिक चौरस मैल व आस्ट्रेलियेंत १६ लक्ष मैल. एवढ्या प्रदेशावर इंग्लंड देश धनीपणा करीत आहे.

## २. फौज.

BRITISH FORCES.

कोणत्याही राज्याचें बळ त्याच्या फौजेवरून दिसून येतें. विलायतेंतील संयुक्त राज्याची फौज सवा दोन लक्ष मनुष्यें आहे. त्यांतून पावणेदोन लक्ष खुशकीवरचीं व अर्धा लक्ष दर्यावरचीं. खुशकी लश्करावाबद दर वर्षी १९ कोटि व दर्यावरील लश्करावाबद १० कोटि रुपये खर्च होतो. खुशकी लश्कराचे पायदळ, घोडेस्वार व तोफखाना असे तीन प्रकार आहेत. हें सर्व सैन्य कवाईत शिकलेलें व मोठें शूर आहे. लढाई करण्याची जी नवीन युक्ति व कळा निघाली आहे आणि निघत आहे तींत इंग्रजी लश्कर वाकब असतें, आणि तें नित्य कवाइतीचा अभ्यास करून, कारण पडेल त्या वेळेस हत्यारबंद होऊन लढाईस जाण्यास तयार असतें.

याशिवाय "मिलिशिया" (Militia) ह्मणून एक लश्कर आहे त्यांत पाऊण लक्षापासून सवा लक्षपर्यंत मनुष्यें असतात. हीं मनुष्यें सगळा दिवस सरकारी चाकरी बजावण्यास किंवा लढण्यासाठीं बाहेरगांवीं जाण्यास बांधलीं नसतात. परंतु नेमलेल्या दिवशीं कवाईत शिकावी व प्रसंग पडेल तेव्हां युद्धाचीं शस्त्रें घेऊन समरांगणांत जावें, इतकेंच त्यांस केलें पाहिजे.

विलायत देशाच्या संरक्षणाविषयीं विशेष भरंवसा म्हटला म्हणजे तेथील "वालंटियर" नांवाच्या लश्करावर आहे. यांत निरनिराळे उद्योग करणारे लोक स्वसंतोषानें येतात, आणि त्याबद्दल सरकारापासून कांहीं घेत नाहींत. ते नेमलेल्या दिवशीं लश्करी कवाईत शिकून तिचा अभ्यास ठेवितात. इतकें करण्यांत त्यांचा हेतु हाच कीं

आपल्या देशावर परचक्र आलें तर आपण हत्यारबंद होऊन लढण्यास रणांगणीं येऊन उभें राहावें. स्वदेशप्रीतीचें असें उदाहरण इंग्रजांशिवाय दुसऱ्या थोड्याच लोकांत सांपडेल.

### ३. सरकारचें उत्पन्न.

STATE INCOME.

इंग्लंड आणि त्यास जोडलेले दोन देश, स्कॉटलंड व ऐर्लंड यांचा एकंदर वसूल दरसाल ७० कोटि रुपये आहे.* आपल्या देशांतील वस्ती विलायतेंतील वस्तीच्या सहापट सातपट असतांही एथील वसूल सगळा ४९ कोटि रुपये होतो. विलायत सरकारचें दरसाल ७० कोटि रुपयांचें उत्पन्न आहे तरी त्याच्या शिरावर कर्ज मोठें आहे. लढाई किंवा दुसरें असें कांहीं मोठें काम पडून खर्च वाढतो तेव्हां कर्ज काढावें लागतें. हल्लीं या सरकारच्या माथ्यावर सुमारें ८ अब्जांचें देणें आहे. ७० कोटि रुपयांच्या उत्पन्नांतून सुमारें २९ कोटि लश्करी खर्चांत व २८ कोटि कर्जाच्या व्याजांत उडून जातात. बाकी राहिलेल्या पैशांत सरकारचा इतर खर्च चालतो.

### ४. राज्यव्यवस्थेचा प्रकार.

FORM OF GOVERNMENT.

इंग्रजी राज्यरीतीचा प्रकार फार चांगला व वाखाणण्याजोगा आहे. या राज्यांत राजा व मानकरी लोक जशी स्वतंत्रता भोगतात तशीच अगदीं गरीब रयतही हकानें भोगते. या राज्यांत कोणी कोणावर जुलूम करूं शकत नाहीं, कोणाच्यानें कोणास कायद्याविरुद्ध कैद किंवा कबज करवत नाहीं, आणि केलेंच तर त्यास चोवीस तासांच्या आंत मोकळें करण्यासाठीं "हेबियस-कॉर्पस" ह्मणून एक कायदा तयारच आहे. या राज्यांत कोणाही मनुष्यास कोणत्याही कारणावरून व कोणत्याही अपराधावरून न्याय झाल्याशिवाय शिक्षा हो-

* Home News ; April 1864.

ऊं शकत नाहीं, आणि कोणत्याही मनुष्यानें इनसाफाविषयीं मागणें केलें तर त्याचा इनसाफ करण्यांत येतो. या राज्यांत पाहिजे त्याणें पाहिजे तसें फिरावें आणि कायद्याच्या बाहेर न जातां पाहिजे तें करावें. ज्या राज्यांत प्रजेस या प्रकारचें सुख तें राज्य चांगलें व वाखणणी करण्याजोगें असायाचेंच.

या राज्याची व्यवस्था अशी आहे कीं राज्यकारभाराचें निरनिराळें काम निरनिराळ्या मनुष्यांस लावून दिलें असतें. येणेंकरून एकेका मनुष्याच्या शिरावर एकेका कामाचें जोखीम राहतें, आणि कोणत्याही खात्यांत कांहीं न्यूनाधिक दिसून आलें तर त्याचा जबाब त्या खात्याच्या मुख्य अधिकाऱ्यास द्यावा लागतो. कामकाजाची वांटणी अशी केलेली आहे कीं जो तो आपापल्या कामांत दक्ष व हुशार असतो. कोणी कोणाच्या आड येत नाहीं किंवा दुसऱ्याच्या कामांत हात घालीत नाहीं. जो कारभारी किंवा कामदार आपलें काम नीट बजावीत नाहीं तो त्या हुद्यावर फार दिवस टिकत नाहीं. ह्मणून प्रत्येक असामी आपल्या आबरूस भिऊन आपापलें काम उत्सुकतेनें व प्रामाणिकपणानें बजावण्याविषयीं तजवीज व यत्न करीत असतो.

राज्यकारभारांत एकट्या राजाचाच अधिकार चालत नाहीं, मानकऱ्यांचा व लोकांचाही अधिकार चालतो. ह्या कारणास्तव तेथील राजाच्यानें लोकांच्या संमतीशिवाय पाहिजे तसें करवत नाहीं. लोकांच्या संमतावांचून त्याच्यानें कर किंवा जकात बसववत नाहीं. सरदारांच्या व साधारण लोकांच्या संमताशिवाय राजाच्यानें कोणताही नवीन कायदा किंवा जुन्या कायद्यांत फेरफार करवत नाहीं, आणि आपल्या प्रजेवर कोणत्याही प्रकारची जुलूमजबरदस्ती करवत नाहीं. पार्लमेन्ट ह्मणून जी मोठी राजसभा आहे तींतील मानकरी आणि प्रजेचे प्रतिनिधि यांस मान्य झाल्याशिवाय राजाच्यानें रयतेवर बसवि-

लेल्या करांत अधिक उणें कांहीं करवत नाहीं, आणि तसेंच नवे कायदे किंवा जुन्या कायद्यांत फेरफारही करवत नाहीं.

### ९. पार्लमेन्ट सभा.

IMPERIAL PARLIAMENT.

या सभेंत बसण्याचा हक्क मानकरी व लोकांचे प्रतिनिधि यांस आहे. या पार्लमेन्ट सभेचे दोन पोटभेद आहेत. त्यांपैकीं एका सभेचें नांव "हौस-ऑव-लॉर्ड्स" ह्मणजे मानकऱ्यांची सभा, आणि दुसरीचें हौस-ऑव-कॉमन्स" ह्मणजे लोकांची सभा. पहिलींत सुमारें ४९० व दुसरींत ६९० सभासद आहेत. या लोकांस त्यांच्या मेहनतीबद्दल कांहीं मिळत नाहीं. परंतु पार्लमेन्टचा सभासद होऊन त्या सभेंत बसायास मिळणें हाच मोठा मान समजतात, ह्मणून तो हुद्दा मिळविण्याविषयीं व मिळाल्यावर सभेंत प्रसिद्धि पावण्याविषयीं तेथील लोक मोठे उत्सुक असतात.

पार्लमेन्ट सभा बारमास भरत नसते. या विषयावर लिहीत असतां पांचव्या प्रकरणांत सांगितलें आहे कीं प्रति वर्षी बहुत करून फेब्रुवारीपासून जुलई महिन्यापर्यंत रविवार व मोठे सणाचे दिवस खेरीज करून, ही सभा, नित्य भरत असते. फेब्रुवारी महिन्यांत या सभेची बैठक सुरू होते तेव्हां एकदां व जुलईत ती बरखास्त होते तेव्हां एकदां अशा वर्षांतून बहुधा दोन वेळां महाराणी पार्लमेन्ट सभेस येतात. याखेरीज या सभेच्या कामाकाजांत राणी साहेब मुळींच पडत नाहींत, परंतु त्यांच्या तर्फेनें त्यांच्या प्रधानांस पार्लमेन्ट सभेंत नेहमी असावें लागतें.

या सभेंत राज्यप्रकरणी हरएक काम कसें चाललें आहे याविषयीं प्रधानांस सवाल पुसले जातात. कोणत्याही खात्यांत कांहीं गफलत झाली किंवा कोठें कांहीं न्यून दिसलें तर त्याविषयीं टीका करण्यास व खुलासा मागण्यास दरएक सभासदास अधिकार आहे. रयतेक-

डून घेतलेल्या पैशाचा व्यय नीट होतो किंवा नाहीं, प्रजेचें पाळण व संरक्षण नीट रीतीनें होत आहे किंवा नाहीं, याविषयीं पार्लमेन्ट सभेचे सभासद बारीक चौकशी ठेवीत असतात. राज्यकारभार चालविणें हें काम प्रधानांचें आहे आणि त्याचें जोखीम मुख्य प्रधानाच्या डोईवर असतें, म्हणून कोणत्याही खात्यांत कांहीं चूक किंवा न्यून दिसून आलें तर त्याविषयीं पार्लमेन्टच्या कोणाही सभासदास सभेंत उघड रीतीनें बोलून, त्या खात्यावरील प्रधानाजवळ खुलासा मागण्याचा अधिकार आहे.

पार्लमेन्ट सभेंत भिन्न भिन्न मतांच्या दोन फळ्या आहेत. तींतून एकीचें नांव "व्हिग" किंवा "लिबरल." या पक्षाचें वळण सुधारणूक व फेरफार करण्याकडेस असतें. कायद्यांत किंवा राज्यप्रकरणी कोणत्याही बाबतींत सुधारणूक करणें यांस अधिक आवडतें. दुसऱ्या फळीस "टोरि" किंवा "कॉन्सर्वेटिव" ह्मणतात. हिचा कल सुधारणूक करण्याकडे नसतो. जुने कायदे व राज्यकारभाराच्या जुन्या रीती उपाय चालेल तोंपर्यंत फिरवूं नयेत अशी या पक्षाच्या लोकांची समजूत असते.

या दोन पक्षांतून ज्याच्या कडेस प्रधानकी असते तो जोरावर असतो. आज कित्येक वर्षांपर्यंत "व्हिग" किंवा "लिबरल" ह्मणजे सुधारणुकीस अनुकूळ जो पक्ष त्याकडेस प्रधानाचें काम चालत* आहे, यावरून ही फळी सांप्रत प्रबळ आहे. परंतु दुसऱ्या फळीचे लोक वारंवार पार्लमेन्ट सभेंत कामकाजाविषयीं वादांत यांच्या उलट पक्ष

* लार्ड पामर्स्तनाच्या मरणानंतर लार्ड रसल मुख्य प्रधान झाला तोही सुधारणुकीच्या पक्षाचाच होता. तो पार्लमेन्ट सभेबाबद कांहीं सुधारणा करण्याच्या तजविजींत होता, परंतु इतक्यांत प्रधानकी दुसऱ्या पक्षाच्या हातीं गेल्यामुळें त्याचा बेत सिद्धीस गेला नाहीं.

स्वीकारून त्यांचें सामर्थ्य कमी करण्याचा यत्न करीत असतात. ते हरएक बाबतींत प्रधानांचे प्रतिपक्षी होऊन त्यांच्या कारभारांतील जे जे दोष माहीत होतात ते ते सहज उघडकीस आणितात. यावरून त्यांस "ऑपोझिशन" ह्मणजे विरुद्ध पक्ष उचलणारे असें ह्मणतात. या विरोधामुळें राज्यकारभार विशेष चांगल्या रीतीनें चालून प्रजेस मोठा लाभ होतो.

पार्लमेन्ट सभेच्या कोणा सभासदास एकाद्या जुन्या कायद्यांत कांहीं फेरफार करणें, किंवा एकादा नवा कायदा करणें जरूर वाटल्यास, तो त्याविषयीं दरखास्त किंवा सूचना करितो, आणि आपण त्याबाबद तयार केलेला खर्डा सभेंत वाचतो. या खर्ड्यास "बिल" म्हणतात. कोणतेंहीं बिल वाचण्याच्या अगोदर सभेंत प्रविष्ट करण्याविषयीं सभेची आज्ञा घेतली पाहिजे. बिल एक वेळ वाचल्यानंतर सर्व सभासद त्याविषयीं विचार करितात, आणि कांहीं दिवसांनंतर तें पुनः वाचण्यांत येतें. ते समयीं बहुमतानें त्यांत कांहीं अधिक उणें करणें असल्यास केलें जातें.

तें बिल बारीक रीतीनें तपासून त्याचा विचार करण्याचें काम थोड्याशा सभासदांची कमिटी नेमून त्यांकडे सोंपतात. एकादें बिल सरकारी असून फारच अगत्याचें असलें, तर सर्व सभासद एकत्र बसून त्याचा विचार करितात. ह्याप्रमाणें सर्व सभासद आपणास कमिटी ह्मणवून बिलाचा विचार करावयास बसतात, तेव्हां प्रत्येकास पाहिजे तितके वेळां बोलण्याची मोकळीक असते. तें बिल पुनः तिसऱ्या वेळीं वाचून त्यावर सभासदांचीं मतें घेण्यांत येतात, तेव्हां त्याला अनुकूल अशीं बहुत मतें पडलीं असतां तें पसार होतें.

हें केवळ एका सभेंत पसार झालें. आतां तें दुसरींत पसार झालें पाहिजे. "कॉमन्स" म्हणजे लोकांच्या प्रतिनिधींची सभा हींत बिल

पसार झाल्यावर आणखी "लार्ड्स" म्हणजे मानकऱ्यांची सभा हींत पसार झालें पाहिजे; आणि प्रथम मानकऱ्यांच्या सभेंत पसार झालें असलें तर पुनः प्रतिनिधींच्या सभेंत पसार झालें पाहिजे. दुसऱ्या सभेंत पसार होण्यासही तें तीनदां वाचलें पाहिजे. याप्रमाणें तें उभय सभांत पसार झाल्यावर महाराणीच्या मंजुरीकरितां त्यांकडे जातें. त्याला महाराणीची मंजुरी मिळाली म्हणजे मग तें बिल शेवटीं पसार होऊन त्याची पार्लमेन्ट सभेच्या आक्टांत म्हणजे कायद्यांत गणना होते. असें झाल्यानंतर लोकांस हा नवा कायदा पाळला पाहिजे.

एकाद्या वेळेस दोनही सभा एकाद्या बिलाविषयीं एकमत होत नसल्या तर उभयतांकडून एक कमिटी नेमण्यांत येते, आणि त्यांत फेरफार करून दोघीही सभा समजुतीवर येतात. दोनही सभांची समजूत झाल्याशिवाय, बिल पसार नहोतां शेवटीं रद्द व्हावयाचें. उभय सभांनीं बिल पसंत केल्यावर महाराणी साहेब तें बहुतकरून मंजूर करितातच. यावरून, राज्य चालविण्याच्या व्यवस्थेंत लोक, सरदार आणि राजा या तिघांचेंही अंग आहे, आणि यांतून कोणासही एकमेकांच्या संमताशिवाय जुना कायदा फिरवितां किंवा नवा करतां येत नाहीं. लोकांनीं जे आपले प्रतिनिधि नेमिले असतात त्यांणीं दक्षतेनें आणि हुशारीनें आपलें काम बजाविलें नाहीं, तर ते पुनः त्यांस त्या कामावर योजीत नाहींत.

ह्या पार्लमेन्ट सभेच्या हातांत मोठीच सत्ता आहे. कोणी केवढाही मोठा कामदार असून त्याणें अपराध केला असतां, ही सभा त्याला आणवून शिक्षा करूं शकते. यामुळें कोणीही कारभारी गैर रीतीनें वर्तणूक करण्यास भितो. याप्रमाणें पार्लमेन्ट सभेच्या हातांत मोठी सत्ता आहे खरी, परंतु ही सभा कांहीं बारमास भरत नाहीं. ती एकदां बंद झाल्यानंतर मुदतीवर पुनः चालू करणें किंवा न करणें

हें तक्ताधिपतीच्या मर्जीवर आहे. तक्ताधिपतीनें ती चालू केल्याशिवाय चालू होत नाहीं, आणि ती चालू असल्याशिवाय तिची सत्ता चालत नाहीं. याप्रमाणेंच पार्लमेन्टचें चालू काम बंद करण्याचा अखत्यारही राजास किंवा तक्ताधिपतीस आहे.

कोणी असें विचारतील कीं याप्रमाणें पार्लमेन्ट सभा चालू किंवा बंद करण्याचा अधिकार भूपतीस आहे त्यापेक्षां, कोणी जुलमी राजा किंवा राणी आपल्या प्रधानांच्या हातून मनास येईल तशा वाईट रीतीनें राज्य चालवील तर पार्लमेन्ट काय करील ? जोंपर्यंत तक्ताधिपति पार्लमेन्ट सभा भरवून चालू करणार नाहीं, तोंपर्यंत तिची कांहीं सत्ता चालणार नाहीं. ही गोष्ट खरी आहे; परंतु तक्ताधिपतीस पार्लमेन्ट सभा भरविल्यावांचून परिणाम नाहीं. कारण पार्लमेन्ट सभेच्या मंजुरीशिवाय प्रजा कर कधींही देणार नाहींत; आणि कर दिला नाहीं ह्मणजे राजाचें भांडार रितें पडून राज्याचें सर्व काम अडकून राहणार.

### ६. कॉमन्स ह्मणजे लोकांच्या प्रतिनिधींची सभा.

HOUSE OF COMMONS.

देशांतील प्रजा आपणच या सभेच्या सभासदांची योजना करितात. निरनिराळीं शहरें आणि प्रांत यांजकडून निरनिराळ्या सभासदांची नेमणूक होते. या सभेंत मोठ्या शहरांच्या तर्फेचे बहुत करून दोन दोन आणि लहान शहरांच्या तर्फेचा एकेक प्रतिनिधि बसतो; ह्मणजे इंग्लंड आणि वेल्स यांच्या तर्फेचे ५००, स्कॉटलंडाच्या तर्फेचे ५३ आणि ऐर्लंडाच्या तर्फेचे १०५ प्रतिनिधि बसतात. साधारण लोकांमध्यें ज्यांला घरदार आणि शेतभात आहे त्यांला प्रतिनिधि नेमण्याच्या कामांत संमत देण्याचा अधिकार आहे. ज्यांचें घरचें उत्पन्न वर्षास शंभर रुपयांवर आहे किंवा जे शेताचा खंडमक्ता वर्षास

पांचशें रुपयांच्या खालीं भरीत नसतील, त्यांला प्रतिनिधि नेमण्याच्या कामांत अनुमत देण्याचा हक्क आहे.

याप्रमाणें ज्या प्रतिनिधींची योजना होते ते फार फार ह्मणजे सात वर्षें त्या कामावर राहतात. नंतर प्रत्येक शहरीं आणि गांवीं प्रतिनिधि नेमण्याचें काम पुनः चालतें. परंतु ते बहुतकरून इतका काळही टिकत नाहींत. तक्ताधिपति मध्येंच मरण पावल्यास गांवोंगांवीं आणि शहरोशहरीं नव्या प्रतिनिधींची नेमणूक होते, किंवा प्रधानांचा कारभार बहुतेक सभासदांस आवडला नाहीं, किंवा कांहीं मोठ्या बाबतींत मतभेद पडला, तर जुनी सभा मोडून नवे प्रतिनिधि पुनः नेमण्यांत येतात.

## ७. लॉर्ड्स ह्मणजे मानकऱ्यांची सभा.

HOUSE OF LORDS.

इंग्लंडांत एकंदर ३७६ मानकरी किंवा सरदार आहेत. या सर्वांस पार्लमेन्ट सभेंत बसण्याचा अधिकार आहे. त्यांजबरोबर दोन "आर्चबिशप" ह्मणजे पहिल्या पदवीचे धर्माध्यक्ष आणि चोवीस बिशप म्हणजे दुसऱ्या पदवीचे धर्माध्यक्ष ही बसतात. ह्या सभेंत स्कॉटलंडांतील १६ आणि ऐर्लंडांतील २८ मानकरी बसतात. सरदाराची पदवी वंशपरंपरेनें चालते, ह्मणजे कोणी एक सरदार मरण पावल्यावर त्याच्या वडील पुत्रास त्याची सरदारकी आणि किताब प्राप्त होतो. तो पुत्र एकवीस वर्षांच्या वयाचा होई तोंपर्यंत "मैनर" ह्मणजे अज्ञान गणिला जातो, ह्मणून त्याच्यानें पार्लमेन्ट सभेंत बसवत नाहीं.

सरदारांबरोबर तीन राजवंशी मानकरी ह्मणजे "प्रिन्स-ऑव-वेल्स" (युवराज), "ड्यूक-ऑव–कम्बर्लंड" आणि "ड्यूक–ऑव–केम्ब्रिज" हेही बसतात. बडे लोकांमध्यें पांच पदव्या आहेत; पहिली "ड्यूक," दुसरी "मार्क्विस," तिसरी "अर्ल," चौथी "वैकौन्ट" आणि पांच-

वी "बारन". यांपैकीं पहिल्या पदवीचे मानकरी २०, दुसरीचे १९, तिसरीचे १०९, चौथीचे २१, आणि पांचवीचे २०७ आहेत.* बारन ह्मणजे बारोनेट नव्हे. बारोनेट व नैट या पदव्यांच्या लोकांची गणना सरदारांत किंवा बडे लोकांत होत नाहीं. ते कामन्स म्हणजे साधारण लोकांत पहिल्या पदवीचे गणिले आहेत. सर्व सरदारांस लॉर्ड असा सामान्यतः किताब आहे. मानकऱ्याचा किताब व पदवी देणें हें गादीवरील राजाकडे अथवा राणीकडे आहे.

पूर्वीं मानकऱ्याची पदवी मोठमोठे जाहगीरदारांस आणि श्रीमानांस मात्र मिळत असे; परंतु आतां जो कोणी युद्धांत किंवा विद्येच्या कामांत कांहीं मोठा पराक्रम करितो त्यालाही हा मान मिळतो. परंतु हा मोठा मान महापराक्रमी पुरुषाशिवाय दुसऱ्या कोणास प्राप्त होत नाहीं. कित्येकांस सरदाराची पदवी देतात ती त्यांच्या पाठीमागें त्यांच्या वारसांस मिळत नाहीं. अशा प्रकारच्या सरदारांस मानकऱ्यांच्या सभेंत बसण्याचा अधिकार नाहीं.

इंग्लंडांतील मानकऱ्यांस कित्येक मोठे हक्क आहेत. कोणा सरदाराकडेस कोणाचें कर्ज निघत असलें तर घेणेदाराच्यानें त्यास धरून तुरुंगांत घालवत नाहीं, किंवा त्याला धरण्याचा हुकूम कोणत्याही कोडताच्यानें करवत नाहीं. फौजदारींत मानकऱ्यांच्या सभेशिवाय दुसऱ्या कोणत्याही कोडतास त्यांचा न्याय करण्याचा अखत्यार नाहीं. सरदारांच्या आबरूवर कोणाच्यानें हल्लाहरकत करवत नाहीं, किंवा त्यांच्या आबरूस नुकसान पोंचेल असा कांहीं मजकूर प्रसिद्ध करवत नाहीं. तो मजकूर खरा असला तरीही प्रगट करतां येत नाहीं. प्रगट केला तर न्यायाधीशास योग्य वाटेल तेवढा दंड तसें करणारास तो करील ; आणि तो दंड न देईल तर त्या खरी

* Times of India Directory.

किंवा खोटी निंदा करणारास बंदीशाळा भोगावी लागेल. न्याया-च्या कोडतांत सरदारलोक डोकीची टोपी न काढतां गेले तरी चा-लतें; परंतु इतर लोकांस ती काढलीच पाहिजे.

पांच प्रतींच्या सरदारांच्या टोप्यांत थोडथोडा भेद असतो. त्यां-च्या टोप्यांचा आकार राजाच्या अथवा राणीच्या मुगुटासारखा कां-हींसा असतो. टोपीवरून किंवा पोशाकावरून हा अमुक प्रतीचा स रदार आहे असें समजतें. ड्यूकास "हिज ग्रेस" असें बहुमानार्थी म्हणतात; मार्क्विसास "मोस्त ऑनरब्ल" म्हणतात; आणि अर्ल, वै-कौंट व बारन यांस "रैट ऑनरबल" म्हणतात. कोणा ड्यूक पदवी-च्या स्त्रीनें मार्क्विसाबरोबर लग्न केलें असतां तिची पहिली मोठी पदवी असते तीच राहते. मार्क्विसपदवीच्या स्त्रीनें ड्यूकाबरोबर ल-ग्न केलें असतां तिला पतीची उंच पदवी प्राप्त होते. अशा स्त्रीला दोन पुत्र झाले असतां वडील पुत्र बापाची ड्यूक ही पदवी पावतो, आणि धाकटा आईची मार्क्विस ही पदवी पावतो.*

## ८. तक्ताधिपति-राजा अथवा राणी.

THE SOVEREIGN.

इंग्लंडाच्या गादीवर बहुतकरून राजा असतो, आणि कधीं का-ळीं राणी असते. इंग्लंडांत गादीच्या वारशाबद्दल असा निश्चित का-यदा केलेला आहे कीं कोणी तक्ताधिपति मरण पावल्यावर नवा वा-रस कोण याविषयीं कांहीं पंचाईत पडत नाहीं. यामुळें ज्यांचा हक्क गादीवर पोंचत नाहीं अशांस उगाच दावा करण्यास हिंमत होत ना-हीं. जोंवर राजपुत्र आहे तोंवर राजकन्येचा गादीवर बसण्याविषयीं हक्क पोंचत नाहीं. राजकन्या गादीवर बसली असतां ती गादीची स्वामिनी होते, आणि तक्ताधिपतीचा सर्व मान पावते. तिच्या भर्त्या-

* Debrett's Peerage.

स कांहीं राजा म्हणत नाहींत. दरबारांत किंवा राजसभेंत राणी सिं-हासनावर बसते आणि तिचा नवरा असला तर त्यास त्याच्या डा-व्या जागीं बसावें किंवा वेळीं उभेंही राहावें लागतें. असें आहे त-थापि गृहकृत्यांत व संसाराच्या कामांत राणी तो आपला पति म्हणून आपणापेक्षां श्रेष्ठ असें जाणून सर्व प्रकारें त्याचा मान राखते.

हल्लीं इंग्लंडाच्या गादीवर कोण आहे हें वाचणाऱ्यांस माहीत आ-हेच. विक्टोरिया महाराणी गादीवर बसल्या त्या दिवसापासून इंग्लं-डाची वढती अधिकाधिक होत चालली आहे. ह्या राणीचा भले-पणा, साधेपणा, सुशिलपणा, चातुर्य आणि पवित्र आचरण यांविषयीं इंग्लिश लोकांचा असा चांगला ग्रह झालेला आहे, कीं सर्व प्रजा वि-क्टोरियेच्या नांवाला अगदीं मोहित आणि सुप्रसन्न होऊन जाते. या महाराणीचें नांव, चरित्र आणि ठावठिकाण हीं इंग्लंडांतील लोकांस अत्यंत प्रिय आणि पूज्य झालीं आहेत.

महाराणीचें जन्म सन १८१९ त झालें. यावरून हल्लीं (१८६७ त) त्यांचें वय ४८ वर्षांचें आहे. इंग्लंडाचा माजी राजा चौथा विल्यम हा राणी साहेबांचा चुलता होता. इंग्लंडाचा पहिला राजा एग्बर्ट या-जपासून पिढ्या मोजल्या तर विक्टोरिया महाराणी ही सत्तेचाळिसावी होते. चौथा विल्यम राजा मरण पावल्यावर म्हणजे सन १८३७ त म-हाराणी साहेब गादीवर बसल्या. यांचें लग्न सन १८४० त जर्मनी देशाचा राजपुत्र "प्रिन्स ऑल्बर्ट" याजबरोबर झालें. महाराणी-स सन १८५७ पर्यंत चार पुत्र आणि पांच कन्या अशीं नऊ अपत्यें झालीं, तीं सर्व जिवंत आहेत. यांपैकीं दोन राजकन्यांचीं आणि एका वडील राजपुत्राचें अशीं तिघांचीं लग्नें झालीं आहेत.

सर्वांत मोठ्या राजपुत्रीचें वय पंचवीस वर्षांचें आहे. आणि युवराज प्रिन्स—ऑव—वेल्स याचें चोवीस वर्षांचें आहे. हा राजकुमार या

चांगलें आणि उंचें शिक्षण पावला आहे; आणि त्याणें बहुत देशाटनही केलें आहे. तो इतक्यांतच लोकांची प्रीति संपादन करूं लागला आहे. आह्मी विलातेस गेलों त्याच वर्षीं ह्या राजपुत्राचें जर्मनी देशांतील राजकन्येबरोबर लग्न झालें. महाराणीचा प्रिय पति सन १८६१ त मरण पावला, त्याचें दुःख राणी साहेबांनीं सन १८६९ सालच्या अखेरीपर्यंत धरिलें. हा राजपुरुष मोठा उद्योगी आणि बुद्धिवान होता. विद्याकळांची वृद्धि करण्याच्या कामांत त्याचें फार लक्ष असे, आणि तो राज्यप्रकरणी गोष्टींत महाराणीस हितकर बुद्धिवाद सांगत असे. त्याच्या आंगीं भलेपणा, साधेपणा आणि दया हे गुण मोठे होते.

## ९. तक्ताधिपतीचा अखत्यार.

ROYAL PREROGATIVES.

इंग्लंडामध्यें राज्य चालविण्यांत तक्ताधिपति राजाचा अथवा राणीचा अधिकार फारच थोडा आहे. आपले एतद्देशीय राजेरजवाडे मनास येईल त्याला दंड करितात किंवा बंदीशाळेंत घालतात, तसें इंग्लंडच्या तक्ताधिपतीच्यानें करवत नाहीं. त्याच्या खर्चास देखील पार्लमेंट सभेनें नेमणूक ठरवून दिली असते त्याहून अधिक त्यास मिळावयाचें नाहीं. विक्टोरिया महाराणीस वर्षाची ३८॥ लक्ष रुपये नेमणूक आहे; सरकारी खजिना आपला स्वताचा आहे असें समजून, राणी साहेब ह्या ठरविलेल्या नेमणुकीपेक्षां अधिक पैसा घेऊं ह्मणतील तर तसें त्यांच्यानें करवत नाहीं.

याप्रमाणें राज्यकारभारांत तक्ताधिपतीचा अधिकार फार थोडा आहे, परंतु इतर गोष्टींत त्याला मोठा अखत्यार आहे. कोणा मनुष्यास मोठी शिक्षा झाली असली तर ती कमी करणें अथवा त्यास मुळींच सोडून देणें त्याच्या हातांत आहे. मोठे हुद्दे देणें आणि मोठ्या पदवीस चढविणें किंवा किताब देणें हें त्याच्या हातीं आहे.

पार्लमेन्ट सभा बंद किंवा चालू करणें, अन्य राष्ट्रांबरोबर लढाई किंवा सल्ला करणें हें त्याच्या हातांत आहे. पार्लमेन्ट सभेनें ठरविलेला कर मंजूर नामंजूर करणें हें त्याच्या हातांत आहे. फौजेसंबंधी सर्व अधिकारही त्यालाच आहे.

## १०. प्रधान.

MINISTRY.

तक्ताधिपति राजा किंवा राणी राज्याचा कारभार करण्यास आपण एक मुख्य प्रधान नेमितें. तो मुख्य प्रधान आपल्या हाताखालीं प्रधान किंवा सेक्रेटरी नेमितो, आणि सर्व मिळून राज्याचा अवघा कारभार करितात. राजा किंवा राणी मुख्य प्रधान नेमिते तो सर्वांच्या पसंतीस येईल असा असतो, नाहींतर त्याची प्रधानकी बहुतकाळ टिकत नाहीं. कारण तो प्रधान जें कांहीं करील अथवा बोलेल त्याच्या विरुद्ध पार्लमेन्ट सभेचे पुष्कळ सभासद झाले, तर त्याला पुढें कारभार निभावणार नाहीं.

याजकरितां जो पुरुष राज्यप्रकरणांत मोठा निष्णात आणि खबरदार असून ज्यावर पार्लमेन्टच्या बहुतेक सभासदांचा भरंवसा असेल अशाचीच राणी मुख्य प्रधानाच्या जागेवर योजना करिते. मुख्य प्रधानास "प्रेम-मिनिस्तर" किंवा "फर्स्त-लॉर्ड-ऑव-ट्रेजरी" ह्मणतात. याच्या खालचा प्रधान "लॉर्ड-हाय-चान्सेलर" हा होय. हा थोर अधिकारी सर्वांत वरिष्ठ कोडताचा मुख्य न्यायाधीश असून मानकऱ्यांच्या सभेंत प्रमुख गणला जातो. याच्या खालची पदवी "लॉर्ड-प्रिवि-सील" याची. याचें काम हें कीं राणीचें शिकामोर्तब संभाळावें. याच्या खालची पदवी "चान्सेलर-ऑव-एक्सचेकर" याची. याचें काम हें कीं सरकारी खजिन्याचा हिशोब ठेवावा. राज्याचे निरनिराळे सेक्रेटरी आहेत ते याच्या खालचे.

पहिला सेक्रेटरी "होम डिपार्टमेंट"चा हा होय. याचें काम हें कीं इंग्लंडासंबंधी आणि त्याला जोडलेल्या दोन राज्यांसंबंधी राज्यप्रकरणी काम पाहावें. दुसरा सेक्रेटरी "फारेन डिपार्टमेंट"चा हा होय. याचें काम परराष्ट्रांबरोबर राज्यप्रकरणी पत्रव्यवहार करावा हें. "कोलोनी"चा सेक्रेटरी हा तिसरा. याचें काम हें कीं इंग्लंडाच्या वसाहती संस्थानांच्या कारभारावर देखरेख ठेवावी. चौथा सेक्रेटरी लष्करी खात्याचा. याचें काम लष्करसंबंधी सर्व कामकाज पाहावें हें. पांचवा सेक्रेटरी हिंदुस्थान खात्याचा. याचें काम हिंदुस्थानचा कारभार पाहावा हें.

हे सेक्रेटरी किंवा प्रधान यांच्या खालची पदवी "फर्स्त—लॉर्ड—ऑव—आडमिरल्टी" याची होय. याचें काम आरमाराचा बंदोबस्त ठेवावा हें. याच्या खालच्या पदवीचा अधिकारी ह्मटला ह्मणजे "बोर्ड-आव्-ट्रेड"चा प्रमुख. याचें काम हें कीं व्यापारसंबंधी चौकशी ठेवावी. याच्या खालचा अधिकारी "पोष्ट मास्तर जनरल" हा होय. हा सर्व डांकेच्या खात्यावर मुख्य. याप्रमाणें मुख्य प्रधानाच्या हाताखालीं दुसरे बारा प्रधान किंवा कारभारी असतात. एक मुख्य प्रधान आणि हे बारा प्रधान मिळून "काबिनेट" किंवा "मिनिस्त्री" ह्मणजे प्रधानमंडळ होतें. हे आणि यांचे असिष्टंट ह्मणजे मदतनीस मिळून राज्याचा सर्व कारभार करितात.

## ११. प्रिवि कौन्सिल.

PRIVY COUNCIL.

प्रधान इत्यादिक मिळून महाराणीचें प्रिवि कौन्सिल होतें. ह्या सभेचें काम ह्मटलें ह्मणजे कारण लागेल तेव्हां राणीस राज्यप्रकरणी चांगला बुद्धिवाद सांगावा. ह्या कौन्सिलांत तेरा प्रधानांसुद्धां एकंदर १७९ असामी आहेत, त्यांपैकीं अठरा जण धर्मशास्त्रांत ह्मणजे कायद्यांत निपुण असे आहेत. प्रधान जें कांहीं करतील त्याची ज

बाबदारी ह्या कौन्सिलाकडे नाहीं. परंतु राणी साहेब त्यांची सभा भरून विचार पुसतात तेव्हां ते जो अभिप्राय किंवा बुद्धिवाद सांगतात त्या-विषयीं मात्र ते जबाबदार होत.

प्रिवि कौन्सिलाच्या सभासदांची योजना करणें किंवा कोणा स-भासदास काढून टाकणें हें महाराणीकडेस आहे. प्रिवि कौन्सिला-ची "ज्युडिशल कमिटी" म्हणजे तींत धर्मशास्त्रांत निपुण असे सभा-सद असतात, त्यांचें काम हें कीं इंग्लिशांच्या बाहेरील संस्थानांतल्या कोडतांत झालेल्या निवाड्यांवर अपिलें येतील त्यांची चौकशी करून निकाल करावा. आपल्या एथील "हाय कोर्टा"च्या फैसल्यावर अपील करणें तर तें प्रिवि कौन्सिलाच्या ज्युडिशल कमिटीला केलें पाहिजे.

## १२. न्यायव्यवस्था.

ADMINISTRATION OF JUSTICE.

इंग्लिशांच्या राज्याची मोठी खुबी ह्मटली ह्मणजे त्यांची उत्तम न्याय करण्याची रीति हीच होय. इंग्लंडांत राजा आणि रंक, श्रीमंत आ-णि गरीब, यांचा सारखा न्याय होतो. तेथें सर्वांचा सारखा न्याय होतो इतकेंच नाहीं, तर बहुधा बाजवी आणि खरा न्याय होतो. न्यायाधी-श धर्मशास्त्रांत निपुण असतो तथापि तो जूरी ह्मणजे पंच यांचा विचार घेऊन निवाडा करितो. जूरीमध्यें संभावित बारा जण असता-त. हे पंच फौजदारी खटल्यांत मात्र बसतात असें नाहीं, तर दिवा-णी कामांतही बसतात. इंग्रजी इनसाफ करण्याची मोठी खुबी ती जूरी ह्मणजे पंच जमवून न्याय करणें यांतच आहे. बारा गृहस्थांनीं एकमतें कोणासही अपराधी ठरविल्याशिवाय न्यायाधीशाच्यानें त्यास शिक्षा करवतच नाहीं. अपराधी किंवा निरपराधी ठरविणें हें जूरीक-डेस आहे; आणि जूरीनें अपराधी ठरविल्यानंतर सजा देणें मात्र न्या-याधीशाकडेस आहे.

विलायतेमध्यें सर्वांत मोठें कोडत ह्मटलें ह्मणजे "कोर्ट-ऑव-किंग्स (किंवा क्वीन्स) बेन्च" हें होय. याच्या खालचीं कोडतें "कोर्ट ऑव-कॉमन-प्लीज" आणि "कोर्ट-ऑव-एक्सचेकर" हीं होत. "कोर्ट-ऑव-चान्सरी" हें एकिटीचें ह्मणजे नीतीला अनुसरून न्याय करणारें कोडत आहे. "कोर्ट-ऑव-असेझ" ह्मणून एक कोडत आहे तें वर्षांतून एक दोन वेळां बाहेर जिल्ह्यांत फिरावयास जातें, आणि फौजदारी खटल्यांचा तपास करतें. यांशिवाय आणखी पुष्कळ कोडतें आहेत. नवराबायकोंचा संबंध तोडून टाकणाऱ्या कोडतांत व्यभिचाराची पुरवारी वादीकडून झाली असतां, कोडत लग्नसंबंध तोडण्याविषयीं हुकूमनामा करितें

मोठें कोडत लंडनामध्यें पार्लमेन्टसभागृहांतच भरतें. वर सांगितलें आहे कीं मोठें कोडत ह्मणजे किंग्स (अथवा क्वीन्स) बेन्च हें होय, परंतु यावर मानकऱ्यांच्या पार्लमेन्ट सभेंत अपील चालतें. दुसरें, मोठ्या अधिकाऱ्यांचा किंवा मानकऱ्यांचा न्याय करण्याचा अधिकार कोर्ट-ऑव-किंग्स (किंवा क्वीन्स) बेन्च याला नाहीं. त्यांचा न्याय मानकऱ्यांच्या पार्लमेन्ट सभेंतच होतो.



# प्रकरण १२.

## विलायतेच्या प्रांतांतील पर्यटन.

## XII.—A SHORT TOUR IN GREAT BRITAIN.

लंडनाहून मुंबईस परत येण्याच्या अगोदर इंग्लंडांतील आणि स्कॉटलंडांतील कितीएक शहरें व गांव आणि तेथील कारखाने, आ- णि तसेच त्या देशांतील शेतें, डोंगर व सरोवरें पाहण्याचें माझ्या मनांत फार होतें. हा हेतु परिपूर्ण करण्यासाठीं, मी जुलई महिन्यांत म्हणजे भरउन्हाळ्यांत, आमच्या सोबत्यांपैकीं वासुदेव राव यांजबरोबर तेथील कितीएक शहरें व गांव पाहण्याच्या उद्देशानें फिरावयास निघालों.

विलायतेंत पर्यटन करावयास हा ऋतु उत्तम समजतात, आणि यांत देशाटन करावयास पुष्कळ निघतात. विलायतेंत पर्यटन कर- णें फार सोपें आहे; कारण गांवोगांव लोखंडी सडक आणि तिजवर धांवणारी आगगाडी आहे, आणि जागोजाग प्रवासी लोकांस उतरा- वयास राजवाड्यांप्रमाणें सुंदर व सुखावह मंदिरें बांधिलेलीं आहेत. पर्यटनाच्या योगानें अनेक गृहस्थांचा समागम व परिचय होतो, आ- णि त्यांचे गुणदोष जाणण्यास उत्तम सवड सांपडते.

### १. हर्टफोर्ड.

### HERTFORD.

या गांवीं मी ऑस्तिन नांवाच्या एका प्रख्यात छापखानेवाल्यास भेटावयास गेलों होतों. हा गृहस्थ फार उत्कृष्ट छापितो, आणि याणें संस्कृत, जंद, फारसी वगैरे पूर्वदेशीय भाषांतील कित्येक ग्रंथ फारच उत्तम रीतीनें छापिल्यावरून, इंग्लंडाच्या महाराणीकडून आणि फ्रा- न्सच्या चक्रवर्तीकडून यास चांद बक्षीस मिळाले आहेत. मी त्यास

एक इंग्रजी ग्रंथ (गुजराथी महाराजांचा इतिहास) छापण्याचें काम दिलें होतें, त्याच्या संबंधानें त्यास भेटावयास गेलों होतों. त्याचा छापखाना पाहून मला आनंद झाला त्याहूनही, त्याचें मोठें कुटुंब आणि त्या कुटुंबाच्या माणसांचें आदरआतिथ्य पाहून अधिक झाला.

ह्या गांवास लंडनाहून सुमारें एका तासांत जातां येतें. ह्यांत पाहण्यासारखें फारसें कांहीं नाहीं. हेलीबरी कालेज—ह्मणजे जींत आमच्या देशाची "सिविल सर्वीस" ह्मणजे सनदी चाकरी करणारे उमेदवार विद्यार्थी विद्याभ्यास करून तयार होतात—ही प्रख्यात पाठशाळा ह्या गांवांत आहे. आपल्या देशांत सत्ता धारण करणारे बहुतेक कामदार ह्याच शाळेंत अभ्यास करून परीक्षा देतात, आणि सनद घेऊन येतात. मी हर्टफोर्ड एथें सुमारें सहा तास होतों, त्यांतील बहुतेक वेळ छापखान्याच्या मालकाच्या घरांत आणि छापखान्यांत गेला, ह्मणून दुसरें कांहीं पाहणें झालें नाहीं.

## २. मान्चेस्तर.

MANCHESTER.

सुताच्या आणि वस्त्रांच्या कारखान्यांचें हें मुख्य स्थळ आहे. मी लंडनाहून निघालों तो सुमारें सहा तासांनीं या शहरीं जाऊन पोंचलों. हें लंडनाहून १८२ मैल आहे. ह्या शहरांत मालाच्या वखारींच्या मोठ्या उंच आणि सुंदर इमारती आहेत. त्या चारचार पांचपांच मजल्यांच्या आहेत, आणि त्या बांधावयास लक्षावधि रुपये लागले असतील. सुंदर रस्ते, चौक, कितीएक घरें आणि देवळें यांहीं करून हें शहर बहुत शोभतें. कापडाच्या व सुताच्या कारखान्यांच्या प्रांतांतलें हें मुख्य आणि प्रसिद्ध शहर खरोखर पाहण्यासारखें आहे.

मान्चेस्तरांत कित्येक मोठ्या रस्त्यांवर कितीएक नामांकित पुरुषांचे पुतळे आहेत. ज्या महान् पुरुषाच्या बुद्धिच्या आणि शोधाच्या

योगेंकरून मान्चेस्तराचें महत्व वाढलें त्याचा पुतळा प्रसिद्ध ठिकाणीं अर्थात् बसविला आहे. ज्या जागीं या पुरुषाचा (जेम्स वॉट) याचा पुतळा आहे तीस फारच शोभा आली आहे. या पुरुषानें वाफेचें यंत्र काढलें. या शोधापासून मान्चेस्तरच्या आणि त्याच्या आसपासच्या गांवच्या लोकांचें जितकें हित झालें आहे तितकें पृथ्वीवर दुसऱ्या कोठच्याही लोकांचें झालेलें नाहीं.

मी मान्चेस्तरास प्रथम गेलों तो सुताचा कारखाना पाहावयास गेलों होतों. मी मुंबईंत सुताचा कारखाना अगोदर पाहिला होता त्यांत आणि यांत विशेषसा कांहीं भेद दिसण्यांत आला नाहीं. परंतु एथें लहान लहान मुलीं झपाट्यानें काम करीत होत्या तें आणि तेथील व्यवस्था आणि कारखान्याच्या मालकाची सभ्यता व भलेपणा पाहून मला फार संतोष झाला.



सुताचें यंत्र.

मान्चेस्तर एथील व्यापारी व कारखानदार हे मोठे श्रीमान व वजनदार लोक आहेत. मान्चेस्तर आणि त्याच्या आसपासचे गांव यांत जितकें द्रव्य आहे तितकें पृथ्वीवर दुसऱ्या कोठेंही तितक्याच विस्ताराच्या प्रदेशांत नसेल. मोठमोठ्या कारखान्यांचे देखील मालक एकेक दोन दोन किंवा चार चार असामी आहेत. असे कारखाने स्थापण्यास आणि चालवण्यास या ठिकाणीं आपल्या एथल्याप्रमाणें मंडळ्यांची फारशी गरज नाहीं. एथें कारखान्यांच्या इमारतीं-

त आणि आंतील यंत्रांत किती पैसा घातलेला असावा! एथील व्यापारी लाखो रुपयांचे सवदे व देवघेव करितात, परंतु कांहींमात्र गोंगाट किंवा गडबड पाहण्यांत येत नाहीं. आपल्या एथें कितीही लहान सवदा होत असला तरी किती कटकट आणि ओढाताण होत असते! एथें कितीही मोठा सवदा असला तरी असा प्रकार मुळींच दृष्टीस पडत नाहीं.

मान्चेस्तर शहर लांकाशायर प्रांतांत आहे. ह्या प्रांतात निदान एक हजार कारखाने होतील. यांत एकंदर दहा लक्ष माग (Looms) आणि दोन कोटि सूत काढावयाचे रहाट आहेत, आणि तीन लक्ष मनुष्यें खपत आहेत! या कारखान्यांस अमेरिकेहून प्रति वर्षीं कापसाचे वीस लक्ष गठ्ठे मिळत असत ते, तेथें लढाई चालू होऊन कापसाचें पीक बंद झाल्यामुळें, येतनासे झाले, तेव्हां यांतील बहुतेक कारखाने बंद करावे लागले, त्यामुळें मजुरांचा रोजगार बुडाला. त्या लोकांच्या हितार्थ आपल्या देशांत "लांकाशायर-रिलीफ फंड" उपस्थित केलें होतें त्याचें स्मरण आपणास आहेच. मी हे कारखाने पाहावयास गेलों तेव्हां बंद पडलेले बहुतेक कारखाने पुनः चालू झाले होते. तसेच मान्चेस्तराजवळच रॉचडेल ह्मणून एक लहानच पण सुंदर गांव आहे तेथेंही कापडाचे व लोंकरीचे कारखाने पाहावयास मी गेलों होतों.

### ३. रॉचडेल.

ROCHDALE.

हा गांव मान्चेस्तरानजीकच आहे; यांत सुताचे, कापडाचे, लोंकरीचे वगैरे पुष्कळ कारखाने आहेत. मान्चेस्तराच्या आसपास चहूंकडेस तीस मैलपर्यंत इतके कारखाने आहेत कीं जिकडे जावें तिकडे उंच धुरोळ्या (चिमन्या) आकाशास मिळाल्या आहेत असें भासतें. मान्चेस्तराहून रॉचडेल आगगाडींतून एका तासाची वाट आहे.

लंडनाहून माझा एक स्नेही मिस्तर स० ग्राम याणें रॉचडेल एथील मेयर म्हणजे मुख्य अंमलदार याजवर मला भलावणपत्र दिलें होतें तें घेऊन मी त्या गांवांत पहिल्यानें त्या मेयराच्याच घरीं गेलों होतों.

अहाहा! त्या मेयराच्या घरांतील मनुष्यांचा भलेपणा मी काय वर्णूं! सर्वांनीं माझा परामर्श घेतला तो मी कधीं विसरणार नाहीं. मेयर स्वता घरांत नव्हता, परंतु त्याचा तरूण मुलगा होता. त्याणें मेयराचा स्वताचा कारखाना होता तो मला प्रथम दाखविला. नंतर तो आपलें काम टाकून गाडी आणवून मला दुसरे कारखाने दाखवावयास घेऊन गेला. त्यास हे श्रम घेण्याचा कंटाळा न येतां उलटा संतोष वाटला. त्याणें मजबरोबर मोठ्या स्नेहभावानें व ममतेनें भाषण केलें, आणि आमच्या देशाविषयीं कित्येक गोष्टी ऐकून त्याला फार संतोष व आश्चर्य वाटलें.

तो मला लोंकरीचे कारखाने दाखविल्यावर कापडाचा कारखाना दाखवावयास घेऊन गेला. त्याणें मला सांगितलें कीं ह्या कारखान्याचे मालक मजूरलोकच आहेत. कारखान्यांत खपणाऱ्या मजूर लोकांनीं आपल्या उद्योगानें आणि काटकसरेनें जो द्रव्यसंचय केला होता त्यांतून आपापल्या शक्तीप्रमाणें शेर (किंवा



कापडाचें यंत्र.

वर्गणी) भरून मोठी पुंजी केली आणि कारखाना स्थापिला. ते बहुतेक आपल्याच कारखान्यांत मजुरी करितात. धनी आपण आ-

णि चाकरही आपण म्हणून ते लोक फार मन लावून काम करिता-त, आणि त्यामुळे त्यांस मोठा लाभ होतो.

नंतर तो भला गृहस्थ मला गालिच्यांचा कारखाना दाखवाव-यास घेऊन गेला. तो कारखाना पार्लमेन्टच्या एका प्रख्यात सभा-सदाचा होता. आह्मी गेलों तेव्हां तो बंद होता. परंतु त्याच्या मानेजरानें (कारभाऱ्यानें) कारखान्यांत केलेले कित्येक गालिचे म-ला दाखविले. ते कसे करितात ते पाहण्याची मला फार इच्छा होती, परंतु ती त्या गांवीं पूर्ण झाली नाहीं. इतक्यांत टिफिनीची वेळ झाली ह्मणून तो मला परत घरीं घेऊन गेला. त्याच्या कुटुंबा-चीं सर्व मनुष्यें टिफीन करावयास बसलीं तेव्हां त्यांची रीतभात, न-म्रता, आणि सौजन्य पाहून मला फारच संतोष वाटला.

आपल्या या देशाविषयीं कित्येक गोष्टी ऐकून त्या सर्वांस बहुत आनंद व आश्चर्य झालें. आपल्या एथील जातिभेदाविषयीं गोष्ट नि-घाली तेव्हां एका जातीचे लोक दुसऱ्या जातीच्या मनुष्याच्या हात-चें शिजलेलें किंवा शिवलेलें अन्न खात नाहींत हें ऐकून त्यांस मों-ठेंच नवल वाटलें. मांस भक्षणाविषयीं गोष्ट निघाली असतां तुह्मी आमच्या देशांत मांस न खातां राहतां तरी कसे असें त्याणीं मला ह्म-टलें. मी ह्मणालों, मला कांहीं कठीण पडत नाहीं. मला मांस खाणें अगदीं पसंत वाटत नाहीं. कोणा जनावरांचा एकेक अवयव कापून खावा, ह्याचा माझ्या मनास मोठा कंटाळा वाटतो. तीं ह्मणालीं, ह्यां-त कंटाळा कसला? मी ह्मटलें, फ्रेन्च लोक बेडूक वाफून मोठ्या आ-वडीनें खातात, परंतु बहुतेक इंग्रजांस त्यांचा कंटाळा येतो. बेडकाचें नांव घेतांच घरांतील मुख्य यजमानीन इतकी कंटाळली कीं तिच्या-नें पुढें कांहीं खाववलेंच नाहीं.

आपणाकडून हा अमर्यादपणा घडला ह्मणून मला अंमळसें वाईट

टलें, परंतु माझ्या बोलण्याचा लागलाच दाखला आल्यावरून सर्व कु-
ब खूश होऊन हंसूं लागलें, आणि त्यांणीं "ब्रेवो! ब्रेवो!" ह्मणून मला
ाबासकी दिली. त्या बाईचें मन दुखवलें असेल असें वाटून मी तिजज-
ळ क्षमा मागितली; परंतु ती ह्मणाली त्याविषयीं कांहीं मनांत आणण्या-
ी गरज नाहीं, माझें मन किंचित्‌ही दुखवलें नाहीं; परंतु आतां मी सम-
ल्यें कीं तुह्मांस बाळपणापासूनच मांसभक्षणाचा अत्यंत कंटाळा आहे.

नंतर त्या तरूण मेयरानें आपल्या कारखान्याच्या संबंधीं शाळा हो-
ी ती दाखविली. कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांच्या मुलांस
ररोज एक तास ह्या शाळेंत शिक्षण मिळतें. त्याच्या बोलण्यावरू-
असें दिसलें कीं तो आणि त्याचा बाप दोघेही विद्यावृद्धि आदि-
रून देशसुधारणुकीच्या कामाविषयीं मोठी आस्था बाळगितात.
थून त्याणें मला ग्यासाचा कारखाना पाहावयास नेलें. ग्यास कोळ-
ांपासून कसा निघतो, तो कसा जमा होतो, आणि नित्य तयार होतो
ाणि खपतो त्याचा हिशेब कसा ठेवितां येतो, तें सर्व त्याणें समजावून
ांगितलें. इतकें होई तों संध्याकाळ झाला आणि मान्चेस्तर शहरी
रत जावयाची वेळ झाली.

तो सद्‌गृहस्थ थेट आगगाडीच्या चक्रापर्यंत मला पोंचवायास
ाला, आणि गाडी निघे तोंपर्यंत थांबला. सारा दिवस भाडो
ी गाडींत बसून गांवांत फिरलों त्याचें भाडें त्याणें मला देऊं दिलेंच
ाहीं, आपणच भरलें. त्याचें नांव "आश्वर्थ" असें होतें. त्याणें मा-
आदरआतिथ्य केलें तें मी कधीं विसरणार नाहीं. मेयर ह्मणजे
गळ्या गांवचा मुख्य अधिकारी व माजिस्त्रेट असें असून, त्याच्या सर्व
टुंबाचा भलेपणा व सौजन्य ध्यानांत ठेवण्यासारखें होतें. मी रॉ-
डेल एथून मान्चेस्तर एथें परत येऊन एक दिवस तेथें राहिलों,
ाणि पाहायाचें उरलें होतें तें पाहून घेऊन पुढें लिवरपुलास गेलों.

## ४. लिवरपूल.

LIVERPOOL.

हें शहर मान्चेस्तराहून ३६ मैल आहे. तेथें जावयास सुमारें सव्वा तास लागला. लंडनाहून लिवरपूल २०४ मैल होईल. हें शहर व्यापाराचें मुख्य व प्रसिद्ध स्थान आहे. एथील बंदर व गोदी पाहण्यासारखी आहे. गोदी एवढी मोठी आहे कीं ती मोठमोठ्या तारवांची वखारच आहे अशी दिसते. बंदराजवळच मालाच्या वखारी होत्या त्या पाहिल्या. त्या फारच मोठ्या होत्या. लिवरपुलांत तिसांपेक्षां अधिक गोदी आहेत; त्यांचें उत्पन्न वर्षास २५ लक्ष रुपये होतें. त्यांत १५०० मोठीं गलबतें राहतील. मी लिवरपुलास जाऊन पोंचलों त्याच्या दुसरे दिवशीं त्या बंदरांतून "ग्रेट ईस्तर्न" नामक सर्वांत मोठी आगबोट आहे ती अमेरिकेकडेस हांकारावयाची होती. ही आगबोट पाहण्याची मला फार इच्छा होती, ह्मणून ज्या पेढीशीं माझा संबंध होता तिचा एक मनुष्य बरोबर घेऊन उजेडल्यावर मी ती पाहावयास गेलों.

परंतु आह्मी तिजजवळ जाऊन पोंचलों इतक्यांत ती नांगर उठवून चालूं लागली. ह्मणून माझा थोडासा आशाभंग झाला खरा, तथापि ती बाहेरून पाहावयास मिळाल्यामुळें मला थोडाथोडका आनंद झाला असें नाहीं. ह्या विशाळ आगबोटीजवळ इतर आगबोटी केवळ लहान मचव्यांसारख्या दिसत असत. तिचा मोठा विशाळ आकार पाहून मी फार आश्चर्य पावलों. ती वर जाऊन पाहिली असती तर अधिकच आश्चर्य वाटलें असतें. ही एवढी मोठी आहे कीं हींत ह्या शेवटाकडून त्या शेवटास वर्तमान नेण्याआणण्यासाठीं विद्युत्तार चालते असें सांगतात. ती माझ्या दृष्टीच्या बाहेर जाई तोंपर्यंत मी दुरून निरेखून पाहिली. नंतर गोदी आणि बंदर चांगल्या रीतीनें पाहिलें.

तेथील एक्सचेन्ज ह्मणजे व्यापारी लोकांची जमण्याची हवेली पाहावयास गेलों तेव्हां तींत मध्यभागीं कठाड्यांत एक मुख्य दलाल किंवा लिलांव पुकारणारा उभा राहून रेलवे कंपनी इत्यादिकांच्या शेरांचें लिलांव करीत होता. त्याजवळ पुष्कळ दलाल जमले होते. मी तेथील "टौनहाल" ही पाहिलें. "ज्यार्ज्सहॉल" नांवाची एक अत्यंत सुंदर इमारत आहे तीही पाहिली; ती बांधण्यास २९ लक्ष रूपये लागले असें सांगतात. ती चारशें फुटी लांब असून तिचे खांब ५० फुटी उंच आहेत. खलाशी लोकांसाठीं 'सेलर-होम' बांधलेलें आहे त्यांत सुमारें ६०० खलाशांचा समावेश होईल इतकी जागा आहे. ह्या ठिकाणीं आंधळे, बहिरे व मुके यांस शिकविण्याच्या शाळा आहेत, परंतु त्या पाहणें मला झालें नाहीं.

संध्याकाळीं मी एका नाटकगृहांत गेलों होतों, आणि खेळ पाहून मला बहुत आनंद झाला. एकानें आपल्या मित्राचा प्राण वांचवावा ह्मणून आपला प्राण दिला असा खेळ केला होता, आणि तो हृदयांत बिंबण्याजोगा हुबेहूब उतरला होता. अहो, आपल्या देशांत एकमेकांसाठीं जीव देणारे मित्र कोठें आहेत! अहो, जातीचें भय बाळगून दूरदूर राहणारे ते आपल्या मित्रासाठीं जीव काय देणार! वर सांगितलेल्या खेळाची मला वारंवार आठवण होते. खेळाची गोष्ट कल्पित नव्हती, तर खरोखर बनून आलेली होती. मी लिवरपुलामध्यें तीनच दिवस राहिलों, आणि चौथे दिवशीं एडिंबरो शहरीं जावयास निघालों.

### ९. सेन्ट हीलन्स.

ST. HELENS.

लिवरपुलाहून एडिंबरोस जातांना वाटेस "सेन्ट हीलन्स" नांवाचा गांव लागतो. ह्या गांवांत कांचीचे आणि धातूचे मोठे कारखाने आहेत असें ऐकल्यावरून, मी ह्या ष्टेशनावर उतरलों. ष्टेशनापासून

गांव सुमारें तीन मैल दूर असल्यामुळें, लोखंडी सडकेवरून जाणाऱ्या दुसऱ्या आगगाडींत बसून मी गांवांत गेलों. हा गांव दिसण्यांत चांगलासा नाहीं, परंतु त्यांत मोठमोठाले कारखाने आहेत. मी ज्यावर शिफारसपत्र घेतलें होतें त्या गृहस्थाची गांठ पडली नाहीं, ह्मणून निराश होऊन परत जात होतों इतक्यांत एक गृहस्थ मला भेटला, त्यास मी माझा मनोरथ कळवितांच तो भला गृहस्थ मला कांचीचा मोठा कारखाना दाखवावयास घेऊन गेला.

परंतु कांहीं कारणामुळें त्या दिवशीं तो कारखाना बंद होता ह्मणून तो गृहस्थ मला धातु गाळण्याचा एक मोठा कारखाना दाखवावयास घेऊन गेला. तो कारखाना पाहून मी फार संतुष्ट व आश्चर्यभरित झालों. तेथें लोखंड गाळण्याची एक मोठी उंच भट्टी होती. मातींतून धातु निराळे पाडण्याची कृति मला समजाविली. ती सर्व ह्या पुस्तकांत विस्तारें वर्णण्यासारखी नाहीं. कारखान्याच्या मालकाचे आणि त्या परक्या गृहस्थाचे आभार मानून मी परत आगगाडीच्या चक्कावर गेलों, आणि दुसरी गाडी आली तींत बसून एडिंबरोस निघून गेलों.

## ६. एडिंबरो.

EDINBURGH.

मी सेन्ट हीलन्सहून अगदीं संध्याकाळ झाल्यावर निघालों तो रात्रीस एडिंबरो मुकामीं जाऊन पोंचलों. मी ज्या हॉटेलांत उतरलों तें फार सुंदर असून एडिंबरोंतील सर्वांत उत्तम अशा आळींत होतें. मी सकाळीं उठून खिडकीचा पडदा सारून पाहतों तों, अहाहा! काय सुंदर देखावा दिसत आहे! एक तर, अवघ्या संयुक्त राज्यांत एडिंबरो हें एक अत्यंत सुंदर आणि रमणीय नगर गणिलें आहे, आणि दुसरें, ज्या आळींत मी उतरलों होतों ती सर्वांत उत्तम समजतात; ह्मणून माझ्या डोळ्यांस जो आनंद झाला तो लिहून कळवितां ये-

ईल असा नाहीं. या आळीचें नांव "प्रिन्सेस-स्त्रीट" असें आहे. मी फराळ व पोशाक करून खालीं उतरलों तेव्हां ती आळी खरोखर दिसण्यांत मोठी रमणीय दिसली. रस्ता बहुत रुंद आणि स्वच्छ होता इतकेंच नाहीं, तर आमच्या घरापुढें रस्त्याच्या बाजूस एक सुंदर बाग आणि त्या बागांत एक सुंदर मनोरा होता. हा उंच मनोरा कोणाचा असावा बरें! सर वॉल्टर स्कॉट, ज्याची कविता इंग्रजी विद्यार्थी मोठ्या गोडीनें आणि प्रेमानें वाचतात, आणि जो इ० स० १८३२ त मरण पावला, त्या विख्यात कवीच्या स्मरणार्थ हा सुंदर मनोरा बांधला आहे. समोर दोन सुंदर इमारती आहेत, एक न्याशनल ग्यालरी आणि दुसरी रॉयल इन्स्तित्यूत. त्याच्या मागल्या बाजूस एका उंच टेकडीवर एडिंबरोचा किल्ला आहे. हा आनंदकारक देखावा पाहून माझें मन फारच प्रसन्न झालें.


हैलंदर.

प्रथम मी किल्ला बघावयास, आणि त्यावरून शहर कसें दिसतें तें पाहावयास गेलों. किल्ल्यावर शिपायांचा पहारा होता. त्यांचा पोशाक हैलंदरी होता, ह्मणजे स्कॉटलंडांत कांहीं पहाडी प्रदेश आहेत त्यांस "हैलंद" ह्मणतात, तेथील लोकांचा हा पोशाक. ह्या पोशाकांत पाय मोज्यांपासून वर गुडघ्यांपर्यंत उघडे असतात. विक्टोरिया महाराणीस हा पोशाक फार आवडतो असें दिसतें; कारण दोघे धाकटे राजपुत्र बहुतकरून असा पोशाक करितात. किल्ल्यावर चढून पाहिलें तों बहुतेक शहर चागलें दिसलें. सकाळचा प्रहर होता ह्मणून आजूबाजूचा सर्व प्रदेश फारच सुंदर आणि रमणीय दिसत होता.



EDINBURGH CASTLE FROM PRINCES S<sup>T</sup> GARDENS.

प्रिन्सेस स्ट्रीट बागांतुन एडिंबरो किल्ल्याचा देखावा.

( ४८६ )

हा किल्ला पाहून आल्यावर मी ज्या गृहस्थावर, भलावणपत्र घेऊन
ालों होतों त्यास भेटावयास गेलों. तो मला पाहून फार संतोष पावला.
ाणें मला स्कॉटलंडचें फ्रीचर्च (देऊळ) दाखविलें. नंतर तो तेथील
ल्यात डाक्तर ग्रथी यांस भेटविण्यासाठीं मला घेऊन गेला. हा गृहस्थ
वे ग्रेटब्रिटनांत मोठा विख्यात आहे. एडिंबरो एथील लोक त्याच्या
ोपकारबुद्धीवरून व नीतिपर भाषणावरून त्याला फार चाहतात.

त्या दिवशीं रविवार होता तरी त्याणें मला भेट दिली. तो मला
ांवानें ओळखीत होता, आणि मी विलायतेंत आलों आहें हेंही त्या-
ा माहीत होतें. त्याणें मोठ्या संतोषानें माझी भेट घेतली आणि
ामच्या देशाविषयीं कांहीं गोष्टी विचारिल्या. तो मला ह्मणाला, तु-
ी दहा बारा दिवस राहाल तर फार चांगलें. परंतु मला तीन दि-
ांवर राहतां नये अशी अडचण होती. आज आपण संभाषण कर-
ार ह्मणून त्याणें सांगितलें आणि मला अगत्य येण्याविषयीं आमंत्रण
केलें. हें संभाषण ऐकण्यास मी दोन प्रहरीं गेलों. देऊळ अगदीं भ-
रून गेलें होतें. ज्या दिवशीं याची संभाषण करण्याची पाळी असते
्या दिवशीं लोक असे लोटतात कीं अगोदर चिठ्या काढून ठेविता-
त, आणि कित्येकांस तर परत जावें लागतें. अशा पुरुषाचें संभा-
षण मला ऐकावयास सांपडलें हें मी आपलें मोठें भाग्य समजतों.

अहाहा! भाषण तर तेंच. तो जें कांहीं बोले तें स्पष्ट आणि मनांत ठ-
सण्याजोगें बोले. तो जें काहीं बोले तें अंतःकरणापासून सद्गदित हो-
ऊन बोलत असे. श्रोत्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले इतकेंच नाहीं,
तर कित्येकांच्या डोळ्यांस अश्रुधारा लागल्या होत्या, आणि माझें मन
तर मेणाप्रमाणें मृदु झालें होतें. हा संसार सर्व मिथ्या आहे आणि म-
नुष्यमात्रास ईश्वराची कृपा संपादणें आणि त्याची भक्ति करणें आवश्यक
आहे असें सर्वांच्या मनांत रामबाणाप्रमाणें त्याच्या भाषणानें विंधून गेलें.

स्कॉटलंडांत इंग्लंडापेक्षां रविवार अधिक निष्ठेनें पाळितात. त्या दिवशीं आगगाडी देखील चालत नाहीं, आणि भाडोत्री गाड्या मिळणें फार कठीण पडतें. ह्मणून हें भाषण संपल्यावर मला आमच्या घराच्या समोरच्या बागेंत दोन तास मोडावे लागले. तितक्यांत वॉल्टर स्कॉट याचा मनोरा ज्यास "स्कॉटमॉन्युमेन्ट" असें ह्मणतात तो निरेखून पाहिला. त्याचें बांधकाम फारच उंची आहे. मी ह्या मनोऱ्याच्या शिखरावर चढून पाहिलें तों चहूंकडेस उत्कृष्ट सृष्टिस्वरूप दिसलें. मनोरा २०० फुटी उंच आहे. तो बांधावयास १॥ लक्ष रुपये लागले* नंतर त्यावरचा लेख वाचिला. मी ह्या सुंदर बागेंत कांहीं वेळ फिरलों आणि कांहीं वेळ बसलों इतक्यांत सांज झाली.

दुसरे दिवशीं "होलिरूड" नामक पुरातन काळचें राजमंदिर आहे तें पाहावयास मी गेलों. मंदिराच्या बाहेर एक सुंदर कारंजें उडत होतें. प्राचीन काळचे कांहीं राजकीय पदार्थ या मंदिरांत पाहण्याजोगे आहेत. यांतील कित्येक खोल्या मेरी नामक स्कॉटलंडच्या राणीच्या वेळीं होत्या तशाच अजून ठेविल्या आहेत. मेरी राणीच्या रंगमहालांत पलंग वगैरे सामान जसें होतें तसें अजून मोठ्या जतनेनें ठेविलें आहे.

या राजवाड्याच्या शेजारीं "आर्थर-सीट" नामक एक सुंदर टेकडी आहे. ती अजमासें ८०० फुटी उंच होईल. तिजवरून सभोंवार फार सुंदर आणि रमणीय दिसतें. ह्या टेकरीवरून चहूंकडचा प्रदेश पाहून मला फार आनंद झाला. ह्या टेकडीकडेस जातांना एक सुंदर रस्ता लागतो त्याचें नांव "क्वीन्स ड्रैव".

मी तेथून निघून यूनिवर्सिटीच्या रस्त्यानें गाडी नेवविली. यूनिवर्सिटी बंद होती, परंतु आंत जाऊन तेथील म्यूझियम (पदार्थसंग्र-

* Black's Guide to Scotland; p. 21.

त्लय) पाहिलें. त्यांत पोटांत कांहीं भरून ठेवलेल्या प्राण्यांच्या क-
वरांचा मोठा संग्रह पाहिला. ब्रिटिश पदार्थसंग्रहालयापुढें हें सं-
हालय कांहींच नाहीं हें खरें, तथापि एथें पुष्कळ मूल्यवान पदा-
ांच्या संग्रह होता. सुमारें एक हजार जनावरांच्या कलेवरांची सं-
ख्या एथें होईल, आणी ह्याशिवाय धातु, पाषाण इत्यादिकांचा संग्रह
ाहे तो निराळा. तेथें जवळच पुस्तकालय आहे तें पाहिलें, त्यांत एक
क्ष पुस्तकें होतीं. विद्यार्थ्यांच्या अभ्यास करण्याच्या खोल्या पाहिल्या.
ा यूनिवर्सिटींत सुमारें ८०० विद्यार्थी अभ्यास करीत असतात असें
ाझ्या ऐकण्यांत आलें.

मी जुनें एडिंबरो शहर पाहिलें. जुनें शहर व नवें शहर हीं आतां नि-
राळीं पडलीं आहेत. जुनें तें जुनेंच, तें दिसण्यांत चागलें कोठून दि-
सणार? मी ज्या गृहस्थावर भलावणपत्र नेलें त्याचें नांव मिस्तर थंग
होतें; त्याचें घर जुन्या शहरांत होतें. रेवरेंड मिस्तर होर्मस्जीही
एथेंच राहत होता, त्यास भेटावयास मी गेलों होतों, परंतु त्याची
गांठ पडली नाहीं. नव्या शहरांत मोठ्या कुशलतेनें पुष्कळ आळी
आणि चौक साधून, पोरबंदरी दगडासारख्या पांढऱ्या दगडाची
घरें बांधलीं आहेत. या इमारती दिसण्यांत पारिस एथील इमारतीं-
च्या खालोखाल आहेत. परंतु इंग्लंड आणि स्कॉटलंड यांत इतकें सुं-
दर दुसरें एकही शहर नाहीं. यांतील घरांची, आणि रस्त्यांची रच-
ना स्वाभाविक रचनेसारखी आहे. एडिंबरोंत वस्ती सुमारें २। लक्ष
आहे. मी ह्या शहरांत तीन दिवस राहून नंतर ग्लास्गोस निघून गेलों.

## ७. ग्ल्यास्गो.

GLASGOW.

मी एडिंबरोहून निघाल्यापासून दीड तासाच्या आंत ग्ल्यास्गो-
स पोंचलों. या दोन शहरांमध्यें ४२ मैल सगळें अंतर आहे. लंड-

नापासून हें शहर सुमारें ४०० मैल होईल. ह्या शहरांत मी फक्त दोन दिवस होतों, तितक्यांत जितकें पाहतां आलें तितकें पाहून घेतलें. ह्या शहरांत सूत, कापड, चीट, रुमाल, यंत्रें, कांच आणि लोखंड यांचे कारखाने आहेत. त्यांतून सात आठ कारखाने मी पाहिले. एथें सुताच्या कापडाच्या सर्व कारखान्यांत एकंदर ३० हजार माग (Looms) आहेत. ह्या शहरांत मोठमोठीं गलबतें आणि आगबोटी बांधतात. प्रति वर्षीं दोन तीन कोटि रुपयांचीं गलबतें येथें बांधून तयार होतात.

मी ज्या गृहस्थावर शिफारसपत्र नेलें होतें त्याची भेट झाली नाहीं. तेव्हां मुंबईच्या एका युरोपियन व्यापाऱ्याला मी नांवानें ओळखीत होतों, आणि त्याचें राहण्याचें ठिकाण मला ठाऊक होतें, त्याला जाऊन भेटलों. त्या गृहस्थाची तेथल्या मोठ्या कारखानदारांशीं ओळख नव्हती, परंतु तो मला दुसऱ्या एका मोठ्या व्यापाऱ्याकडेस घेऊन गेला, आणि त्याणें त्याची माझी ओळख करून दिली. तो गृहस्थ कारखाने पाहण्याचा माझा हेतु जाणून लागलाच निघाला आणि दीड दिवसांत त्याणें मला सात आठ कारखाने दाखविले. नंतर मला त्या मुंबईकर गृहस्थाकडेस पोंचवून तो निघून गेला, परंतु त्या भल्या गृहस्थानें स्वतांचें काम ठेवून आणि श्रम घेऊन मला अनेक कारखाने दाखविले, आणि मजवर लोभ दाखविला, हे त्याचे उपकार मी कधीं विसरणार नाहीं.

मी प्रथम चिटाचा कारखाना पाहिला. त्यांत कापड कसें धुऊन तयार होतें, त्याजवर तऱ्हतऱ्हेचे बुट्टे कसे निघतात, आणि तें लागलेंच कसें वाळतें हें सर्व मी डोळ्यांनीं पाहिलें. चीट छापण्याचे नव्यानव्या तऱ्हांचे नवेनवे तांब्याचे छापे (रोलर) एका मोठ्या सदरेंत कोरून तयार होत होते, त्या कामावर पुष्कळ माणसें लागलीं होतीं, या

सर्व कारागिरांस मोठमोठे पगार मिळतात. त्यांला नेहमी ठेवून नवे-नवे बुट्टे तयार करवितात. जुनी तऱ्हा लौकरच रद्द होते, कारण जुन्याच तऱ्हा ठेविल्या तर माल लवकर खपत नाहीं. छापण्याच्या निरनिराळ्या तऱ्हांचा रंग तयार होत होता. दुसरा कारखाना सुती रुमालांचा पाहिला. त्यांत लाखो रुमाल छापून तयार होत होते.

नंतर तिसरा कारखाना धोत्रांचा पाहिला. धोत्रांच्या किनारीवर बुट्टी कशी निघते तें एथें मी पाहिलें. चौथा कारखाना रेशमी कापडाचा पाहिला. पांचवा कारखाना पाहिला तो गालिच्यांचा होता. त्यांत लोंकर विणण्याची युक्ति व तजवीज केली आहे ती मोठी चमत्कारिक व अगत्य पाहण्यासारखी आहे. सहावा कारखाना पाहिला तो जामदानीचा किंवा पांढऱ्या कापडावर पांढरी बुट्टी काढण्याचा होता. सातवा कारखाना लोखंडाचें यांत्रिक सामान करण्याचा पाहिला, आणि आठवा कांचीचा पाहिला.

हा कांचीचा कारखाना फारच मोठा असून त्याचा धनी मोठा सज्जन होता. त्याणें मला कांचीची भट्टी दाखविली. या भट्टीजवळ मनुष्यें उभीं राहून कांचीचा कढत रस लांब नळींत एका टोंकाकडे घेऊन दुसऱ्या टोंकाकडून फुंका मारून आणि ती फिरवून कांचीस निरनिराळे आकार कसे देतात तें दाखविलें. कांचीच्या निरनिराळ्या जिन्नसांच्या निरनिराळ्या कृति दाखविल्या. कांचीवर पाहिजे तशी बुट्टी, वेल वगैरे कशी काढतां येते तें सर्व मला दाखविलें आणि समजावून सांगितलें. एकदोन साध्या कांचीच्या भांड्यांवर लागलीच बुट्टी काढवून दाखविली; आणि तीं मला बक्षीस केलीं. त्या गृहस्थाची सभ्यता, लायकी, आणि सौजन्य पाहून मी फारच प्रसन्न झालों. ह्याचे आणि दाखवावयास आलेल्या गृहस्थाचे उपकार मी लवकर विसरणार नाहीं.

हे सर्व कारखाने नजरेनें पाहिल्यावांचून त्यांविषयीं समजूत पडणें कठीण आहे; ह्मणून अधिक विस्तारें करून त्यांचें वर्णन करण्याची गरज दिसत नाहीं. ग्ल्यास्गो शहर "क्लैड" नदीच्या कांठीं आहे तें जरी एडिंबरो इतकें चांगलें नाहीं, तरी तें मोठें आणि अगत्याचें शहर आहे. पृथ्वीवर कोठेंही आगबोट चालत नव्हती तेव्हांच ह्या शहरांत क्लैड नदीवर पहिली आगबोट चालत होती. ह्या शहरीं सर्वांत उत्कृष्ट इमारत "रॉयल एक्सचेन्ज" ही आहे. तींत मोठमोठे व्यापारी नित्य जमतात. ड्यूक-ऑव-वेलिंग्टन याचा पुतळा लंडनांतील एक्सचेन्जजवळ घोड्यावर बसलेला आहे तसा ह्या एक्सचेन्जजवळही आहे. या शहरांत वस्ती सुमारें चार लक्ष आहे. मी हें शहर सोडून स्कॉटलंडांतील सरोवरें, डोंगरी प्रदेश आणि अरण्यें पाहावयास निघालों.

## ८. लॉख लोमंड सरोवर.

LOCH LOMOND.

स्कॉटलंडांतील सरोवरें आणि डोंगरी प्रदेश यांच्या स्वरूपाची फार प्रशंसा ऐकिली होती ह्मणून तीं पाहण्याची मला फार इच्छा झाली होती. अवघ्या ब्रिटन देशांत लॉख लोमंड हें सरोवर सर्वांत मोठें आहे, हें आणि दुसरें लॉख क्याट्रैन हीं दोन सरोवरें पाहून एडिंबरोस परत जाण्याची रेलवेष्टेशनावर मी टिकिट घेतली. ग्लास्गोहून लॉख लोमंड २० मैल आहे. मी ग्ल्यास्गोंतून मोठ्या सकाळीं निघून आगगाडींत बसलों तो एका कलाकानें या सरोवराजवळ जाऊन पोंचलों. हें सरोवर बालक नांवाच्या गांवाजवळ आहे. सरोवराच्या कांठीं एक लहानशी आगबोट तयार होती, तींत मी बसलों. मजबरोबर ह्या आगबोटींत आणखी पंचवीस युरोपिअन होते. आगबोटींत न्यहारीची सर्व तयारी होती. ज्यांस पाहिजे त्यांणीं खाल्लें, नंतर आगबोट निघाली.

अहाहा! गोड आणि निर्मळ पाण्याच्या सरोवरांत आगबोट जेव्हां

चालूं लागली तेव्हां आम्हांस केवढा आनंद झाला! आगबोटींत कसा हर्षाचा लोट आला आणि सर्व जण कसे सुप्रसन्न झाले! जरा पुढें गेलों तों पाण्याचा अंतच नाहीं असें वाटूं लागलें. अहाहा! हें केवढें मोठें सरोवर, याच्या चारही बाजूंस केवढे मोठे डोंगर, आणि यांत किती लहान लहान बेटें! स्वच्छ निर्मळ पाण्यांतून आगबोट चालली आहे, घटकेघटकेस नवीं बेटें दिसत आहेत, वारंवार पर्वतांचीं शिखरें दृष्टीस पडत आहेत, आणि त्यांवर हिरवेंगार रान व दाट झाडी लागली आहे, आणि मध्यें मध्यें स्वच्छ पाण्याचे धोत किंवा झरे दृष्टीस पडत आहेत! अशी रमणीय आणि मनवेधक मौज मी कधीं पाहिली नव्हती.

इतक्यांत पावसाचा रंग दिसूं लागला. सर्व आजूबाजूच्या प्रदेशाचें स्वरूप पालटलें. डोंगराचें आणि सरोवराचें रूप बदललें. जशी एकादी सुंदर नारी चित्त वेधण्यासाठीं सर्व अलंकार धारण करते तसें आतां ह्या डोंगरांनीं आणि सरोवरानें आपले अलंकार परिधान केले; परंतु पावसावांचून ते सर्व अलंकार निस्तेज दिसत होते, इतक्यांत मेघराजानें पुढें सरसावून तें न्यून काढून टाकलें. मेघवृष्टि होऊं लागली. एकाद्या रूपवती स्त्रीस जसें कज्जल शोभा आणितें तशी काळ्या आभाळांनीं पर्वतांस शोभा आणिली. प्रदेशाचें रूप व सौंदर्य इतकें बदललें कीं डोळे उघडून त्यांकडेस पाहवेना देखील; डोळे दिपूनच जात. विस्तीर्ण सरोवर, उंच पर्वत, सरोवरांतील असंख्यात लहान लहान बेटें, आणि त्यांवरची दाट झाडी, वरून काळेभोर ढग, आणि बारिकबारिकसा पाऊस, हा सर्व प्रकार मोठा रमणीय व मनोरंजक असा बनून गेला.

हें सरोवर २४ मैल लांब आहे, आणि एका मैलापासून सात मैलांपर्यंत रुंद आहे. यांत पाणी २० वांवें खोल आहे, आणि कांहीं ठिकाणीं १०० वांवांपेक्षांही अधिक आहे. या सरोवराच्या आजूबा-

नूला उंच डोंगर आहेत आणि त्या सर्वांत 'बेनलोमंड' हा फारच उंच आहे. त्याची उंची ३००० फुटींपेक्षां अधिक आहे. या सरोवराच्या लांबीच्या ह्या तडीहून त्या तडीस जाण्यास सुमारें तीन तास लागले. पलीकडेस उतरलों तों तेथें घोड्याच्या गाड्या आह्मांसाठीं तयार उभ्या होत्या. ज्यांला जशी जागा सांपडली त्याप्रमाणें सर्व त्या गाड्यांत बसले; आणि कांहींसें पुढें गेल्यावर दुसरें सरोवर आलें. तेथें आह्मी गाडींतून उतरलों.

## ९. लॉख क्याट्रैन.

LOCH KATRINE.

ह्या दुसऱ्या सरोवराचें नांव लॉख क्याट्रैन. ह्यांतही आह्मांसाठीं आगबोट तयार उभी होती. या सुंदर सरोवराचें पाणी गोड व निर्मळ होतें. तें केवळ स्फाटिकाप्रमाणें स्वच्छ होतें. किनाऱ्यावर गाई, बैल वगैरे गुरें पाणी पीत होतीं, आणि मनुष्यें जवळ उभीं होतीं, त्यांचें प्रतिबिंब पाण्यांत स्पष्ट दिसत असे. आमच्या आगबोटीचेंही प्रतिबिंब असें स्वच्छ दिसत होतें कीं जणू दुसरी आगबोटच पाण्याच्या तळाजवळून चालली आहे. या वेळीं पाऊस उभाला होता तरी आकाशांत अभ्रें होतींच, आणि सरोवर व आसपासचे डोंगर फारच सुंदर आणि रमणीय दिसत होते.

लॉख लोमंडापेक्षां हें सरोवर लहान खरें; परंतु याचें सौंदर्य कांहीं कमी नव्हतें. एथील उंच पर्वत केवळ गगनचुंबनच करीत आहेत असें भासे. ते राक्षसासारखे विशाळ व विक्राळ दिसत. असक्यांत उंच शिखराचें नांव "बेनविन्यू" असें आहे त्याची उंची २४०० फुटी आहे असें सांगतात. या उंच डोंगराच्या उंच शिखरावर जाऊन हें सरोवर आणि त्याचे आसपासची मौज पाहावी असें माझ्या मनांत होतें. या सरोवरांतून पलीकडे जाण्यास सुमारें दीड तास लागला. ए-

वढावेळपर्यंत माझ्या मनांत आनंदाच्या लहरी येत होत्या. मला ही अशी महायात्रा घडली ह्मणून मी आपणास धन्य समजलों. ह्या महा "वनयात्रे"च्या सरोवराचें "गंगाजळ" भरून घ्यावें असें माझ्या मनांत आलें. ह्या सरोवराचें दर्शन पुनः मला कधीं होईल!.

### १०. डोंगरांतील खोऱ्यांचें आणि वनाचें स्वरूप.

TROSACHS—ROCK AND WOODS SCENERY.

आह्मी सरोवराच्या कांठीं येऊन पोंचलों तों तेथें आम्हांसाठीं गाड्या तयार होत्या. त्यांत आह्मांला भावलें त्याप्रमाणें आह्मी जाऊन बसलों. आह्मांला आतां डोंगरांतील खिंडी किंवा खोरीं यांतून जावयाचें होतें आणि त्यांच्या स्वरूपाची मौज पाहण्यासारखी होती ह्मणून आह्मी गाडींत बाहेर उंच जागीं बसलों. गाडी चालूं लागल्यानंतर थोड्याच वेळानें सरोवर दिसेनासें झालें. आम्ही एका खोऱ्यामध्यें वन होतें त्यांत गेलों. इतक्यांत मेघराजाची स्वारी आली. बारिकबारीक पाऊस पडूं लागला. आह्मी भिजून चिंब झालों. पाऊस लागतां लागतां झपाऱ्यानें लागूं लागला, आमची विनवणी ऐकेचना. मला सरदी होण्याचें भय पडलें.

परंतु दुःखावांचून कशाचेंही सुख समजत नाहीं. पाऊस पडल्यामुळें जरा आह्मांला त्रास झाला खरा, परंतु आसपासचें सृष्टिस्वरूप इतकें सुंदर, रमणीय आणि मनवेधक झालें कीं आह्मा सर्वांस आनंदाच्या लहरी येऊं लागल्या, आह्मांतील पुष्कळजण मोठ्यानें गाऊं लागले, आणि उंच वांकड्या तिकड्या दऱ्याखोऱ्यांतून व दाट झाडींतून जातांना आनंदघोष गाजला. ही मौज मला इतकी गोड लागली कीं ती मी अजून न विसरतां तिच्या मिटक्या मारीत आहें. या खिंडीच्या व डोंगरी प्रदेशाच्या वनशोभेवर, एका प्रख्यात कवीनें रचलेल्या कवनांतील मासला दाखवून शेवटीं त्यांचा निरोप घेतों:—

"So wonderous wild, the whole might seem
The scenery of a fairy dream"

ह्मणजे हा सर्व देखावा इतका अद्भुत चमत्कारिक आहे कीं स्वप्नांत आकाशांतील यक्षिणीच दृष्टीस पडत आहेत असा भास होतो. सरोवराशिवाय नुसतें अरण्याचें व डोंगरांचें यासारखें स्वरूप मी आपल्या देशांत एक दोन ठिकाणीं पाहिलें आहे. परंतु सरोवराच्या योगानें यास जी विशेष शोभा आली आणि मला जो हर्ष झाला तो लेखणीनें लिहून कळवितां येत नाहीं. असे चमत्कार पाहण्याची मला फार आवड आहे, कारण ते पाहून मनांत परमेश्वराच्या महत्वाविषयीं थोर विचार आल्यावांचून, आणि त्याजविषयीं भक्तिभाव उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं.

ह्या खिंडींतून व रानांतून आह्मी बाहेर पडलों तेव्हां एका हॉटेलांत गेलों. माझे पाय थंडीनें अगदीं गार होऊन गेले. मी लागलींच माझीं वस्त्रें पालटलीं. शेकटी तयारच होती, परंतु एका शेकटीनें सर्वांचें काय वळणार? मजबरोबरच्या लोकांनीं मजवर मेहरबानी करून शेकटीजवळ जागा दिली. शेक घेऊन जरा ऊब आली तेव्हां अंमळ जीव स्वस्थ झाला. त्यांणीं हा मजवर उपकार केला ह्मणून मी त्यांचे आभार मानिले, तेव्हां त्यांतील एक गृहस्थ असें ह्मणाला कीं तुह्मी परदेशी ह्मणून आमच्या देशांत पाहुणे आहां असें समजलें पाहिजे. हें त्याचें भाषण ऐकून मी फार संतोष पावलों. तेथें सुमारें दीड तास विसावा घेऊन आह्मी निघालों आणि आगगाडीच्या ष्टेशनावर जाऊन पोंचलों.

## ११. स्तर्लिंग क्यासल.

STIRLING CASTLE.

क्यालंडर ह्मणून एक गांव आहे तो सोडून १६ मैल पुढें गेल्यावर ४० मिनिटांनीं, इतिहासांत प्रसिद्ध असा जो स्तर्लिंग क्यासल त्या-

जवळ जाऊन पोंचलों. तो किल्ला पाहावयास आह्मी गाडींतून उतरलों, आणि किल्ल्यावर चढलों. हा किल्ला पाहण्यासाठीं मजबरोबर तिघेच सोबती उरले, बाकीचे सलाम करून पुढें चालते झाले. ह्या किल्ल्यांत हैलंडरांचें लष्कर होतें. एकजण हैलंड-ब्यागपैप हें वाद्य वाजवीत होता. त्याला आह्मी आमची किल्ला पाहाण्याची इच्छा दर्शविली. त्याणें आपला एक सोबती आह्मांबरोबर दिला, त्याणें किल्ल्यांतला वाडा दाखविला.

ह्या वाड्यांत पूर्वीं स्कॉटलंड देशाचे कित्येक राजे राहत असत. कित्येक राजांचें जन्म या किल्ल्यांत झालें. "डॅग्लसरूम" नांवाची एक खोली पाहिली ती एका स्त्रीनें दाखविली. तिणें त्या खोलीसंबंधी सर्व वृत्तांत थोडक्यांत सांगितला. तो येणेंप्रमाणेंः—दुसरा जेम्स राजा राज्य करीत असतां "डग्लस" नामक एक सरदार होता. त्याणें राजाचा अधिकार कमी करण्यासाठीं एक कागद करून त्यावर इतर सरदारांच्या सह्या घेतल्या. हें राजाला समजतांच त्याणें या किल्ल्यांत त्याला बोलण्यासाठीं ह्मणून बोलाविलें. तो आला तेव्हां राजानें त्याला त्या खोलींत घेऊन जाऊन सांगितलें कीं मजविरुद्ध तूं जो कागद केला आहे तो फाडून टाक. सरदारानें तें ऐकिलें नाहीं ह्मणून राजानें तेथच्या तेथेंच त्याचा प्राण घेतला, आणि प्रेत खिडकीवाटे बाहेर झुगारून दिलें. यामुळें या खोलीचें नांव "डग्लसरूम" असें पडलें.

नंतर किल्ल्यावरून खालची मौज कशी दिसते ती पाहिली. भोंवतालें मोठें मैदान आणि रान होतें. तें किल्ल्यावरून फारच सुंदर दिसलें. "फोर्थ" नदी समोर शेतांतून वाहत होती तेणेंकरून तर त्या देशस्वरूपास फारच शोभा आली होती. असें सांगतात कीं या मैदानांत पूर्वीं राजे घोड्यांच्या मोठ्या पैजा लावून मौजा क-

रीत असत. आमचा एक सोबती फ्रेंच होता, तो मजबरोबर उभा राहून किल्ल्यावरून खालीं पाहत होता. इतक्यांत त्याची टोपी वाऱ्यानें उडून थेट खालीं गेली! ती आह्मास दाखविण्याकरितां बरोबर आलेल्या हैलंडरानें आणून दिली. आह्मी खालीं उतरलों इतक्यांत संध्याकाळ झाला. नंतर आगगाडींत बसून आह्मी परत एडिंबरोस गेलों.

मी स्कॉटलंडांत १५० मैल प्रदक्षिणा करून पुनः एडिंबरोस येऊन पोंचलों. तेथें एक दिवसाचा विसावा घेऊन दुसरे दिवशीं संध्याकाळीं आगगाडींत बसून निघालों, आणि ४०० मैलांची मजल करून तिसरे दिवशीं दहा वाजतां लंडनांत येऊन पोंचलों. याप्रमाणें विलायतेंतील प्रांतांत जातांयेतां मिळून एकंदर सुमारें १००० मैल पर्यटन केलें. आणखी वेळ असून अनुकूलता असती तर आणखीही फिरून दुसरे पुष्कळ गांव, कारखाने, आणि स्थळें पाहण्याची मला मोठी इच्छा होती. ईश्वर करील तर, ही आणि याप्रमाणेंच युरोपांतील इतर देश पाहण्याची आणि अमेरिकेस जाण्याची इच्छा आज नाहीं तर कधीं तरी पूर्ण होईल.



## १२. प्रवासाची समाप्ति.

CONCLUSION.

आतां मी आपल्या प्रवासाची समाप्ति करतों. विलायतेंतील प्रांतांत फिरून आल्यानंतर, थोड्याच दिवसांनीं मी स्वदेशीं परत येण्यास निघालों. पारिस, लायन्स, मार्सेल्स, माल्टा, केरो आणि आदन यांच्या वाटेनें इ० सन १८६३ त सप्तम्बर महिन्याच्या अखेरीस मी आपली जन्मभूमिका—मुंबई—एथें येऊन पोंचलों. मी इंग्लंडची महायात्रा करून सात महिन्यांनीं घरीं परत आलों. इंग्लंडांत दोनतीन वर्षें राहावें असा माझा बेत होता, परंतु मला कांहीं वर्षें छातींत रोग झाल्यामुळें इंग्लंडांतील डांकराच्या शिफारशीवरून तेथील हिंवाळ्याच्या अगोदर मला परतावें लागलें. हें मला एथें सांगितलें पाहिजे कीं विलायतेंत एक दिवस देखील मला हा रोग जाणवला नाहीं इतकेंच नाहीं, तर प्रवास करून आल्यापासून तो निघूनच गेला असें दिसतें. इंग्लंडांतील प्रवासापासून मला हा एक मोठा अलभ्य लाभ झाला.

माझ्या प्रवासाविषयीं लोक पाहिजे तें ह्मणोत, परंतु मला जें चांगलें आणि योग्य वाटलें तें मी केलें. यामुळें मजवर जीं दुःखें येऊन पडलीं आहेत तीं मी धैर्य धरून सहन करीत आहें; परंतु मी सर्वांत मोठा संतोष हा मानतों कीं मला ही मोठी यात्रा घडली. या यात्रेच्या स्मरणानें मला माझ्या दुःखांत जें सुख होत आहे त्यांतच मी मोठा आनंद मानतों. मी असें समजतों कीं देशाचें संरक्षण करण्याच्या प्रसंगीं कितीही सैन्य असलें तरी समरांगणाच्या अग्रभागीं जे असतात ते बहुत करून मरावयाचेच अथवा घायाळ व्हावयाचेच; त्याप्रमाणेंच सुधारणुकीच्या कोणत्याही मोठ्या कामांत जे कोणी प्रथम पुढें सरसावतील त्यांजवर संकटें आणि क्लेश पडावयाचेच. हा दुःखाचा वांटा घेण्यास जोवर सुधारणुकीचे साहाय्यकार आणि मित्र हिंमत

करून पुढें सरसावणार नाहींत तोंवर सर्व जात किंवा देश आनोभान कोणत्याही सुधारणुकीस अनुकूल होणार नाहीं. सुधारणूकच काय, पण कोणतेंही मोठें कार्य सर्व जातीचें एक मत होऊन आणि एक विचार होऊन आजपर्यंत कधीं झालेलें नाहीं, आणि मला वाटतें कीं पुढेंही होणार नाहीं.

जो प्रथम पुढें सरसावतो त्याला अडथळे आले ह्मणून सुधारणूक कांहीं अडकून राहावयाची नाहीं. विलायतेस प्रथम जाणाऱ्या थोड्याशा गृहस्थांला त्रास झाला ह्मणून विलायतेस जाण्याचा मार्ग बंद राहील असें कोणी कधीं समजूं नये. राव साहेब महीपतराम यांजवर ह्या बाबतींत जीं संकटें येऊन पडलीं त्यांमुळें जसा मी अडकून राहिलों नाहीं तसाच माझें पाहून दुसरा कोणी जाणाराही अडकणार नाहीं असें मला वाटतें. इंग्रजी शिकून जेव्हां इंग्रज लोकांचा स्वतंत्रपणें विचार करण्याचा बाणा आपल्या लोकांत सुरू होईल तेव्हां प्रत्येक गृहस्थास असें वाटूं लागेल कीं "मी आपलें स्वतंत्रपण जातीस विकून, तिचा कांहीं बंदा झालों नाहीं. जें कर्म मला चांगलें आणि योग्य वाटेल तें करतांना कोणी माझ्या आड येईल किंवा माझे हात पाय बांधून टाकील तर तो त्रास सहन करण्यापेक्षां मरणें बरें." जेव्हां स्वतंत्रपणाचा असा कढ आपल्या लोकांस येईल तेव्हांच जातीचा जुलूम आणि बंधन तुटून जाईल, आणि सुधारणुकीचें महाद्वार उघडेल. आपलें भरतखंड सांप्रत ज्या निकृष्ट दशेस येऊन पोंचलें आहे आणि त्यामुळें ज्या आपदा, क्लेश, संकटें आणि अपमान त्यावर गुजरले आहेत व गुजरत आहेत, त्यांचें निवारण होऊन, या देशाचा पुनः उत्कर्ष होणें आणि पृथ्वीवर याची प्रतिष्ठा वाढणें तर, एथील लोकांमध्यें प्रत्येकानें, जातीपातीचें किंवा इतरांचें भय न बाळगतां, स्वतंत्रपणें विचार आणि तदनुसार आचरण करण्याचें धैर्य के-

लेंच पाहिजे. असें करणारांस आरंभीं कांहीं दु:खें आणि छळणूक होईल ती सोसण्यास सिद्ध झालें पाहिजे. तसें केल्यावांचून आपल्या देशास कधीं सुदीन येणार नाहीं, आणि आपले लोक कधीं सुखी होणार नाहींत. आतां, शेवटीं पुन: मी असें सांगतों कीं माझ्या प्रवासाविषयीं लोक पाहिजे तें बोलोत, त्याचीं फळें गोडच निपजतील अशी मला आशा आहे. हे परमेश्वरा! तूं ही माझी आशा लौकर पुरीव! आणि माझ्या देशबांधवांस जातीच्या बंधनांतून मुक्त कर! तथास्तु.



# मुख्य मुख्य चुकांचें शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४ | २ | रंगण्याचे | रंगविण्याचे |
| ३६ | ११ | व्यापारा | व्यापारी |
| ४६ | २० | पुढ | पुढें |
| ५० | ५ | माडला | मोडला |
| ५० | १५ | आंणून | आंतून |
| ६५ | ३ | चालण्याचा | चालविण्याचा |
| ७१ | २१ | मळ | अंमळ |
| ९० | १८ | मिनाऱ्याचीं | मनोऱ्याचीं |
| १०५ | १ | योग्यतेनुसार | योग्यतानुसार |
| १९८ | १८ | हाता | हातीं |
| २१७ | २० | उपोदघात | उपोद्घात |
| २७१ | २ | आकृतिनीं | आकृति |
| २८२ | ३ | नाहीं | नाहींत |
| ३२० | १० | लोकांस | लोकांत |
| ३३१ | १२ | त्या | †या |
| ३८९ | २२ | कोणीही | कोणाही |
| ४२३ | २ | सुत्दत्संबंधी | सुहृत्संबंधीं |
| ४२९ | ३ | स्वातंत्र | स्वातंत्र्य |
| ४५२ | १×३ | देशाच्या | त्या देशाच्या |
| ४९६ | १४ | चिष | चिप |

.......................................

# TRAVELS IN ENGLAND.

## *(First Gujarati Edition)*

## OPINIONS OF THE PRESS.

---

*From "The Times of India," July* 16, 1866.

TRAVELS IN ENGLAND. By Karsandás Mulji. Bombay, 1866.

ı addition to its introductory matter, the volume contains upwards of 360 ›s of printed matter. It also contains a large number of steel, copper, and d engravings, admirably executed in general, which add greatly to its value. · composed in simple, correct, and fluent Gujaráti, and it is altogether most ting and attractive. It is not a cunning concoction of pilfered leaves ı travellers' 'Guides,' but the genuine product of the author's observation, ıiry, and instruction by friends. His intelligence and moral feeling, as well ıis curiosity and wonderment, it shews us were exercised by him during his ıderings abroad. In his descriptions he always bears in mind the circum-ıces of his native readers; and he successfully accommodates himself to what knows to have been their wishes for information. He has contrived to dense his information: and he has found space to describe his journey ›ugh Egypt and France to London; to notice the external features and iosities of the British capital; and to describe its houses and public edifices, principal institutions and sights, its places of recreation and its exhibitions. devotes a chapter to the social state and habits of the people and another the etiquette and usages of society. He discusses the general character of British nation, with which he is very favourably impressed; the sources of gland's greatness, and the power and constitution of the British Ráj. He ıcludes by a narrative of a hasty tour which he made in the provinces, exten-g to Edinburgh and Glasgow, and to the Scottish Lochs, where his exhilara-ı seems to have reached its *acme.* His book is fraught throughout with truction to his countrymen; it is everywhere notable for judgment and good ıse; and it contains nothing offensive to good taste or good breeding.

*From the "Bombay Saturday Review," August 4th,* 1866.

KARSANDÁS MÚLJI'S TRAVELS.*—A more beautiful volume than this has ver left the Bombay press. Its typography, executed by Mr. Nánábhái ıstamji Ránína, is excellent. It is profusely illustrated by admirable engra-ıgs in steel, copper, and wood and by plain and tinted lithographs of personages,

* Travels in England (in Gujaráti), by Karsandás Mulji.

scenes, and other objects interesting to all travellers especially to those from the distant East. Its style of composition is plain, easy, chaste, and fluent; and free alike from high and low words, either unintelligible to the majority of readers, or offensive to persons of education and taste. Sound judgment is evinced throughout its pages in the selection of subjects for notice: while its narrative is so natural, that the reader gets the impression that it exhausts in a general way every subject of which it treats. It shows us the constant delectification of the traveller in, to him, novel and interesting scenes and social developments; but it never reveals him to us in the attitude of gaping wonder and ignorant bewilderment characteristic of Mr. Verdant Green, or of Messrs. Smith, Jones, and Robinson in their peregrinations. The author shows that he was prepared for travel by previous reading and inquiry; and he appropriately puts everything in its right place for the apprehension and appreciation of his countrymen, for whose information and benefit he writes. They learn from his pages how the prevailing prejudices against foreign journeying may be subdued by ancient and modern examples of Indian travel, which should be more effective than the Smritis, the products of the darkest ages of Indian history; and how the inconveniences of an oceanic voyage may be mitigated by well-provided and well-conducted steamers, by agreeable society on board a ship, and by the interest of intermediate ports, cities and countries. These pages promise a cordial welcome to the sons of India at both the capitals of England and Scotland, and throughout the provinces, not only by philanthropists especially interested in the East, but by all classes of the people, who have neither the conceit of small and "brief authority" on the one hand, nor of rude and violent loaferism on the other, which are so often viewed with dislike or disgust in India. They treat the innumerable attractions which are found in England to the inquisitive Indian—in the external appearance of the British cities and towns; in their streets, houses, and public edifices; in their principal institutions, and places of public instruction and amusement; in their progress in arts, science, literature and religion; in their mechanical contrivances and resources; in the outward and inward economy of English society; and, in short, in all the matters which have contributed to the national pre-eminence and influence. They also notice the features of the best of our rural scenery, and the delight which may be found in visiting our valleys and mountains, our rivers, firths, and lakes. The value attached to the book by the countrymen of the author may be easily understood by the fact that the whole impression of it has been purchased within a few weeks. Not till a new edition of it appears will the order which the Government has very considerately given for five hundred copies be implemented. We are glad to learn that it has been determined to translate it into Maráthi, in which language it will be as well patronized, both privately and publicly, as in Gujurati. It is to the general Indian public what Mr. Dosábhái Framji's book of travels, also in every respect a superior book, is to the Pársis.